# बौद्धधम्म जिज्ञासा
(BAUDHADHAMMA JIDNYĀSĀ)

**संकलिका : कीर्ती पाटील**



---

**प्रकाशक :**
विकास पाटील,
२३, उरुवेला कॉलनी,
वर्धा रोड, नागपूर - ४४० ०१५
फोन : ०७१२-२२२६९१२

---

**टाईप सेटींग :**
श्रीपाद एन्टरप्राईजेस
योगलक्ष्मी कॉम्प्लेक्स,
मोदी नं. १, सीताबर्डी, नागपूर
फोन : ०७१२-५६१२८९४

---

**द्वितीयावृत्ती :**
१२ ऑक्टोबर, २००५
अशोक विजयादशमी

---

Printed and donated for free distribution by
The Corporate Body of the Buddha Educational Foundation
11F., 55 Hang Chow South Road Sec 1, Taipei, Taiwan, R.O.C.
Tel:886-2-23951198,Fax:886-2-23913415
Email:overseas@budaedu.org
Website: http://www.budaedu.org

Printed in Taiwan

# समर्पण

सब्ब पापस्स अकरणं
कुसलस्स उपसंपदा
सचित्त परियोदपनं
एतं बुद्धान सासनं।

ह्या न्याय्य व करुणामय शिकवणीमुळे मला लाभलेले दीर्घायुष्य, सुख, समाधान व आरोग्य यासाठी मी तथागताचरणी हे माझे चतुर्थ पुष्प "बौद्धधम्म जिज्ञासा" सविनयभावे समर्पित करीत आहे.

- कीर्ती पाटील

# दोन शब्द

माझा मुलगा चि. विकास ह्याला एकदा कर्नल एच. एसं. ऑलकॉट ह्या लेखकाचे 'Buddhist Catechism' म्हणजे 'बौद्धधर्मीय प्रश्नोत्तरी' हे सुमारे ११५ वर्षांपूर्वी इ. स. १८८१ मध्ये प्रकाशित झालेले इंग्रजी पुस्तक पाहावयास मिळाले. त्यात प्रश्नोत्तर रूपाने बुद्ध, धम्म आणि संघ यांवरील माहिती दिलेली होती. ते पुस्तक श्रीलंका सरकारच्या सांस्कृतिक मंत्रालयातर्फे प्रकाशित झालेले असून, तेथील शालेय पाठ्यक्रमासाठी मंजूर केलेले होते. त्यापूर्वी 'मिलिंद प्रश्न' हा बौद्ध साहित्यातील अत्यंत जुना व प्रमाणित असा एकच ग्रंथ उपलब्ध होता. अलीकडे पूज्य भन्ते कौसल्यायन यांचे 'An Intelligent Man's Guide to Buddhism' हे फारच चांगले पुस्तक पाहावयास मिळाले व लवकरच त्यांनी स्वतःच्याच पुस्तकाचा हिंदी अनुवादही प्रकाशित केला.

बौद्ध धम्मावरील कोणत्याही प्रश्नाचे निश्चित उत्तर मिळावयास बरीच शोधाशोध करावी लागत असते. बौद्धजनांच्या मनांत उद्‌भवणाऱ्या प्रश्नांची रीतसर मांडणी केलेली असलेले व त्यांची उत्तरे विनासायास मिळतील अशा तऱ्हेचे एकही पुस्तक आतापावेतो मराठीतून प्रकाशित झालेल्या बौद्ध साहित्यात आम्हाला पाहावयास मिळाले नाही. मराठी वाचकांना भासत असलेली ही उणीव दूर करावयाच्या दृष्टीने प्रस्तुत पुस्तक लिहावयाचा आम्ही हा अल्पसा प्रयत्न केलेला आहे.

या पुस्तकातील प्रश्नांची निवड करताना जी माहिती बौद्ध विद्यार्थ्यांना व साधारण बौद्ध जनतेला उपयुक्त होईल, एवढीच संक्षिप्त माहिती येथे देण्याची दक्षता घेतलेली आहे. बौद्ध साहित्य समुद्रासारखे अगाध आहे. त्या साहित्याची थोडीदेखील दखल घ्यायचे ठरविले तरी एक फार मोठा ग्रंथ निर्माण होईल. यास्तव अभिधम्मासारख्या गहन विषयाला हात न लावता, केवळ मोजकी परंतु सर्वसाधारण बौद्धजनास धम्माचे ज्ञान होण्याइतपत माहिती येथे देण्यात आलेली आहे. आम्हास असे वाटते की, या आधुनिक जगातील प्रत्येक शालेय विद्यार्थ्याला बौद्ध धम्माविषयी एवढी माहिती असणे आवश्यक आहे.

येथील प्रश्नोत्तरांची माहिती मिळविण्यास मला अनेक बंधुभगिनींची मदत झाली. चर्चेच्या रूपाने बराचशा प्रश्नांची उकल झाली. मी त्या सर्वांची ऋणी आहे. बौद्ध धम्मात आत्म्यास स्थान नाही, परंतु पुनर्जन्मास आहे, हे कसे या धाकट्या मुलाने (आयु. निश्चयने) विचारलेल्या प्रश्नाचा उलगडा करावयास बरीच शोधाशोध करावी लागली व पुस्तकाचे काम सुमारे दोन वर्षे लांबणीवर पडले. बौद्ध साहित्यांमध्ये सांगितलेल्या ''या जन्माचे कर्म पुढच्या जन्मी

वारसा म्हणून मिळते'' ही कल्पना समजण्यास बरीच कठीण आहे. पीएच.डी. चे अनेक प्रबंधही या विषयावर स्पष्टपणे प्रकाश टाकू शकलेले नाहीत. त्यास मुख्य अडचण ही असली पाहिजे की, आतापावेतो विज्ञानाने (Science) केलेली प्रगती या गोष्टींचे समाधानपूर्वक आकलन करावयास अपुरी आहे. यास्तव प्रेत, भूत, अशरीर जीव, इद्धि (Super natural power), सिद्धि, दुसऱ्यांच्या मनातील विचारांना तत्क्षणीच जाणणे, वगैरे गोष्टी ज्या बौद्धकालीन साहित्यात सर्रासपणे उपस्थित होत्या, त्यांचा छडा अजूनही लागलेला नाही. त्यांना आत्मसात करावयाच्या पद्धती (Techniques) शब्दातीत असून त्या केवळ अनुभवाने आत्मसात होऊ शकणाऱ्या असाव्यात, असे आम्हास वाटते. जसे निर्वाणाच्या अवस्थेचा बोध केवळ शब्दांनी वर्णन करून होत नाही, तो केवळ अनुभवला जाऊ शकतो. (Can only be experienced).

या पुस्तकाच्या टाईप सेटिंगसाठी न्यू विदर्भ कॉम्प्यूअर इन्स्टिट्यूट, गजाननगर, नागपूरच्या सौ. पांडे व मुद्रणासाठी रवींद्र आर्ट्स, यशवंत स्टेडियम, नागपूरचे श्री. म. म. कानिटकर व त्यांचे सुपुत्र श्री. रवींद्र यांची बरीच मदत झाली व त्यांनी जातीने लक्ष घालून पुस्तक वेळेवर छापले, याबद्दल मी त्यांची आभारी आहे.

माझ्या अमृतजयंतीला या पुस्तकाचे प्रकाशन होत असलेले पाहून मला अत्यंत समाधान लाभलेले आहे. चोखंदळ वाचकवर्गाने अनपेक्षितपणे राहिलेल्या चुकांबद्दल क्षमा करून, चुकांची दुरुस्ती पाठविल्यास मी त्यांची अधिकच ऋणी होईल.

प्रा. डॉ. भाऊ लोखंडे यांच्यासारख्या विद्याव्यासंगी आणि बौद्ध तत्त्वज्ञानावर असीम श्रद्धा ठेवणाऱ्या व्यक्तीने दिलेल्या प्रस्तावनेबद्दल मी त्यांची अत्यंत ऋणी आहे.

दि.: १३ ऑगस्ट, १९९७

**सौ. कीर्ती पाटील,**
२३, उरुवेला कॉलनी,
वर्धा रोड, नागपूर-१५

# शुभकामना !

"भारतात बौद्धधम्माच्या वृक्षाची पाने वाळली असली तरी त्याची मुळे मात्र हिरवीगार आहेत. त्यांना जर थोडे पाणी मिळाले तर बौद्धधम्माचा वृक्ष पुन्हा फोफावून आल्याशिवाय राहणार नाही" अशी खात्री बोधिसत्त्व बाबासाहेब आंबेडकर यांना वाटत होती. त्या वृक्षाला बाबासाहेबांनी १४ ऑक्टोबर, १९५६ ला पाच लाख अनुयायांच्या हातांनी जलसिंचन केले आणि आत्मविश्वासपूर्वक गर्जना केली की आता भारतात आलेली बौद्धधम्माची लाट कदापीही परत जाणार नाही. त्याच आत्मविश्वासाच्या बळावर त्यांनी पुनःश्च ऐक भीमप्रतिज्ञा उच्चारली, "जर मी काही काळ अधिक जगलो तर अक्खा भारत बौद्धमय करून दाखवीन". त्यासाठी त्यांनी दिल्ली, मुंबई, मद्राससारख्या महानगरात मोठेमोठे बुद्धविहार उभारण्याची योजना बोलून दाखविली आणि श्रीलंकेतील पाली भाषेच्या जाणकारांकडून पालीतील त्रिरत्नवंदना, जयमंगल अष्टगाथा आणि त्रिशरण पंचशीलाच्या रेकॉर्ड्स तयार करवून घेतल्या. स्वतः बौद्धपूजापाठ नावाची छोटीशी पुस्तिका प्रकाशित केली. सामान्य जनतेला बौद्धधम्माचे आचार-विचार आणि तत्त्वज्ञानाबरोबरच तथागत बुद्धाचे चरित्र समजून घेता यावे म्हणून 'दी बुद्धा ॲन्ड हिज धम्मा' नावाचा आधुनिक बौद्धांचा बायबल शोभेल असा धम्म ग्रंथही लिहून ठेवला. त्याबरहुकूम आचरण करण्याचा उपदेश करताना महारामांगांचा धम्म म्हणतील असे वर्तन घडू देऊ नका असा धोक्याचा व सावधगिरीचा इशारापण द्यायला ते विसरले नाहीत. मोझेसने आपल्या ज्यू लोकांना जशा टेन कमांडमेंट्स दिल्यात तशाच बाबासाहेबांनी आपल्या शिष्यांना बावीस प्रतिज्ञा दिल्यात. स्वाभाविकपणे त्यांचा आनंद गगनात मावेना आणि त्या आनंदाच्या भरात बाबासाहेब म्हणालेत, "आज माझा पुनर्जन्म झाला. माझी नरकातून मुक्ती झाली."

परंतु आपल्या अनुयायांना बोट धरून चालायला शिकवायच्या आधीच बाबांचे महापरिनिर्वाण झाले आणि नवदीक्षित बौद्ध जनतेवर आकाशच कोसळले. आता त्यांना 'बुद्धा अँड हिज धम्माशिवाय दुसरा 'गुरू' च उरला नाही. तथागत बुद्ध अंतिमसमयी आनंदाला म्हणाले होते, आनंदा ! माझ्या निर्वाणानंतर मी तुम्हाला उपदेशिलेला धम्मच तुमचा 'गुरुशास्ता' समजून आचरण करावे. बाबासाहेबांना अंतिम समयी असा संदेश देऊन जाण्याचीही संधी मिळाली नाही.

अशा परिस्थितीत बौद्ध जनतेने सापडेल त्या माध्यमातून धम्म जाणून घेण्याचा प्रयत्न केला आणि साक्षात आचरणालाही सुरुवात केली. परंतु बौद्धधम्मात पूजाअर्चा, प्रार्थना, नवसायास, बळी आदींना वाव नसल्यामुळे बुद्धिवादाच्या आधारावरच धम्माच्या शंकाकुशंकाचे निरसन करणे भाग पडले. त्या कामी भदन्त आनंद कौसल्यायन यांची 'बौद्धधम्म की बुद्धिवादी समीक्षा' आणि 'ॲन इंटेलिजन्ट मॅन्स गाईड टू बुद्धिझम' ही पुस्तके फारच

उपयुक्त ठरलीत. त्यांचे स्वरूप प्रश्नोत्तरांचे असल्यामुळे ती समजायला सोपी आणि उद्‌बोधक ठरलीत. दुसरा ग्रंथ 'मिलिंदप्रश्न', 'मिलिन्दपञ्हो' किंवा 'क्श्चन्स् ऑफ किंग मिनँडर' या नावाने विश्वविख्यात आहे. त्यांचे हिंदी भाषांतर भिक्षू जगदीश काश्यप यांनी प्रसिद्ध केले होते. त्यातील काही भाग गाळून महत्त्वाच्या प्रकरणांचा मराठी अनुवाद दिवं. आचार्य मा. फ. गांजरे यांनी अशोक प्रकाशनातर्फे प्रसिद्ध केला. त्यानंतर मग इतरांनीही काही अनुवाद प्रसिद्ध केलेत. परंतु हे दोन ग्रंथ जनतेच्या हाती आधी पडलेत. परंतु, भदन्त आनंद कौसल्यायनांच्याही खूप आधी १८८१ साली कर्नल ऑलकॉट यांचा 'बुद्धिस्ट कॅटेचिझम' 'बौद्ध प्रश्नोत्तरी' नामक ग्रंथ प्रकाशात आला होता. अनागारिक धम्मपाल यांनी १८९१ साली या कर्नल ऑलकॉट यांच्याबरोबरच बुद्धगयेला येऊन कित्येक शतकानंतर बुद्ध जयंतीला धम्मध्वज फडकावून बुद्धगया महाविहारमुक्तीची प्रतिज्ञा केली होती.

कर्नल ऑलकॉट यांचे श्रीलंका सरकारने प्रकाशित केलेले उपरोक्त पुस्तक श्रीमती कीर्ती पाटील यांचे पुत्र आयुष्यमान विकास यांच्या हाती लागले आणि त्यांच्याच माध्यमातून बौद्धधम्म जिज्ञासा नावाचे सदरहू पुस्तक मराठीत साकार झाले. या पुस्तकामुळे मराठी वाचकांच्या मनांत उद्‌भवणाऱ्या अनेकविध शंकाकुशंकाचे निरसन व्हायला आणि त्यांच्या ज्ञानात भर पडायला मदत होईल. बौद्ध साहित्याच्या गहनता व अगाधतेची जाणीव संकलनकर्त्या लेखिकेला असल्याचे त्यांच्याकडूनच स्पष्ट होते. त्यांनी याची प्रांजळ कबुली देत म्हटले आहे, " बौद्धसाहित्य समुद्रासारखे अगाध आहे. यास्तव अभिधम्मासारख्या गहन विषयाला हात न लावता, केवळ मोजकी परंतु सर्वसाधारण बौद्धजनांस धम्माचे ज्ञान होण्याइतपत माहिती येथे देण्यात आली आहे. प्रत्येक शालेय विद्यार्थ्याला बौद्धधम्माविषयी एवढी माहिती असणे आवश्यक आहे. बौद्धजनांच्या मनात उद्‌भवणाऱ्या प्रश्नांची रीतसर मांडणी करावयाच्या दृष्टीने आणि त्याची मराठी वाचकांना भासणारी उणीव दूर करण्याच्या हेतूने हे पुस्तक तयार करण्यात आले आहे." श्रीमती कीर्ती पाटील यांचा हा प्रयत्न खरोखरच स्तुत्य आणि अभिनंदनीय आहे.

ही रचना पाच खंडांत विभक्त असून भगवान बुद्धांचे जीवनचरित्र, धम्माची शिकवण, बौद्धसंघ, बौद्धधम्माचा अभ्युदय व प्रसार तसेच बौद्धधम्म आणि विज्ञान अशी त्यांची नावे आहेत. प्रत्येक खंडातील प्रकरणातून विविध विषयांवर प्रश्नोत्तरे ग्रंथित केली आहेत. पहिल्यात बुद्धचरित्राचा परिचय करून देण्यात आला असून दुसऱ्या खंडात बौद्ध तत्त्वज्ञानाचे विश्लेषण केले आहे. तिसऱ्या खंडात भिक्षूसंघाच्या निर्मितीपासून तर संघाच्या नियम व संघ विघटनाचेही विवेचन आढळते. चवथ्या खंडात बौद्धसंगीती व बौद्धसाहित्य, प्रियदर्शी अशोकाचे धम्मप्रसाराचे महान कार्य, बौद्धधम्माचा ऱ्हास व पुनरुत्थान वर्णिले आहे. पाचव्या खंडात बौद्धधम्माला वैज्ञानिक कसोटीवर कसून दाखवण्यात आले आहे. पाचही खंडात नानाप्रकारच्या जिज्ञासांची अतिशय समर्पक पद्धतीने पूर्ती करण्याचा प्रयत्न केला आहे.

मुळातून वाचताना वाचकांना याचा प्रत्यय येईलच.

आज बाबासाहेबांच्या व तथागतांच्या प्रतिमांचे पावित्र्य भंग करण्याचे नीचपणाचे कारस्थान करण्यात येत आहे. बुद्ध व बाबांच्या अनुयायांनी आपल्या नेत्रांतच नव्हे तर हृदयात बाबांची प्रतिमा आणि शिकवण एकसमयावच्छेदेकरून जीवापाड जोपासून ठेवली पाहिजे. अन्यथा, नुसत्या प्रतिमा जपल्यात आणि शिकवणीचा विसर पडला तर आम्ही बुद्ध व बाबांच्या तत्त्वज्ञानाचे मारेकरी ठरू! प्रियदर्शी अशोकाने निर्मिलेल्या ८४ हजार बौद्ध स्मारकांना प्रतिक्रांतिवादी फंडामेंटॅलिस्ट धर्मवेड्यांनी नष्ट केले, परंतु बुद्धाचे आचार आणि विचार त्यांना नष्ट करता आले नाही. आजही संपूर्ण दक्षिणपूर्व आशिया बुद्धांच्या जयजयकाराने दुमदुमतो आहे. चीन, जपान, मंगोलिया, तिबेट, नेपाळ, भूतान, श्रीलंका, ब्रह्मदेश, थायलंड, व्हिएतनाम, कंबोडिया, इन्डोनेशिया एवढेच नव्हे तर रशिया, जर्मनीसकट इंग्लंड, अमेरिकाही बुद्धप्रभावापासून अलिप्त राहिलेली नाही. संपूर्ण युरोपात बौद्धधम्माची लाट उसळली आहे. बौद्ध धम्माचे तत्त्वज्ञान आणि विपश्यना ध्यान सर्वांच्या गळ्यातील ताईत बनत चालले आहे. उत्तर भारतातही आता कधीतरी ऐका अद्वितीय बौद्धधम्मदीक्षा समारोहाचे आयोजन झालेले साऱ्या जगाला पाहता येईल. बाबांच्या दिल्लीतील न झालेल्या धर्मान्तराची उणीव नक्कीच भरून निघेल. अशा परिस्थितीत भारतीय बौद्धांची जबाबदारी फारच मोठी आहे. नामांतर किंवा मूर्तिविडंबन आणि फुले-शाहू-आंबेडकर यांचे चारित्र्यहनन करून प्रतिगामी शक्ती आम्हाला मुख्य ध्येयापासून विचलित करू पाहते. सामाजिक, आर्थिक व राजकीय शक्तीप्राप्तीपासून आम्हाला दूर ठेवू इच्छिते. आमच्या नुसत्या आराध्यच नव्हे तर अनुकरणीय अशा दैवततुल्य नायकांना 'खलनायक' ठरवू पाहत आहे. महात्मा फुल्यांना दुर्गंधी, शाहू महाराजांना इंग्रजांचा खबऱ्या आणि डॉ. आंबेडकरांना देशद्रोही खोटादेव (फॉल्स गॉड) ठरविण्याचे महापातकच नव्हे तर कपटकारस्थान करण्यात त्यांना अपराधबोध होत नाही. म्हणून मुख्य ध्येय व मुख्य शत्रूपासून केन्द्रापासून आपली नजर व नेम विचलित न होऊ देता, आपल्या संघटनेचे शस्त्र हातून गळू न देता, बुद्धाच्या व बाबांच्या अहिंसेचा अव्हेर न होऊ देता, आपला आर्थिक, शैक्षणिक व सांस्कृतिक विकास साधण्यासाठी जीवाचे रान करण्याची ही वेळ आहे. 'खरे तत्त्वज्ञान सामान्यजनांना समजावून सांगण्यात धम्मप्रचारक अयशस्वी ठरल्यास धम्माचा ऱ्हास होतो', असे भन्ते नागसेन म्हणतात. या पुस्तकाच्या माध्यमातून जनसामान्यांना धम्माचे सम्यकज्ञान प्राप्त होईल या अपेक्षेने श्रीमती कीर्ती पाटील यांना शुभेच्छा देतो!

**प्रा. डॉ. भाऊ लोखंडे,**
वैशालीविहार, मॉडेल टाऊन, नागपूर-१४

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

ही द्वितीयावृती सहृदय आणि चोखंदळ वाचकांच्या हाती देताना मला फार हर्ष होत आहे. ही सुधारून वाढविलेली आवृत्ती असून पूर्वीच्या ६६१ प्रश्नांमधे ८९ प्रश्नांची भर टाकून एकूण ७५० प्रश्नोत्तरे व ६ टिपांची भर टाकून एकूण १६ टिपा सादर केलेल्या आहेत. भर टाकलेले प्रश्न 'विपश्यना', 'रेकी', 'बौद्धांच्या वंदना', आणि इतर काही अनुत्तरित विषयांसंबंधित आहेत. अधिकचे प्रश्न टाकताना पूर्वीच्या प्रश्नांचा क्रम बदललेला नाही.

मध्यंतरी २८ मे २००१ रोजी माझ्या मातोश्री कीर्ती पाटील कालवश झाल्या. परंतु त्यांची इच्छा प्रस्तुत पुस्तकाची उजळणी करताना त्यात अधिकाधिक माहिती जोडावी अशीच होती. त्यानुसार पुढेही आवृत्ती काढावयाची संधी मिळाल्यास, त्यांची इच्छा ध्यानात ठेवण्यात येईल.

मराठी भाषेवर संस्कृत भाषेचे वर्चस्व आहे, हे कोणीही नाकबूल करू शकणार नाही. तथापि बौद्ध धम्माची मूळ भाषा पाली असल्यामुळे बौद्धधम्माची चर्चा करताना शब्दप्रयोगामध्ये पाली भाषेतील शब्दांचा जास्तीत जास्त वापर करणे आवश्यक आहे. म्हणून 'त्रिशरण' ऐवजी 'तिसरण', 'सारिपुत्र' ऐवजी 'सारिपुत्त', असे प्रयोग करण्याचा प्रयत्न झालेला आहे. त्यामुळे ह्या प्रयत्नांना 'अशुद्ध' लेखन म्हणावयाचे कारण नाही, असे आमचे प्रांजळ मत आहे.

ह्याच पुस्तकाचे हिंदी भाषांतर "बौद्धधम्म जिज्ञासा" तयार होऊन चार वर्षे लोटलीत, परंतु प्रकाशनाचा योग अजूनही आलेला नाही. तो लवकरच येईल अशी आशा बाळगतो.

माझ्या सुविद्य धर्मपत्नी विजया विकास पाटील तसेच आयु. राष्ट्रपाल मेश्राम यांनीही कच्च्या मुद्रणाच्या दुरुस्तीकरिता मदत केली, त्यामुळे मुद्रणास गती मिळाली. डॉ. बालचंद्र खांडेकर यांनी पाली भाषेतील मजकुराचे शुद्धलेखन तपासल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. त्याचप्रमाणे डॉ. विमलकीर्ती यांनी वंदना पाठाचे शुद्धलेखन तपासल्याबद्दल त्यांचा आभारी आहे. रविन्द्र आर्ट्सचे श्री. रवीन्द्र कनिटकर यांनी याही वेळेस काळजीपूर्वक मुद्रण केल्याबद्दल त्यांचा आभारी आहे.

या पुस्तकाचे पुनर्मुद्रण करावयाची आमची इच्छा होतीच. परंतु मा. विलास वाघ, सुगावा प्रकाशन पुणे, यांच्या प्रेरणेने चालना मिळाली, त्याबद्दल मी त्यांचा कृतज्ञ आहे.

दि. १२ ऑक्टोबर, २००५ (अशोक विजयादशमी)

२३, उरुवेला कॉलनी, वर्धा रोड,
डॉ. बाबासाहेब आंबेडकर सांस्कृतिक भवनाजवळ,
नागपूर-४४० ०१५.

**विकास पाटील**

* * * *

# संदर्भ ग्रंथ - स्रोत


| | | | |
|---|---|---|---|
| १. | ऑल, ऑ (प्रश्नक्रम) | : | Buddhist Catechism (= बौद्ध प्रश्नोत्तरी)<br>ले. - कर्नल एच. एस. ऑलकॉट. (इ.स. १८८१)<br>सांस्कृतिक मंत्रालय, श्रीलंकातर्फे प्रसिद्ध |
| २. | भन्ते | : | बौद्धधर्म - एक बुद्धिवादी अध्ययन<br>ले. - भदन्त आनंद कौसल्यायन,<br>भिक्खू निवास प्रकाशन, दीक्षाभूमी, नागपूर (१९८२) |
| ३. | बुध | : | भगवान बुद्ध आणि त्यांचा धम्म<br>( = The Buddha and His Dhamma)<br>ले. - डॉ. भी. रा. आंबेडकर<br>मराठी अनुवाद - तळवटकर, चिटणीस, रेगे<br>सिद्धार्थ प्रकाशन, मुंबई. (१९८२) |
| ४. | मि. प्र. | : | मिलिंद - प्रश्न<br>अनु. - भिक्षू जगदीश काश्यप (इ. स. १९७३)<br>प्रकाशक - भिक्षू प्रज्ञानन्द, जेतवन महाविहार, श्रावस्ती. |
| ५. | तस | : | तथागताची सत्यगाथा ( = Gospel of Buddha)<br>अनु. सौ. कीर्ती पाटील.<br>मूळ लेखक - पॉल कॅरस (इ.स. १८८०)<br>अनुवादित प्रकाशन (इ.स. १९८६) |
| ६. | बुपू | : | Early Monistic Buddhism<br>(= बुद्धधम्माचा पूर्वेतिहास)<br>ले. - नलिनाक्ष दत्त : Calcutta Orientel (१९६०) |
| ७. | बौद | : | बौद्ध दर्शन. ले. - महापंडित राहुल सांस्कृत्यायन,<br>किताब महल |
| ८. | भ. बुद्ध | : | भगवान बुद्ध. ले. - अनागारिक धर्मपाल, महाबोधी<br>सोसायटी, कलकत्ता. |
| ९. | आबौम | : | आदर्श बौद्ध महिलायें. लेखिका - विद्यावती, भारतीय<br>शाक्य परिषद, संकिसा, फर्रूखाबाद. |
| १०. | बौवास्त्रि | : | Women in Buddhist Literature<br>(= बौद्ध वाङ्मयातील स्त्रिया)<br>ले. - डॉ. विमला चूर्ण लॉ - महाबोधी सोसायटी<br>लायब्रेरी (१९२७) |

| | | | |
|---|---|---|---|
| ११. | बौधविई | : | बौद्धधर्म के विकास का इतिहास - डॉ. गोविन्दचन्द्र पाण्डेय<br>हिन्दी समिति, सूचना विभाग, लखनऊ (१९७६) |
| १२. | बौध | : | Buddhism (= बौद्धधर्म). ले. ए. डब्लू. पी. गुरुंग<br>मे. शेशाचलम, मद्रास |
| १३. | भा बौप | : | भारतातील बौद्ध पंथ (Buddhist Sets in India)<br>नलिनाक्ष दत्त |
| १४. | बोछा | : | बोधिवृक्ष की छाया में. ले. - भरतसिंह उपाध्याय,<br>सस्ता साहित्य मंडल प्रकाशन, कनाट सर्कस, दिल्ली (१९९४) |
| १५. | थैबौआसि | : | थेरवादी बौद्धधम्मातील आत्म्याचा सिद्धान्त.<br>Theory of soul in Theravada Buddhism.<br>ले. - ऱ्हूडो यासुई Ryudo Yasui, आतीशा मेमोरियल,<br>पब्लिर्शिंग सोसायटी, कलकत्ता, (इ.स. १९९४)<br>पीएच.डी. पदवी प्रबंध |
| १६. | बुसाज्ञा | : | बुद्धधम्म सामान्यज्ञान<br>संपादक - सूर्यकांत भगत, जयंत मानसे.<br>त्रिपिटक पालिभाषा अनुसंधान केंद्र, भीमटेकडी,<br>गिट्टीखदान, नागपूर (१९८८) |
| १७. | बौधानि | : | बौद्धधम्मावरील चार निबंध<br>ले. - धर्मानंद कोसंबी.<br>महाराष्ट्र राज्य संस्कृती मंडळ (१९८२) |
| १८. | बौजी | : | बौद्ध जीवनचर्या<br>सौ. कीर्ती पाटील<br>२३, उरूवेला कॉलनी, नागपूर. (१९९१) |
| १९. | कर्मनि | : | कर्म - निर्वाण<br>ले. - पॉल कॅरस, एशियन पब्लिशर्स, ६९५ मॉडेल टाऊन,<br>जालंधर (१९७८) |
| २०. | संकलिका | : | सौ. कीर्ती पाटील यांच्या मतानुसार दिलेली उत्तरे. |
| २१. | दुमुसा | : | दुःख मुक्ति की साधना, ले. लक्ष्मीनारायण राठी,<br>२७, शंकरसेठ रोड, पुणे - ४११००९ (१९८४) |
| २२. | विप | : | विपश्यना पद्धती, ले. अनागारिक मुनींद्र (१९६७)<br>भिक्खू सुगतानंद, बुद्धकुटी, सई नदीच्या किनारी,<br>प्रतापगढ (अवध) उप्र. |

| | | | |
|---|---|---|---|
| २३. | बौसइ | : | बौद्ध संस्कृति का इतिहास, ले. भागचंद्र जैन,<br>आलोक प्रकाशन (१९७०), सदर, नागपूर |
| २४. | पालि | : | ३१ दिन में पालि, ले. भदन्त आनंद कौसल्यायन,<br>बुद्धभूमी प्रकाशन, कामठी रोड,<br>नागपूर-४४१००२ (१९९५) |
| २५. | बौधसाइ | : | बौद्ध धर्माचा साद्यंत इतिहास, ले. वा. गो. आपटे (१९९७)<br>भारतीय प्रकाशन, समता सैनिक दल, नागपूर |
| २६. | रेकी | : | रेकी, ले. पारूल दत्ता,<br>७५, संतोषपूर, कलकत्ता (१९९८) |
| २७. | एमबौस | : | एशिया के महान बौद्ध सम्राट, ले. डॉ. भिक्षु सावंगी मेधनकर,<br>बुद्धभूमी, कामठी रोड, नागपूर, (१९९४) |
| २८. | बाआलेभा | : | बाबसाहेब आंबेडकर लेखन व भाषणे<br>(Dr. Babasaheb Ambedkar Writings & Speeches)<br>भाग १६, शिक्षण विभाग, महाराष्ट्र शासन (१९९८) |

* * * *

# अनुक्रमणिका : खंड व प्रकरणे

# प्रथम खंड

## भ. बुद्धांचे जीवनचरित्र

| प्रश्न क्रम | | स्रोत पृष्ठ/प्रश्न |
|---|---|---|
| | **जन्म ते प्रव्रज्या** | |
| १. | बुद्ध म्हणजे काय ? | भन्ते २ |
| २. | भगवान बुद्ध कोणे होते ? | बुध २ |
| ३. | कपिलवस्तूनगर | ऑल १७ |
| ४. | राजकुमार सिद्धार्थाचा जन्म, ब्राह्मणांचे भविष्य | ऑल २० |
| ५. | ऋषी असिताचे भविष्य | ऑल ३८ |
| ६. | बालक सिद्धार्थाविषयी अद्‌भुत गोष्टी | भन्ते १७ |
| ७. | सिद्धार्थाचे लालनपालन | बुध ३ |
| ८. | राजकुमार सिद्धार्थाला उपलब्ध सौख्ये | ऑल २१ |
| ९. | सिद्धार्थास सात्त्विक शहाणपण | ऑल २५ |
| १०. | सिद्धार्थाचे शिक्षण | बुध १० |
| ११. | वेदांचे अध्ययन | बुध ८ |
| १२. | पशुबलीविषयी सिद्धार्थाचे मत | बुध १४ |
| १३. | देवदत्ताशी शत्रुत्वाचा प्रसंग | बुध १४ |
| १४. | सिद्धार्थाचा विवाह | ऑल २४ |
| १५. | सिद्धार्थाचे तारुण्याचे दिवस | बुध १४ |
| १६. | सिद्धार्थास पुत्ररत्न : राहुल | बुध १५ |
| १७. | गृहत्यागास कारणीभूत परंपरागत गोष्टी | ऑल ३४ |
| १८. | परंपरागत कथेनुसार महाल कसा सोडला | ऑल १८ |
| १९. | गृहत्यागाचे डॉ. आंबेडकरांनी सांगितलेले कारण | बुध |
| २०. | अभिनिष्क्रमणाची घटना व कारण | बौधानि ५ |
| २१. | सिद्धार्थाच्या प्रव्रज्येचे वर्णन | बुध ३१ |
| २२. | सिद्धार्थाने कोणत्या गोष्टींचा त्याग केला | ऑल ३० |
| २३. | स्वार्थत्यागाचे उदाहरण | ऑल ३१ |
| २४. | सिद्धार्थ अरण्यात का गेला ? | ऑल ४७ |
| | **नेहमीसाठी अभिनिष्क्रमण** | |
| २५. | कपिलवस्तुमधून सिद्धार्थ कोठे गेला ? | ऑल ४३ |
| २६. | बिंबिसार राजाने काय देऊ केले ? | बुध ४३ |
| २७. | सिद्धार्थाचे बिंबिसारास उत्तर | बुध ४४ |

## नवीन प्रकाशाच्या शोधार्थ



## ज्ञानलाभ व नवीन मार्गाचे दर्शन



## भ. बुद्धांचा विषादयोग

## धम्मचक्रप्रवर्तन



## धम्मदीक्षेचे आंदोलन

## निम्नस्तरीय लोकांची धम्मदीक्षा



## जन्मभूमीचे आवाहन



## स्त्रियांची धम्मदीक्षा



## शेवटचे दिवस



## महापरिनिर्वाण

## धम्मामध्ये भगवंतांचे स्वतःचे स्थान



## भगवंताचे व्यक्तिमत्व



## बोधिसत्त्वाचे बुद्ध झाले

## भ. बुद्ध व त्यांचे समकालीन



## भ. बुद्धांचे विरोधक



## भगवंतांच्या धर्माचे आलोचक

## प्रतीत्यसमुत्पादाचा सिद्धान्त

## निर्वाणासंबंधी प्रवचने



## पुनर्जन्म आणि आत्मा



## पुनर्जन्म आणि कर्मवाद

## शील आणि सदाचरण

## धम्म कशाला म्हणावे ?

## अधम्म कशाला म्हणावे ?



## सद्धम्म कशाला म्हणावे ?



## मूर्तिपूजा व पूजाअर्चा

## बौद्धांच्या वंदना



## धम्माचा प्रज्ञापूर्वक स्वीकार



## मैत्री भावना



## अहिंसा

## गृहस्थांसाठी उपदेश

## बौध्दधम्मीयांचे धम्मग्रंथ

# तृतीय खंड - बौद्ध संघ

## संघाचे संघटन



## भिक्खूची प्रगती

## संघाचे इतर नियम



## आदर्श भिक्खू



## बौद्ध उपासक

## स्त्रीचा धार्मिक दर्जा



## पारमिता



## भिक्खू संघातील विशिष्ट व्यक्ती

| | | |
|---|---|---|
| ४७७. | अंगुलिमाल : | भन्ते १३२ |
| ४७८. | अष्टिमहाश्रावक : | बौधनि २३७ |
| ४७९. | आज्ञात कौण्डिण्य | बुपु ९६ |
| ४८०. | महामोग्गलान | बुपु १०२ |
| ४८१. | मोग्गलिपुत्त तिस्स | बुपु ११० |
| ४८२. | नागसेन | बौद ६२ |
| ४८३. | महाकवी अश्वघोष | बौद ११९ |
| ४८४. | अनागारिक धम्मपाल | भबुद्ध १ |
| ४८५. | आनंद कौसल्यायन | संकलिका |

## भिक्खुणी संघांतील विशिष्ट व्यक्ती

| | | |
|---|---|---|
| ४८६. | महाप्रजापती गौतमी | आबौम १ |
| ४८७. | यशोधरा : भद्रा कात्यायनी' | आबौम ७ |
| ४८८. | खेमा : महाप्रज्ञावती | बौवास्त्री ९१ |
| ४८९. | भद्दा उप्पलवण्णा : इद्धिप्राप्ता | बौवास्त्री ९९ |
| ४९०. | भद्दा कुण्डलकेसा | बौवास्त्रि ११२ |
| ४९१. | किसा गौतमी | बौवास्त्रि ११४ |
| ४९२. | धम्मदिन्ना | आबौम ९ |
| ४९३. | विनयधरा पटाचारा | आबौम १९ |
| ४९४. | नन्दा, कपिलानि, श्रृगालमाता | आबौम २३ |
| ४९५. | संघमित्रा - स. अशोकाची कन्या | आबौमा ९२ |
| ४९६. | चारुमति - स. अशोकाची कन्या | आबौमा १०१ |
| ४९७. | अनुला - श्रीलंकेची राणी | बौवास्त्रि ९७ |
| ४९८. | राज्यश्री - हर्षवर्धनाची बहीण | आबौम १०६ |

## बौध्दधम्मातील विशिष्ट उपासक - उपासिका

| | | |
|---|---|---|
| ४९९. | राजा बिंबिसार | तस २० |
| ५००. | कोशलनरेश प्रसेनजित | बुध ११८ |
| ५०१. | अनाथपिण्डिक | तस ५५ |
| ५०२. | विशाखा - मिगारमाता | आबौम ४९ |
| ५०३. | आम्रपाली | तस १८८ |
| ५०४. | सुजाता | आबौम ५४ |
| ५०५. | जीवक वैद्य | तस ७० |
| ५०६. | सेनापती सिंह | तस ११९ |
| ५०७. | सम्राट अशोक | ऑल २८७ |

## बौद्ध धम्मातील पंथभेद



# चतुर्थ खंड - बौद्ध धम्माचा अभ्युदय व प्रसार

## धर्म-संगीती व बौद्ध साहित्य

| | | |
|---|---|---|
| ५३४. | तिबेटमध्ये नेलेले ग्रंथ | ऑ ३१५ |
| ५३५. | श्रीलंकेत जपून ठेवलेले ग्रंथ | ऑ ३१६ |
| ५३६. | पिटकांची उजळणी | ऑ ३१७ |
| ५३७. | धर्मतत्त्वांचा एकमताने स्वीकार | ऑ ३१८ |
| ५३८. | बुद्ध धम्माचे मौलिक ग्रंथ : त्रिपिटक | बौधिनी १ |
| ५३८ (अ) | बौद्ध धम्मीय महाश्रमणांचे साहित्य | बौद ५६, ८८ |
| ५३८ (ब) | बुद्धघोषांचे बौद्धसाहित्यात योगदान | बौधसाई ३ |

## बौध्दांची प्राचीन विद्यापीठे

| | | |
|---|---|---|
| ५३९. | बौद्धांची प्राचीन विद्यापीठे कोणती ? | बुसाज्ञा ५ |
| ५४०. | तक्षशीला विद्यापीठ | बुसाज्ञा ६ |
| ५४१. | नालंदा विद्यापीठ | बुसाज्ञा ७ |
| ५४२. | विक्रमशीला विद्यापीठ | बुसाज्ञा १० |
| ५४३. | उदन्तपुरी विद्यापीठ | बुसाज्ञा ९ |

## धम्मप्रसार

| | | |
|---|---|---|
| ५४४. | धम्माचा प्रथम उपदेश | ऑ ७ |
| ५४५. | धम्माचा प्रसार | ऑ २८१ |
| ५४६. | भिक्खूंचे प्रतिकूल परिस्थितीमध्ये भ्रमण | भन्ते १३८ |
| ५४७. | प्रसारासाठी कसलीही हिंसा झाली नाही | ऑ १७९ |
| ५४८. | अद्‌भुत प्रसाराचे रहस्य | ऑ २८० |
| ५४९. | धम्मप्रसाराची केंद्रे | बुध २८० |
| ५५०. | भगवंतांनी भ्रमण केलेली स्थळे | बुध ४०१ |
| ५५१. | प्रसारासाठी उपासकांची मदत | बुध ३५७ |
| ५५२. | यात्रेकरूंचे सहाय्य | ऑ २८६ |
| ५५२ (अ) | मोग्गलिपुत्र तिस्सांद्वारे धम्मप्रचार | एमबौस १५ |
| ५५३. | धम्माचा प्रचार स्वभाषेतून | बौधविइ २२८ |
| ५५३ (अ) | पाली व संस्कृत वर्णावली | पालि ३ |
| ५५४. | पाली भाषेची उत्पत्ती | बौधविइ २२७ |

## प्रियदर्शी अशोकाचे महत्कार्य

| | | |
|---|---|---|
| ५५५. | धम्मप्रसारास सर्वात अधिक हातभार | ऑ २८७ |
| ५५६. | अशोकाला 'महान अशोक' का म्हणतात ? | ऑ २८९ |
| ५५७. | बौद्ध धम्माची दीक्षा | ऑ २९० |

## परदेशांत प्रसार



## बौद्धधम्म भारतातून लुप्त झाला

## भारतांत धम्माची पुनर्स्थापना



# पंचम खंड – बौद्धधम्म आणि विज्ञान (Science)

## वैज्ञानिक दृष्टिकोन

## ईश्वर मान्य नाही



## वस्तूंचे अस्तित्व आणि उत्पत्ती



## देवांचे अस्तित्व

## मार



## संमोहिनी विद्या



## सिद्धी आणि चमत्कार



## तेजस्वी आभा

## कर्म-सिद्धान्त



## पुनर्जन्म

## कांही प्रश्नांवरील टीपा



* * * *

## प्रथम खण्ड

# भगवान बुद्धांचे जीवनचरित्र

## जन्म ते प्रव्रज्या

**प्रश्न १ - बुद्ध म्हणजे काय ?**

**उत्तर -** बुद्ध म्हणजे ज्याला सम्यक् संबोधीची प्राप्ती झालेली आहे असा; सम्यकसंबुद्ध, किंवा ज्याला परिपूर्ण ज्ञान प्राप्त झाले आहे असा. पाली भाषेत याला ''सब्बञ्ञू'' म्हणजे सर्वज्ञ (अमर्याद ज्ञानी) म्हटलेले आहे.

बुद्ध हे व्यक्तिचे नाव नव्हे. ते मनाच्या स्थितीचे किंवा अवस्थेचे नाव आहे. मनाची अशी अवस्था की, जी मानसिक विकासाच्या अत्युच्च शिखरावर पोहोचलेली आहे.

बोधीसत्त्व म्हणजे बुद्ध होण्याचा प्रयत्न करणारा मनुष्य ज्ञानप्राप्तिपूर्वी गौतम केवळ बोधिसत्त्व होता. बोधिसत्त्व आपल्या जीवनाच्या अवस्थेत क्रमाक्रमाने प्रगती करीत, दहा पारमितांचा परिपूर्ण अभ्यास करीत, सम्यक संबुद्ध होतो. पहिल्या अवस्थेत 'मुदिता' (आनंद), दुसऱ्या अवस्थेत 'विमलता' (शुद्धता), येणेप्रमाणे 'प्रभाकारी' (तेजस्विता), 'अर्चिष्मती' (अग्नीप्रमाणे तेजस्वी बुद्धिमत्ता), 'सुदूर्जया (जिंकण्यास कठीण), 'अभिमुखी' (पदार्थांची उत्क्रांती व तिच्या कारणांची बारा निदानें जाणणे), 'दूरङ्गमा' (दूर जाणे), 'अचल' (अढळ), 'साधुमती' (धर्माच्या सर्व दिशा जाणणे) आणि दहाव्या अवस्थेत तो 'धर्ममेध' होतो व त्याला बुद्धाची दिव्यदृष्टी प्राप्त होते.

**प्रश्न २ - भगवान बुद्ध कोण होते ?**

**उत्तर -** भगवान बुद्धांचे बालपणीचे नाव सिद्धार्थ होते. मातापित्यांची अपत्यप्राप्तीची इच्छा पूर्ण झाल्यामुळे त्यांनी मुलाचे नांव सिद्धार्थ असे ठेवले. जन्मानंतर पाचव्या दिवशी नामग्रहण संस्कार झाला. सिद्धार्थ हे राजवंशीय नाव असून त्यांचे गोत्र गौतम किंवा 'गोतम' असे होते. ते सूर्यवंशी घराण्यातील प्रसिद्ध ईश्वाकू कुळातील असून कपिलवस्तू नगरीचे राजकुमार होते. त्यांच्या पित्याचे नाव राजा शुद्धोदन व मातेचे नाव राणी मायादेवी असे होते. मायादेवीला महामाया असेही म्हणत. राजा शुद्धोदन शाक्यवंशीय प्रजेवर राज्य करीत होता. 'शाक्य' हे

क्षत्रिय वर्णाचे आर्य होते. शुद्धोदन म्हणजे धुतलेले तांदूळ. त्यांना बऱ्याच वर्षांपासून मूलबाळ नव्हते. एके दिवशी मायादेवीला असे स्वप्न पडले की, तिला सुवर्णाच्या पालखीत बसवून चारही दिशारक्षक हिमालयातील अनोतवदह सरोवरावर घेऊन गेले व सुमेध नावाचे बोधिसत्त्व पांढऱ्या शुभ्र हत्तीच्या रूपाने तेथे प्रकट झाला. त्याने तिला तीन प्रदक्षिणा घातल्या व तिच्या उजव्या कुशीतून गर्भात दाखल झाला. यालाच बोधिसत्त्वाचा बीजांकुर म्हणतात. महामायेस जाग आली व तिने राजाला स्वप्नाबद्दल सांगितले. दुसऱ्या दिवशी आठ ब्राह्मणांना भविष्य वर्तविण्यास राजाने बोलाविले त्यांची नावे अशीः राम, ध्वज, मंत्री, लक्ष्मण, सुयाम, सुदत्त, भोज आणि यज्ञ, त्यांनी सांगितले की तुम्हाला एक पुत्र होईल जो चक्रवर्ती राजा होईल किंवा बुद्ध होऊन जगावर धर्मराज्य करेल.

**प्रश्न ३ - कपिलवस्तुनगर कोठे वसलेले होते ?**

उत्तर - भारत देशात वाराणसीच्या उत्तरेला १०० मैलांवर आणि हिमालय पर्वताच्या पायथ्यापासून सुमारे ४० मैलांवर रोहिणी नदीच्या काठावर वसलेले होते. सध्या तिला कोहना नदी म्हणतात. हे ठिकाण सुहरतगढ स्टेशनपासून उत्तरेस १२ मैलांवर नेपाळ राज्यातील तौलिहवा बाजाराजवळ असून त्याचे सध्याचे नाव तिलौराकोट असे आहे.

**प्रश्न ४ - राजकुमार सिद्धार्थाचा जन्म कधी व कोठे झाला ?**

**उत्तर** - राजकुमार सिद्धार्थाचा जन्म वैशाखी पौर्णिमेला इ.स. पूर्व ५६३ साली झाला. जन्माचे निश्चित स्थळ पूर्णतः सिद्ध झालेले आहे. भारत सरकारच्या पुराणवस्तू संशोधन खात्याने नेपाळ तराईच्या अरण्यात हे निश्चित स्थळ दाखविण्यासाठी सम्राट अशोकाने जो दगडी स्तंभ उभारलेला होता, त्याला शोधून काढलेले आहे. त्या काळी या अरण्याला 'लुम्बिनी' वन असे म्हणत.

**प्रश्न ५ - सिद्धार्थाच्या जन्मानंतर ऋषी असिताने काय भविष्य वर्तवले व त्याचा शुद्धोदनावर काय परिणाम झाला ?**

**उत्तर** - सिद्धार्थाच्या जन्मानंतर ऋषी असिताने असे भविष्य वर्तवले की, एके दिवशी सिद्धार्थ आपल्या राज्याचा त्याग करून सन्यासदीक्षा घेऊन 'बुद्ध' होईल. पिता शुद्धोदन आपल्या राज्याच्या वारसाला मुकण्यास तयार नव्हता, म्हणून त्याने मानवी दुःखे व मृत्यू यांची राजकुमारास कल्पना येईल अशी कोणतीही दृश्ये त्याच्या पाहण्यात येऊ नयेत, ह्याबद्दल दक्षता बाळगली होती. राजकुमाराजवळ ह्या गोष्टी बोलण्याची देखील कोणालाही परवानगी नव्हती. तो आपल्या विलासयुक्त सुसज्जित महालात आणि सुगंधी फुलांच्या मनोहर बागेत प्रायः जणुकाही एखाद्या बंदिवानासारखा राहत असे. त्याच्या महालासभोवती उंच परकोट होते. आणि महालाच्या आतील भागात प्रत्येक गोष्ट जेवढी सुशोभित करता येईल तेवढी सुसज्जित केलेली होती जेर्णेकरून त्याला बाहेर जाण्याची व जगातील दुःखे आणि विपत्ती पाहण्याची इच्छाच होऊ नये, अशी परंपरागत कथा आहे.

**प्रश्न ६ - बालक सिद्धार्थाविषयी काही अद्‌भुत गोष्टी सांगितलेल्या आहेत, त्या खऱ्या आहेत काय ?**

**उत्तर** - बालक सिद्धार्थाविषयी ज्या अद्‌भुत गोष्टी सांगितलेल्या आहेत त्यांच्याविषयी असे म्हणता येईल की, बौद्धांच्या इतिहासात महायानाच्या प्रभावाने एक काळ असा आला की, भ. बुद्धांचा केवळ धम्मच लोकोत्तर मानला जात नव्हता तर त्यांचे शरीरही लोकोत्तर मानले जाऊ लागले.

**प्रश्न ७ - सिद्धार्थाचे लालनपालन कोणी केले ?**

**उत्तर** - सिद्धार्थाची आई राणी महामाया अचानक आजारी पडली व बालक केवळ सात दिवसांचा असतानाच तिचे निधन झाले. त्यानंतर त्याची मावशी महाप्रजापती गौतमी हिनेच त्याचे फार प्रेमाने लालनपालन केले. ती त्याची सावत्र आई देखील होती. सिद्धार्थास विमातेपासून नंद नावाचा लहान भाऊही होता.

**प्रश्न ८ - राजकुमार सिद्धार्थाला कशा प्रकारची सौख्ये उपलब्ध होती ?**

**उत्तर** - राजा शुद्धोदनाने आपल्या पुत्राकरिता सर्व सुखसोयींनी परिपूर्ण हिवाळ्याकरिता, उन्हाळ्याकरिता व पावसाळ्याकरिता प्रत्येकी एक असे तीन महाल बांधले होते. एक नऊ मजली, दुसरा पाच मजली व तिसरा तीन मजली, असे तीनही महाल सुंदर सजविलेले होते. प्रत्येक महालाभोवती अत्यंत रमणीय बाग असून त्यांत सुंदर फुले होती. पाण्याच्या कारंजांनी बागेला शोभा आलेली होती. वृक्षावर बसलेल्या गाणाऱ्या पक्षांचा सुंदर कलरव ऐकू येत असे, आणि जमिनीवर मयूर पक्षी आपला पिसारा उभारून नयनमनोहर नृत्य करीत असत. अनेक लावण्यवती नृत्यांगना आणि गायिका त्याचे मनोरंजन करावयास सतत तत्पर असत. अनेक दासदासी त्याची सेवा करावयास हजर असत.

**प्रश्न ९ विलासी वातावरणात देखील राजकुमार सिद्धार्थास सात्त्विक शहाणपणा कसा प्राप्त झाला ?**

**उत्तर** - सिद्धार्थ जात्याच अतिशय तल्लख बुद्धीचा होता. लहानपणापासूनच कसल्याही प्रकारची शिल्पकला किंवा विद्या विशेष अभ्यास न करताच तो हस्तगत करीत असे. त्याला शिकवायला उत्तम शिक्षक होते. गूढ विषयाचेही त्याला त्वरित आकलन होत असे, त्यामुळे त्याला सात्त्विक शहाणपणा प्राप्त झाला.

**प्रश्न १० सिद्धार्थाने कोणकोणत्या प्रकारचे शिक्षण घेतले ?**

**उत्तर** - सिद्धार्थ आठ वर्षांचा झाल्यावर त्याचे विधिवत शिक्षण सुरू झाले. त्याचे प्रथम शिक्षक तेच आठ ब्राह्मण होते ज्यांनी त्याच्याविषयी बालपणी भविष्यवाणी केलेली होती. त्याचे द्वितीय गुरू उद्दिच्च देशातील सब्बमित्त नांवाचे विद्वान आचार्य होते. ते उत्कृष्ट व्याकरणाचार्य आणि वेद, वेदांग, वैय्याकरण आणि उपनिषद यांचे प्रकांड विद्वान होते. त्यांनी सिद्धार्थास दर्शनशास्त्रात पूर्णतः पारंगत केले. त्यानंतर आलारकालामाचा शिष्य भारद्वाज याने चित्तास एकाग्र करावयाची व समाधिस्थ राहावयाची विद्या शिकविली.

**प्रश्न ११ सिद्धार्थ गौतमाने वेद आणि वैदिक ऋषींच्या शास्त्रांचे अध्ययन केले होते काय ?**

**उत्तर** – सिद्धार्थाने वेदांचे आणि दहा वैदिक ऋषिंच्या शास्त्रांचे अध्ययन केले होते. सिद्धार्थाने वेद, वेदांग, उपनिषद यांचे अध्ययन सब्बमित्त आणि उद्दिच्च या विद्वानांच्या हाताखाली केले. परंतु, त्यांमध्ये मानवाच्या नैतिक उत्थानाला सहायक होईल असे त्याला काहीच आढळले नाही. त्याच्या दृष्टीने वेद वाळूच्या भिंतीप्रमाणे निरुपयोगी असून त्यांत ग्रहण करण्यासारखे त्यास काहीच आढळले नाही. तसेच सिद्धार्थाला त्या काळच्या मोठमोठ्या दर्शनशास्त्रांतही तात्त्विक दृष्ट्या महत्त्वाचे काहीसुद्धा दिसले नाही. त्या ऋषींना सत्य शोधायची तळमळ होती ह्याबद्दल सिद्धार्थास शंका नव्हती, परंतु ते अंधकारात चाचपडत सत्याचा शोध घेत होते व ते त्यांना प्राप्त झालेले नव्हते.

**प्रश्न १२ त्या काळातील यज्ञयागांतील पशुबली विषयी सिद्धार्थाचे काय मत होते ?**

**उत्तर** – यज्ञविरोधी लोक पशुबलीविषयी ब्राह्मणांचा उपहास करीत यज्ञयागांतील पशुबली सर्वथा निरर्थक असल्याचे ज्यांचे मत होते त्यांच्याशी सिद्धार्थ सहमत होता.

**प्रश्न १३ देवदत्ताशी शत्रुत्व व्हावयास कोणता करुणामय प्रसंग कारणीभूत झाला ?**

**उत्तर** – एकदा सिद्धार्थ आपल्या शेतावरील एका झाडाखाली विश्राम करीत असताना एकाएकी एक पक्षी आकाशातून त्याच्या पायाजवळ येऊन पडला. बाणाने विद्ध झाल्यामुळे तो वेदनेने तडफडत होता. त्याने त्याच्या शरीरातील बाण काढला, त्यास पाणी पाजले व ऊब मिळावी म्हणून त्यास कुशीत घेऊन बसला.

तेवढ्यातच त्याचा मामेभाऊ देवदत्त तेथे आला व आपल्या शिकारी विषयी चौकशी करू लागला. सिद्धार्थाने त्यास स्वस्थ होत असलेला पक्षी दाखविला, परंतु त्यास परत करण्यास साफ नकार दिला. सिद्धार्थ म्हणाला, ''मारणाऱ्यापेक्षा वाचविणारा श्रेष्ठ होय. म्हणून हा पक्षी माझा आहे.'' पुढे हे प्रकरण राजदरबारात गेले. तेथेही सिद्धार्थाचे म्हणणेच मान्य करण्यात आले. तेव्हापासून देवदत्ताने सिद्धार्थाशी शत्रुत्व सुरू केले.

**प्रश्न १४ सिद्धार्थाचा विवाह कधी व कशा प्रकारे संपन्न झाला ?**

**उत्तर** – पूर्वीच्या क्षत्रिय लोकांच्या रीतिरिवाजानुसार स्वयंवरासाठी विविध प्रकारचे खेळ, शिल्पकला व शस्त्रविद्या ह्यांची स्पर्धा आयोजित केल्या जात असत. सिद्धार्थाने त्या काळच्या सर्वच विद्या हस्तगत केलेल्या होत्या. त्यामुळे सर्व प्रतिस्पर्ध्यांना जिंकून त्याने यशोधरेचे स्वयंवर जिंकले व तिचे पाणिग्रहण केले. त्यावेळी सिद्धार्थाचे वय सोळा वर्षांचे व यशोधरेचे पंधरा वर्षांचे होते. तिच्या पित्याचे नाव दण्डपाणी असून तो देखील शाक्य वंशाचाच होता. सौंदर्य आणि शील याविषयी यशोधरेची फार प्रसिद्धी होती.

**प्रश्न १५ तारुण्याचे दिवस सिद्धार्थाने कसे व्यतीत केले ?**

**उत्तर** – शुद्धोदन राजाच्या आज्ञेनुसार राज-पुरोहित उदायी ह्याने सिद्धार्थासाठी सर्व सोयी उपलब्ध केल्या. पित्याच्या योजनेनुसार सिद्धार्थाने तारुण्याचे दिवस भोगविलासात व्यतीत केले. तथापि त्याने आपल्या कर्तव्याकडे दुर्लक्ष केले नाही. वीस वर्षांचा असतांनाच तो शाक्य संघाचा सदस्य झाला व संघाचे प्रत्येक कार्य अत्यंत दक्षतेने करू लागला, संथागारामध्ये शाक्य संघाच्या सभांचे आयोजन होत असे.

**प्रश्न १६   सिद्धार्थाच्या मुलाचे नाव काय होते ?**

**उत्तर** - वयाच्या एकोणतिसाव्या वर्षी त्यास पुत्ररत्न झाले. त्याचे नांव राहुल ठेवण्यात आले. कारण सिद्धार्थास असे वाटले की, जणुकाही संसारात गुंतविण्यास व मुक्तीच्या मार्गात अडथळे निर्माण करण्यास तो राहू (राहुग्रह) उत्पन्न झाला आहे.

**प्रश्न १७   गृहत्याग करून अरण्यात जावयास (महाभिनिष्क्रमणास) परंपरागत कथेनुसार कोणत्या गोष्टी कारणीभूत ठरल्या ?**

**उत्तर** - परंपरागत कथेनुसार गृहत्यागाचा प्रसंग 'बुद्धचरित' काव्यादी ग्रंथातून चमत्कारिक रीतीने वर्णिला आहे. सिद्धार्थ अत्यंत भोगविलासांत राहत होता. त्याला तीन ऋतूकरिता तीन राजवाडे बांधून देण्यात आले होते. दासदासी आणि नृत्यांगना सदैव सेवेत हजर असत. त्याला कसलीही दुःखदायक दृश्ये दिसू नयेत याची खबरदारी घेतली जात होती. त्याला म्हातारपण, आजारपण आणि मृत्यू या अत्यंत सामान्य दुःखद गोष्टींचेही दर्शन झालेले नव्हते. पुढे अकस्मात त्याला मुक्तपणे फिरावयाची इच्छा झाली. तेव्हा चार निरनिराळ्या प्रसंगी सिद्धार्थ आपल्या महालातून निघून रथावर बसून जात असताना त्यास मनुष्याची चार वेगवेगळी रूपे दिसलीत, ती अशी - प्रथम गलितगात्र झालेला म्हातारा मनुष्य दिसला. मग रोगाने जर्जर झालेला आजारी मनुष्य, त्यानंतर एक मृत व्यक्ती आणि शेवटी एक तेजस्वी परिवाज्रक दिसला. त्याचा सारथी छन्न यानेही ही दृश्ये पाहिलीत आणि ती दृश्ये प्रत्येकाच्या जीवनाशी निगडित असतात, असे सिद्धार्थास समजावून सांगितले. येणेप्रमाणे जीवनातील दुःखाचे दर्शन घडल्याने सिद्धार्थास वैराग्य प्राप्त झाले. संन्यासदीक्षा हाच खरा दुःखमुक्तीचा मार्ग आहे, असे वाटून त्याने गृहत्याग केला. (तथापि सिद्धार्थ सर्व विद्यांमध्ये पारंगत होऊन २९ वर्षे वयाचा होईपर्यंत त्यास कोणत्याही रोग्याचे, वृद्धाचे व प्रेताचे दर्शन घडले नाही, ही पारंपरिक गोष्ट बुद्धिसंगत आणि तर्कसंगत वाटत नाहो : संकलिका)

**प्रश्न १८   परंपरागत कथेनुसार सिद्धार्थाने महाल कसा सोडला ?**

**उत्तर** - एके रात्री सर्वजण गाढ झोपले असताना सिद्धार्थ उठला. आपल्या निद्रिस्त पत्नीला व तान्ह्या बाळाला शेवटचे पाहून घेतले. आपला सारथी छन्न याला बोलाविले, आपला पांढराशुभ्र आवडता घोडा कंथक यावर आरूढ होऊन, महालाच्या द्वाराजवळ पोहोचला. महाद्वाराशी पहारा देत असलेल्या राजाच्या सेवकांना देवांनी गाढ झोप आणली. त्यामुळे ते घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकू शकले नाहीत. महाद्वाराचे कुलूप आपोआप उघडण्यास देवच कारणीभूत झाले, आणि राजकुमार अंधारात दूर निघून गेला, व नंतर त्याने दुःखमुक्तीचा मार्ग शोधावयास प्रव्रज्या ग्रहण केली.

**प्रश्न १९   राजकुमार सिद्धार्थाच्या महाभिनिष्क्रमणाचे डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सांगितलेले कारण कोणते ?**

**उत्तर** - डॉ. भीमराव आंबेडकरांनी आपल्या 'भ. बुद्ध आणि त्यांचा धम्म' ह्या पुस्तकात ज्या कारणांचा उल्लेख केला आहे, ते अधिक योग्य व संयुक्तिक वाटते. ते कारण असे- सिद्धार्थ राजकुमाराचे राज्य म्हणजेच शाक्यांचे राज्य व शेजारी असलेले कोलियांचे राज्य यांच्यात रोहिणी नदीच्या पाण्याबाबत वाद निर्माण झाला. हा प्रश्न वाटाघाटींनी सोडवावा

असे सिद्धार्थाचे मत होते. तथापि, शाक्यसंघाचे बहुमत युद्ध करावे म्हणजे संघर्ष करावा असेच होते. संघाचे म्हणणे सिद्धार्थास मान्य नसल्यामुळे त्याला संघ सोडून व आपले राज्य सोडून जावे लागले व तसे करताना जगातील संघर्षाच्या व दुःखाच्या कारणाचे मूळ शोधून काढावयास त्याने संन्यासदीक्षा ग्रहण केली.

**प्रश्न २०  डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सिद्धार्थाच्या गृहत्यागाच्या घटनेचे जे वर्णन आपल्या पुस्तकात केले त्याला उल्लेख बौद्ध साहित्यात कोठे व कशा प्रकारे केलेला आहे ?**

**उत्तर** - ही गृहत्यागाची घटना मज्झिमानिकायांतील अयिपरियेसन सूत्रात भगवंतानी येणेप्रमाणे कथन केलेली आहे -

भिक्खूंनो, मीसुद्धा संबोधिज्ञान होण्यापूर्वी बोधिसत्वावस्थेत, स्वतः जन्मधर्मी असताना जन्माच्या फेऱ्यांत सांपडलेल्या वस्तूंच्या (पुत्र, दारा, दासी, दास इत्यादिकांच्या) मागे लागलो होतो. म्हणजे माझे सुख त्यांवर अवलंबून आहे असे मला वाटे. स्वतः जराधर्मी असतांना, व्याधिधर्मी असतांना, मरणधर्मी असताना, शोकधर्मी असताना, जरा, व्याधी, मरण, शोक यांच्या फेऱ्यांत पडलेल्या वस्तूंच्याच मागे लागलो होतो. तेव्हा माझ्या मनात असा विचार आली की, मी स्वतः जन्म, जरा, मरण, व्याधि व शोक यांनी संबद्ध असतां त्यांनीच संबद्ध असे जे पुत्रादारादिक यांच्या मागे लागलो आहे, हे ठीक नव्हे. तर मी या जन्मजरादिकांनी होणारी हानी पाहून, अज्ञान, अजर, अव्याधी, अमर आणि अशोक असे जे परमश्रेष्ठ निर्वाणपद त्याचा शोध करावा, हे योग्य आहे.

''भिक्खूंनो, असा विचार करीत असता काही काळाने जरी मी त्यावेळी तरु ण होतो, माझा एकही केस पिकला नव्हता, भरज्वानीत होतो, आणि माझे आईबाप मला परवानगी देत नव्हते, डोळ्यांतून निघणाऱ्या अश्रुप्रवाहाने त्यांची मुखे भिजली होती, ते सारखे रडत होते, तरीही मी (त्या सगळ्यांची परवा न करता) शिरोमुंडन करून, काषाय वस्त्रांनी देह आच्छादून, घरातून बाहेर पडलो. (मी संन्यासी झालो)''

**प्रश्न २१  सिद्धार्थ प्रव्रजित झाला त्या प्रसंगाचे वर्णन करा.**

**उत्तर** - भारद्वाज मुनींचे आश्रम कपिलवस्तूमध्येच होते. तेथे जाऊन प्रव्रजित व्हावयाचे सिद्धार्थाने ठरविले. आपल्या कंथक नावाच्या घोड्यावर स्वार होऊन व सारथी छन्न याला सोबत घेऊन तो तेथे पोहोचला. महानाम नावाच्या चुलत भावाने त्याच्यासाठी भिक्खूचे कपडे व भिक्षापात्र आणले. त्याचे मातापितादेखिल तेथे उपस्थित होते. ते फारच शोकाकुल होते सर्वांच्या समक्ष त्याचे मुण्डन झाल्यावर त्याने परिव्रज्या घेतली. त्यानंतर अनोमा नदी ओलांडून तो कपिलवस्तू सोडून निघून गेला.

**प्रश्न २२  गृहत्याग करताना सिद्धार्थाने कोणत्या गोष्टींचा त्याग केला ?**

**उत्तर** - आपले सुंदर व सुसज्जित महाल, अगणित संपत्ती, विलास, सुखचैन, मऊ बिछाने, सुंदर राजसी पोशाख, सुग्रास अन्न, मातापिता आणि आपले राज्य या सर्वांचा सिद्धार्थाने त्याग केला. एवढेच नव्हे तर आपली प्रिय पत्नी यशोधरा आणि एकुलता एक पुत्र राहुल यांचाही त्याग केला.

**प्रश्न २३  बहुजनांच्या सुखाकरिता व मानवाचे दुःख दूर करण्याच्या उद्देशाने अव्याहतपणे एवढा स्वार्थत्याग केल्याचे दुसरे उदाहरण आहे काय ?**

**उत्तर** - एकही नाही. म्हणूनच बौद्धजन त्यांच्यावर एवढे प्रेम करतात व त्यांचा आदर्श समोर ठेवतात. जगाला सुखी करण्याकरिता आणि दुःखापासून सुटकेचा मार्ग संपूर्ण मनुष्यमात्राला दाखविण्याकरिता (स्वतः सम्बुद्ध होईपर्यंत) त्यांनी देहदंडनाद्वारे कठीण तपश्चर्या केली आणि त्यानंतर मनन आणि चिंतन करून सत्याचा मार्ग शोधून काढला.

**प्रश्न २४ : अरण्यामध्ये जाऊन दुःखाचे मूळ शोधून काढण्याची अपेक्षा त्यांनी का केली ?**

**उत्तर** - मनुष्याच्या प्रवृत्तींचे मूळ कारण व दुःखाचे मूळ कारण शोधून काढावयास कराव्या लागणाऱ्या चिंतनामध्ये कसलाही प्रतिबंध येऊ नये, यासाठी ते अरण्यात गेले.

## नेहमीसाठी अभिनिष्क्रमण

**प्रश्न २५  कपिलवस्तूमधून सिद्धार्थाने कोठे प्रयाण केले ?**

**उत्तर** - सिद्धार्थ कपिलवस्तू नगरीपासून फार दूर अनोमा (ओनामा) नदीकडे गेला. परंपरागत कथा अशी आहे की, तेथे त्याने आपले सुंदर लांब केस तरवारीने कापून काढले. संन्याशाचा पिवळा वेष धारण केला. आपले अलंकार व प्रीय घोडा कंथक यास छन्नाकडे सोपवून शुद्धोदन राजाकडे परत जाण्याची त्याला आज्ञा केली. त्याचे केस केवळ दोन बोटे लांब राहून उजवीकडे वळून डोक्याला चिपकून गेले व त्यानंतर जीवनभर केसांचे परिमाण तेच राहिले. आजकाल अफ्रिकेतील निग्रो लोकांचे केसही तसेच कुरळे पाहावयास मिळतात व त्यांची वाढ होत नाही. कपिलवस्तूमधून सिद्धार्थ राजगृह या बिंबिसार राजाच्या राजधानीच्या शहरी पायीच गेला. तेथून जवळच असलेल्या पांडव पर्वताच्या पायथ्याशी एक लहानशी पर्णकुटी बांधली. कपिलवस्तू ते राजगृह हे ४०० मैलांचे अंतर तो पायीच चालत गेला.

**प्रश्न २६  बिंबिसार राजाने सिद्धार्थास परिव्राजेचा त्याग करावयास विनंती करून काय देऊकेले ?**

**उत्तर** - राजगृह या शहराच्या बाहेर झोपडी बांधल्यावर सिद्धार्थ भिक्षेकरिता राजगृहास पायीच जात असे. त्याचे भव्य आणि आकर्षक व्यक्तित्व पाहून तेथील प्रजेत फार कुतूहल उत्पन्न झाले. तेव्हा राजा बिंबिसार याला समजले की, ज्याच्याविषयी अशी भविष्यवाणी केली गेली होती की, तो एकतर चक्रवर्ती राजा होईल किंवा जगास ज्ञानाचा प्रकाश दाखविणारा 'बुद्ध' होईल. तोच सिद्धार्थ गौतम परिव्राजक झालेला आहे, तेव्हा त्याच्या पर्णकुटीवर जाऊन बिंबिसाराने त्यास आपले अर्धे राज्य देऊ केले व परिव्राज सोडून देण्याची विनंती केली.

**प्रश्न २७  सिद्धार्थाने बिम्बिसारास काय उत्तर दिले ?**

**उत्तर** - बिंबिसाराने सिद्धार्थास असा उपदेश दिला की, तारुण्यामध्ये कामभोग योग्य आहे. मध्यमवयीन-वयस्कांसाठी धनप्राप्ति व वृद्धांसाठी धर्माजन. म्हातारपणी पुण्य करून माणूस

धर्मार्जन करू शकतो. त्यावर सिद्धार्थाने उत्तर दिले की, विषयसुखाची कामना करणाऱ्याच्या वासनेचे शमन कधीच होत नाही. मर्त्य लोकच नव्हे तर दिव्य लोकांतही विषयानुरक्त माणसाच्या मनाची तृप्ती कधीच होत नसते. समुद्राने वेढलेल्या विस्तीर्ण भूप्रदेशांवर प्रभुसत्ता कायम केल्यावर राजे लोक तृप्त न होता समुद्राच्या दुसऱ्या भागावरील भूप्रदेश काबीज करावयाची कामना करतात. मी रागामुळे, इर्षेमुळे किंवा प्रलोभनामुळे गृहत्याग केलेला नाही. बालक असो, तरुण असो, किंवा वृद्ध असो त्याने कारुण्यावर अधिष्ठित असे धर्माचरण करायला हवे. मी ह्या जगातील कलह पाहून मर्माहत झालो आहे. मी शांतीच्या शोधात आहे आणि दुःखाचा अंत कसा होईल, याचा मार्ग शोधत आहे. (ही कथा सुत्तनिपातातील पब्बज्जासूत्रात दिली आहे.)

**प्रश्न २८ राजगृहास गेल्यावर सिद्धार्थाने काय केले ?**

**उत्तर** - राजगृहास गेल्यावर सिद्धार्थाने जवळच असलेल्या पांडव पर्वताच्या पायथ्याशी लहानशी पर्णकुटी बांधली. कपिलवस्तू ते राजगृह हे ४०० मैलांचे अंतर तो पायीच चालत गेला. त्यानंतर तो उरु वेलेस सध्याच्या बुद्ध गयेतील महाबोधी मंदिराजवळ गेला. तेथील अरण्यामध्ये अत्यंत विद्वान तपस्वी राहत होते. ज्या ज्ञान-प्राप्तीच्या शोधात तो निघाला होता, ती मिळविण्याच्या आशेने पुढे तो त्यांचा विद्यार्थी झाला. त्याने त्यांच्या पद्धती ग्रहण केल्या आणि त्यांच्या सर्व प्रकारच्या तपश्चर्यांचा अभ्यास केला. परंतु, तसे केल्यावरही राजकुमाराला काहीच लाभ झाला नाही व मानवी दुःखाचे मूळ आणि पूर्णतः मुक्तीचा मार्ग गवसला नाही. ते उरु वेले जवळ असलेल्या एका दूरच्या अरण्यात निघून गेले आणि कडकडीत व्रतनियमांनी आपली शरीरशुद्धी करण्यासाठी कडक शिस्तीचे पालन करून त्यांनी सहा वर्षे महान तप केले.

**प्रश्न २९ सिद्धार्थाने गृहत्याग केल्यानंतर कोलीय आणि शाक्य यांच्यात समेट घडून आला काय ?**

**उत्तर** - होय. कोलियांशी युद्ध न व्हावे यासाठी शाक्यांनी बरेच आंदोलन केले आणि शाक्य संघाने सामोपचाराने वाद मिटविला. हा समाचार सिद्धार्थास राजगृहात असताना पंचवर्गीय भिक्खूंकडून समजला.

**प्रश्न ३० शाक्य आणि कोलीय यांच्यामधील वाद मिटल्यानंतर देखील सिद्धार्थाने परिव्रजेचा त्याग कां केला नाही ?**

**उत्तर** - ही गोष्ट सत्य होती की, शाक्य आणि कोलीय यांच्यातील वाद व त्यामुळे उद्भवणारी युद्धाची परिस्थिती यामुळे सिद्धार्थाने गृहत्याग केलेला होता. परंतु बराच विचार केल्यावर त्यास असे आढळले की, संघर्ष आणि विरोध यांचे मूळ केवळ वेगवेगळ्या जाती व राजेरजवाडे यांच्यातच नव्हे, तर क्षत्रियांमध्ये, ब्राह्मणांमध्ये, गृहस्थांमध्ये, माता आणि पुत्र, पुत्र आणि पिता, भाऊ आणि बहीण, मित्र आणि मित्र इत्यादी सर्वांमध्ये स्थायी स्वरूपात असतेच. जगातील कष्ट आणि दुःख यांच्या मुळाशी हा वर्गसंघर्षच आहे व या सामाजिक संघर्षाच्या समस्येचे मूळ शोधून काढावयाचा सिद्धार्थाने निर्धार केला.

# नवीन प्रकाशाच्या शोधार्थ

**प्रश्न ३१ : ज्ञानप्राप्तीसाठी सिद्धार्थाने कोणकोणते प्रयत्न केले ?**

**उत्तर** - सिद्धार्थाने प्रथम उरु वेला येथील तपस्व्यांसोबत तपश्चर्या सुरू केली. तपस्वी देहदंडाची व आत्मक्लेशाची उग्र तपश्चर्या करीत असत. यामुळेच मनुष्यास पूर्ण ज्ञान प्राप्त होऊ शकते, असे ते म्हणत. सिद्धार्थाने त्यांच्या सर्व पद्धती आत्मसात केल्या. त्याने अत्यंत कठोर तपश्चर्या सुरू केली त्यामुळे ते त्यास गुरू मानू लागले. परंतु असे केल्यावरही राजकुमारास काहीच ज्ञानलाभ झाला नाही, आणि मानवी दुःखाचे मूळ किंवा पूर्णतः मुक्तीचा मार्ग गवसला नाही.

**प्रश्न ३२ सिद्धार्थाने कोणकोणत्या ऋषींजवळ तपश्चर्येचे शिक्षण घेतले ?**

**उत्तर** - राजगृह नगरीस सोडून सिद्धार्थ प्रथम भृगू ऋषींच्या आश्रमात गेला. तेथे स्वर्गप्राप्तीसाठी नानाप्रकारची तपस्या करणारे तपस्वी त्यास दिसले. तेथे कांहीजण कंदमुळे व फळे खाऊन राहत असत, कांहीजण पक्षांप्रमाणे दाणे वेचून खात, काहीजण गवत खाऊन तर काहीजण दातांनी कच्चे पदार्थ चावून खात. कांहीजण सतत पाण्यात राहत असत. याप्रमाणे कष्ट सहन केल्याने स्वर्गलाभ होतो आणि कष्ट सहन केल्यानेच (देहदंडानेच) पुण्यलाभ होतो अशी त्यांची धारणा होती.

त्यानंतर सिद्धार्थ विंध्यप्रदेशमार्गे वैशालीमध्ये राहत असलेल्या आलार कालाम या ऋषीकडे गेला. तेथे त्याने सांख्य दर्शनाचे सिद्धान्त ग्रहण केले.

**प्रश्न ३३ सिद्धार्थाने ध्यानमार्गाचे शिक्षण कोणाजवळ घेतले ?**

**उत्तर** - आलारकालामाने सिद्धार्थाला ध्यानमार्ग शिकविला, आकिंचन्यायतन नावाची समाधी शिकविली. त्याच्या सात पायऱ्या होत्या. त्या सर्व त्याने आत्मसात केल्या. श्वासोच्छ्वासाच्या तीन पद्धति होत्या :-

१) आनापानसती म्हणजे श्वासाला नियंत्रणात ठेवणे.

२) प्राणायाम म्हणजे पूरक, कुंभक आणि रेचक यांवर नियंत्रण. आणि

३) समाधिमार्ग

त्यानंतर सिद्धार्थ उद्दक रामपुत्र नावाच्या ऋषीकडे गेला आणि ध्यान करावयाची आठवी पायरीदेखील आत्मसात केली. याप्रमाणे कोसल जनपदातील दोन्ही महान् आचार्यांकडून ज्ञान प्राप्त केल्यावर सिद्धार्थ मगध राज्यात गेला व तेथील ध्यानपद्धती आत्मसात केली. त्यानुसार श्वासाचे पूर्णतः निरोधन करून एकाग्रता साधावयाची असे. ही अत्यंत वेदनादायी पद्धती होती, परंतु सिद्धार्थाने तिलाही आत्मसात केले.

**प्रश्न ३४ सिद्धार्थाने ब्राह्मणांच्या तत्त्वज्ञानाचे अध्ययन केले होते काय ?**

**उत्तर** - होय. त्यावेळी ब्राह्मणांच्या तत्त्वज्ञानाचे (Philosophy) चार प्रमुख आधारस्तंभ होते.

१) वेद पवित्र आहेत व ते अपौरुषेय आहेत.

२) जन्ममरणाच्या फेऱ्यापासून आत्म्याची मुक्ती वैदिक यज्ञयाग केल्याने व ब्राह्मणांना दान दिल्याने होऊ शकते.

३) चातुर्वर्ण्य ही आदर्श समाजरचना होय (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र) आणि चार आश्रम हीच आदर्श जीवन रचना होय (ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम आणि संन्यासाश्रम).

४) कर्मवादाचा सिद्धान्त म्हणजे मागील जन्मी केलेल्या कर्मानुसार आत्मा पुढील जन्म ग्रहण करतो.

**प्रश्न ३५ सिद्धार्थाचे वेदांविषयी काय मत होते ?**

**उत्तर -** वेदांना 'अपौरुषेय' मानल्याने विचारस्वातंत्र्यास तिलांजली देण्यासारखेच आहे, असे सिद्धार्थाचे मत होते. वेद म्हणजे मंत्र आणि ऋचा किंवा स्तुतिकाव्यांचा संग्रह होय. या ऋचांचे उच्चारण व पठण करणाऱ्यांना 'ऋषी' असे म्हणत. मंत्र म्हणजे इंद्र, वरुण, अग्नी, सोम, ब्रह्म इत्यादी देवांना संबोधून केलेली काव्यरचना व प्रार्थना होय. शत्रूपासून रक्षण किंवा शत्रूविरुद्ध सहाय्य किंवा धन प्राप्त करावयासाठी ह्या प्रार्थना केलेल्या आहेत. त्यासाठी भक्तजनांपासून भोजन, मांस आणि सुरा देवांनी स्वीकार करावी, असे आवाहन प्रार्थनांमध्ये केलेले आहे.

वेदांमध्ये तत्त्वज्ञानाचे प्रमाण फारच कमी आहे. परंतु कांही ऋषींनी तत्त्वज्ञानापर काव्य रचलेले दिसते. त्यांची नावे अशी - १) अमर्षघण, २) प्रजापती परमेष्ठी, ३) बृहस्पती, ४) अनिल, ५) दीर्घतमा, ६) नारायण, ७) हिरण्यगर्भ, आणि ८) विश्वकर्मा. या सर्वांनी सृष्टीची उत्पत्ती कशी झाली, वेगवेगळ्या वस्तू कशा उत्पन्न झाल्या, सृष्टी कशांत कशा प्रकारे विलीन होईल इत्यादी प्रश्नांचा ऊहापोह केलेला आहे. अमर्षघणाचे म्हणणे असे की, सृष्टीची उत्पत्ती ताप (तपस्) पासून झाली. ब्राह्मणबृहस्पतीचे (बृहस्पतीचे) म्हणणे असे की, सृष्टी असत्‌मधून सत् स्वरूपात आली. कदाचित् असत् ह्याचा आशय अनंत असा असावा. प्रजापती परमेष्ठीने बृहस्पतीच्या मताचा विरोध केला व असे प्रतिपादन केले की, जल हेच सृष्टीचे मूळ होय. अनिलचे कथन असे की, वायू हेच मुख्य तत्त्व होय : त्यातच गती, वेग उत्पन्न करण्याची शक्ती आहे. दीर्घतमाचे म्हणणे असे की, सर्वांचा मूलाधार सूर्य होय. नारायणाच्या मतानुसार 'पुरुष' सृष्टीचे मूळ कारण होय. 'पुरुषापासून' सूर्य, चंद्र, पृथ्वी, जल इत्यादी आणि सर्व प्राणी व मनुष्यदेखिल उत्पन्न झाले. हिरण्यगर्भाचे मत असे की, अग्नी विश्वाची उत्पादक शक्ती होय. विश्वकर्माचे मत होते की, जलापासून सृष्टीची रचना झाली. त्याचे म्हणणे असे होती की, 'पुरुष' आदी आणि अंत होय व त्यानेच जलापासून सृष्टीची रचना केली.

सिद्धार्थास वेदमंत्रामध्ये मानवाच्या नैतीक उत्थानास सहाय्यक होणारी एकही गोष्ट दिसली नाही. त्यास वेद निष्प्रयोजन वाटले. त्यामुळे त्यापासून ग्रहण करण्यासारखी एकही गोष्ट त्यास दिसली नाही. वैदिक ऋषींना ज्ञानाची लालसा होती व ते सत्यशोधनाच्या प्रयासात होते; परंतु त्यांना ते गवसलेले नव्हते. त्यामुळे त्यांचे तत्त्वज्ञान सिद्धार्थास पूर्णतः व्यर्थ स्वरूपाचे वाटले. सिद्धार्थाने वेद अपौरुषेय असल्याचे नाकारले. कोणत्याही गोष्टीचे परीक्षण

करणे आवश्यक आहे, असे त्याचे मत होते. सिद्धार्थास विचारस्वातंत्र्य ही सर्वाधिक महत्त्वाची गोष्ट वाटत होती.

**प्रश्न ३६ यज्ञयागाविषयी सिद्धार्थाचे काय मत होते ?**

**उत्तर** - सिद्धार्थाला वैदिक यज्ञ किंवा इतर धार्मिक विधीमुळे जन्ममरणापासून मुक्ती मिळते, ही ब्राह्मणी कल्पना मान्य नव्हती. यज्ञाची व्याख्या करताना त्याने 'खरे यज्ञ' आणि 'खोटे यज्ञ' असे स्पष्ट विभाजन केले. दुसऱ्यांच्या कल्याणासाठी केलेला 'आत्मपरित्याग' हाच खरा यज्ञ होय, असे सिद्धार्थाचे मत होते. कोण्या देवतेला प्रसन्न करावयास करण्यात येणाऱ्या यज्ञास खोटा यज्ञ, असे म्हणून त्याने त्याची निंदा केली.

**प्रश्न ३७ सिद्धार्थाच्या काळी चातुर्वर्ण्य व्यवस्था प्रभावी होती काय ?**

**उत्तर** - होय. ब्राह्मणवादानुसार असलेली चातुर्वर्ण्याची समाजव्यवस्था सिद्धार्थास पूर्णतः अनैसर्गिक वाटत होती. कोणीतरी समाजावर लादलेल्या हुकुमानुसार ती व्यवस्था होती. परंतु सिद्धार्थ स्वतंत्र समाजव्यवस्थेचा समर्थक होता. ब्राह्मणवादी समाजरचना गतिशील समाजरचना नव्हती. जन्माच्या वेळी मिळालेला विशिष्ट दर्जा (ब्राह्मण किंवा वैश्य वगैरे) त्या व्यक्तीचा कायमचा (Permanent) दर्जा असे. कोणी कितीही पुण्यकर्म केले किंवा कितीही पापकर्म केले तरी त्याचा दर्जा बदलत नसे. त्यामुळे गुणांची पूजा होत नसे किंवा त्यात विकास घडवून आणावयाची शक्यता नसे. प्रत्येक समाजात असमानता आहे; परंतु त्या असमानतेस धार्मिक मान्यता नाही. ब्राह्मणवादाने समानतेचा सिद्धान्त कधीही स्वीकार केला नाही. कारण तो समानतेच्या सिद्धान्ताचा शत्रू आहे.

चारही वर्णांचे व्यवसाय निश्चित केले होते व निवड करावयाची कोणासही स्वतंत्रता नव्हती. सिद्धार्थास चातुर्वर्ण्याचे तत्त्वज्ञान पूर्णतः चुकीचे वाटले. कारण चातुर्वर्णाचा उद्देश्य कमजोर वर्गाला दाबून त्यांचे शोषण करणे हाच होता. शूद्र आणि स्त्रिया सर्वथा शक्तिहीन होत्या. त्यांना ज्ञान प्राप्त करावयाचा देखील अधिकार नव्हता. सिद्धार्थास ठाऊक होते की, चातुर्वर्णी समाजरचनेमध्ये सुधार करणे शक्य नव्हते; कारण तिला 'ईश्वरनिर्मित' मानले जात असे. म्हणून त्या समाजव्यवस्थेला पूर्णतः नष्ट करणेच आवश्यक होते.

**प्रश्न ३८ ब्राह्मणांचा कर्मवादाचा सिद्धान्त सिद्धार्थास मान्य होता काय ?**

**उत्तर** - नाही. सिद्धार्थास दिसून आले की, कर्मवादाची रचना ब्राह्मणवादातूनच झालेली आहे, आणि विद्रोहाची भावना शूद्र समाजातून पूर्णतः नष्ट व्हावी यासाठीच आहे. ब्राह्मणी कर्मवादानुसार पुनर्जन्माच्यावेळी कोणता जन्म घ्यावयाचा हे 'मागील जन्मी केलेल्या कर्मांवर अवलंबून असते.' पुनर्जन्म हा मागील जन्मीच्या कर्मांचा परिणाम होय. याचा अर्थ की, या जन्मीच्या दुःखाकरिता पूर्वजन्मीची कर्मेच जबाबदार आहेत. विद्रोह करून देखील दुःख दूर केले जाऊ शकत नाही. कारण पूर्वजन्मीच्या कर्मांमुळेच असे निश्चित केलेले आहे की, या जन्मी तो दुःखीच राहील. असा कर्मवाद सिद्धार्थास मान्य नव्हता.

**प्रश्न ३९ उपनिषदाविषयी सिद्धार्थाचे काय मत होते ?**

**उत्तर** - उपनिषदसुद्धा वैदिक वाङ्मयाचा भाग असल्याचाच समज होता. हा वेदांचा भाग नव्हे. उपनिषद श्रुतिबाह्य आहेत. परंतु त्यांना धार्मिक वाङ्मयाचा भाग असल्याचे मानले जाते. त्यांची संख्या बरीच आहे. त्यातील काही प्रमुख आहेत. काही उपनिषदाविषयी ब्राह्मण पुरोहितांमध्ये बराच विरोध होता. तथापि सर्व उपनिषद याविषयी सहमत होते की, वैदिक अध्ययन 'अविद्येचे' अध्ययन होते. ते सर्व वेदांना व वैदिक ज्ञानास अपरा (निम्नस्तरीय) विद्याच मानीत होते, आणि वेदांना अपौरुषेय मानीत नव्हते. तथापि उपनिषदांचा मुख्य विषय ब्रह्म आणि आत्मा असा होता.

ब्रह्म हेच सर्वव्यापक तत्त्व असून त्याने सृष्टीस एकत्र बांधलेले आहे. आत्म्यास ज्यावेळी हे ज्ञान होईल की, तोसुद्धा ब्रह्माचे स्वरूप आहे, तेव्हाच आत्म्याची मुक्ती होईल. उपनिषदाची मुख्य शिकवण अशी की, 'आत्मा' आणि 'ब्रह्म' एकच आहेत. मायेमुळे ग्रथित झाल्यामुळे आत्म्यास हा बोध होत नाही. परंतु सिद्धार्थास 'ब्रह्माच्या' वास्तविकतेचे प्रमाण मिळालेंच नाही. म्हणून त्याने उपनिषदाच्या मूलभूत पायासच अस्वीकार केले. याज्ञवल्क्यासारख्या महान ऋषींना जेव्हा विचारण्यात आले की, 'ब्रह्म म्हणजे काय? आत्मा काय आहे?' तेव्हा बृहदारण्यक उपनिषदात त्याचे उत्तर असे नमूद केलेले आहे की, मी जाणत नाही, मी जाणत नाही (नेति, नेति). ज्याविषयी कोणीही कांहीच जाणत नाही ती वस्तू वास्तविकता कशी असू शकेल? म्हणून सिद्धार्थाने उपनिषदांना शुद्ध काल्पनिक मानले.

**प्रश्न ४० सिद्धार्थाने कपिल मुनीच्या सांख्य मताचे अध्ययन केले होते काय ?**

**उत्तर** - होय. प्राचीन तत्त्वज्ञानी लोकांमध्ये कपिलमुनी सर्वांत प्रमुख होते. त्यांचे तत्त्वज्ञान सांख्यतत्त्वज्ञान या नावाने ओळखले जाते. त्याचा प्रथम सिद्धान्त असा की, सत्यासाठी प्रमाण आवश्यक आहे. प्रमाणाशिवाय सत्याचे अस्तित्व नाही. सत्याला सिद्ध करावयास केवळ दोनच प्रमाण मान्य केले जाऊ शकतात -

१) प्रत्यक्ष व २) अनुमान. १) प्रत्यक्ष प्रमाण म्हणजे इंद्रियांच्या माध्यमाने विद्यमान वस्तूची चित्तास ओळख करून देणे २) अनुमान प्रमाण तीन प्रकारचे आहेत - १. कारणामुळे कार्याचे अनुमान. जसे - ढगांच्या अस्तित्वामुळे पावसाचे अनुमान लावू शकतो. २. कार्याने कारणाचे अनुमान. जसे - जर नदीला पूर आलेला दिसत असेल तर वरच्या प्रवाहाच्या प्रदेशात पाऊस पडलेला असावा असे अनुमान लावू शकतो. ३. सामान्यतः दृष्टीस पडणाऱ्या गोष्टीवरून अनुमान जसे - आकाशात तारे भिन्नभिन्न ठिकाणी गेलेले पाहून आपण असे अनुमान लावतो की, तारे स्थानपरिवर्तन करतात. कपिलमुनीला सृष्टिकर्त्याचे अस्तित्व मान्य नव्हते. त्यांचे असे मत होते की, उत्पन्न वस्तू आधीपासून आपल्या कारणामुळे विद्यमान असते जसे मातीपासून भांडे बनते किंवा धाग्यापासून कपडा बनतो. नवीन उत्पत्ती कधीच होत नसते. तसेच असत्य हे कोणत्याही कार्याचे कारण होऊच शकत नाही. या जगाचे मूळ स्रोत (उत्पत्तीस कारण) दोन आहेत. :- (१) व्यक्त आणि (२) अव्यक्त (अविकसित) दुसरा तर्क असा की, कार्यास आपल्या कारणाहून भिन्न असायलाच पाहिजे.

कपिल ऋषीचे म्हणणे असे होते की, अव्यक्त (अविकसित) वस्तूची व्यक्त (विकसित) वस्तूंमध्ये परिणती ज्या तीन गुणांमुळे होते ते असे - सत्त्व, रज आणि तम. सत्त्व गुण सृष्टीमध्ये प्रकाशाप्रमाणे आहे, जो प्राणिमात्रास सुख देतो. रजगुण प्रेरित करतो, संचारित करतो. तो क्रियाशीलतेस कारण होतो. तमोगुण वजनीपणाचे द्योतक आहे, जड वस्तूचे द्योतक आहे तो निरोध करतो, उपेक्षा किंवा निष्क्रियता उत्पन्न करतो, या गुणांचे प्रमाण कमी-अधिक होण्यास दुःख हेच कारण होय. सिद्धार्थाने त्यातील केवळ तीन गोष्टी ग्रहण केल्या - १. सत्य प्रमाणावर आधारित असलेच पाहिजे. यथार्थतेचा आधार, बुद्धिवाद असायलाच पाहिजे २. ईश्वराच्या अस्तित्वास तर्कावर आधारित असे कोणतेच कारण विद्यमान नाही. ३. जगात दुःख आहे.

**प्रश्न ४१ तपश्चर्येचे परीक्षण सिद्धार्थाने कोठे केले ?**

**उत्तर** - सांख्यमार्ग आणि समाधिमार्गाचे परीक्षण केल्यावर सिद्धार्थ गयेस गेला. तेथे राजर्षी नेंगरी यांच्या आश्रमात व उरुवेलेस नेरंजरा नदीच्या काठावर एकांत ठिकाणी गेला. तेथे त्यास पंचवर्गीय भिक्खू भेटले. ते सिद्धार्थाची सेवा करू लागले व तो म्हणेल ते ऐकू लागले. तेथे सिद्धार्थाने अत्यंत उग्र स्वरूपाची आत्मक्लेशाची तपश्चर्या आरंभ केली.

**प्रश्न ४२ संबोधी प्राप्त होण्यापूर्वी सिद्धार्थाचे पाच आचार्य होते ते कोणते ?**

**उत्तर** -

१) बोधिसत्त्वाचा जन्म होताच ज्या आठ ब्राह्मणांनी येऊन त्याची लक्षणे वर्तविली होती, त्यांची नावे - राम, ध्वज, लक्ष्मण, मन्त्री, यज्ञ, सुयाम, सुभोज आणि सुदत्त अशी होती. ह्या सर्वांनी 'स्वस्ती' सांगून सिद्धार्थाची जोपासना केली होती. हे त्याचे प्रथम आचार्य होते.

२) बोधिसत्त्वाचा दुसरा आचार्य सब्बमित्त नावाचा ब्राह्मण होय. तो फार कुलीन अशा उच्च घराण्यातील असून शब्दशास्त्र, वैयाकरण आणि वेदांची सहा अंगे जाणणारा पंडित होता. पिता शुद्धोदनाने त्यास पुष्कळसे धन देऊन व सोन्याच्या झारीद्वारे पाण्याने संकल्प करून कुमार सिद्धार्थाला त्याच्याकडे सोपविले होते. हा त्याचा दुसरा आचार्य होय.

३) त्याचा तिसरा आचार्य एक देवता होती, जिने बोधिसत्त्वाच्या अंतःकरणात ज्ञानाचा शोध करण्यासाठी घराबाहेर पडण्यास त्याला उद्यत आणि उत्सुक केले होते. तिचे म्हणणे ऐकून सिद्धार्थास महालात राहणे असह्य होऊ लागले व त्याने गृहत्याग करून महाभिनिष्क्रमण केले. ही देवता तिसरा आचार्य होती.

४) आलारकालाम बोधिसत्त्वाचा चौथा आचार्य होता.

५) उद्दक रामपुत्र हा बोधिसत्त्वाचा पाचवा आचार्य होता.

**प्रश्न ४३ तपश्चर्येच्या वेळी सिद्धार्थाचे कोणकोण सोबती होते ?**

**उत्तर** - तपश्चर्येकरिता सिद्धार्थ उरुवेलेकडील एका दूरच्या अरण्यात निघून गेला आणि कडकडीत व्रतनियमांनी आपली शरीरशुद्धी करण्यासाठी शिस्तीचे पालन करून त्याने सहा

वर्षे महान तप केले. त्याच्यासोबत पाच ब्राह्मण सोबती होते. त्यांची नावे - कौंडिण्य, भद्दीय, वप्प, महानाम आणि अश्वजित अशी होती. यांनाच पुढे पंचवर्गीय भिक्खू म्हटलेले आहे.

## प्रश्न ४४ सिद्धार्थ गौतमाने कशा तऱ्हेची तपश्चर्या केली ?

**उत्तर -**

१) सिद्धार्थाची तपश्चर्या अत्यंत उग्र स्वरूपाची होती.

२) कधीकधी तो दोन-तीन घरीच भिक्षा मागण्यास जाई सात घरांपेक्षा जास्त घरी जात नसे. प्रत्येक घरून दोन-तीन घासांचेच भोजन स्वीकारित असे. सात घासांपेक्षा अधिक भोजन स्वीकारित नसे.

३) तो केवळ एक-दोन वाट्या अन्न खाऊनच उदरनिर्वाह करीत असे सात वाट्यांपेक्षा अधिक अन्न सेवन करीत नसे.

४) तो दिवसातून एकदाच भोजन करीत असे, तर कधीकधी दोन दिवसातून एकदा. असे करीत करीत कधीकधी सात दिवसांतून एकदाच तर कधी पंधरा दिवसांतून एकदा आणि तेसुद्धा मोजकेच अन्न ग्रहण करीत असे.

५) जेव्हा त्याने तपश्चर्येत अधिक प्रगती केली, तेव्हा त्याचा आहार जंगलातील केवळ हिरवी कंदमुळेच होता, किंवा आपणहून उगवलेले जव किंवा धानाचे दाणे किंवा झाडाच्या सालींचे तुकडे, किंवा धानाच्या आतील लाल कण, किंवा उकळलेल्या तांदळाची पेज, किंवा मोहरीच्या दाण्याचे चूर्ण असाच त्याचा आहार होता.

६) तो कंदमुळे व हवेने आपोआप खाली पडलेली जंगली फळे खाऊन राहत असे. त्याचे कपडे तागाचे, किंवा कचऱ्याच्या ढिगाऱ्यावर पडलेल्या चिंध्यांचे, किंवा झाडांच्या सालीचे, किंवा हरिणाच्या कातडीचे, किंवा गवतापासून बनविलेल्या पट्ट्यांचे, मनुष्य किंवा जनावरांच्या केसांपासून बनविलेल्या घोंगड्यांचे किंवा गिधाडांच्या पंखांचे बनविलेले असत.

७) तो आपल्या डोक्याचे व दाढीचे केस उपटून काढी. तो नेहमीच मांडी घालून ताठ बसत असे आणि तशाच अवस्थेत पुढे सरकत असे.

८) अशा प्रकारे आणि अशाच अनेक प्रकारे तो आपल्या शरीराला कष्ट व वेदना देई, आपल्या शरीराविषयी त्याने एवढी उपेक्षा दाखविली की, वर्षानुवर्षे त्याच्या शरीरावर मळाचे थर जमून पुढे ते आपोआप खाली पडू लागले होते. हिवाळ्यात अतिशय थंडीच्या आणि कृष्णपक्षांतील अंधाऱ्या रात्री तो उघड्यावर राहत असे, तर दिवसा गडद काळोखात राहत असे. पावसाळा सुरू होताना जेव्हा भयंकर उष्मा होऊ लागे तेव्हा तो सूर्याच्या प्रखर उन्हात व रात्री जीव गुदमरल्या जाईल अशा गर्मीमध्ये घनघोर जंगलात राहत असे.

९) तो स्मशानात प्रेतांच्या हाडांची उशी डोक्याखाली घेऊन झोपत असे.

१०) शेवटी तर गौतमाने आहार अत्यंत कमी केला. दररोज एकच शेंग खाऊन पूर्ण दिवस घालवीत असे. त्यानंतर मोहरीचा एकच दाणा व नंतर तांदळाचा एकच दाणा खाऊन

राहत असे. त्यामुळे त्याचे शरीर अत्यंत कृश झाले. त्याने आपल्या पोटाला स्पर्श केला असता त्याचा हात पाठीच्या बरगड्यांना जाऊन लागे आणि पाठीला स्पर्श केला असता पोटाच्या आतडीस स्पर्श होई इतके त्याचे पोट व पाठ एक झाले होते.

११) गौतमाची तपश्चर्या व आत्मक्लेश अशा प्रकारे अत्यंत उग्र स्वरूपाचे होते. तपश्चर्या जितकी उग्र करता येईल तेवढी त्याने केली. हे सर्व सहा वर्षांच्या दीर्घ काळपर्यंत सुरूच होते. सहा वर्षांनंतर त्याचे शरीर एवढे क्षीण झाले की, तो जागच्या जागी हालचालही करू शकत नव्हता.

१२) एके दिवशी त्यास एकाएकी मुर्च्छा आली व तो जमिनीवर कोसळला त्याच्या सोबत्यांना तो मरण पावला असेच वाटले, परंतु थोड्याच वेळाने सिद्धार्थास चेतना आली.

**प्रश्न ४५ सिद्धार्थाने कडक तपश्चर्येचा त्याग का केला ?**

**उत्तर** - सिद्धार्थाने विचार केला की, कडक उपोषणाने किंवा आत्मक्लेशाने ज्ञानप्राप्ती कधीही होणार नाही; मनाची दारे उघडी केल्यानेच ती होऊ शकेल. कडक उपोषणामुळे त्याला आलेले मरण त्याने नुकतेच जेमतेम टाळले होते. तथापि त्याला ज्ञानप्राप्ती झाली नव्हती. खरी शांती व चित्ताची एकाग्रता शरीराची नैसर्गिक गरज भागविल्यानेच प्राप्त होऊ शकते, असा त्याने विचार केला व म्हणून सिद्धार्थाने अन्नग्रहण करण्याचा निश्चय केला जेणेकरून ज्ञानप्राप्ती होईपर्यंत तरी त्याला जगता यावे. ध्यान मार्गाने जाऊन चिंतन करूनच दुःखमुक्तीचा मार्ग सापडू शकेल, असे त्यास वाटू लागले, म्हणून त्याने तपश्चर्येचा त्याग केला. (मज्झिमनिकायामधील महासच्चक सुत्त)

# ज्ञानलाभ आणि नवीन मार्गाचे दर्शन

**प्रश्न ४६ तपश्चर्येचा त्याग केल्यावर सिद्धार्थास प्रथम अन्नदान कोणी दिले ?**

**उत्तर** - त्यावेळी उरुवेलेमध्ये सेनानी नावाचा गृहस्थ राहत होता. त्याच्या कन्येचे नाव सुजाता असे होते. तिने न्यग्रोध वृक्षाला नवस केला होता की, जर तिला पुत्रलाभ झाला तर प्रत्येक वर्षी ती त्याला नैवेद्य चढवील. तिची ही इच्छा पूर्ण झाल्यामुळे तिने आपल्या पुण्णा नावाच्या दासीला न्यग्रोध वृक्षाखाली पूजेची जागा तयार करण्यास पाठविले होते. तेथे गौतमाला बसलेला पाहून पुण्णाला वाटले की, वृक्षदेवताच साकार झालेली आहे. सुजातेला हे समजल्यावर ती स्वतःच तेथे गेली व तिने स्वतः बनविलेली खीर सुवर्णपात्रामध्ये सिद्धार्थ गौतमाला अर्पण केली. सिद्धार्थाने त्या खिरेचा स्वीकार केला आणि जवळच्या सुपतिट्ठ (नेरंजरा) नावाच्या नदीवर स्नान करून खीर ग्रहण केली. अशा प्रकारे सिद्धार्थाच्या तपश्चर्येचा शेवट झाला. खीर खाल्यानंतर त्याने सुवर्णपात्र नेरंजरा नदीत फेकून दिले. ते पात्र 'काळ' नावाच्या नागराजाच्या महालाजवळ जाऊन नदीच्या डोहात बुडून गेले.

**प्रश्न ४७ सर्वात फलदायी अन्नदान कोणते ?**

**उत्तर** - भगवंताचे महापरिनिर्वाण निकट आहे, असे त्यांनी जेव्हा जाणले, तेव्हा त्यांनी आयुष्मान आनंदास, चुन्द लोहाराला लोकांनी दूषण देऊ नये याकरिता स्पष्ट केले- "ही दोन अन्नदाने समान फलदायी आणि दुसऱ्या कोणत्याही अन्नदानापेक्षा अतीव लाभदायक

आहेत. पहिले अन्नदान म्हणजे, जेव्हा तथागतांनी परिपूर्ण ज्ञानाची प्राप्ती केली ते, आणि दुसरे अन्नदान म्हणजे जेव्हा त्यांच्या ऐहिक अस्तित्वाचा मागमूसही मागे शिल्लक न राहता त्यांनी अंतिम निर्वाणात पदार्पण केले त ही दोन अन्नदानें समान फलदायी व समान लाभदायक अशा एकाच योग्यतेची असून दुसऱ्या कोणत्याही अन्नदानापेक्षा अधिक फलदायी व अधिक लाभदायक आहेत.''

**प्रश्न ४८ उपोषण सोडल्यानंतर सिद्धार्थाने काय केले ?**

**उत्तर** - मनाचा पक्का निर्धार करून तो उरुवेलेहून निघाला आणि राजमार्गाने वाटचाल करीत करीत गयेस पोहोचला. तेथे एक चांगल्यापैकी पिंपळाचा वृक्ष त्यास दिसला. त्या पिंपळाच्या वृक्षाखाली (अश्वत्थवृक्ष) पूर्वेकडे तोंड करून मांडी घालून तो बसला. चित्तमलाचा क्षय करावयास ऋषिमुनी बहुधा पूर्व दिशाच निवडीत असत. ध्यान करावयास बसण्यापूर्वी सिद्धार्थाने इतकी भोजनसामग्री एकत्र केली की, जी त्यास चाळीस दिवसांपर्यंत पुरेल.

सुजातेपासून खीर ग्रहण केल्यावर त्याच रात्री सिद्धार्थाला पांच स्वप्ने पडलीत. त्यांचा त्याने असा अर्थ काढला की, प्रयत्नांती त्याला सम्बोधि अवश्य प्राप्त होईल. त्याने निश्चय केला की, शरीरातील सर्व रक्त आणि मांस सुकून गेले तरीसुद्धा 'बोधी' प्राप्त होईपर्यंत तो त्या जागेस सोडणार नाही.

असे म्हणतात की, काळ नावाचा नागराजा व स्वर्णप्रभा नावाची त्याची पत्नी पिंपळाच्या झाडाजवळ आले आणि ध्यानस्थ बसलेल्या सिद्धार्थाची स्तुती करून तो निश्चितच बोधी प्राप्त करेल, अशी शुभेच्छा त्यांनी व्यक्त केली.

तो दृढ आसन लावून बसलेला असताना वाईट चेतना आणि वाईट विचार एकामागून एक त्याच्या मनावर आक्रमण करू लागले. यालाचा पौराणिक भाषेमध्ये 'मार-पुत्रांचे आक्रमण' म्हटलेले आहे. सिद्धार्थास भीती वाटू लागली की, त्या वाईट विचारांचे जर त्याने नियंत्रण केले नाही तर त्याची साधना विफल होऊ शकेल. त्याला माहीत होते की, मारयुद्धामध्ये पुष्कळसे ऋषिमुनी पराजित झाले होते. तेव्हा त्याने आपले संपूर्ण साहस पणाला लावून मनाचा निर्धार केला की, ''माझ्यामध्ये श्रद्धा आहे, प्रज्ञाबल आहे, दृढ संकल्प आणि कर्तृत्व आहे, तेव्हा मी माराच्या आक्रमणास भिणार नाही.''

**प्रश्न ४९ ज्ञानप्राप्तीपूर्वी सिद्धार्थास कसा अनुभव आला व त्यास ज्ञानप्राप्ती कशी झाली ?**

**उत्तर** - ज्ञानप्राप्तीसाठी सिद्धार्थास चार आठवडे सतत ध्यानमग्न राहावे लागले. त्याला शेवटच्या स्थितीपर्यंत पोहोचण्यास चार अवस्था पार कराव्या लागल्या.

१) पहिली अवस्था वितर्क आणि विचारप्रधान होती. एकान्तवासामुळे त्याने तिला सरलतेने प्राप्त केले.

२) दुसऱ्या अवस्थेमध्ये एकाग्रता आली.

३) तिसऱ्या अवस्थेमध्ये समचित्तता आणि जागरूकतेचा समावेश झाला.

४) चवथ्या आणि अंतिम अवस्थेमध्ये समचित्ततेचा व पवित्रतेचा संयोग आणि समचित्तता

व जागरूकतेचा संयोग झाला. याप्रमाणे चार आठवडे सतत चिंतन करीत राहिल्याने अविद्येचा नाश होऊन प्रकाश प्रकट झाला.

सिद्धार्थ बोधिसत्त्व होता; म्हणजेच ज्ञानप्राप्तीकरिता प्रयत्नशील होता.

चौथ्या आठवड्याच्या अंतिम रात्री वासनांचा समूळ नाश कसा करावा, ह्याचा मार्ग सापडला. दुसऱ्या दिवशीच्या प्रातःकाळी जणू फुलणाऱ्या कमळाप्रमाणे त्याचे चित्त विकसित झाले. सम्यक् सम्बोधी प्राप्त होऊन चार आर्यसत्यांचे आणि प्रतित्यसमुत्पाद सिद्धान्ताचे ज्ञान झाले. सिद्धार्थ सम्यक संबुद्ध झाला. त्यावेळी त्याचे वय ३५ वर्षांचे होते. तो दिवस बुधवार वैशाखी पौर्णिमेचा असून ते इ.स. पूर्व ५२८ वे वर्ष होते. ज्याप्रमाणे उषःकालीन सूर्य रात्रीच्या अंधकारास दूर पळवितो आणि वृक्ष, शेतें, खडक, सागर, नद्या, प्राणी, मानव आणि सर्वच वस्तूंना प्रकाशित करतो, त्याप्रमाणे त्याच्या चित्तांत ज्ञानाचा पूर्ण प्रकाश फाकला आणि मनुष्याच्या दुःखाची कारणे व ती दुःखे दूर करावयाचा मार्ग त्याने एकाच दृष्टिक्षेपात पाहिला. यापुढे त्याला संबुद्ध, तथागत, सुगत, धर्मराज, मारजित जीन इ. नावांनी ओळखत.

**प्रश्न ५० ज्ञानप्राप्तीसाठी भगवंताना कशा तऱ्हेचा मानसिक त्रास सहन करावा लागला ?**

**उत्तर** - त्यांना पराकाष्ठेचे व भयंकर मानसिक श्रम करावे लागलेत. सत्य शोधण्याच्या मार्गात अडथळा आणणाऱ्या स्वतःच्या शरीरामधील सर्व नैसर्गिक दोषांशी, मानवी अंतवासनेशी, इच्छाशक्तींशी त्यांना झगडावे लागले. सभोवतालच्या पापी जगामधील सर्व अकुशल शक्तींना पराजित करावे लागले. ज्याप्रमाणे एखादा सैनिक जीवावर उदार होऊन युद्धात पुष्कळ शत्रूंशी एकटाच लढतो, त्याप्रमाणे ते लढले. एखाद्या विजयी वीराप्रमाणे त्यांनी आपले लक्ष्य गाठले आणि त्यामुळे मानवी दुःखाचे रहस्य बाहेर पडले. ह्यालाच 'मारावरील विजय' म्हणतात.

**प्रश्न ५१ सिद्धार्थाने 'मारविजय' कशा प्रकारे प्राप्त केला ?**

**उत्तर** - सिद्धार्थ नेरंजरा नदीच्या काठी निर्वाणप्राप्तीसाठी मोठ्या उत्साहाने ध्यान करीत असताना, 'मार' येथे आला व त्याला परावृत्त करावयास आटोकाट प्रयत्न करू लागला. 'मार' म्हणजे मारणारा मनाच्या दुष्ट किंवा अकुशल प्रवृत्तींचा समूह त्यास बोधिसत्त्व सिद्धार्थाने असे उत्तर दिले -

**कामा ते पठमा सेना दुतिया अरति वुच्चति।**
**ततिया खुप्पिपासा ते चतुत्थी तण्हा पवुच्चति ॥१॥**
**पंचमी थीनमिद्धं ते छट्ठा भीरूप वुच्चति।**
**सप्तमी विचिकिच्छा ते मक्खो थभो ते अट्ठमो ॥२॥**
**लाभो सिलोको सक्कारो मिच्छा लद्धो च थोयसो।**
**यो चत्तानं समुक्कंसे परेच अवजानति ॥३॥**
**एसा नमुचि ते सेना कण्हस्सभिप्पहारणी।**
**न तं असूरो जिनाति जेत्व च लभते सुखं ॥४॥**

**अर्थ** - (१-२) (हे मार) इंद्रियांना सुखविणारे चैनीचे पदार्थ ही तुझी पहिली सेना होय. अरती (कंटाळा) ही तुझी दुसरी सेना, तिसरी भूक आणि तहान, चवथी विषयवासना, पांचवी आळस, सहावी भीती, सातवी कुशंका आणि आठवी गर्व ही तुझी सेना होय. (३) याशिवाय लाभसत्कार, पूजा ही तुझी नववी सेना आहे, आणि खोट्या मार्गाने मिळालेली कीर्ती ही दहावी, या कीर्तीच्या योगाने मनुष्य आत्मस्तुती आणि परनिंदा करीत असतो. (४) हे काळ्याकुट्ट नमुची (मार), साधुसंतांवर प्रहार करणारी ही तुझी सेना आहे. तिला भ्याड मनुष्य जिंकू शकत नाही. परंतु जो शूर मनुष्य तिला जिंकतो, तोच सुखाचा लाभ घेतो.) येणेप्रमाणे सिद्धार्थाने माराला जिंकले. 'मारविजय' म्हणजे 'आत्मविजय' होय. हा जय बाह्य शत्रूंपेक्षा कितीतरी पटीने श्रेष्ठ आहे.

**प्रश्न ५२ बोधिवृक्षाखाली भ. बुद्ध किती दिवस राहिले ?**

**उत्तर** - ते एकोणपन्नास दिवस राहिले. त्यावेळी भगवंतानी बुद्धधम्माविषयीच्या ज्या गोष्टी बौद्ध वाङ्मयात वाचावयास मिळतात त्यांचे व बौद्धधम्माच्या संपूर्ण तत्त्वप्रणालीचे मनन व चिंतन केले. चिंतन काळात उपजीविका करण्यासाठी चाळीस दिवस पुरेल इतके अन्न त्यांनी गोळा केले होते.

**प्रश्न ५३ भ. बुद्धांना प्राप्त झालेल्या सम्बोधीमध्ये प्रामुख्याने कोणकोणते ज्ञान समाविष्ट होते ?**

**उत्तर** - ज्ञेय आणि अज्ञेयाचे स्वरूप, आर्य अष्टांगिक मार्ग, शक्याशक्य, गुणावगुणाचे मूळ कारण, प्राणिमात्रांचे विचार जाणणे, सृष्टीचे नियम, संवेदनांचे मोहजाल, इच्छाचा विमोड करण्याची साधने कुणाही व्यक्तीचा तसेच वस्तूचा जन्म आणि पुनर्जन्म ह्यांतील फरक ह्या गोष्टी ज्ञानप्राप्तीमध्ये प्रमुख होत्या. चार आर्यसत्ये व प्रतित्यसमुत्पाद इत्यादीचे यथार्थ ज्ञान यांनाच लोकोत्तर प्रज्ञा म्हटलेले आहे.

**प्रश्न ५३ (अ) : सम्यक संबुद्धाला कोणकोणत्या गोष्टींचे ज्ञान किंवा बळ प्राप्त झालेले असते ?**

**उत्तर** - सम्यक संबुद्धाला दहा गोष्टींचे ज्ञान किंवा बळ प्राप्त झालेले असते.

१) बुद्ध स्थानाला स्थान समजून, अस्थानाला अस्थान असे यथार्थपणे जाणतात.
२) बुद्ध सर्वागामिनी प्रतिपदेला (मार्ग, ज्ञान) यथार्थ जाणतात.
३) बुद्ध भूतकाळ, वर्तमान आणि भविष्य काळांत केलेल्या कर्मांचे परिणाम ह्यांना स्थान आणि हेतूपूर्वक अचूकपणे जाणतात. (कोणीही केलेल्या कर्माचे भविष्यांत त्याला काय फळ मिळेल, हे जाणतात : संकलिका)
४) बुद्ध अनेक धातु (ब्रह्माण्ड), नाना धातू असलेल्या लोकांना (देवलोक वगैरे) यथार्थ जाणतात. (सर्वच ज्ञान एकेवेळी सदा सर्वदा उपलब्ध नसते, परंतु आवश्यकता भासल्यास त्यांचे ज्ञान त्यांना त्वरितच होते : संकलिका)
५) बुद्ध विविध प्रकारचे स्वभाव किंवा गुणधर्म असलेल्या प्राण्यांना जाणतात.
६) बुद्ध इतर प्राण्यांच्या इंद्रियांचे परत्व-अपरत्व (प्रबलता-दुर्बलता) ह्यांना यथार्थत

जाणतात.

७) बुद्ध ध्यान, विमोक्ष, समाधी, समापत्तीचे मळ आणि व्यवदान (निर्मळ कारण) आणि त्यांचे उत्थान यांना समग्रपणे जाणतात.

८) बुद्ध आपल्या पूर्वजन्मींच्या घटनांचे स्मरण करू शकतात. (पूर्वजन्म म्हणजे ह्याच शरीराचे पूर्वक्षण : संकलिका)

९) बुद्ध अमानवीय विशुद्ध दिव्यचक्षूंद्वारे प्राण्यांचे उत्पन्न होणे, मरणे, स्वर्गलोकास प्राप्त होणे, यांचे दर्शन करू शकतात. (स्वर्ग लोक या पृथ्वीवरील आनंदमय अवस्थेला म्हणतात : संकलिका)

१०) बुद्ध आश्रवांच्या क्षयामुळे आश्रवरहित (बंधनरहित) झाल्यामुळे चित्ताची मुक्ती आणि प्रज्ञेची मुक्ती ह्यांचा साक्षात्कार त्यांना घडतो.

भगवान प्रत्येक क्षणी संसारातील सर्वच गोष्टींचे ज्ञान स्वतःजवळ साठवून ठेवीत नसत. परंतु त्यांची सर्वज्ञता यातच होती की, ज्या क्षणी त्यांना कसलेही ज्ञान जाणावेसे वाटले, तर त्या विषयावर ध्यान केल्याबरोबर त्यांना त्याचे ज्ञान होत असे. ह्यालाच 'आवर्जन-प्रतिबद्ध' सर्वज्ञता म्हणतात.

## भ. बुद्धांचा विषाद योग

**प्रश्न ५४ सम्बोधी प्राप्त केल्यावर सद्धम्माचा प्रचार-प्रसार करावा असे भगवंताना सुरुवातीस वाटले काय ?**

**उत्तर** - नाही. सम्बोधी प्राप्त केल्यावर भगवंताच्या मनात असा विचार आला की, दुसऱ्यांना आपल्या धम्माचा उपदेश द्यावा की, आत्मकल्याणामध्येच मग्न राहावे. यालाच त्यांचा विषादयोग असे म्हणतात. त्यांना असे वाटले की -

१) मला सद्धम्माचे ज्ञान मिळाले हे खरे, परंतु प्रत्येक सामान्य व्यक्तीला ते समजणे व त्याचे अनुकरण करणे कठीण आहे. बुद्धिमान लोकांनादेखील ते अतिसूक्ष्म आहे.

२) माणसाला आत्मा आणि परमात्मा यांच्या मोहजालामधून निघणे कठीण आहे. त्याला रितीरिवाज, रूढी आणि धार्मिक संस्कार यांच्या बंधनातून निघणे कठीण आहे. ब्राम्हणी कर्मवादापासून मुक्त होणे कठीण आहे.

३) लोकांना 'आत्मा नित्य आहे', या आजपावेतो त्यांनी स्वीकारलेल्या सिद्धान्तापासून मुक्त होणे कठीण आहे.

४) जर मी माझ्या सिद्धान्ताचा उपदेश दिला व लोकांना तो समजला नाही किंवा समजून देखील त्यांनी जर त्याचा स्वीकार केला नाही किंवा स्वीकार केल्यावर देखील त्यानुसार ते आचरण करू शकले नाही, तर लोकांनाही व्यर्थ श्रम होतील व मलादेखील उगीचच त्रास होईल.

५) मी संन्यासी राहून आपले स्वतःचे कल्याण निश्चितच करू शकतो. या प्रकारे भगवंताचे मन सद्धम्माच्या प्रचाराकडे न झुकता निष्क्रियतेकडे झुकले.

**किच्छेन मे अधिगतं हलं दानि पकासितुं ।**
**रागदोसपरेतेहि नायं धम्मो सुसम्बुद्धो ॥१॥**
**परिसोतगामिं निपुणं गंभीरं दुद्दसं अणुं ।**
**रागरत्ता न दक्खन्ति तमोखन्धेन आवुटा ति ॥२॥**

**अर्थ :** (१) मोठ्या प्रयत्नाने या मार्गाचे ज्ञान मला झाले आहे. आता ते लोकांना सांगण्यात अर्थ दिसत नाही. कारण लोभाने आणि द्वेषाने भरलेले लोक ते जाणू शकणार नाहीत.
(२) हा मार्ग लोकप्रवाहाच्या उलट जाणारा आहे हा ज्ञानयुक्त आहे, हा गंभीर आहे, हा दुरधिगम आहे, आणि हा सूक्ष्म आहे (म्हणून) अज्ञानावरणाने आच्छादित व कामासक्त मनुष्यांना याचे ज्ञान होणार नाही.

**प्रश्न ५५ भगवंतानी आपल्या नवीन ज्ञानाचा प्रचार करावयाचे का ठरविले ?**

**उत्तर** - प्राचीन कथा अशी आहे की, ब्रह्मासहम्पतीला भगवंताच्या मनात आलेला धम्मप्रसार न करण्याचा विचार समजला व त्यामुळे जगाचे फार नुकसान होईल असे वाटून तो भगवंताजवळ प्रकट झाला व त्याने हात जोडून विनंती केली, 'तुम्ही आता सिद्धार्थ नसून सम्यक संबुद्ध झालेले आहात आणि जगाला अंधकारातून मुक्त करावयाचे प्रयत्न तुम्ही केलेच पाहिजेत. पुष्कळसे लोक असेदेखील आहेत की, जे सद्धम्म श्रवण करावयास आतुर आहेत. त्या लोकांसाठी अमृताचे द्वार उघडणे आवश्यक आहे. म्हणून दया करून देवता व मनुष्य यांना सद्धम्माचा उपदेश तुम्ही द्यावा.' त्यानंतर भगवंताने धम्माचा उपदेश करावयाचा संकल्प केला.

खरे म्हणजे त्यांनी स्वगतच पूर्ण विचार केला की, जगात एवढे दुःख आहे, त्यामुळे इतर संन्याशांप्रमाणे जगात काय घडत आहे ते केवळ निमूटपणे पाहत न बसता त्याच्या कल्याणाकरिता धर्मोपदेश करावा. त्यांना जाणीव झाली की, त्यांनी गृहत्याग याकरिताच केला होता की, दुःखाचे व संघर्षाचे मूळ शोधून काढावे आणि जगातील दुःख व कष्ट दूर करावेत. धम्माचे स्वरूप गहन असले तरी, शक्य तितक्या स्पष्टपणे व सोप्या रीतीने लोकांना शिकविणे आवश्यक होते. प्रत्येकाच्या वैयक्तिक कुवतीप्रमाणे त्यास सत्याचे दर्शन घडेलच, असे त्यांना वाटले. मुक्तीचा केवळ हाच एक मार्ग असून प्रत्येक मानवास तो समजावून घेण्याचा समान अधिकार आहे, असा त्यांनी स्वगतच विचार केला.

**प्रश्न ५६ भगवंताला विषादयोग नष्ट करून धम्मप्रसार करा, अशी विनंती करणारा तो ब्रह्मासहम्पती कोण होता ?**

**उत्तर** - मैत्री, करुणा, मुदिता (आनंदिवृत्ती), आणि उपेक्षा या चार भावनांना ब्रह्मविहार असे म्हणतात.

**तिट्ठचर निसिन्नो वा सयानो वा यावतस्स विगतमिद्धो ।**
**एतं सतिं अधिट्ठेय्य ब्रम्हमेतं विहारं इधमाहु ॥**

(उभे असता, चालत असता, बसले असता किंवा अंथरुणावर पडल्यावर जोपर्यंत झोप येत नाही तोपर्यंत ही मैत्रीची भावना जागृत ठेवावी. कारण तिलाच ब्रह्मविहार असे म्हणतात.)

ब्रम्हदेव म्हणजे मैत्री, करूणा, मुदिता किंवा उपेक्षा यांपैकी एखादी मनोवृत्ति होय. ज्या ब्रह्मदेवाला लोक पितामह म्हणतात, तो दुसरा कोणी नसून या चार मनोवृत्तींची साक्षात मूर्ती

होय. तेव्हा आता बुद्धांजवळ ब्रह्मदेव आला म्हणजे काय? तर या चार मनोवृत्ती त्यांच्या मनात विकास पावल्या. ब्रह्मदेवाची प्रार्थना त्यांनी ऐकली म्हणजे काय? तर त्यांच्या अंतःकरणात वास करणाऱ्या अमर्याद प्रेमाने, अगाध करु णेने, सज्जनांविषयी मुदितेने, आणि जे कोणी त्यांचे ऐकणार नाहीत व अकारण शत्रू होतील अशांच्या उपेक्षेने त्यांना सद्धम्माचा प्रसार करावयास प्रवृत्त केले.

## धम्मचक्र प्रवर्तन

**प्रश्न ५७ भगवंतांनी प्रथम उपदेश कोठे केला?**

**उत्तर** – ऋषिपतनाच्या मृगदायामध्ये केला. धर्मोपदेश करावयाचा निश्चय केल्यावर भगवंताने प्रथम उपदेश कोणास द्यावयाचा यावर विचार केला. सर्वप्रथम त्यांना आलारकालामाची आठवण झाली. कारण तो विद्धान, बुद्धिमान, समजदार आणि निर्मळ होता. परंतु त्याचे निधन झाल्याचे त्यांना समजले. त्यानंतर उद्दक रामपुत्तास उपदेश द्यावयाचा विचार केला. पण त्याचेही निधन झाले होते. तदनंतर वाराणसीजवळच्या ऋषिपतनाच्या मृगदावामध्ये त्यांचे पूर्वीचे पाच सोबती (पंचवर्गीय भिक्ख) त्यांना आठवले. भगवंतानी विचार केला की, त्यांनी बरीच सेवा केलेली होती. म्हणून त्यांनाच प्रथम धर्मोपदेश द्यावा. त्या स्थळाची ओळख म्हणून अजूनही पडझड झालेल्या स्तूपांचे अवशेष व शिलालेख त्या जागी शिल्लक आहेत.

सुरुवातीस भिक्खूंनी त्यांचे म्हणणे न ऐकण्याचे ठरविले. कारण त्यांना सिद्धार्थ गौतमाने तपश्चर्या सोडून दिल्याचे माहीत होते. परंतु त्यांच्या मुद्रेवरील अलौकिक तेज पाहून व त्यांची मधुर वाणी ऐकून त्यांची मने वळली.

त्यांच्यापैकी सर्वात प्रौढ असलेल्या कौंडिण्याला सर्वात प्रथम धम्मज्ञान समजले. सर्वप्रथम कौंडिण्यानेच आपली दुमते सोडून दिलीत. भ.बुद्धाच्या शिकवणुकीचा स्वीकार केला आणि त्यांचा शिष्य बनून अर्हतेकडे नेणाऱ्या मार्गावर प्रवेश केला. इतर चौघांनी लवकरच त्याचे अनुसरण केले.

त्यांनी विशद केलेल्या जीवनक्रमाला आर्य अष्टांगिक मार्ग म्हणतात व पाली भाषेत त्याला 'अरियो अट्ठङ्गिको' मग्गो असे म्हणतात.

**प्रश्न ५८ भगवंतांनी प्रथम धर्मोपदेशात काय सांगितले?**

**उत्तर** –प्रथम धर्मोपदेशाला 'धर्मचक्रप्रवर्तना' चा उपदेश असे म्हणतात. यात दोन प्रवचनांचा समावेश होतो. धर्मचक्रप्रवर्तन सूत्र (धम्मचक्कपवत्तन सुत्त) आणि अनात्मलक्षण सूत्र (अनत्त-लक्खण सुत्त) पहिले प्रवचन चार आर्यसत्यांविषयी (अरियसच्च) असून त्यालाच बुद्धधम्माचा आधार समजतात. दुसरे प्रवचन अनात्म लक्षणसूत्र, तीन अत्यावश्यक गोष्टींविषयी आहे. अनित्य (अनिच्च म्हणजे कोणतीही गोष्ट सनातन नसल्याचे तत्त्व = doctrine of impermanence), दुक्ख (दुःखाचे अस्तित्व = doctrine of Suffering) आणि अनात्म (अनत्ता म्हणजे आत्म्याचे अस्तित्व नसणे = doctrine of non-self). त्यांनी पंचवर्गीय भिक्खूंना जे त्यावेळी वाराणसीजवळ इसिपतन मृगदायेत राहत होते त्यांना चार

आर्यसत्यांचा उपदेश दिला तो असा :-

चार आर्यसत्ये (Four Noble Truths) येणेप्रमाणे-

१. दुःख, म्हणजे या जगांत दुःखाचे अस्तित्व आहे. (The Noble Truth of suffering : The raison d'etre of Buddhism)
२. दुःख समुदय, म्हणजे या दुःखाला कारण आहे. (The noble truth of the cause of suffering)'
३. दुःख निरोध, म्हणजे या दुःखाचा निरोध होऊ शकतो. (The Noble truth of the ceasation of suffering) आणि निब्बान (= निर्वाण) मिळू शकते. (Nibbana; the summum bonum of Buddhism)
४. दुःख-निरोध-गामिनी-प्रतिपदा (दुक्ख निरोध गामिनि पटिपदा), म्हणजे दुःख निरोधाचा जो मार्ग तो हाच आहे. मध्यम मार्ग (मज्झिमा पटिपदा) (The Noble truth of the path leading to the ceasation of suffering) या सदोदित सत्य असणाऱ्या गोष्टी (Universal Truths) असल्यामुळे यांना आर्यसत्ये असे म्हणतात.

प्रथम तीन आर्यसत्यावर बुद्धधम्माचे तत्त्वज्ञान (Philosophy) आधारलेली आहे आणि चौथे आर्यसत्य बुद्धधम्माचे नीतिशास्त्र (Ethics of Buddhism) होय.

**प्रश्न ५९ : भगवंतांनी मध्यममार्ग कशा प्रकारे समजावून सांगितला?**

**उत्तर - अ.** ह्या दोन विरुद्ध टोकांवरील गोष्टी आहेत. एक तर कामभोगाचे जीवन व दुसरे काय, क्लेशाचे जीवन. एकाचे म्हणणे खावे-प्यावे आणि मौज करावी, कारण उद्या तर मरायचेच आहे. दुसऱ्याचे म्हणणे असे की, संपूर्ण नैसर्गिक वासनांचा समूळ नाश केला पाहिजे, कारण त्यांच्यामुळे पुनर्जन्म होतो, म्हणून सदोदित देहदंडन करीत तपश्चर्या करावी.

**ब.** भगवंताने मध्यम मार्गाचा उपदेश केला न पूर्णतः कामभोगाचा मार्ग न पूर्णतः कायक्लेशाचा मार्ग. (The Middle Path)

**क.** जोपर्यंत पार्थिव किंवा स्वर्गीय सुखाची कामना मनात राहील, तोपर्यंत काय क्लेश व्यर्थच आहे. कायक्लेशाने जर तृष्णेला शांत करू शकलो नाही, तर स्वतःवर विजय मिळविणे शक्यच नाही.

**ड.** स्वतःवर विजय मिळविला म्हणजे काम-तृष्णेपासून आपोआपच मुक्ती मिळेल व कामभोगाची कामना राहणार नाही आणि मग प्राकृतिक गरजेची पूर्ती केल्यामुळे विकार निर्माण होणार नाहीत. आपल्या शारीरिक आवश्यकतेनुसार खाणेपिणे सुरू ठेवले पाहिजे.

**इ.** सर्व तऱ्हेची कामवासना उत्तेजक असते आणि कामुक आपल्या कामवासनेचा गुलाम असतो. तथापि शरीराच्या स्वाभाविक आवश्यकतेची पूर्ती करण्यात काहीच वाईट नाही. शरीर स्वस्थ ठेवले नाही तर प्रज्ञारूपी प्रदीप प्रज्वलित राहू शकणार नाही.

**फ.** दोन्ही विरुद्ध टोकाच्या मार्गापासून (Two extremities) दूर राहिले पाहिजे व मध्यममार्गास अवलंबिले पाहिजे.

**प्रश्न.६० : दुःख किंवा दुःखाबद्दलचे आर्यसत्य कोणत ?**

**उत्तर -** जन्म हा दुःखमय आहे. वृद्धत्व दुःखमय आहे, व्याधी दुःखमय आहे. मृत्यू दुःखमय

आहे. आनंद न देणाऱ्या गोष्टीशी गाठ पडणे दुःखमय आहे. आनंद देणाऱ्या गोष्टीचा वियोग होणे दुःखमय आहे. ज्याची लालसा असते ते न मिळाल्यास दुःख होते. थोडक्यात पाच आकर्षणे (उपादान स्कंध) दुःखमय आहेत. (Five Aggregates of Attachment are suffering) ह्यालाच 'दुःख' आर्यसत्य म्हणतात.

**प्रश्न ६१ : दुःखसमुदय किंवा दुःखाच्या कारणाबद्दलचे आर्यसत्य कोणते?**

**उत्तर** - तृष्णेमुळेच दुःख निर्माण होते. हे दुःखसमुदय आर्यसत्य होय. मोहामुळे जन्मोजन्माची साखळी ही तृष्णा उत्पन्न करते. इंद्रियसुखाची लालसा म्हणजे कामतृष्णा (काम तण्हा), जगण्याची लालसा म्हणजे भवतृष्णा (भव तण्हा म्हणजे अनंत काळपर्यंत जगावयाची लालसा) (Craving associated with Eternalism) नष्ट होऊन पुन्हा जन्म घ्यायची लालसा म्हणजे विभव तृष्णा (विभव तृष्णा : Craving associated with Nihilism.)

**प्रश्न ६२ : दुःखनिरोध किंवा दुःखाचा नाश होण्याबद्दलचे आर्यसत्य कोणते?**

**उत्तर** -तृष्णेचा निःशेष होऊ शकतो, म्हणजेच तृष्णेचा पूर्णतः नाश होऊन निर्वाणाची प्राप्ति होऊ शकते हेच दुःखनिरोधाचे आर्यसत्य होय.

**प्रश्न ६३ : दुःखनिरोध गामिनी प्रतिपदा किंवा दुःखाच्या नाशाचा मार्ग सांगणारे आर्यसत्य कोणते ?**

**उत्तर** - आर्य अष्टांगिक मार्ग (अरियो अट्ठंगिको मग्गो Noble Eightfold Path) हे दुःखनाशाच्या मार्गाचे आर्यसत्य होय. यांत आठ गोष्टींचा समावेश होतो. सम्यक दृष्टी (सम्मादिट्ठी Right understanding) सम्यक संकल्प (सम्मासंकल्प Right thoughts), सम्यक वाणी (सम्मा वाचा Right speech) सम्यक कर्मान्त (सम्मा कम्मन्तो Right action), सम्यक व्यायाम म्हणजे प्रयत्न (सम्मा व्यायामो Right endeavour), सम्यकस्मृति (सम्मासति Right mindfulness) सम्यकसमाधी (सम्मासमाधी Right concentration).

**प्रश्न ६४ : पंचवर्गीय भिक्खूंना दुःखाचा नाश करावयास भगवंतांने कोणता मार्ग सांगितला?**

**उत्तर** - भगवंताने त्यांना पंचशीलाचा व मध्यमार्गाचा उपदेश करून असे सांगितले की,

अ. त्यांच्या सद्धम्माचा, आत्मा परमात्मा यांच्याशी काहीही संबंध नाही. माणूस मेल्यावर आत्म्याचे काय होते याच्याशी संबंध नाही किंवा कर्मकांड आणि यज्ञयागाशी संबंध नाही.

ब. त्यांच्या धम्माचा केंद्रबिंदू मानव असून या पृथ्वीवर निवास करीत असताना एका माणसाचे दुसऱ्याचेप्रती काय कर्तव्य आहे, हा त्यांच्या धम्माचा प्रथम विषय होय.

क. माणूस दुःखी आहे, कष्टी आहे, दारिद्र्यात आहे, त्यांच्या दुःखाचा नाश करणे हा त्यांच्या धर्माचा द्वितीय विषय होय. दुःखाच्या अस्तित्वाची स्वीकृती व दुःखाच्या नाशाचे उपाय हीच त्यांच्या धम्माची आधारशिला होय.

ड. प्रत्येक माणसाने पवित्रतेच्या, धर्माच्या आणि शीलमार्गाच्या रस्त्यावर चालल्यास

दुःखात निरोध होऊ शकतो.

इ. पवित्रतेच्या मार्गानुसार उत्तम जीवनाचे पाच माप दंड आहेत.

१. कोणत्याही प्राण्याची हिंसा न करणे
२. चोरी न करणे
३. व्यभिचार न करणे
४. असत्य न बोलणे आणि
५. मादक वस्तूंचे सेवन न करणे

उत्तम जीवनाचे पाचही मापदंड प्रत्येक व्यक्तीकरिता कल्याणकारी आहेत आणि समाजासाठी देखील कल्याणकारी आहेत. म्हणून त्यांना जीवनाचे खरे मापदंड मानायलाच पाहिजे. प्रत्येक मनुष्याकरिता जीवनाचे मापदण्ड असणे आवश्यक आहे. जेणेकरून तो आपल्या चांगल्या-वाईटाचे मोजमाप करू शकेल. त्याच्या जीवनाचा मापदण्ड नसतो, तो पतित असूनही त्याला त्याची जाणीव नसते. ज्याच्या जीवनाचा मापदंड असतो तो नेहमी या गोष्टीचा प्रवास करतो की जेणेकरून तो पतितावस्थेतून बाहेर येईल.

**प्रश्न ६५ : भगवंतांनी पंचवर्गीय भिक्खूंना सम्यक मार्ग कसा शिकविला?**

**उत्तर –** भगवंताने त्यांना सम्यक मार्गाचा म्हणजेच आर्य अष्टांगिक मार्गाचा उपदेश केला

१. सम्यक दृष्टी : ही सर्वात प्रथम आणि प्रधान आहे. सम्यक दृष्टीचा अंतीम उद्देश अविद्येचा नाश करणे हा होय. अविद्या म्हणजे माणसाने दुःखास न ओळखणे, दुःखनिरोधाच्या उपायास न जाणणे, सत्य वस्तुस्थितीला न ओळखणे, सत्यास सत्य व असल्यास असत्य न जाणणे.

२. सम्यक संकल्प : आपल्या आशा आकांक्षा, ठराव, संकल्प, विचार, उच्च स्तराचे असावेत. निम्न स्तराचे नसावेत. योग्य असावेत. अयोग्य नसावेत.

३. सम्यक वाणीः म्हणजे सदा सत्य बोलावे. असत्य बोलू नये. दुसऱ्याची निंदानालस्ती करू नये. शिवीगाळ व कठोर वचनाचा व्यवहार करू नये. विनम्र वाणीचा व्यवहार करावा. व्यर्थ आणि मूर्खतापूर्ण बकबक न करणे, बुद्धिसंगत आणि तर्कसंगत उद्देशपूर्ण गोष्टीच कराव्यात.

४. सम्यक कर्मान्त : योग्य व्यवहाराची शिकवण आपल्या व्यवहाराने दुसऱ्याचे नुकसान व्हावयास नको. त्यांच्या भावना व त्यांचे अधिकार सुरक्षित राहावेत. आपले कार्य जीवनाच्या मुख्य नियमांशी शक्यतोवर समन्वित असावे.

५. सम्यक आजीविका : म्हणजे जीविका अशा प्रकारची की,ज्यामुळे कुणाची हानी किंवा कुणावर अन्यावर व्हायला नको.

६. सम्यक व्यायाम : म्हणजे चांगल्या गोष्टी करावयाचा प्रयास. अष्टांगिक मार्गाविरोधी चित्तप्रवृत्तींना थांबविणे, ज्या वाईट चित्तप्रवृत्ती उत्पन्न झाल्या असतील त्यांना नष्ट करणें व उत्तम चित्त प्रवृत्तींना चालना देणे व त्यांचा विकास करणे.

७. सम्यक स्मृति : म्हणजे प्रत्येक गोष्टीवर लक्ष ठेवणें. मनाची सतत जागरूकता. अकुशल विचार मनांत उठले की त्यांच्यावर नजर ठेवणे.

८. सम्यक समाधी : या सात गोष्टींना प्राप्त करावयाच्या मार्गात पाच विघ्ने येतात ती अशी -लोभ, द्वेष, आळस, विचिकित्सा आणि अनिश्चय. त्यापासून मुक्त व्हावयाचा उपाय समाधी आहे. समाधी म्हणजे चित्ताची एकाग्रता. त्यामुळे पाचही संयोजने (बंधने) स्थगित राहतात. परंतु त्यांच्यात परिवर्तन करावयास सम्यक समाधीची आवश्यकता असते. सम्यक् समाधी मनास कुशल कर्माचे एकाग्रतेने चिंतन करावयाचा अभ्यास करविते, व येणेप्रमाणे अकुशल कर्माकडे आकर्षित व्हावयाच्या प्रवृत्तीसच समाप्त करते. सम्यक समाधी मनास सदासर्वदा कुशल विचार करण्याची सवय लावते.

**प्रश्न ६६ : भगवंताने पंचवर्षीय भिक्खूंना शील आणि सदगुणाचा मार्ग कशा प्रकारे शिकविला?**

**उत्तर** - शील मार्गावर जाताना

१. शील २. दान ३. उपेक्षा (उपेक्खा) ४. नैष्कर्म्य ५.वीर्य ६. क्षान्ती (खान्ती) ७. सत्य ८. अधिष्ठान ९. करुणा १०. मैत्री या दहा सदगुणांचा अभ्यास आणि विकास करावा लागतो.

१. शील म्हणजे नैतिकता, अकुशल न करण्याची प्रवृत्ती व कुशल करण्याची प्रवृत्ती, दुष्ट कर्मापासून भय आणि लज्जा.शील म्हणजे पापभीरूता.

२. दान म्हणजे कसलीही अपेक्षा न करता दुसऱ्याचे भले करणे.

३. उपेक्षा म्हणजे अनासक्ती. याचा अर्थ इतरांच्या सुख दुःखाविषयी निरपेक्ष भाव नव्हे. ही चित्ताची अवस्था आहे. ज्यात प्रिय-अप्रिय काहीही नसते. फळ काहीही असो त्याविषयी निरपेक्ष राहून साधना करण्यात मग्न राहणे.

४. नैष्कर्म्य म्हणजे सांसारिक काम-भोगांचा त्याग.

५. वीर्य म्हणजे सम्यक प्रयत्न. जो उत्तम संकल्प केला त्यास पूर्ण करावयास संपूर्ण सामर्थ्यानिशी प्रयत्न करणे आणि त्यास पूर्ण केल्याशिवाय मागे वळून न पाहणे.

६. क्षान्ती म्हणजे क्षमा शीलता, घृणा न करणें आणि घृणेच्या मोबदल्यात क्षमाशीलता दाखविणे.

७. सत्य म्हणजे कधीही खोटे न बोलणे

८. अधिष्ठान म्हणजे आपल्या उद्देशापर्यंत पोहचवीण्याचा दृढनिश्चय

९. करुणा म्हणजे मानवाविषयी प्रेमपूर्ण दया

१०. मैत्री म्हणजे सर्व प्राण्यांविषयी भ्रातृभावना. मित्रांसाठीच नव्हे तर शत्रूविषयी देखील भ्रातृभावना.

**प्रश्न ६७ : पंचवर्गीय भिक्खूंनी बौद्धधम्माची दीक्षा का घेतली ?**

**उत्तर** - जगाच्या इतिहासात अभूतपूर्व अशा धम्माची शिकवण भगवंतानी त्यांना दिली. त्यापूर्वी अशी शिकवण त्यांना कोणीही दिली नव्हती. त्याची विशेषता अशी-

१) दुःखाचा विनाश हा धम्माचा वास्तविक उद्देश आहे, असे त्यापूर्वी कोणीही प्रतिपादन केलेले नव्हते.

२) तो मुक्तीचा अत्यंत सरळ मार्ग होता; ज्याला अपौरुषेय शक्तींच्या मदतीची गरज

नव्हती; ज्यासाठी आत्मा किंवा परमात्मा यांवर विश्वास करावयाची आवश्यकता नव्हती आणि ज्याला मोक्षलाभाकरिता मरणोत्तर जीवनावर विश्वास करावयाचीही गरज नव्हती.

३) तो असा धर्म होता, ज्याचा ईश्वर वचनाशी किंवा ईश्वराच्या आज्ञेशी कसलाही संबंध नव्हता. ज्यात केवळ मानवाच्या सामाजिक गरजा पूर्ण करावयास आवश्यक असणाऱ्या अनुशासनासच 'धर्म' असे नांव दिलेले होते.

४) 'मोक्ष' म्हणजे असे सुख जे मानवधर्मानुसार आचरण केल्याने ह्या पृथ्वीवरच प्राप्त होऊ शकते; असे यापूर्वी कुणीही प्रतिपादित केलेले नव्हते. भगवंतांच्या धम्माच्या या अभूतपूर्व गुणांमुळे पंचवर्गीय भिक्खूंनी बौद्धधम्माची दीक्षा ग्रहण केली.

**प्रश्न ६८ : पंचवर्गीय भिक्खूनंतर कोणकोण त्यांचे धर्मानुयायी झालेत ?**

**उत्तर** - वाराणशीचा यश नावाचा एक श्रीमंत तरुण उपासक व श्रीमंत व्यापारी असलेला त्याचा पिता. त्यावेळी यशाला विरक्तीने पछाडलेले होते व त्यामुळे त्याला सगळीकडे दुःखच दुःख दिसू लागले. फिरत फिरत तो ऋषिपतनास गेला. तेथे भगवंताने आदल्या दिवशीच पंचवर्गीय भिक्खूंना उपदेश दिलेला होता. त्यांनी त्यालाही धर्मोपदेश केला. यशाने त्यांना याचना केल्यावर भगवंताने त्याला भिक्खूधम्माची दीक्षा दिली. तीन महिन्यांतच त्यांच्या धर्मानुयायांची संख्या साठपर्यंत गेली. यशाची आई आणि त्याची पत्नी या धम्माच्या प्रथम उपासिका होत.

त्यानंतर त्यांनी आपल्या शिष्यांना बोलावून घेतले. त्यांना धम्माविषयी पूर्ण माहिती दिली, आणि त्यांना आपल्या धम्माचा प्रचार करण्याकरिता चहूकडे पाठवून दिले. जे वैदिकधर्मीय नव्हते त्यांना ब्राह्मणी धर्म स्वीकारावयास मनाई होती. (विधर्मीयांना हिंदू धर्मात प्रवेश करावयास मनाई होती) यास्तव प्रचारकांद्वारे प्रसारित केलेला, बौद्धधम्म हाच जगातील सर्वात जुना धर्म आहे, असे म्हणावे लागेल. पूर्वीच्या धर्मप्रचारकांनी (म्ह-भिक्खूंनी) अनेक प्रकारचे कष्ट, छळ, आणि निर्दयपणा अतिशय धैर्याने सहन केला.

## धम्मदीक्षेचे आंदोलन

**प्रश्न ६९ : काश्यप बंधू कधी प्रव्रजित झाले ?**

**उत्तर** - भ. बुद्ध उरुवेलेस गेले. तेथे अग्निपुजकांच्या एका मोठ्या पंथाचे जटाधारी साधू फाल्गू नदीच्या काठावर राहत. उरु वेल काश्यप नावाचा त्यांचा गुरू होता. तो फार विद्वान म्हणून प्रसिद्ध होता. त्याला व त्याच्या दोन्ही भावांना (नदी काश्यप व गया काश्यप यांना) भ. बुद्धांनी प्रव्रजित केले. त्यामुहे त्यांचे सर्व जटाधारी जटील शिष्यदेखील भ. बुद्धांचे अनुयायी झाले. उरुवेल काश्यपाचे पाचशे, नदी काश्यपाचे तीनशे आणि गया काश्यपाचे दोनशे शिष्य होते. भगवंतांनी त्या अग्निपूजकांना उपदेश दिला की - काम, क्रोध आणि अविद्या हीच ती अग्निरूपे आहेत, ज्यात सर्व गोष्टी भस्मसात होतात व जगात दुःख आणि शोक निर्माण करतात. काम, क्रोध, आणि अविद्येचा अग्नी विझल्याने विद्या आणि पवित्र आचरणाचा अविर्भाव होतो.

**प्रश्न ७० : भगवंतांचे मुख्य चारिका-क्षेत्र कोणते होते ?**

**उत्तर** - भगवंत श्रावस्तीहून कोसल, कोसलहून मल्ल, मल्लहून वज्जी, वज्जीहून काशी आणि काशीहून मगध - जनपदांमध्ये अधिकाधिक विहार करीत असत. हा सारा प्रदेश सध्याचा उत्तर प्रदेश व बिहार याच्या अंतर्गत येतो.

**प्रश्न ७१ : त्यांच्याकडून व त्यांच्या शिष्यांकडून कोणकोणत्या प्रकारच्या लोकांनी दीक्षा घेतली ?**

**उत्तर** - सर्व दर्जांच्या, सर्व देशांच्या आणि सर्व जातींच्या लोकांनी दीक्षा घेतली. रंक आणि राव, श्रीमंत आणि गरीब, निर्बल आणि बलवान, अशिक्षित तसेच प्रकांड पंडित अशा सर्व प्रकारच्या लोकांनी त्यांच्या धम्माची दीक्षा घेतली. त्यांचा धम्म सर्वांकरिताच सोईस्कर होता.

**प्रश्न ७२ : भ. बुद्धांची उपसंपदा झाली होती काय ?**

**उत्तर** - बुद्ध गयामधील पिंपळाच्या वृक्षाखाली बसून भ. बुद्धांनी बुद्धत्वाचा लाभ घेतला होता, तीच त्यांची उपसंपदा होती. त्या वृक्षाखाली भगवंतांना बुद्धत्व प्राप्त झाले होते, म्हणून त्याला 'बोधिवृक्ष' म्हटले आहे.

**प्रश्न ७३ : राजा बिंबिसाराने धम्मदीक्षा कधी घेतली ?**

**उत्तर** - राजगृह मगधनरेश श्रेणिक बिंबिसाराची राजधानी होती. भगवंतांचे राजगृहास आगमन झाल्यावर त्याला वाटले की, कट्टर जटिलांचे मतपरिवर्तन करणारे स्वतः सम्यक संबुद्ध अवश्य असतील. म्हणून तो हजारो ब्राह्मण आणि प्रजाजनांसह भगवंतांकडे गेला. तेथे उरुवेल काश्यपाला पाहून लोकांना कुतूहल वाटले. त्यांना भगवंतांनी धर्मोपदेश दिला. तेव्हा राजा बिंबिसार भगवंतांचा शरणागत उपासक झाला.

**प्रश्न ७४ : अनाथपिण्डिकाची धर्मदीक्षा कधी झाली ?**

**उत्तर** - कोसल जनपदाची राजधानी श्रावस्ती येथे सुदत्त नावाचा नागरिक होता. कोसल देशाचा राजा प्रसेनजित याचा सुदत्त हा खजांजी (श्रेष्ठी) होता व दरिद्री लोकांना तो पुष्कळ दान देत असे, म्हणून त्याचे नाव अनाथपिण्डिक असे पडले. तो राजगृहास आपल्या मेहुण्याकडे गेला तेव्हा तेथे भगवंतांच्या आगमनासाठी फार मोठी तयारी करताना त्याने पाहिले. तेथेच त्यास भगवंतांचे दर्शन झाले व धर्मोपदेशाचा लाभ झाला. त्याने भगवंतास विचारले की, आपली धनसंपत्ती, घरदार आणि कारभार यांचा त्याग करून संन्यासी होणे, धर्मजीवनाचे सुख प्राप्त करण्यासाठी आवश्यक आहे काय? त्यावर भगवंतांनी उपासक राहूनदेखील धर्मलाभ करता येतो, अशी त्यास शिकवण दिली. तेव्हापासून तो भगवंतांचा शरणागत उपासक झाला. उपासक राहूनच त्याने धम्माची व संघाची बरीच मोठी सेवा केली.

**प्रश्न ७५ : राजा प्रसेनजितास भगवंतांनी कोणता उपदेश दिला ?**

**उत्तर** - भगवान जेतवनात असताना राजा प्रसेनजित त्यांच्याकडे गेला व भगवंतास धम्मोपदेश देण्याची विनंती केली. भगवंतांनी राजाला असा उपदेश दिला, 'आपली चांगली किंवा वाईट कर्मे आपला छायेप्रमाणे पाठलाग करीत असतात. मैत्रीपूर्ण हृदयाची आवश्यकता सर्वाधिक आहे.'

'आपल्या प्रजेस आपल्या एकुलत्या एक अपत्यासारखे समजावे. दुसऱ्यांना खाली पाडून स्वतःस वर नेण्याचा प्रयत्न करू नये. दुःखी लोकांना सांत्वना द्यावी. राजकीय थाटमाटाला विशेष महत्व देऊ नये. खुशामती लोकांच्या गोड गोड गोष्टीच ऐकू नये. कायाक्लेशाने स्वतःस त्रास देऊ नये. धर्म आणि सुमार्ग याचा विचार करावा. अन्याय करू नये. कामाग्नीचे भय सर्वांसाठी समान आहे, जो एकवेळ त्या भोवऱ्यात फसेल त्याचे बाहेर पडणे कठीण असते. धम्माची अशी मागणी आहे की, 'मार' रूपी शत्रूपासून स्वतःला सुरक्षित ठेवावे. स्वतःच्या विचारांवर नजर असू द्यावी; जेणेकरून हातून कांहीच वाईट घडणार नाही. भौतिक वस्तूंच्या तुच्छतेवर खोलवर विचार करायला पाहिजे. जीवनाच्या अस्थिरतेला चांगल्या प्रकारे समजून घ्यावे. राजधर्माच्या नियमांचे उल्लंघन करू नये, बाह्य पदार्थांना आपल्या प्रसन्नतेचा आधार न बनविता, प्रितियुक्त मनासच प्रसन्नतेचा आधार बनवावे, म्हणजे राजाचे यश भविष्यात अमर होईल.'

**प्रश्न ७६ : जीवकाने धम्मदीक्षा कधी घेतली ?**

**उत्तर –** राजगृहातील एक वेश्या शालवती हिचा तो पुत्र होता. त्याला कचऱ्याच्या ढिगाजवळ एका टोपलीत जिवंत पाहून त्याचे नाव जीवक असे ठेवण्यात आले. पुढे त्याने दुसऱ्यांचे जीवन वांचविण्याचे व्रत घेतले व तो नामांकित वैद्य झाला. त्याने बिंबिसार राजाला भगंदर रोगापासून मुक्त केले. त्याने राजगृहातील एकाच्या डोक्यावर शल्यचिकित्सा केली आणि कांहींच्या आंतड्यावरही शल्यक्रिया केली. जीवकाची तथागतांवर खूपच श्रद्धा होती व तो श्रमणांची निःशुल्क चिकित्सा करीत असे. तो तथागतांचा गृहस्थ उपासक होता. त्याला राजाकडून मिळालेली शालजोडी त्याने भगवंतांना अर्पण केली, तेव्हा भगवंतांनी सर्वच भिक्खूंना चिवर दान स्वीकारावयास अनुमती दिली.

**प्रश्न ७७ : विशाखेने भगवंतास कोणते आठ वर मागून घेतले ?**

**उत्तर –** श्रावस्ति नगरीमध्ये विशाखा नांवाची एक अत्यंत श्रीमंत स्त्री राहत होती. ती धनंजय श्रेष्ठीची कन्या व मिगारश्रेष्ठीची सून होती. तिची भगवंतांवर अतीव श्रद्धा होती. तिने पूर्वाराम नांवाचा बगीचा भिक्खूसंघास दान केलेला होता. दायिका-उपासिकांमध्ये सर्वश्रेष्ठ अशी तिची ख्याती होती.

तिने भिक्खूसंघाच्या हिताकरिता भगवंतांजवळ आठ वर मागून घेतले, व ते काय आहेत हे जाणून घेतल्यावर भगवंतांनी तिला अनुमती दिली.

विशाखा म्हणाली, भगवंत जे वर मी मागू इच्छिते ते योग्य व कल्याणकारी आहेत. ते वर असे -

१) पूर्ण वर्षासाठी भिक्खूसंघाला लागणारी वस्त्रे माझ्या आयुष्यभर मी पुरवावी, अशी माझी इच्छा आहे.
२) मी आगंतुक भिक्खूंना भिक्षान्न देऊ इच्छिते आणि
३) येथून परगावी जाणाऱ्या भिक्खूंना भिक्षान्न देऊ इच्छिते.
४) आजारी भिक्खूंकरिता भिक्षान्न व
५) आजाऱ्याची शुश्रूषा करणाऱ्या भिक्खूंनाही भिक्षान्न देऊ इच्छिते.

६) आजारी भिक्खूकरिता औषधे आणि
७) सर्व भिक्खूसंघाला तांदळाची खीर (पायस) देऊ इच्छिते.
८) भिक्खूर्णींकरिता स्नानाच्या वेळी वापरण्यासाठी वस्त्रे देऊ इच्छिते.

त्यावर भगवंतांनी विचारले, 'विशाखे, असे कोणते कारण घडले की तू तथागताकडून हे आठ वर मागत आहेस?'

त्यावर तिने सांगितले, 'भगवंत मी दासीला आज्ञा दिली होती की, जा भोजन तयार असल्यामुळे भिक्खूसंघाला बोलावून आण' तेव्हा दासीला विहारात भिक्खूंनी पाऊस पडत असतांना आपली वस्त्रे काढलेली आहेत असे दिसले. भगवंत नग्नता घृणास्पद आणि मलिन आहे, म्हणून मी वर्षाऋतूसाठी संघाला विशेष प्रकारची वस्त्रे यावज्जीव पुरविण्याची इच्छा केली. आगंतुक भिक्खूला रस्त्यांची माहिती नसल्यामुळे, विहारात परत येतांना भिक्षाटनाने तो पूर्णपणे थकून गेलेला असतो, म्हणून आगंतुक भिक्खूंना अन्नदान करू इच्छिते. भिक्षेच्या शोधांत राहिल्याने प्रवासास जाणारा भिक्खू बरोबरीच्या भिक्खूंमागे सुटूं शकतो, हे तिसरे कारण. चवथे कारण असे की आजारी भिक्खूला पथ्यकारक अन्न मिळाले नाही तर त्याचा आजार वाढूं शकतो, पाचवे कारण असे की, जो भिक्खू आजाऱ्याची सुश्रूषा करावयास त्याच्याजवळ थांबलेला असतो, त्याला भिक्षा मागावयास बाहेर जायची संधीच मिळायची नाही. सहावे कारण असे की, जर आजारी भिक्खूला योग्य औषधी मिळाली नाही तर त्याचा आजार वाढू शकतो. सातवे कारण असे की, भगवंतांनी तांदळाच्या खिरीची स्तुती केलेली आहे कारण तिने मन ताजेतवाने होते. आठवे कारण असे की, भिक्खुणी अचिरावती नदीच्या एकाच घाटावर गणिकांच्या सोबत नग्न अवस्थेत स्नान करतात व गणिका भिक्खुणींचा उपहास करतात. भगवंत स्त्रियांची नग्नता किळसवाणी, तिरस्कारणीय आणि मलिन असते. त्यावर सर्वांनी तिला साधुकार दिला.

**प्रश्न ७८ : रट्ठपालाने दीक्षा कधी घेतली ?**

**उत्तर** - तथागत कुरू देशात भ्रमण करीत असताना चुल्लकोट्ठीत नावाच्या एका गावात आले. तेथे इतरांसोबत रट्ठपालानेही भगवंतांचा उपदेश ग्रहण केला व त्यास प्रव्रजित व्हावयाची उत्कट इच्छा झाली. तेव्हा भगवंतांनी त्यास मातापित्याची परवानगी घ्यावयास सांगितले. तो एकुलता एक पुत्र असल्याने मातापित्यांनी परवानगी नाकारली. तेव्हा केवळ जमिनीवरच तो झोपला व म्हणाला की, मी एकतर भिक्खू होईल, किंवा जमिनीवर पडल्यापडल्याच मृत्यूस प्राप्त होईल. शेवटी मातापित्यांनी त्यास परवानगी दिली. त्यानंतर त्याने परिव्राज घेतला व पुढे तो आदर्श भिक्खू बनला.

एकदा तो भिक्षा ग्रहण करण्यास आपल्या पित्याच्या घरी गेला. तेथे पित्याने सोन्याचांदीचे बरेच प्रलोभन दिले. रट्ठपालाची भार्या शृंगार करून आली व तिने त्याचे पाय धरले. परंतु तो पुन्हा गृहस्थ झाला नाही.

चारिका करीत करीत तो कुरु नेरशाच्या मृगोद्यानात गेला. कुरूनरेशाला ते समजल्यावर आपल्या लव्याजम्यासह तो तेथे गेला व त्याने रट्ठपालास परिव्राज व्हावयाचे कारण विचारले. बहुधा म्हातारपणामुळे, वाईट स्वास्थ्यामुळे, दारिद्र्यामुळे किंवा निकट नातलगाच्या मृत्युमुळे लोक संन्यास ग्रहण करीत असत.

रट्ठपालाने उत्तर दिले की, सम्यक संबुद्धाकडून चार गोष्टींचे ज्ञान झाल्यामुळे त्याने गृहत्याग केला -

१) जग अनित्य आहे व निरंतर परिवर्तशील आहे.
२) जगाचा कोणी मालक किंवा संरक्षक नाही.
३) आपले काहीच नाही, सर्वकाही सोडून जाणे आहे.
४) तृष्णेच्या आहारी गेल्यामुळेच जग दुःखी आहे.

राजाला त्याचे उत्तर अद्भुत वाटले व त्याने साधुवाद दिला.

**प्रश्न ७९ : भ. बुद्धांचे सर्वात विद्वान आणि प्रिय शिष्य कोणते होते ?**

**उत्तर -** सारिपुत्र आणि मोग्गल्लान हे दोघे त्यांचे अग्रश्रावक होते. ते त्यापूर्वी संजय नावाच्या तपस्व्याचे मुख्य शिष्य होते. संजयाचे अडीचशे शिष्य होते. सारिपुत्रास अश्वजित् स्थवीर नावाचे भगवंताचे शिष्य भेटले. त्यांच्या चेहऱ्यावरील धीरगंभीर तेज पाहून सारिपुत्राने भगवंताकडे जाण्याचे ठरविले. सारिपुत्र अतिशय विद्वान, 'प्रज्ञावंत' म्हणून आणि मोग्गल्लान दैवी शक्ती प्राप्त असलेले 'सिद्धिवंत म्हणून' प्रसिद्ध होते.

**प्रश्न ८० : भगवंतांनी भिक्षूंना धम्मप्रचारासाठी 'चरथ भिख्खवे चारिकं' हा आदेश कधी दिला ?**

**उत्तर -** भगवान ऋषिपत्तनात राहत असताना त्यांच्यापाशी साठ भिक्खूंचा संघ जमला. हे सगळे भिक्खू अर्हत्पदाला पोहोचले होते. त्यांना एकत्र जमवून ते म्हणाले, भिक्खूंना बहुजनांच्या हितासाठी, बहुजनांच्या सुखासाठी, लोकांवर अनुकंपा करण्यासाठी, देवांच्या आणि मनुष्यांच्या कल्याणासाठी धम्मोपदेशाचा प्रसार करावयास भ्रमण करा. प्रारंभी कल्याणप्रद, मध्यंतरी कल्याणप्रद व शेवटी कल्याणप्रद अशा या धम्ममार्गाचा अर्थ आणि भावासहित परिशुद्ध अशा ह्या धर्माचा ब्रह्मचर्य राखून प्रकाश करा. **''चरथ भिक्खवे चारिकं, बहुजनहिताय, बहुजनसुखाय, लोकानुकंपाय अत्थाय, हिताय, सुखाय देवमनुस्सानं, देसेत्थ भिक्खवे धम्मं आदि कल्याणं मज्झेकल्याणं परियोसान कल्याणं, सात्थं सव्यंजनं केवल परिपुण्णं परिसुद्धं ब्रह्मचरियं पकासेथ ।''**

**प्रश्न ८१ : भगवंतांनी अनेक खेडुत ब्राह्मणांना देखिल धम्मदीक्षा दिली काय ?**

**उत्तर -** होय. एक छोटेसे गाव होते. त्यात सत्तर ब्राह्मण-परिवार राहत असत. ते सर्व पशुपालनाने उपजीविका करीत असत. त्यांना भगवंतांनी उपदेश केला की, जे सत्य आणि असत्याला समजून घेतात, त्या सम्यकदृष्टि लोकांना सद्गती प्राप्त होते. पुढे त्या सर्वांनी श्रमण व्हावयाची इच्छा व्यक्त केली आणि लवकरच ते सर्व भिक्खूसंघात सामील झाले.

**प्रश्न ८२ : उत्तरवतीच्या ब्राह्मणांनी धम्मदीक्षा कधी घेतली ?**

**उत्तर -** जेव्हा भ. बुद्ध श्रावस्तीच्या जेतवनामध्ये विहार करीत होते आणि सर्वांच्या कल्याणार्थ उपदेश देत होते, तेव्हा श्रावस्तीच्या पूर्वेकडील उत्तरवती गावी पाचशे ब्राह्मण राहत होते. ते सर्व गंगेच्या काठावर निवास करीत असलेल्या व शरीरावर धूळ माखणाऱ्या निर्ग्रन्थ तपस्व्याकडे (म्हणजे भ. महावीरांच्या शिष्यांकडे) जावयाचा विचार करीत होते. रस्त्यामध्येच

त्यांना फार तहान लागली. तेव्हा एका वृक्षदेवतेने त्यांना यथेच्छ पाणी पाजले आणि असा उपदेश दिला की यज्ञयाग इत्यादी रात्रंदिवस दुःख देणारे व चिंतेचे जनकच आहेत. चिंतेपासून मुक्त व्हावयास भ. बुद्धांच्या धर्माचा स्वीकार करणे उत्तम होय. तेव्हा ते सर्व ब्राह्मण श्रावस्तीला गेले व भगवंतांचे शिष्य झाले.

भगवंतांनी त्यांना उपदेश केला की, माणूस नग्न राहो किंवा लांब जटा धारण करो किंवा पानांची व चिवरांची वल्कले धारण करो, किंवा शरीरावर धूळ टाकून दगडावर झोपणारा असो, त्यामुळे त्याला तृष्णेपासून मुक्ती मिळत नाही.

परंतु जो कोणाशी कलह करीत नाही, कुणाची हत्या करीत नाही, कुणाला पराजित करून विजयी होऊ इच्छित नाही, ज्याची सर्वांप्रती मैत्रीची भावना आहे, अशा माणसाला कोणाविषयी द्वेष किंवा घृणा होत नाही.

जो सदाचारी आहे, जो वरिष्ठांचा आणि वृद्धांचा आदर करतो, त्याला चार गोष्टींची प्राप्ती होते - आयू, वर्ण, सुख आणि बल.

**प्रश्न ८३ : भगवंताची उपसंपदा झाली होती काय ?**
**उत्तर** - होय. बोधि वृक्षाखाली भगवंताना जे बुद्धत्व मिळाले तीच त्यांची उपसंपदा होय. जशी उपसंपदा त्यांचे अनुयायी घेत होते, तशी त्यांनी कुणा दुसऱ्याकडून उपसंपदा घेतली नाही. भगवंतांनी नियम बांधून दिला की भिक्खूने प्रथम उपसंपन्न व्हायलाच पाहिजे. सर्व भिक्खू त्याचे आयुष्यभर पालन करतात.

# निम्नस्तरीय लोकांची धम्मदीक्षा

**प्रश्न ८४ : भ. बुद्ध धम्मप्रसारासाठी सम्यकसमाधीचा उपयोग कशा प्रकारे करीत असत ?**
उत्तर - दररोज सकाळी आपल्या दिव्य अंतर्दृष्टीने सत्य स्वीकारण्यासाठी लोक कुठे तयार आहेत, ह्याचे अवलोकन करावयाचा भगवंतांचा नियम होता. त्यानंतर शक्य होईतो, ते त्यांच्यापर्यंत धम्मास पोहोचविण्याची तजवीज करीत असत. त्यांच्यापैकी काही लोक जेव्हा त्यांना भेटावयास येत तेव्हा त्यांच्या मनाचा वेध घेऊन, त्यांचे मनोगत जाणून, त्यांच्या गरजेनुसार ते त्यांना उपदेश करीत.

**प्रश्न ८५ : आयुष्मान उपालीच्या धम्मदीक्षेचा विशेष प्रसंग कोणता ?**
**उत्तर** - शाक्य जनपदांतील श्रीमंत क्षत्रिय अनुरुद्ध, आनंद, भगु, किम्बिल, देवदत्त आणि शाक्य राजा भद्दीय यांनी आपली बहुमुल्य वस्त्रें व अलंकार उपाली नाव्ह्याकडे सोपविलीत व ते भगवंताकडे धम्मदीक्षा घ्यावयास निघाले. तेव्हा कपिलवस्तूस परत जात असताना वाटेत उपालीच्या मनात विचार आला की, माझ्याजवळील बहुमुल्य वस्त्रें व दागिने पाहून शाक्यांना असा संशय येऊ शकतो की, अनुरुद्ध इत्यादींची हत्या करून मी ते मिळविले की काय व ते मला ठार मारू शकतात. म्हणून त्यानेही विचार केला की, अनुरुद्ध इत्यादींच्या प्रमाणे त्यानेसुद्धा धम्मदीक्षेकरिता भगवंतांकडे जावे. मग ते सर्वजण भगवंताकडे गेले. तेव्हा शाक्यांनी भगवंतांना अशी विनंती केली की, त्या सर्वांच्या प्रथम उपाली नाव्ह्यास दीक्षा

देण्यात यावी, जेणेकरून तो त्या सर्वांपेक्षा वरिष्ठ भिक्खू समजला जावा व त्या सर्वांनी त्याचा यथोचित आदर करावा; त्यामुळे त्या सर्वांचा वृथा अभिमान गळून जाईल.

भगवंतांनी उपालीस प्रथम दीक्षा दिली. पुढे आयु. उपाली 'विनयपिटका' चे विद्वान आचार्य समजले जाऊ लागले.

**प्रश्न ८६ : भंगी सुणीतची दीक्षा कधी झाली ?**

**उत्तर** - सुणीत नावाचा भंगी आपले सडकेवरील केरकचरा साफ करावयाचे परंपरागत काम करीत असे. त्या कामास नीच मानले जाई. एकदा तथागत भिक्षाटनास निघाले असता त्यांना सुणीत दिसला, तो बराच घाबरलेला होता. परंतु भगवंतांनी त्यास भिक्खू होण्याविषयी विचारले. त्यामुळे तो अत्यंत आनंदित झाला व त्याने भगवंतांना होकार दिला. भगवंतांनी त्यास संघात प्रवेश दिला व उपदेश दिला की - शील, संयम आणि दमन यांच्यामुळे माणूस पवित्र होतो.

**प्रश्न ८७ : सोपाक आणि सुप्पिय अस्पृश्यांची धम्म दीक्षा कशा प्रकारे झाली ?**

**उत्तर** - सोपाक श्रावस्तीमधील एक अस्पृश्य जमातीचा मुलगा होता. प्रसववेदनेच्या वेळी त्याची आई बेहोश झाली. तिला मेलेली समजून तिच्या नातलगांनी तिला स्मशानात नेले व चितेवर ठेवले परंतु भयंकर पावसामुळे चितेस आग लागू शकली नाही. तेव्हा ते सर्व नातलग निघून गेले. पुढे काही वेळाने प्रसव होऊन मूल जन्मास आले व आई मरण पावली. स्मशानाची रखवाली करणाऱ्याने त्याचे नाव सोपाक ठेवले, व त्याने त्याचा पित्याप्रमाणे सांभाळ केला.

पुढे सोपाक सात वर्षांचा असतानाच त्याला भगवंतांचे दर्शन झाले व त्याने स्वतःस भिक्खूची दीक्षा द्यावयाची विनंती केली. स्मशानाची रखवाली करणाऱ्या त्याच्या पित्याने परवानगी दिल्यावर तो निम्न जातीचा असूनही भगवंतांनी त्यास संघात सामील करून घेतले व त्याच्यासोबत रखवाली करणाऱ्याचा मुलगा सुप्पीय यालाही त्याच्या विनंतीनुसार सामील केले. कालांतराने आयु. सोपाक स्थवीर झाले.

**प्रश्न ८८ : सुमंगल आणि इतर निम्न जातीच्या लोकांची धम्मदीक्षा कशा प्रकारे झाली?**

**उत्तर** - सुमंगल नावाचा एक शेतकरी श्रीवस्तीला राहत असे. छन्न हा शुद्धोदनाचा दास होता. धनीय नावाचा एक कुंभार राजगृहात राहत असे. 'कप्यतकूर' नावाचा एक भिकारी श्रावस्तीस राहत असे. त्या सर्वांनी भगवंतास विनंती केल्यामुळे त्या सर्वांना संघात सामील केले गेले.

**प्रश्न ८९ : कुष्ठरोगी सुप्रबुद्धाची दीक्षा केव्हा झाली ?**

**उत्तर** - सुप्रबुद्ध नावाचा एक कुष्ठरोगी राजगृहात राहत असे. तो अत्यंत दरिद्री आणि दुःखी होता. एकदा तथागतांचे प्रवचन सुरू असताना तेथे काही भिक्षा मिळेल या अपेक्षेने तो तेथे गेला व भगवंतांचा उपदेश ऐकू लागला. त्यावेळी धम्मावबोध कोणास होईल, हे जाणावयास तेथे उपस्थित असलेल्या सर्व लोकांच्या चित्ताची दशा भगवान पारखू लागले व त्यांना सुप्रबुद्धाचे चित्त धम्मावबोधास युक्त अशी दिसली. त्यांनी त्याच्या चित्तास उद्देशून दानकथा, शीलकथा, स्वर्गकथा आदींचा उपदेश दिला व पुढे त्याचे चित्त नरम झालेले पाहून आणि

उन्नत झालेले पाहून आर्य-अष्टांगिक मार्गाचा उपदेश केला.

ज्याप्रमाणे स्वच्छ व शुभ्र कापड रंगास त्वरित ग्रहण करते, त्याप्रमाणे सुप्रबुद्धाने ज्ञान प्राप्त केले व त्यास तेथल्यातेथेच विमल, विरज प्रज्ञा प्राप्त झाली. त्याचा संदेह नष्ट होऊन आणि त्याची विचिकित्सा शांत होऊन त्यास विश्वास उत्पन्न झाला; व तो भगवंतांचा शरणागत उपासक झाला.

**प्रश्न १० : डाकू अंगुलिमाल कां प्रव्रजित झाला ?**

**उत्तर -** कोशल देशांत अंगुलिमाल नावाचा डाकू राहत असे. यात्रेकरूंची हत्या केल्यावर तो त्यांची करंगळी कापून त्यांची माळ तयार करीत असे. त्यामुळे त्याचे नाव 'अंगुलिमाल' असे पडले. तो अत्यंत क्रूर होता. एकदा तथागत भ्रमण करीत असता, अंगुलिमाल राहत असलेल्या क्षेत्रात गेले. त्यांना पाहून डाकू जोरजोराने ओरडून, 'थांब, थांब' असे म्हणू लागला. भ. बुद्ध थांबले व तो जवळ आल्यावर त्यास म्हणाले, 'मी तर थांबलो, परंतु तू पापकर्म करण्यापासून कधी थांबशील? तुझ्या हृदयातील कुशल अजूनही जिवंत आहे आणि तू जर त्यास अवसर देशील तर तुझा कायापालट होईल.'

अंगुलिमाल त्यांच्या उपदेशाने प्रभावित झाला व त्याने परिव्राज घेतला. तथागतांनी त्यास श्रावस्तीच्या जेतवनारामात आणले.

राजा प्रसेनजिताची प्रजा अंगुलिमालामुळे त्रस्त झालेली होती आणि स्वतः राजादेखिल अतिशय काळजीत होता. तो भगवंतांकडे जेतवनारामात दर्शनास गेला असताना त्यास कळले की, अंगुलिमालाने प्रव्रज्या घेतली आहे. तेव्हां त्यास अत्यंत आश्चर्य वाटले.

एक दिवस अंगुलिमाल आपले पात्र चीवर धारण करून भिक्षाटनास गेला असता श्रावस्तीच्या लोकांनी त्यास दगडांनी व काठ्यांनी खूप मारले. परंतु त्याने ते सर्व निमुटपणे सहन केले. ते पाहून भगवान त्याला म्हणाले, 'अंगुलिमाल, सहन कर, सहन कर', पुढे कालांतराने अंगुलिमालाने निर्वाण प्राप्त केले.

## जन्मभूमिचे आवाहन

**प्रश्न ११ : गृहत्याग केल्यानंतर भ. बुद्धांनी आपल्या परिवारास पुन्हा कधी भेट दिली काय ?**

**उत्तर -** होय. सात वर्षांनंतर. ते राजगृहास राहत असताना त्यांचा पिता, राजा शुद्धोदन ह्याने त्यांनी यावे व मृत्यूपूर्वी एकदा भेटावे, असा विनंतीपर संदेश पाठविला होता. म्हणून ते त्यांना भेटावयास गेले. आपल्या मधुर वाणीने त्यांनी आपल्या पित्याला स्पष्ट करून सांगितले की, राजकुमार सिद्धार्थाचे अस्तित्व नष्ट होऊन तो आता 'बुद्ध' पदास पोहोचला आहे व त्याला सर्वच मनुष्यप्राणी नातलगासारखे, जवळचे आणि प्रिय वाटतात म्हणून आपल्या धम्माद्वारे तो सर्व मानवांची हृदये जिंकून त्यांना आपले अनुयायी बनवील. तो पुनः गृहस्थ होऊच शकत नाही.

**प्रश्न १२ : त्यांनी यशोधरा व पुत्र राहूल ह्यांची भेट घेतली काय ?**

**उत्तर -** होय. त्यांच्यावरील अपार प्रेमामुळे त्यांच्यासाठी शोक करीत असलेली यशोधरा

दुःखातिरेकाने रडू लागली.

जेव्हा यशोधरेला समजले की, सिद्धार्थाने आपले मुंडन केले, तेव्हा तिनेही स्वतःचे मुंडन केले. जेव्हा तिला समजले की, सिद्धार्थ एकाहारी झाला आहे, तेव्हा ती सुद्धा एकाहारी होऊन मातीच्या भांड्यात दररोज जेवू लागली होती.

**प्रश्न ९३ : भगवंतांनी राहुलास आपला वारसा हक्क दिला काय ?**

**उत्तर** - यशोधरेने राहुलास त्यांच्याकडे पाठवून राजकुमाराचा पुत्र या नात्याने आपला वारसाहक्क त्यांच्याकडून मागावयास सांगितले. तेव्हा त्यांनी त्यास प्रव्रज्या दिली. राहुल सात वर्षांचा बालक होता. राहुलास प्रव्रज्या दिली हे ऐकून राजा शुद्धोदनास फारच वाईट वाटले. कारण त्यामुळे राज्याचा कारभार करण्यास त्याला कोणीच वारस राहिला नाही. त्याने भगवंतास अशी प्रार्थना केली की, यापुढे कोणासही त्याचे मातापिता जिवंत असल्यास त्यांच्या परवानगीशिवाय प्रव्रजित करू नये. ही विनंती भगवंतानी मान्य केली. त्यांनी कोणासही आपला वारस नेमले नाही. 'धम्म' हाच माझा वारस, असे त्यांनी सांगितले.

**प्रश्न ९४ : भगवंतांनी आपल्या कोणकोणत्या आप्तगणांस प्रव्रजित केले ?**

**उत्तर** - दुःखाचा नाश होण्याकरिता, धम्माच्या आवश्यकतेचा उपदेश त्यांनी सर्वांनाच केला. त्यांचा पुत्र राहुल, आनंद (त्यांचा चुलत भाऊ), देवदत्त (त्यांचा आतेभाऊ) ह्या सर्वांनी त्यांच्या धम्माची दीक्षा घेतली व त्यांचे शिष्य झाले. दुसरा आणखी प्रसिद्ध शिष्य म्हणजे अनुरुद्ध, जो प्रव्रज्या घेतल्यानंतर फार मोठा तत्त्वज्ञानी झाला. अनुरुद्ध अमृतोदन शाक्याचा मुलगा होता.

राजकुमार सिद्धार्थाची मावशी व पालक-माता महाप्रजापति गौतमी, तिच्यासोबत यशोधरा व अनेक स्त्रिया 'भिक्षुणी' किंवा स्त्री-योगिनी म्हणून धम्मामध्ये सामील झाल्या.

**प्रश्न ९५ : पौत्र राहुलास दीक्षा दिल्याने वृद्ध राजा शुद्धोदनावर काय परिणाम झाला ?**

**उत्तर** - त्यामुळे राजा शुद्धोदन अति दुःखित झाला आणि त्याने भ. बुद्धांजवळ त्याविषयी तक्रार केली; तेव्हापासून भ. बुद्धांनी संघाला असा नियम घालून दिला की, माता-पिता जिवंत असल्यास, त्यांच्या आज्ञेशिवाय पुत्राला प्रव्रजित करू नये.

## स्त्रियांची धम्मदीक्षा

**प्रश्न ९६ : महाप्रजापती गौतमी आणि यशोधरा यांनी दीक्षा कधी घेतली ?**

**उत्तर** - जेव्हा भगवान कपिलवस्तूहून परतले तेव्हा पुरुषाप्रमाणेच स्त्रियादेखील प्रव्रज्या घेण्यास उत्सुक होत्या व सर्व स्त्रियांचे नेतृत्व स्वतः महाप्रजापती गौतमी करीत होती. तिने स्त्रियांना प्रव्रजित करण्याविषयी भगवंतास विनंती केली. परंतु ती त्यांनी स्वीकारली नाही. तेव्हा गौतमी दुःखित होऊन रडत रडत निघून गेली.

भगवान वैशालीच्या कूटागार भवनात थांबले असताना पुन्हा महाप्रजापती गौतमी पाचशे स्त्रियांसह तेथे गेली. तिने केशवपन केलेले होते. काषाय-वस्त्र धारण केलेले होते. तिने पुन्हा प्रव्रजेकरिता विनंती केली, परंतु भगवंतांनी तिला स्वीकारले नाही. तेव्हा आयु. आनंद त्यांच्याकडे गेले आणि गौतमीने कशा प्रकारे मातेसमान त्यांची सेवा केली होती वगैरे

गोष्टींची त्यांना आठवण दिली. आणि स्त्रियांनाही प्रव्रजित होण्यात अनुमती देण्याची विनंती केली. तरीसुद्धा भगवंतांनी ती मान्य केली नाही.

तेव्हा आयु. आनंदाने भगवंतास विचारले, 'ब्राह्मण स्त्रियांना प्रव्रज्या देत नाही, तर तुमचा दृष्टिकोणदेखील तसा आहे काय? स्त्रियांशी असा भेदभाव का बरे? काय स्त्रिया धम्मानुसार आचरण करून निर्वाण प्राप्त करू शकणार नाहीत?' त्यावर भगवंतांनी उत्तर दिले, 'माझ्या मतानुसार पुरुषांप्रमाणे स्त्रियादेखील निर्वाण प्राप्त करू शकतात. मी पुरुषांना स्त्रियांपेक्षा कोणत्याही प्रकारे धार्मिक बाबतीत विशेष असल्याचे मानीत नाही. परंतु स्त्रियांना प्रव्रज्या नकारण्यास व्यावहारिक कारणे आहेत.' त्यानंतर पुष्कळदा विनंती केल्यावर भगवंतांनी स्त्रियांच्या प्रव्रज्येस अनुमती दिली, परंतु त्याकरिता आठ अटी ठेवल्या. त्यांचा सानंदाने स्वीकार केल्यावर भगवंतांनी महाप्रजापती गौतमीस प्रव्रज्या दिली. त्यानंतर यशोधरेसाहित पाचशे शाक्य गृहिणींना नन्दक नावाच्या भिक्खूने प्रव्रज्या दिली. भिक्खुणी झाल्यावर महाप्रजापती गौतमीचे नाव भद्दा कच्चाना (भद्रा कात्यायना) असे पडले. तीच प्रथम भिक्खूणी होय.

**प्रश्न १७ : प्रकृती नामक चांडाल कन्येची धम्मदीक्षा केव्हा झाली ?**

**उत्तर** - एकदा आयु. आनंद भिक्षाटन करीत असताना त्यांना तहान लागली व त्यांनी विहिरीवर पाणी ओढणाऱ्या एका प्रकृती नावाच्या चांडालकन्येस पाणी देण्याची विनंती केली. तिने त्यांस सांगितले की, ती नीच जातीची असल्यामुळे त्यांस पाणी पाजू शकणार नाही. परंतु आयु. आनंदांनी जातीची पर्वा न करता तिच्यापासून पाणी ग्रहण केले. त्यामुळे प्रकृतीस आयु. आनंदांविषयी फारच श्रद्धा उत्पन्न झाली. ती त्यांच्या मागे जेतवनारामापर्यंत गेली व भगवंतास आनंदाबरोबर लग्न लावून द्यावयाची ती विनंती करू लागली. भगवंतांनी आपल्या उपदेशाने तिचे मन वळविले व तिने भिक्खुणीसंघात प्रवेश घेतला. तिने पुढे पुष्कळ नांव कमाविले.

## शेवटचे दिवस

**प्रश्न १८ : माता प्रजापती व पत्नी यशोधरा ह्यांच्याशी भ. बुद्धांची पुन्हा भेट झाली काय ?**

**उत्तर** - होय. महाप्रजापती गौतमीचा जेव्हा अंतकाळ आला तेव्हा ती यशेधरेसोबत भगवंताजवळ गेली व तिने तथागतांची भक्तिभावे पूजा केली. तिने सिद्धार्थाचे पालन-पोषण केलेले होते. त्यामुळे तिला बुद्धजननी समजले जात होते व त्यामुळे तिचा केवढातरी गौरव झाला होता.

यशोधरेने भगवंतांशी बोलतांना सांगितले की, तिला अठ्याहत्तर वर्षे पूर्ण झालेली होती. व तीच तिची अखेरची रात्र असल्याने आणि तथागतांमुळेच तिला धर्मबल प्राप्त असल्यामुळे ती त्यांच्याप्रती आपली कृतज्ञता व्यक्त करण्यास त्यांच्या दर्शनास आलेली होती.

त्या दोघींची तथागतांशी हीच अंतिम भेट होती.

**प्रश्न ९९ : तथागत-राहुल या पितापुत्राची अंतिम भेट केव्हा झाली ?**

**उत्तर** – एकदा भ. बुद्ध राजगृहातील वेळुवनात निवास करीत असताना राहुल अम्बलट्ठिके मध्ये थांबलेला होता. दुपारी समाधीतून उठल्यावर तथागत राहुलकडे गेले. त्यांना दुरून येताना पाहून राहुलने त्यांच्यासाठी आसन मांडले व पाय धुवायला पाणी ठेवले. राहुलाने तथागतांना नमस्कार केला व एका बाजूला बसला. तेव्हा तथागतांनी त्याला खोटे न बोलण्याविषयी, अहितकर काम न करण्याविषयी उपदेश केला. मैत्री, करुणा, मुदिता, उपेक्षा ह्यांचा अभ्यास करण्याविषयी उपदेश केला. ते म्हणाले, 'सर्व वस्तू 'नश्वर' आहेत ह्याची जाणीव ठेव. म्हणजे तुझा अहंकार गळून पडेल.' भगवंतांचा उपदेश श्रवण करून राहुल हर्षित होऊन प्रसन्न झाला.

खऱ्या धर्माचे ज्ञान मिळण्यापूर्वी, राहुलाची वागणूक सत्याधिष्ठित नव्हती, तेव्हा भगवंतांनी त्यास उपदेश दिला, तू माझा पुत्र व एका राजाचा पौत्र आहेस. स्वखुशीने प्रत्येक गोष्टीचा त्याग करून 'तू एक श्रमण झाला आहेस. म्हणून तू आपल्या जिभेवर ताबा ठेव व आपल्या मनास शुद्ध कर. ज्याप्रमाणे रणांगणामधील हत्ती सोंडेच्या मध्यभागी मारल्या जाणाऱ्या बाणापासून आपल्या सोंडेचे रक्षण करतो; अशा लढाऊ हत्तीसारखा तू हो व जो राजाला आपल्या सोंडेवर चढून जाऊ देतो अशा नरम पडलेल्या व शांत झालेल्या हत्तीप्रमाणे तू हो. अशा रीतीने जो मनुष्य सदाचरणाला पूज्य मानेल त्याला आयुष्यभर सुख मिळेल.'

**प्रश्न १०० : भ. बुद्धांनी अंतिम चारिका (प्रवास) करताना कोणकोणत्या स्थळांना भेटी दिल्या ?**

**उत्तर** – भगवंतांनी संबोधी प्राप्त केल्यावर ४५ वर्षे प्रवास करीत करीत उपदेश केला. आपल्या अंतिम प्रवासास निघण्यापूर्वी भ. बुद्ध राजगृहातील गृध्रकूट पर्वतावर थांबले होते. तेथून ते अम्बलिठ्ठिका, नालंदा, पाटलीपुत्र, कोटिग्राम, नादिका व वैशालीला गेले. वैशाली हे निगण्ठनाथ पुत्र महावीरांचे जन्मस्थान होते. त्यामुळे जैनधर्माचा तो एक बालेकिल्ला होता. तथागत जेथे जेथे गेले, तेथे तेथे त्यांनी भिक्खू-संघाला व उपासकांना उपदेश केला. त्यांनी आपल्या उपदेशाने वैशालीच्या लोकांची मनेही काबीज केली. वर्षावास संपल्यावर जेव्हा त्यांनी वैशालीचा निरोप घेतला तेव्हा त्यांनी त्या लिच्छविजनांना आपले भिक्षापात्र स्मृती म्हणून प्रदान केले. ती त्यांची वैशालीची अखेरची भेट होती.

वैशालीहून भ. बुद्ध भण्डग्रामास, भण्डग्रामाहून हट्ठीनगर व तेथून भोगनगरास गेले. भोगनगराहून ते पावा येथे गेले. तेथे चुन्द नावाच्या लोहाराच्या आम्रवनात थांबले. तेथून ते कूसीनारास गेले. चुन्दाला जेव्हा हे समजले तेव्हा तो त्यांच्या दर्शनाला गेला व त्याने त्यांना भिक्खूसंघासहित दुसऱ्या दिवशीच्या भोजनाचे आमंत्रण दिले. भगवंतांनी मौन राहून ते स्वीकारले. दुसऱ्या दिवशी आपल्या घरी स्वादिष्ट खीर वगैरे मिष्टान्नाबरोबर चुन्दाने 'सूकर-मद्दवा' चीही सिद्धता केली. भिक्खूसंघासह भगवंतांनी चुन्दाच्या घरचे भोजन ग्रहण केले व चुन्दास धम्मोपदेश करून ते निघाले. परंतु चुन्दाने सिद्ध केलेले भोजन भगवंतांच्या प्रकृतीस मानवले नाही. त्यांना घोर आजार झाला. अतिसारामुळे त्यांना मरणप्राय वेदना होऊ लागल्या. परंतु त्यांनी 'स्मृती सम्प्रजन्यच्या' नियोगाने त्या सर्व सहन केल्या. थोडे बरे वाटल्यावर ते सर्वजण पावाहून कुसीनाराला आले.

**प्रश्न १०१ : भगवंतांनी आपल्या मृत्यूची घोषणा केली होती काय ?**

**उत्तर -** होय. भगवंतांनी आनंदास येणेप्रमाणे सांगितले, आनंदा! दुष्ट मार आज पुन्हा मी जेथे होतो तेथे आला व म्हणाला - 'पवित्रतम भगवंता, तुम्हास वंदन असो. तुम्ही परमश्रेष्ठ सुख मिळविलेले आहे आणि महापरिनिर्वाण अंतीम निर्वाणात पदार्पण करण्याची आपली वेळ आलेली आहे.' तेव्हा मी त्याला म्हणालो - 'अरे दुष्टा, आनंदी हो. तथागतांचा लोप लवकरच घडून येईल.' त्यानंतर भगवंतांनी आयु. आनंदास वैशालीच्या जवळपास राहत असलेल्या सर्व भिक्खूंना धम्मसभागृहांत एकत्रित करावयास सांगितले.

**प्रश्न १०२ : भ. बुद्धांनी भिक्खूसंघास दिलेला बोधिपक्षीय धर्माचा अंतिम उपदेश कोणता ?**

**उत्तर -** त्यावेळी भगवान कुटागार शाळेमध्ये निवास करीत होते. त्यांनी वैशालीच्या जवळपास जेवढे भिक्खू विहार करीत होते, त्या सर्वांना एकत्रित करविले. त्यांना आपली शेवटची अनुशासनपर देशना दिली. भगवंतांनी भिक्खूंना सम्बोधित करून म्हटले, ''भिक्खूंनो! मी बोधिपक्षीय धम्माचा जो उपदेश दिलेला आहे तो चांगल्याप्रकारे शिकून ग्रहण करा, तशी भावना करा, चिंतन, मनन करून विकसित करा, जेणेकरून हे श्रेष्ठ जीवन अमर होईल आणि ह्याने अनेकांचे कल्याण होऊन अनेकांना सुखाचा लाभ होईल.''

त्याचे सविस्तर विवरण करताना भगवंतानी म्हटले, -

''भिक्खूना! मी चार स्मृती उपस्थानांचा उपदेश दिला आहे,<br>
चार सम्यक-प्रयासांचा उपदेश दिला आहे,<br>
चार ऋद्धिपादांचा, पाच इंद्रियांचा उपदेश दिला आहे.<br>
पाच बलांचा उपदेश दिला आहे.<br>
सात बोध्यंगांचा उपदेश दिला आहे आणि<br>
आर्य अष्टांगिक मार्गाचा उपदेश दिला आहे.

भिक्खूनो! मी तुम्हाला सांगतो की, - संस्कार अनित्य आहेत. तुम्ही अप्रमादी राहून आपल्या उद्देश प्राप्तीकरिता सतत प्रयत्नशील राहा. थोड्याच दिवसात तथागतांचे परिनिर्वाण होईल. आजपासून तीन महिन्यानंतरच तथागत परिनिवृत्त होतील.''

हे सर्व धम्म एकूण सदतीस आहेत आणि म्हणून ह्यांना 'सदतीस बोधिपक्षीय' धम्म म्हणतात. चार स्मृती उपस्थान आहेत - (१) कायानुपश्यना, (२) वेदनानुपश्यना, (३) चित्तानुपश्यना व (४) धर्मानुपश्यना.

सम्यक प्रयास चार आहेत -

१. अकुशल धर्मांची उत्पत्ती न व्हावी म्हणून प्रयत्न करणे,
२. उत्पन्न झालेल्या अकुशलांचा नाश करण्याकरिता प्रयत्न करणे,
३. उत्पन्न न झालेल्या कुशल धम्माची प्राप्ती करण्याकरिता प्रयत्न करणे, आणि
४. उत्पन्न झालेल्या कुशल धम्माची जोपासना करण्याकरिता प्रयत्न करणे.

ऋद्धिपाद चार आहेत -

१) छंद, २) चित्त ३) वीर्य, आणि ४) विमर्श.

इंद्रिये पांच आहेत - १) चक्षू २) श्रवणेन्द्रिय ३) नासिका ४) जिव्हा, आणि ५) त्वचा.

यांशिवाय येथे श्रद्धा, वीर्य, स्मृती, समाधी, प्रज्ञा हेही अभिप्रेत आहेत. त्यांनादेखील 'इंद्रिये' च म्हणतात.
पाच 'बलसुद्धा' हेच आहेत - १) श्रद्धा बल २) वीर्य बल ३) स्मृती बल ४) समाधी बल आणि ५) प्रज्ञा बल
सात बोध्यंगांतही स्मृती, वीर्य आणि समाधीचा समावेश केला जातो.
आणि बाकीचे चार आहेत - १) धर्म २) विनय ३) प्रीतिप्रश्रंधि आणि ४) उपेक्षा.
पुन्हा आर्य अष्टांगिक मार्गात सुद्धा १) स्मृती आणि २) समाधी येतातच.
बाकीचे सहा आहेत - १) सम्यक दृष्टि २) सम्यक संकल्प ३) सम्यक वाचा ४) सम्यक कर्मान्त ५) सम्यक आजीविका आणि ६) सम्यक व्यायाम.
अशारीतीने जर ह्या सदतीस बोधी पक्षीय धम्मांची एकूण मोजदाद केली तर त्यांची वास्तविक संख्या सदतीस न होता एकूण पंचवीस होते. ह्या बोधीपक्षीय धम्मांद्वारे बौद्ध धम्माचा सारांश विशद केलेला आहे. नाहीतर भगवंतांनी अथवा संगीतीकारांनी ह्यांना इतके महत्त्व दिले नसते.

**प्रश्न १०३ : त्यांच्या अन्तिम अवस्थेतदेखील त्यांनी धर्मोपदेश केला काय ?**

**उत्तर** - होय. त्यावेळी भगवंतांना भयंकर यातना होत असूनदेखील त्यांनी सुभद्र, मल्ल राजकुमार व त्यांचे स्वतःचे एकत्रित झालेले अनुयायी ह्यांना धर्मोपदेश दिला.

सुभद्र परिव्राजक कुशिनाराला राहत होता. त्याने लोकवार्ता ऐकली, ''असे म्हणतात की, आज रात्रीच अखेरच्या प्रहरी भ. बुद्धांचे परिनिर्वाण होणार आहे.'' तेव्हा त्याने विचार केला की, त्याच्या मनातील शंकेचे निरसन भगवंताशिवाय कोणीही करू शकणार नाही. तेव्हा तो आडमार्गाने मल्लाच्या शालवनांत गेला. तेथे स्थविर आनंदाची भेट घेऊन सुभद्र म्हणाला, ''स्थविर आनंद! मी थोडा वेळ तरी तथागतांचे दर्शन करू शकेल काय?''

''पुरे, पुरे सुभद्र! आता त्यांना त्रास देऊ नकोस. ते फार थकलेले आहेत. ते विश्राम करीत आहेत.'' पण सुभद्राने तीनदा तीच विनंती केली व आनंदाने त्याला तिन्ही वेळा तेच उत्तर दिले.

परंतु दोघांचा संवाद तथागतांनी ऐकला. त्यांनी आनंदला म्हटले, ''आनंद! सुभद्राला तथागतांचे दर्शन करण्याची अनुमती द्यावी. तो मला कष्ट देण्याच्या इच्छेने आला नसून माझ्याकडून काही ज्ञान प्राप्त करण्याच्या इच्छेनेच आला असावा.'' तेव्हा आनंदाने सुभद्राला आत पाठविले. सुभद्राने तथागतांना विचारले, ''भगवान, जे प्रसिद्ध गणाचार्य आहेत, पंथसंस्थापक आहेत, जसे - पूर्णकाश्यप, मक्खली घोषाल, अजित केशकंबली, पकुध कच्चायन, संजय वेलट्ठी-पुत्त तसेच निगण्ठनाथ-पुत्त ह्या सर्वांनी सत्य ज्ञान प्राप्त केले आहे काय?''

तथागत म्हणाले, ''सुभद्र! असल्या गोष्टीत तू पडू नकोस. मी तुला धम्मोपदेश देतो. नीट ध्यान देऊन ते श्रवण कर.'' सुभद्र! ज्या धम्ममतांमध्ये आर्य अष्टांगिक मार्ग नाही, त्यात कोणी खरा श्रमण असूच शकत नाही. तथागतांच्या धम्मात आर्य अष्टांगिक मार्ग आहे. म्हणून तथागतांच्या धम्मात श्रमण आहेत. श्रोतापन्न, सकृदागामी, अनागामी आणि अर्हतही आहेत. दुसऱ्या धम्ममतांत श्रमणांचा अभाव आहे. परंतु हे सुभद्र! जर ह्या धम्ममतांच्या

अनुयायांनी सम्यक जीवन व्यतीत केले तर ह्या जगात अर्हतांची उणीव कधीच आढळणार नाही. एकोणतीस वर्षांचा असताना मी कल्याणमार्गाचा यात्री बनलो. मी सद्धम्माचा पक्ष ग्रहण केल्याला आता पन्नासहून अधिक वर्षे झालीत.''

तथागतांचा उपदेश ऐकून सुभद्र प्रसन्नचित्त होऊन म्हणाला, ''बुद्ध, धम्म व संघाला मी शरण जातो. तथागतांनी मला सत्याचे ज्ञान करून दिले आहे.'' आनंदाला बोलावून तथागतांनी म्हटले, ''दुसऱ्या धर्मातील परिव्राजकाला संघात प्रवेश मिळण्यास चार महिने प्रतीक्षा करावी लागते. परंतु मनुष्यामनुष्यांत फरक असतो;'' असे म्हणून सुभद्राला तेव्हाच संघात प्रविष्ट करावयास सांगितले. अशा प्रकारे तथागतांच्या अनुज्ञेने सुभद्र परिव्राजक भिक्खू संघात प्रविष्ट झाला. तथागतांनी स्वतः ज्याला दीक्षा दिली, असा तोच अंन्तीम श्रावक होय.

**प्रश्न १०४ : भ. बुद्धांचे संघाला केलेले अंतिम मार्गदर्शन कोणते ?**

**उत्तर -** १) मार्गदर्शक कोण ? : भ. बुद्ध आनंदाला म्हणाले, ''मी गेल्यानंतर असे समजू नका की, आमचा शास्ता, आमचा मार्गदर्शक राहिला नाही. मी जो धर्मविनय शिकविलेला आहे, माझ्या पश्चात तोच तुमचा शास्ता राहील.''

२) लहानमोठ्यांशी कसे वागावे : ''आनंदा! हल्ली भिक्खू परस्परांशी बोलतांना मित्रभावाने समान संबोधनाने बोलतात. लहानमोठ्यांचा काहीच भेद पाळीत नाहीत. परंतु माझ्या पश्चात ही प्रथा बंद झाली पाहिजे. मोठा लहान्यास नावाने किंवा आयुष्मान किंवा आवुस म्हणून संबोधू शकतो. परंतु लहान्याने मात्र मोठ्याला त्याच्या 'गोत्राने' किंवा 'भन्ते' असेच संबोधावे.''

३) कोणते नियम रद्द करावेत : ''आनंदा! माझ्या पश्चात संघाला आवश्यक वाटले तर गौण नियम आहेत, ते तो रद्दही करू शकतो.''

४) भिक्खू छन्न याच्याशी कसे वागावे : ''आनंदा! भिक्खू छन्न कसा हट्टी, बेशिस्त, उद्दाम व ''विनया'' ला न मानणारा आहे, हे तुला माहीतच आहे. माझ्या पश्चात छन्नाला 'ब्रह्मदण्ड' दिला जावा. त्यावर आनंदाने विचारले, 'भगवन! 'ब्रह्मदण्ड म्हणजे' काय? भगवंत म्हणाले आनंदा, छन्न काय वाटेल ते बोलो, त्याला बोलू द्यावे; त्याच्याशी कोणी बोलू नये. त्याला काही म्हणू नये. त्याला काही शिकवू नये. कदाचित् ह्यामुळे त्याच्यात काही सुधारणा होतील.''

५) भिक्खूसंघास संबोधिलेले अखेरचे वचन : तथागत भिक्खूंना उद्देशून म्हणाले, जर कोणा भिक्खूच्या मनात बुद्धाविषयी, धम्माविषयी, संघाविषयी किंवा मार्गाविषयी काही शंका, संदेह किंवा विचिकित्सा असल्यास आताच त्याने विचारून घ्यावे. मागाहून असा पश्चात्ताप करायची पाळी येऊ नये की, ''आमचा शास्ता आमच्या सम्मुख असताना आम्ही त्यांना विचारून आपल्या शंकेचे निराकरण केले नाही.'' परंतु भिक्खू मौन राहिले. तथागतांनी तीनदा भिक्खूंना विचारले, पण ते तीनही वेळा गप्पच राहिले. तेव्हा तथागत म्हणाले, ''माझ्याविषयी तुम्हाला आदर असल्यामुळे कदाचित तुम्ही गप्प असाल. परंतु मित्राने मित्राला विचारावे तसे विचारा.'' तरीही भिक्खू गप्पच राहिले. तेव्हा तथागत म्हणाले, ''आनंदा! कोणालाही काहीच शंका राहिलेली नाही, हे तथागत जाणतात. माझ्या ह्या

पांचशे भिक्खूंना बोधिप्राप्ती निश्चित आहे. भिक्खूंना! मी तुम्हाला पुन्हा स्मरण करून देतो की, सर्व संस्कार अनित्य आहेत. अप्रमादपूर्वक आपल्या उद्देशाची प्राप्ती करण्यात प्रयत्नशील राहा.'' तथागतांचे हेच अखेरचे शब्द होते.

त्यानंतर भगवंतांनी समाधी अवस्था धारण केली. समाधीच्या अवस्थेत स्थिर झाल्यावर महापरिनिर्वाणास पोहोचले. त्या दिवशी वैशाखी पौर्णिमा असून ते इ.स. पूर्व ४८३ वे वर्ष होते.

**प्रश्न १०५ : भगवंतांचे अंतिम भोजन चुन्द कर्मार-पुत्राने दिलेले डुकराचे मांस होते, हे म्हणणे बरोबर आहे काय ?**

**उत्तर** – नाही. भोजनाची वेळ झाली असता भगवान चुन्द कर्मार-पुत्राच्या निवासस्थानी गेले. चुन्द कर्मार-पुत्राने भ. बुद्धांच्या भिक्खू-संघातील पुष्कळसे पक्वान्न आणि पुष्कळ सूकर-मद्दव तयार करविले होते.

चुन्द कर्मार-पुत्राने दिलेले भोजन केल्यावर भगवंतांना शौचावाटे रक्त पडण्याचा जोरदार आजार उत्पन्न झाला. प्राणांतिक वेदना होऊ लागल्या. पण भगवंतांनी त्या सहन केल्या. येथे सूकर-मद्दव शब्द जो आलेला आहे, त्याविषयी पूर्वीपासूनच वाद चालत आलेला आहे. एक मत असे आहे की, फार तरुण नाही व फार म्हातारा नाही असा साधारणपणे एका वर्षाचा डुक्कर, कोवळाही असतो व रुचकरही असतो. (ह्या गोष्टीचा गैरफायदा इतर धर्मीयांनी घेतलेला आहे : संकलिका). कोणी असे म्हणतात की, बारीक चांगल्या तांदळाला पाच गाईंच्या दुधात शिजविल्यावर जो पातळ रस खीरीप्रमाणे तयार होतो त्यालाच सूकर-मद्दव म्हटले जाते. जसे गोपान. कोणाचे मत असे आहे की, सूकर-मद्दव नावाची एखादी रसायन-विधी असावी, जिच्या अनुसार चुन्द कर्मार-पुत्राने भगवंतांकरिता विशेष भोजन तयार केले होते.

करूणावतार भगवंतांना चुन्दाचे भोजन ग्रहण केल्यावर जेव्हा जोरदार आजार झाला, तेव्हा त्यांना आपल्या आजारापेक्षा अधिक चिंता ह्या गोष्टीची होती की, चुन्द कर्मार-पुत्राला असा विचार करून दुःख न होवो की, आपलेच भोजन ग्रहण केल्यावर भगवान अत्यंत आजारी होऊन त्यांचे परिनिर्वाण झाले. त्यांनी आनंदाला म्हटले - ''आनंदा! तू म्हणशील की, चुन्दा तू फार भाग्यवान आहेस. तू दिलेले भोजन ग्रहण करून भगवंतांना परिनिर्वाणाची प्राप्ती झाली.''

**प्रश्न १०६ : भगवंतांनी 'अत्त दीपो भव' हा उपदेश कधी केला ?**

**उत्तर** – वेळूग्रामामध्ये वर्षावास केल्यानंतर भगवंतांना अतिशय तीव्र वेदना झाल्या होत्या. त्यांनी आपल्या दृढ मनोबलाने त्यांना शांत केले. तेव्हा आयु. आनंद भगवंतांजवळ जाऊन म्हणाले, ''भगवान! मला निश्चितपणे वाटते की, जोपर्यंत भिक्खूसंघाला अंतिम उपदेश देणार नाहीत, तोपर्यंत भगवंतांचे परिनिर्वाण होणार नाही.''

भगवंत म्हणाले ''आनंदा! भिक्खूसंघाला माझ्याकडून आणखी कोणती अपेक्षा आहेत बरे! अमूक धर्मतत्त्वें गूढ आहेत. ती कुणालाच सांगायची नाहीत व अमुक धर्मतत्त्वे लोकांना उपदेश द्यावयासाठी, अशा तऱ्हेचे माझे धोरण कधी नव्हतेच. आनंदा तथागतांनी कोणतीच

गोष्ट अंतिम वेळी प्रकट करण्याकरिता गुप्त ठेवलेली नाही. आनंदा मी केव्हाहि असा विचार केला नाही की, भिक्खूसंघ माझ्यावर अवलंबून राहावा, तथागतांची धारणा तशी नव्हतीच. आनंदा! तथागत भिक्खूसंघाला आता आणखी काय सांगणार आहेत बरे! आता मी क्षीण झालो आहे. बराच वयस्क आहे. म्हातारा झालो आहे. माझे वय ऐंशी वर्षांचे झाले आहे. आनंदा! ज्याप्रमाणे एखाद्या जुन्या झालेल्या छकड्याला बांधबुंध करून चालवितात, त्याप्रमाणे तथागतांची शरीरयात्रा कशीतरी चाललेली आहे. आनंदा! ज्यावेळी वेदनांचा निरोध करण्याच्या अवस्थेमध्ये तथागत विना आलंबनाच्या समाधीमध्ये स्थित राहतात, तीच वेळ तथागतांकरिता सुखद असते. म्हणून आनंदा आपला दीप स्वतःच व्हा, (अत्त दीपो भव।) स्वतःलाच शरण जा, दुसऱ्या कोणालाही शरण जाऊ नका.''

**प्रश्न १०७ : भगवंतांच्या अंतिम अवस्थेचे वर्णन करा.**

**उत्तर –** चुन्दाकडील भोजन ग्रहण केल्यावर ते पावाहून कुसीनारा येथे आले. येताना थोडे चालून जात नाही तोच भगवंतांना विश्रांतीची आवश्यकता भासू लागली. ते रस्त्याच्या बाजूला एका वृक्षाखाली बसले, आणि म्हणाले, ''आनंदा, माझ्यासाठी अंथरूण तयार कर. मी थकलो आहे. थोडा वेळ विश्रांती घेतो.'' आनंदाने आज्ञेप्रमाणे संघाटी चौपदरी करून अंथरली. तथागत त्यावर आसनस्थ झाले व म्हणाले, ''आनंद थोडे पाणी आण; तहान लागली आहे.''

आनंदा म्हणाला, ''इथून ककुत्था नदी जवळच आहे. तिचे पाणी स्वच्छ, शीतल व गोड आहे. प्रवाहात उतरणेही सुलभ आहे. भगवंतांनी तेथे चलावे, म्हणजे हातपाय धुऊन पाणी पिता येईल व बरे वाटेल. जवळच्या जलाशयाचे पाणी विशेष स्वच्छ नाही.'' भगवंतांचे शरीर इतके थकले होते की, ते नदीपर्यंत चालू शकत नव्हते. म्हणून त्यांनी जवळच्याच जलाशयाचे पाणी आनंदाला आणावयास सांगितले.

आनंदाने पाणी आणले आणि भगवंतांनी ते प्राशन केले. थोडा वेळ विश्रांती घेऊन भगवंत भिक्खूसंघासह ककुत्था नदीवर आले. तेथे पाण्यात उतरून त्यांनी स्नान करून जल प्राशन केले. नदी ओलांडून ते दुसऱ्या तीरावरून बाहेर आले व आम्रवनाकडे जाण्यास निघाले. तेथे पोहोचल्यावर त्यांनी पुन्हा आनंदाला बिछाईत तयार करण्यास सांगितले व तेथे विश्रांती घेतली.

काही वेळ विश्रांती घेतल्यावर तथागत उठून बसले आणि आनंदाला म्हणाले, ''आनंद! आपण मल्लांच्या शालवनात जाऊया. हिरण्यवतीच्या दुसऱ्या तीरावर कुशिनारामधे ते उपवन आहे. तेथे जाऊन पोहोचल्यावर दोन शालवृक्षांच्या मध्ये आनंदाला संघाटी अंथरण्यास सांगून ते म्हणाले, 'मी थकलो आहे, थोडे इथे पडावेसे वाटते.' बिछाईत तयार झाल्यावर भगवंत त्यावर जाऊन पहुडले.''

**प्रश्न १०८ : आपल्या शिष्यांना उद्देशून म्हटलेले भगवंतांचे अंतिम शब्द कोणते ?**

**उत्तर –** भगवंत म्हणाले, ''भिक्खूंनो! मी तुम्हाला आता निक्षून सांगतो की, सर्व संस्कार नाशवंत आहेत. तुम्ही अप्रमादी राहून आपल्या मुक्तीसाठी प्रयत्न करा.''

**अनिच्चा वत संखारा, उप्पादवय धम्मिनो ।**
**उप्पजित्वा निरूज्झन्ति तेसं वूपसमो सुखो ।**

# महापरिनिर्वाण

**प्रश्न १०९ : भ. बुद्धांचा अंतिम संस्कार कशा प्रकारे केला गेला ?**

**उत्तर -** कुशिनाराच्या मल्लांनी आनंद स्थविरांना विचारले, "आता तथागतांच्या देहाची व्यवस्था कशी करावी?" आनंद स्थविर म्हणाले, लोक राजा-महाराजांची जशी उत्तरक्रिया करतात, तशीच तथागतांची उत्तरक्रिया व्हायला पाहिजे. महाराजाचा देह प्रथम नव्या कोऱ्या वस्त्रांत गुंडाळतात; नंतर कापूस-लोकरीने गुंडाळून पुन्हा नव्या वस्त्राने गुंडाळतात. असे एकामागून एक, दोन्ही प्रकारचे पाचशे फेरे होईपर्यंत करतात. नंतर देहाला एका तेलाने भरलेल्या मोठ्या कढईत ठेवतात आणि तिच्यावर तसेच दुसरे लोखंडी झांकण ठेवून तो बंद करतात. नंतर सर्व प्रकारची सामग्री आणून चिता रचतात. अशा प्रकारे लोक राजामहाराजांची उत्तरक्रिया करतात, तशीच तथागतांची करावी."

**प्रश्न ११० : भ. बुद्धांच्या महापरिनिर्वाणास कोणता आजार कारणीभूत झाला ?**

**उत्तर -**भ. बुद्ध आपली अंतिम चारिका करताना वैशालीतून पुढे जात जात पावा येथे पोहोचले. तेथे चुन्द नावाच्या लोहाराच्या आम्रवनांत थांबले. तेव्हा चुन्दाने त्यांना भिक्खूसंघासहित दुसऱ्या दिवशीच्या भोजनाचे आमंत्रण दिले आणि स्वादिष्ट खीर वगैरे मिष्टांन्नाबरोबरच 'सूकरमद्दवाचीही' सिद्धता केली. भगवंतांनी चुन्दाच्या घरचे भोजन ग्रहण केले व चुन्दास धर्मोपदेश करून ते निघाले. परंतु चुन्दाने दिलेले भोजन भगवंतांच्या प्रकृतीस मानवले नाही. घोर आजार झाला व अतिसारामुळे मरणप्राय वेदना होऊ लागल्या. परंतु त्यांनी 'स्मृती-सम्प्रजन्यच्या' नियोगाने त्या सर्व सहन केल्या. थोडे बरे वाटल्यावर सर्वजण पावाहून कुशिनाराला निघाले.

त्यावेळी त्यांच्या वयाची ८० वर्षे पूर्ण झाली होती. (इ.स. पूर्वी ५४३) व तो दिवस पौर्णिमेचा होता. आपला अंतकाळ समीप आला आहे, हे जाणून वाराणसीपासून सुमारे एकशे वीस मैलावर असलेल्या कुशिनगरास ते सायंकाळच्या वेळी येऊन पोहोचले. कुशिनगराच्या उपवर्तनात मल्लांच्या शालवनांमध्ये, दोन शाल-वृक्षांच्या मध्यभागी, त्यांनी प्राचीन रूढीप्रमाणे उत्तरेला डोक्याचा भाग करून अंथरूण घालावयास लावले व त्यावर ते आडवे झाले आणि निर्मळ मनाने आपल्या शिष्यसमुदायास अंतिम सूचना देऊन त्यांनी त्यांचा शेवटचा निरोप घेतला. परंतु त्यांनी निक्षून सांगितले की, चुन्दास कसलेही लांछन लावू नये.

**प्रश्न १११ : मल्ल लोकांनी भगवंतांच्या महापरिनिर्वाणानंतर कशा प्रकारे विलाप केला ?**

**उत्तर -** भगवंतांचे महापरिनिर्वाण लवकरच होणार आहे, अशी बातमी आ. आनंदांनी कुशिनगराच्या मल्लांना कळविली. सर्वच मल्ल परिवारांना अतिशय दुःख झाले. लोक आपले केस पसरवून, छाती बडवून, मोठा विलाप करू लागले. आपल्या मुलाबाळांसहित ते भगवंतांच्या अंतिम दर्शनाकरिता निघाले.

त्या मल्लांनी भगवंतांच्या देहाचा अग्निसंस्कार एखाद्या चक्रवर्ती राजाच्या अग्निसंस्काराप्रमाणे करावयाची व्यवस्था केली. त्यांच्या शरीरास एका नवीन कपड्यामध्ये लपेटून त्यानंतर रुई-ऊण याने लपेटून तो क्रम पाचशे वेळपर्यंत सुरू ठेवला असे म्हणतात. नंतर एका मोठ्या लोखंडाच्या तेलाने भरलेल्या कढईमध्ये ठेवून त्यावर तेवढेच मोठे झांकण ठेवले आणि सुगंधी द्रव्ये व फूलमाला इत्यादींची व्यवस्था करून गाजेवाजंत्री लावून नृत्य, गीत इ. द्वारे सहा दिवस भगवंतांविषयी आदर, सत्कार आणि गौरव दाखविण्यात निघून गेले. सातव्या दिवशी त्यांनी अंत्येष्टी केली. त्यासाठी तथागतांच्या शरीरास ते मुकुटबंधन मल्लांच्या चैत्यस्थानी घेऊन गेले व अग्निस्पर्श केला.

**प्रश्न ११२ : भगवंतांच्या पवित्र अस्थी कोणाकोणाला मिळाल्या ?**

**उत्तर** - भगवंतांच्या देहाचा अग्निसंस्कार होऊन त्याची 'फुले' झाल्यावर मल्लांनी सर्व राख आणि अस्थी गोळा केल्या व त्यावर मोठा कडक पहारा बसविला. सात दिवसपर्यंत मल्लांनी नृत्य, गीत, वाद्य, माला आणि सुगंधित द्रव्ये यांनी भगवंतांच्या अस्थींचा मोठा गौरव आणि आदर-सत्कार केला व पूजा केली.

अजातशत्रू राजाने आपले दूत पाठवून अस्थींपैकी एक हिस्सा मागितला. त्याचप्रमाणे वैशालीच्या लिच्छवींनी, कपिलवस्तूच्या शाक्यांनी, अल्लकप्पाच्या वल्ली लोकांनी, रामग्रामाच्या कोलीयांनी आणि पावाच्या मल्लांनी देखील हिस्सा मागितला. परंतु कुशिनगराच्या मल्लांनी साफ इन्कार केला.

तेव्हा द्रोण नावाच्या एका ब्राह्मणाने मध्यस्थी केली व आठ हिस्से करून जनपदांमध्ये वाटावयाची सूचना केली आणि त्यानेच सारखे आठ हिस्से केले. शेवटी ज्या भांड्यात मूळ अस्थी ठेवलेल्या होत्या ते रिकामे भांडे द्रोणाने मागितले व त्यावर नंतर स्तूप उभारला. अशा प्रकारे मगधचा राजा अजातशत्रू, वैशालीचे लिच्छवी, कपिलवस्तूचे शाक्य, अल्लकप्पांचे वल्ली, रामग्रामचे कोलीय, वेठ-दीपचे ब्राह्मण, पावाचे मल्ल ह्यांना भगवंतांच्या अस्थी मिळाल्या. तसेच कुशिनगरामधील मल्ल ह्यांनाही अस्थी मिळाल्या. सर्वांनी आपल्या श्रद्धेनुसार त्यांच्यावर स्तूप बनविले.

## धर्मामध्ये भगवंतांचे स्वतःचे स्थान

**प्रश्न ११३ : आपला उत्तराधिकारी नियुक्त करण्याविषयी भगवंतांचे काय मत होते ?**

**उत्तर** - एकदा भ. बुद्ध धनुर्धारी नामक शाक्य परिवाराच्या आम्रवनात थांबले असताना, पावामध्ये निगण्ठनाथपुत्राचे (म्हणजेच महावीरांचे) नुकतेच देहावसान झालेले होते. त्यांच्या मृत्यूनंतर निर्ग्रंथ म्हणजेच जैन लोकांत भांडणे होऊन दुही माजली. त्यांचे दोन पक्ष पडून ते एकमेकांना वाग्बाणांनी घायाळ करू लागले. ही गोष्ट चुन्दाने स्थविर आनंदाला सांगितली. आनंदाने भ. बुद्धांजवळ ती सविस्तर निवेदन केली आणि आपला उत्तराधिकारी नियुक्त करण्याविषयी त्याने भगवंतांना आग्रहपूर्वक विनंती केली. तेव्हा भ. बुद्ध म्हणाले, 'आनंदा! धम्मासंबंधीचा वादविवाद हुकूमशहा मिटवू शकणार नाही. कोणत्याही वादाबाबत स्वतः संघालाच निर्णय घ्यावा लागेल. संघाने एकत्र येऊन विचारविनिमय करून एकमत झाल्यावर त्या निर्णयाचा स्वीकार केला पाहिजे व त्याचे परिपूर्ण पालन केले पाहिजे. वाद निर्माण

झाल्यास त्याचा निर्णय बहुमतानेच व्हायला पाहिजे. उत्तराधिकाऱ्याची नियुक्ती हा त्यावरील उपाय होऊ शकत नाही.'

**प्रश्न ११४ : भगवंतांनी कोणाला आपले उत्तराधिकारी नेमले होते काय ?**
**उत्तर** - नाही. ते आयु. आनंदाला म्हणाले होते, 'आनंदा! शक्य आहे की, माझ्या परिनिर्वाणानंतर तुम्हाला असे वाटेल की, आमचा कोणी शास्ता राहिला नाही. असा विचार करू नका. मी तुम्हाला जो धम्म आणि विनय ह्यांचा उपदेश दिला आहे, त्यालाच तुम्ही माझ्यानंतर आपला शास्ता मानावे.'

**प्रश्न ११५ : 'धम्म हाच उत्तराधिकारी' अशी शिकवण कोणती ?**
**उत्तर** - भगवंतांनी आपल्या शिष्यांना उद्देशून पुढील उपदेश केला होता, 'जेव्हा मी ह्या जगातून गेलेला असेल, तेव्हा तुम्ही सत्याचा उपदेश करण्यास माझ्या जागी आपल्यामधून चांगल्या कुळाच्या शिक्षित व्यक्तींना नियुक्त करावे व त्यांना तथागतांच्या वस्त्रांनी अलंकृत करून, त्यांना तथागतांच्या निवासस्थानी प्रवेश करू देऊन त्यांना तथागताच्या विचारपीठाचे आधिपत्य द्यावे. तथागताची वस्त्रे म्हणजे अत्युत्कृष्ट संयम व चिकाटी होय. तथागताचे निवासस्थान म्हणजे परोपकारधर्म व प्राण्यांवर प्रेम करणे होय.'

'तुम्ही तथागतासारखेच व्हा. त्यांचे अनुकरण करा आणि उदारपणाने देण्याचे, उदारपणा दाखविण्याचे व अपर्ण करण्याचे त्यांचे उदाहरण समोर ठेवून अनुकरण करा.'

**प्रश्न ११६ : भगवंतांनी आपल्या धर्मात स्वतःसाठी विशेष स्थान ठेवले होते काय ?**
**उत्तर** - नाही. इतर धम्माच्या संस्थापकांनी आपापल्या धर्मात स्वतःसाठी विशेष स्थान ठेवलेले होते. जसे येशूंनी स्वतःस ख्रिश्चन धर्माचा दूत असल्याचे घोषित केले. स्वतःस देवाचा पुत्र असल्याचे घोषित केले. त्यांनी असे स्पष्ट सांगितले की, जो त्यास देवपुत्र मानणार नाही, त्यास मुक्ती मिळणार नाही. याप्रमाणे कोणत्याही ख्रिश्चनास स्वतःच्या मुक्तीकरिता येशूला ईश्वराचा (प्रेषित) पुत्र मानण्याची अनिवार्य शर्त ठेवून स्वतःचे खास स्थान धर्मामध्ये सुरक्षित केले.

इस्लाम धर्माचे संस्थापक महंमद यांनी घोषित केले की, तेच ईश्वराचे पैगंबर होत. एवढेच नव्हे तर तेच ईश्वराचे शेवटचे पैगंबर (दूत) असल्याचेही त्यांनी घोषित केले. याप्रमाणे कोणीही मुसलमान या दोन गोष्टींचा स्वीकार करील तरच त्यास मुक्ती (निजात) मिळेल, अशी शर्त त्यांनी ठेवली व स्वतःचे खास स्थान धर्मात सुरक्षित केले.

भगवान बुद्धांनी या प्रकारची कोणतीहि शर्त ठेवली नाही. त्यांनी स्वतःस धम्माहून भिन्न ठेवले. धम्माचे स्थान वेगळे आणि त्यांचे स्थान वेगळे होते. सर्वसामान्याप्रमाणे त्यांनी शुद्धोदन व महामाया यांचा प्राकृतिक-पुत्र असेच स्वतःला लेखले. ते आपल्या धम्मापासून सर्वथा पृथक होते. संघासाठी बनविलेल्या सर्वच नियमांचे ते स्वतः पालन करीत असत.

आपला मरणोत्तर उत्तराधिकारी नेमण्यास त्यांनी नकार दिला. ह्यावरून सिद्ध होते की, ते आपल्या 'धम्म-शासनात' स्वतःकरिता कोणतेच स्थान सुरक्षित ठेवू इच्छित नव्हते. दोन-तीन वेळा त्यांच्या अनुयायांनी त्यांना उत्तराधिकारी नेमण्याविषयी प्रार्थना केली. पण ती त्यांनी नाकारली. त्यांचे उत्तर होते, 'धम्मच धम्माचा उत्तराधिकारी असतो. तो

स्वयंप्रकाशित व स्वतःच्या तेजानेच जीवित असायला पाहिजे. जो धर्म मानवीय अधिकारावर अवलंबून राहील व त्याच्या संस्थापकाच्या नांवावर जीवित राहील, तो धम्मच नव्हे.' भगवंतांचा आपल्या धम्माविषयी हाच दृष्टिकोण होता.

**प्रश्न ११७ : भ. बुद्ध समानतेचे पुरस्कर्ते होते काय ?**

**उत्तर** - होय. जे जे नियम भगवंतांनी भिक्खूसंघाकरिता बनविलेत, त्या सर्वांना त्यांनी स्वतःवर देखील लागू केलेले होते. जसे -

१) भिक्खू दिवसातून एकदाच भोजन करू शकतो.

२) भिक्खूजवळ कोणतीही स्वमालकीची संपत्ती नसावी.

३) भिक्खूजवळ फक्त तीनच चिवर असावेत.

भगवंतांनी स्वतःकरिता कोणत्याही नियमाचा अपवाद राखून ठेवला नाही व सर्वांना समानतेने वागविले.

एकदा महाप्रजापती गौतमीने स्वतःच्या हाताने सूत कातून त्याचे पांघरावयाचे वस्त्र बनवून भगवंतास भेट करावयास आणले. परंतु भगवंतांनी ते स्वतःकरिता न स्वीकारता संघास दान करावयास लावले. त्याचप्रमाणे एकदा राजवैद्य जीवकाने भगवंतास नवीन वस्त्राचे बनविलेले चिवर दान केले. तेव्हापासासून भगवंतांनी सर्व भिक्खूंकरिता नवीन वस्त्राचे चिवर स्वीकारावयास अनुमती दिली व कचऱ्याच्या ढिगावर फेकलेल्या जुन्या कपड्यांपासून चिवर बनविण्याच्या नियमात सूट दिली.

**प्रश्न ११८ : भ. बुद्धांनी स्वतःला मार्गदाता म्हटले आहे कीं मुक्तिदाता ?**

**उत्तर** - त्यांनी म्हटलेले आहे की, ते सत्याचे केवळ 'उपदेशक' आहेत, केवळ मार्ग दाखवून देणारे मार्गदाता आहेत आणि प्रत्येकाने स्वतःच प्रयत्न करून मुक्ती प्राप्त करून घ्यावयाची असते. याचा 'धम्मपदांतील' २० व्या प्रकरणांत उल्लेख झालेला आहे, तो असा-

**तुम्हेहि किच्चं आतप्पं**
**अक्खातारो तथागता।**
**पटिपन्ना पमोक्खन्ति**
**झायिनो मारबंधना।।**

(अर्थ - कार्यासाठी तुम्हालाच उद्योग करायचा आहे. तथागतांचे (बुद्धाचे) कार्य मार्ग दाखविणे होय. (त्यानुसार) मार्गावर आरूढ होऊन, ध्यानमग्न होऊन 'माराच्या' बंधनातून मुक्त व्हा.)

**प्रश्न ११९ भगवंतांनी गुह्यज्ञान स्वतःजवळच ठेवले काय ?**

**उत्तर** - नाही.' एखादा आचार्य त्याला प्राप्त झालेले गूढ ज्ञान आपल्या जवळच गुप्त ठेवतो, अशा प्रकारची एकही गोष्ट मजजवळ नाही', असे भगवान बुद्धांनी 'परिनिब्बान सुत्तात' म्हटलेले आहे. भ. बुद्धांनी असे स्पष्ट केले की, त्यांनी प्रत्येक गोष्ट मोकळेपणाने आणि प्रकट रूपात शिकविली; परंतु हेही तितकेच सत्य आहे की, ज्याची आकलनशक्ती पूर्णतः विकसित झालेली आहे, केवळ त्यालाच धर्मतत्त्वांचे खरे सखोल ज्ञान समजू शकते. भ. बुद्धांनी श्रवण करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या हृदयाचा शोध घेऊन त्याच्या वैयक्तिक

स्वभावाला व विकासाला जसे सोईस्कर होईल, तेवढेच ज्ञान त्या व्यक्तीला शिकविले.

प्रतित्यसमुत्पादाचे धम्मज्ञान सर्वसाधारण अशा व्यक्तींना दुर्बोध आहे. परंतु भगवंतांच्या बऱ्याच शिष्यांना संबोधीच्या दुर्बोध ज्ञानाचे पूर्णतः आकलन झालेले होते.

**प्रश्न १२० : भ. बुद्धांवर श्रद्धा न ठेवणारे त्यांच्या अश्रद्धेमुळे निश्चितच धिक्कारले जातील, असे बौद्धधम्मांत जाहीर केले आहे काय ?**

**उत्तर** - नाही. त्यांनी कुशल कर्म केल्यास त्याचे फळ त्यांना मिळेलच, परंतु सत्य गोष्टीवर अश्रद्धा ठेवल्यास त्यांच्या तृष्णेचे निर्मूलन होणार नाही. दुःखापासून मुक्ती मिळविण्याकरिता प्रत्येकाला त्याच्या कुशल वा अकुशल 'आर्य अष्टांगिक मार्गाचे' अनुसरण करायलाच पाहिजे.

**प्रश्न १२१ : तथागतांनी आपले ज्ञान सर्वांसमक्ष सारख्याच प्रकारे प्रकट केले होते काय ?**

**उत्तर** – नाही. ज्याप्रमाणे मेघाने वर्षाव केलेले पाणी सर्वच वनस्पतींकरिता सुखदायक असते, त्याचप्रमाणे तथागताचा धम्म सर्वच प्राणिमात्रांसाठी सुखकारक आहे. तथापि प्रत्येक प्राणिमात्राच्या गरजा वेगवेगळ्या असतात, हे जाणून तथागत स्वतःला सर्वांसमक्ष एकदम प्रकट करीत नसत आणि संपूर्ण ज्ञानाची उकल एकदम करीत नसत. निरनिराळ्या प्राण्यांच्या मनोवृत्तीनुसार तथागत त्यांना समजेल तसा व झेपेल तसाच उपदेश देत असत.

**प्रश्न १२२ : स्वतःच्या धम्माविषयी भगवंताचा काय दृष्टिकोण होता ?**

**उत्तर** - दोन-तीन वेळा त्यांच्या धम्माच्या अनुयायांनी आपला उत्तराधिकारी नेमण्याची त्यांना विनंती केली. परंतु भगवंतांनी तिचा अस्वीकार केला. त्यांचे उत्तर होते, 'धम्म हाच धम्माचा उत्तराधिकरी होय. धम्माला स्वतःच्या तेजानेच जीवित रहायला पाहिजे, कुण्या मानवीय अधिकाराने नव्हे. जर धम्मास मानवीय अधिकारांवर निर्भर राहावयाची आवश्यकता असेल, तर त्यास धम्म म्हणता येणार नाही. जर धर्माच्या प्रतिष्ठेकरिता प्रत्येक वेळी त्याच्या संस्थापकांचे नांव घेणे आवश्यक असेल, तर तो धम्मच नव्हे.' स्वतःच्या धम्माविषयी भगवंतांचा हाच दृष्टिकोण होता.

**प्रश्न १२३ : भगवंतांनी स्वतःकरिता किंवा धम्माकरिता 'अपौरुषेयतेची' घोषणा केली काय ?**

**उत्तर** - नाही. भगवंतांनी स्वतःला किंवा धम्माला अपौरुषेय असल्याचे कधीही म्हटले नाही. त्यांचा धम्म मानवासाठी, मानवाने आविष्कृत केलेला धर्म आहे, अपौरुषेय नाही.

**प्रश्न १२४ : भ. बुद्धांनी जगास दिलेला सामाजिक संदेश कोणता ?**

**उत्तर** - भगवंतांनी जगाला शांन्ती व अहिंसेची शिकवण तर दिलीच; एवढेच नव्हे तर, त्यांनी न्यायाची शिकवण दिली, मैत्रीची शिकवण दिली, विचार स्वातंत्र्याची शिकवण दिली, समानतेची शिकवण दिली आणि भ्रातृभावाची शिकवण दिली.

# भगवंतांचे व्यक्तित्व

**प्रश्न १२५ : भगवंतांचे व्यक्तित्व कसे होते ?**

**उत्तर -** त्यांचे शरीर अत्यंत सुंदर होते. सुडौल आणि उंच देह, लांब लांब हात, वृषभासारखे डोळे, स्वर्णासारखी दिप्तीमान कांती, चौडी छाती, सर्वच आकर्षक होते.

उभे असतांना त्यांचे हात गुडघ्यापर्यंत पोहचत. ते आजानुबाहू होते. त्यांना पाहणारा एकदम मंत्रमुग्ध होत असे.

ते सर्वांना प्रिय होते, सर्वांना आदरणीय होते. स्त्री-पुरुष सर्वच लोक त्यांची वाणी ऐकावयास उत्सुक राहत असत. त्यांचा स्वर मधुर, आवाज गंभीर, गतिमान आणि स्पष्ट होता. त्यांची प्रवचने श्रोत्यांना मंत्रमुग्ध करीत. श्रोत्यांना विश्वास असे की, त्यांचे म्हणणे अक्षरशः सत्य असलेच पाहिजे. त्यांची मधुर वाणी लोकांना आनंदविभोर करीत असे. त्यांचे शरीर महापुरुषाच्या ३२ लक्षणांनी समृद्ध होते. येणेप्रमाणे त्यांचे व्यक्तित्व अत्यंत आकर्षक होते.

**प्रश्न १२६ : भगवंतांची दिनचर्या काय होती ?**

**उत्तर -** भ. बुद्ध पहाटेस उठत असत. प्रातर्विधी आटोपून किंवा विहाराच्या बाहेरच्या बाजूस चंक्रमण (इकडून तिकडे शांतपणे फिरणे) करीत. त्यानंतर भिक्षेसाठी गावात प्रवेश करीत. कोणी काही प्रश्न विचारल्यास त्याचे उत्तर देऊन त्याला सन्मार्गाला लावीत. भिक्षापात्रात शिजविलेल्या अन्नाची जी भिक्षा एकत्र होई, ती घेऊन विहारात परत येत व मध्यान्यापूर्वी (दुपारचे बारा वाजणे) भोजन करीत. भोजनोत्तर थोडीशी विश्रांती घेऊन ध्यान करीत. संध्याकाळी गृहस्थांना किंवा भिक्खूंना उपदेश करीत. रात्री पुन्हा ध्यान करीत किंवा चंक्रमण करीत. मध्यरात्रीच्या सुमारास ते उजव्या कुशीवर पायावर पाय ठेवून व उशीला हात घेऊन निजत असत. या त्यांच्या निजण्याला सिंहशय्या असे म्हणतात.

ज्या वेळी प्रवासाला जात त्यावेळी बहुधा त्यांचेसोबत भिक्खूंचा बराच मोठा समुदाय असे. सकाळी एका गावामध्ये भिक्षा ग्रहण करून दुसऱ्या गावी रात्री मुक्कामास जात. जेथे विहार नसेल तेथे ते झाडाखाली किंवा एखाद्या बागेमध्ये राहत. कोणी पूर्व दिवशी आमंत्रण केले असता भिक्खूसंघासह ते आपल्या घरी भिक्षाग्रहण करीत. येणेप्रमाणे सतत ४५ वर्षे त्यांनी जनसमुदायावर आपल्या धम्मामृताचा वर्षाव केला.

**प्रश्न १२७ : भ. बुद्धांची काया महापुरु षांच्या ३२ लक्षणांनी युक्त होती, ती लक्षणे कोणती ?**

**उत्तर -** भ. बुद्ध महापुरुषांच्या बत्तीस लक्षणांनी युक्त होते. ती बत्तीस लक्षणे अशी -

१) सुप्रतिष्ठित पाद - ज्याचे पाय जमिनीवर बरोबर बसतात.

२) ज्याच्या तळपायाचे सर्व आकार परिपूर्ण, बेंबी मांसलयुक्त व सहस्र आर (Spokes) असलेले चक्र असलेली.

३) आयतपार्ष्णी - रुंद घोटे असणारा.

४) लांब बोटे (अंगुली) - लांब सडसडीत बोटे

५) मृदू तरुण हस्तपाद - मऊ, देखणे, हातपाय
६) जाल-हस्त-पाद-बोटे एकमेकांशी समांतर जुळणारी
७) उस्संखपाद - पायाच्या वरच्या भागावर गुल्फ असणे
८) एडी-जंघ - हरिणासारखे राय असणे
९) आजानुबाहू - न झुकता, उभे राहिले असता गुडघ्याला हाताचे तळवे स्पर्श करणारे
१०) कोषाच्छादित - पुरुष - इंद्रिय
११) सुवर्ण वर्ण - सुवर्णासारखी कांती (त्वचेचे तेज)
१२) सूक्ष्म - छवी - नितळ त्वचा - जिच्यावर धूळ चिकटत नाही
१३) एकैक लोम - त्वचेच्या प्रत्येक छिद्रात एकेक रोम (केस)
१४) ऊर्ध्वाग्र लोम - प्रदक्षिणासारखे (डावीकडून उजवीकडे) गोलाकार केसांचे टोक वरच्या बाजूला असलेले.
१५) ब्रह्म जू-गात्र - लांब सडपातळ शरीर (उंच सडपातळ बांधा)
१६) सप्त-उत्सद - शरीराचे सातही अंग पूर्ण आकारसहित
१७) सिंह - पूर्वार्ध काया - कंबरेच्या वरील छाती आदीचा भाग सिंहाप्रमाणे विशाल (रुंद छाती).
१८) चिंतान्तरांस - दोन्ही खांद्याच्या मधील भाग चितपूर्ण असतो.
१९) न्यग्रोध-परिमंडल - जितकी शरीराची उंची आणि तितकीच शरीराची रुंदी (दोन्ही हात पसरून)
२०) समवर्त-स्कंध - समान आकार असलेले खांदे असणारा.
२१) रसग्ग-सग्गी - सुंदर शिरा (रक्तवाहिन्या) असलेला.
२२) सिंह-हनू - सिंहासारखी पूर्ण हनुवटी असलेला.
२३) चव्वालिस दन्त - ४४ दंत असलेला.
२४) समदन्त - एकसारख्या आकाराचे, पंक्तिबद्ध दात असलेला.
२५) अ-विवर-दन्त - दातांमध्ये फट नसलेला, एकमेकांना लागून दात असलेला.
२६) सु-शुक्ल-दाढ - पांढरे शुभ्र दात व दाढा असलेला - (शुभ्र दंतपंक्तिवाला)
२७) प्रभूत-जिव्हा - लाम जीभ असलेला.
२८) ब्रह्म-स्वर - करविंक पक्षाच्या स्वरासारखा स्वर असणारा (मधुर स्वरवाला)
२९) अभिनील नेत्र - अलसीच्या फुलाप्रमाणे नीलवर्ण नेत्र असलेला (कजरारी आँखे)
३०) गो-पक्ष्म - गायीसारख्या काजलयुक्त लांब व दाट केस असलेल्या पापण्या असलेला.
३१) भौंहो के बीच में श्वेत कोमल कपास-सी उर्णा - दोन भुवयांमध्ये कापसासारखी मऊ व शुभ्र केसांची दाट ओळ.
३२) उष्णीषशीर्षा - डोक्याच्या मध्यभागावरील भाग पगडीसारखा उंचवटा असलेला. ह्याशिवाय त्यांच्या चारही बाजूला एक व्यामभर प्रकाश पसरलेला राहत असे. त्यालाच 'तेजोवलय' म्हटले आहे.

**प्रश्न १२८ भ. बुद्ध ईश्वर होते की मानव होते ?**

**उत्तर -** बुद्ध-धम्मामध्ये दैवी अवताराची शिकवण नाही. ते मानव होते. सर्व मानवांमध्ये ते

अत्यंत ज्ञानी, थोर मनाचे व परम पवित्रतम असे पुरुषोत्तम होते. सम्बोधी प्राप्तीकरिता अत्यंत कष्ट सहन करून मनन व चिंतनाने स्वतःचा विकास करीत करीत ते ह्या थोरपदास पोहोचले.

**प्रश्न १२९ : भ. बुद्धांना 'सर्वज्ञ' म्हणता येईल काय ?**

**उत्तर -** 'सर्वज्ञ' ह्याचा अर्थ सृष्टीतील सर्व चराचर गोष्टींचे ज्ञान, असा घेतल्यास भ. बुद्धांनी म्हटले आहे, "जे मला 'सर्वज्ञ' म्हणतात, ते माझ्यावर खोटा आरोप करतात." बौद्ध-परंपरेमध्ये प्रत्यक्ष भ. बुद्धांना सर्वज्ञ मानलेले नाही किंवा इतर कोणालाही 'सर्वज्ञ' मानले नाही. परंतु 'सर्वज्ञचा' अर्थ 'सर्व-विद्' असाही होतो. भ. बुद्धांनी स्वतःकरिता ह्या शब्दाचा उपयोग केला असून, इतरांनीही त्यांच्याकरिता ह्याच शब्दाचा उपयोग केला आहे. भगवंतांचे म्हणणे असे की, दुःख, दुःख-समुदय, दुःख-निरोध आणि दुःख-निरोध-गामिनी प्रतिपदा ते जाणत असल्यामुळे 'सर्व-विद्' ह्या अर्थाने ते सर्वज्ञ होते.

**प्रश्न १३० : भ. बुद्धांच्या आयुष्यातील मुख्य दिवस कोणते ?**

**उत्तर -** इ.स. पूर्व ६२३ साली मे महिन्यात, मंगळवारी, वैशाखी पौर्णिमेला त्यांचा जन्म झाला, इ.स. पूर्व ५९४ मध्ये संसाराचा त्याग करून ते अरण्यात गेले, इ.स. पूर्व ५८८ मध्ये वैशाखी पौर्णिमेला ते बुद्ध झाले आणि जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून मुक्त होऊन इ.स. पूर्व ५४३ मध्ये वयाची ८० वर्षे पूर्ण झाल्यावर वैशाखी पौर्णिमेलाच ते महापरिनिर्वाणास पोहोचले. त्यांच्या जीवनातील प्रत्येक महत्त्वाची घटना वैशाखी पौर्णिमेला घडली. म्हणून सर्व लोक 'मे' महिन्यातील म्हणजेच वैशाख महिन्यातील पौर्णिमेला सार्वजनिकरीत्या मोठा उत्सव आयोजित करतात.

**प्रश्न १३१ : भगवंतांनी सर्व प्रवास पायीच केला काय?**

**उत्तर -** होय. लुंबिनीपासून राजगृह सुमारे अडीचशे मैलांपेक्षा अधिक लांब आहे. ही सर्व यात्रा तथागतांनी पायीच केली. त्यांनी बैलगाडीचा देखील उपयोग केला नाही. प्रवास करताना वाटेत राहण्यासाठी कोठेही जागा उपलब्ध नसेल त्यावेळी, ते झाडाखालीच विश्रांती घेत. नंतर मात्र त्यांच्या गृहस्थ उपासकांनी विहार बांधले. त्यामुळे त्यांची व त्यांच्या भिक्खूंची प्रवासात विश्राम करण्याची सोय होऊ लागली. सर्वसाधारणपणे भिक्खूप्रमाणेच भगवंताजवळही तीनपेक्षा जास्त चिवरे कधीच नसत. दररोज घरोघरी भिक्षा मागून ते दिवसातून एकदाच अन्न ग्रहण करीत.

**प्रश्न १३२ : भ.बुद्धांनी धम्मप्रचारासाठी जेथे वास्तव्ये केलीत, ती प्रमुख केंद्रे कोणती?**

**उत्तर -** धम्मदूतांच्या नियुक्तीनंतर भ.बुद्ध स्वतः एका ठिकाणीच बसून राहिले नाहीत. तर ते स्वतःसुद्धा धम्मदूताचे कार्य करीत राहिले. काही विशिष्ट स्थळे निवडून त्यांनी आपल्या धम्मप्रचाराच्या कार्याची केंद्रे बनविलीत. अशा केंद्रांपैकी 'श्रावस्ती' व 'राजगृह' ही प्रमुख होती. त्यांनी सुमारे पाउणशे वेळा श्रावस्तीला आणि सुमारे पंचवीस वेळा राजगृहाला भेटी दिल्या. आणखी काही इतर स्थळेही धम्म प्रचाराची छोटी केंद्रे होती. जसे कपिलवस्तूत

सहादा, वैशालीस सहांदा आणि कम्मासदम्म येथे चारदा ते गेले होते. वैशाली हे निगण्ठनाथ पुत्त (महावीर) यांचे जन्मस्थान होते. राजगृहालाच वेळूवन होते.

भ.बुद्ध धम्म-प्रचाराचे कार्य करीत असताना इतर काही लहान स्थळांनाही त्यांनी भेटी दिल्या. उक्कठा, नादिका, शाळा, अस्सपूर, घोषिताराम, नालंदा, अप्पण आणि ऐतुमा येथेही ते गेले. तसेच ते ओपसाद, इच्छा नङ्गल, चंडाल कप्प व कुशिनारा येथे गेले. ते देवदह, पावा, अम्बसण्डा, सेतव्या, अनुपिया, आणि उजुया येथे गेले. यावरून असे समजते की, शाक्य जनपद, कुरू जनपद, व अङ्ग-जनपद ह्या राज्यांत त्यांनी बराच प्रवास केला होता व जवळ जवळ त्यांनी संपूर्ण उत्तर भारताची यात्रा केली होती, असे म्हणावयास हरकत नाही.

**प्रश्न १३३ : भ.बुद्ध म्हणजे पूर्वीचे राजकुमार सिद्धार्थ हे एक ऐतिहासिक व्यक्तित्व होते, याबद्दल आपल्याजवळ खात्रीलायक प्रमाणे आहेत काय?**

**उत्तर –** होय. प्राचीन इतिहासातील कोणत्याही मान्य व्यक्तिचित्राइतकेच यांचेही अस्तित्व प्रमाणपूर्वक स्पष्टपणे सिद्ध झालेले आहे. त्यांच्यापैकी काही येणेप्रमाणे-

१. स्वतः त्यांच्याशी ज्यांची ओळख होती अशा ऐतिहासिक व्यक्तींची साक्ष, उदा जैन मुनी तिर्थंकर महावीर.

२. त्यांच्या काळच्या वृतांतातील स्थळांचा आणि इमारतींचा व अवशेषांचा लागलेला शोध.

३. भ.बुद्धांच्या जीवनकाळानंतर काहीच वर्षांनी झालेल्या सम्राटांनी त्यांच्या स्मृतीप्रीत्यर्थ कोरलेले शिलालेख आणि उभारलेले स्तंभ व स्तूप

४. त्यांनी स्थापलेल्या संघाचे अभंग अस्तित्व आणि सुरुवातीपासून संघाच्या भिक्खूंनी पिढ्यानपिढ्या कथन केलेला त्यांचा जीवनवृत्तांत.

५. त्यांच्या मृत्यूच्या वर्षीच आणि नंतरच्या निरनिराळ्या प्रसंगी भ. बुद्धांच्या खऱ्या उपदेशांचा पडताळा पाहण्याकरिता संघाने संगीती भरविल्यात. त्या आजपावेतो शिक्षकांकडून विद्यार्थ्यांकडे परंपरागत न्यायाने चालत आलेला त्यांचा उपदेश.

६. त्यांच्या महापरिनिर्वाणानंतर त्यांच्या अस्थींचे अवशेष आठ राज्यांमध्ये वाटण्यात आले आणि प्रत्येकावर एकेक स्तूप उभारण्यात आला होता. राजा अजातशत्रूला मिळालेल्या अस्थींच्या हिश्शावर त्याने राजगृहामध्ये स्तूप उभारला व त्यांनतर दोन शतकांनीच सम्राट अशोकाने त्याचे अनेक भाग करून आपल्या संपूर्ण साम्राज्यात वाटून दिले. अर्थातच त्या अस्थी भ. बुद्धांच्याच होत्या किंवा नव्हत्या हे जाणण्याची पुरेशी साधनें त्या काळी त्यांच्याजवळ उपलब्ध होती कारण त्या अस्थी सुरुवातीपासूनच पाटण्याच्या राजघराण्याच्या अधिकारात होत्या.

७. भ. बुद्धांच्या शिष्यांपैकी पुष्कळ जण अर्हता झाल्यामुळे व अशा रीतीने आपल्या इंद्रियांवर संयम ठेवल्यामुळे ते अनेक वर्षांपर्यंत जगले असतील. त्यामुळे त्यांच्या शिष्यांच्या केवळ दोन किंवा तीन पिढ्याच भ. बुद्धाचे महापरिनिर्वाण व सम्राट अशोकाच्या उदयाचा काळ यांच्यामधील संपूर्ण कालावधी भरून काढण्यास पर्याप्त होत्या. आणि अशा प्रकारे भ. बुद्धांच्या जीवनातील घटकांचा प्रत्यक्ष पुरावा त्यांच्या

समकालीन व्यक्तींव्दारे मिळण्यास कसलीही अडचण नव्हती. दुसरी संगीती भरली तेव्हा आयुष्मान आनंद यांचे दोन शिष्य हयात होते. ते दोघेही शतायुषी होते. सम्राट अशोकाच्या कारकिर्दीत भरविलेल्या परिषदेच्या वेळी त्या शिष्यांचे शिष्य दोघेही हयात होते.

८. उत्कृष्ट रीतीने लिहिलेला श्रीलंकेचा प्राचीन इतिहास 'महावंश' हा आज उपलब्ध असून विजय राजाच्या कारकिर्दीपासून म्हणजे, इ.स.पूर्व ५४३ पासून असल्यामूळे तो भ. बुद्धाच्या समकालीन आहे. त्यामध्ये भ. बुद्धांच्या व तसेच सम्राट अशोकाच्या जीवनासंबंधी बहुतेक माहिती आलेली असून बौद्ध इतिहासाशी संबंधित इतर सर्व राज्यांचा तपशील त्यात दिलेला आहे.

**प्रश्न १३४ : भ.बुद्धांना कोणकोणत्या आदरणीय नावांनी संबोधीले जाते ?**

**उत्तर -** शाक्यमुनी, शाक्यसिंह (शाक्यांमधील सिंह), सुगत (सुखाने परिपूर्ण व्यक्ती) सत्था (शास्ता-शिक्षक-गुरू), जीन (विश्वविजयी), भागवत (भाग्यवान, भगवंत), लोकनाथ (जगाचा नायक, स्वामी), सर्वज्ञ (सर्व विषयांना जाणणारा), धर्मराज (सत्याचा राजा), तथागत (पूर्वीचे बुद्ध महामानव, महापुरुष, तथा आगत- तसाच आलेला, म्हणजे पूर्वीच्या बुद्धामागोमाग आलेला) इत्यादि.

## बोधिसत्त्वाचे बुद्ध झाले

**प्रश्न १३५ : भ. बुद्धांपूर्वी अनेक बुद्ध होऊन गेलेत, ही गोष्ट खरी आहे काय?**

**उत्तर -**होय. असा पारंपारिक विश्वास आहे की सनातन कार्यकारणभावाच्या परंपरेनुसार युगायुगाने बुद्ध जन्मास येऊन मानवजातीला सत्याचा मार्ग दाखवितात. जातक कथेनुसार बोधिसत्त्व म्हणजे जो मनुष्य बुद्धत्व प्राप्तीकरिता प्रयत्नशील आहे, असा मानव. आपल्या वासनांवर विजय मिळविण्यासाठी, अनुभवाने ज्ञानाची प्राप्ती होण्यासाठी आणि उच्चतर कार्यप्रवृत्तीचा विकास होण्यासाठी तो नेटाने प्रयत्न करतो अशा रीतीने उत्तरोत्तर सूज्ञ, स्वभावाने उदार आणि सदाचाराने बलवान होतो व शेवटी तो अशा स्थितीला पोहोचतो की, जेव्हा तो पूर्णतेस पोहोचलेला संबुद्ध, सुज्ञ आणि मानवजातीचा गुरू होण्यास समर्थ होतो. (परंतु 'आत्म्यामुळे पुनर्जन्म' ही कल्पनाच बौद्ध धम्मात नसल्यामुळे हिंदू धर्माच्या प्रभावाने जातककथेचा समावेश बौद्ध वाङ्मयात भ.बुद्धांनंतर अनेक शतके लोटल्यावर झाला असावा, असे वाटते. या कल्पनेनुसार जोपर्यंत राजकुमार सिद्धार्थ गौतमाने गयेमधील बोधिवृक्षाखाली बसून बुद्धत्वास प्राप्त केले नाही त्या क्षणापर्यंत तो बोधिसत्त्वच होता : संकलिका)

**प्रश्न १३६ बोधिसत्त्व म्हणजे काय?**

**उत्तर -** 'बोधी' म्हणजे महान ज्ञान आणि 'सत्त्व' म्हणजे प्राणी. 'बोधिसत्त्व' म्हणजे जो कधी ना कधी निश्चितपणे बुद्ध किंवा महाज्ञानी बनेल असा बुद्धत्व प्राप्तीकरिता प्रयत्नशील माणूस बुद्धत्व प्राप्त होण्यापूर्वी राजकुमार सिद्धार्थाला बोधिसत्त्वच म्हणत असत.

बोधिसत्त्वाला सतत दहा जन्मांपर्यंत 'बोधिसत्त्व' राहावे लागते. जन्म म्हणजे मानसिक परिवर्तन (जन्म म्हणजे कायेचा मृत्यू होऊन पुनः जन्म घेणे नव्हे जेव्हा बाबासाहेब आंबेडकरांनी

हिंदू धर्माचा त्याग करून बुद्धधम्माची दीक्षा घेतली तेव्हा त्यांनी म्हटले, 'माझा पुनर्जन्म झाला आहे.' म्हणजेच मानसिक विचारांची क्रांती घडून आली आहे.) पहिल्या जन्मी तो 'मुदिता' प्राप्त करून आपल्या चित्ताची अशुद्धता दूर करतो व प्रमादरहित झाल्यावर त्याच्या मनात सर्व प्राणिमात्रांचा कल्याणाची उत्कट इच्छा उत्पन्न होते.

दुसऱ्या जन्मी विमला-भूमी अवस्थेला प्राप्त होऊन कामचेतनेपासून मुक्त होतो. तो सर्वांप्रती कारुणिक होतो.

तिसऱ्या जन्मी प्रभाकारी-भूमी प्राप्त झाल्यावर बोधिसत्त्वाची प्रज्ञा दर्पणासारखी स्वच्छ होते. तो अनात्म व अनित्यतेच्या सिद्धान्ताला पूर्णपणे समजून घेऊन त्यास आत्मसात करतो. उच्च प्रज्ञा प्राप्त करण्यासाठी तो मोठ्यात मोठा त्याग करण्यास सिद्ध होतो.

चौथ्या जन्मी तो अर्चिष्मती-भूमीला प्राप्त करतो. यावेळी त्याचे लक्ष अष्टांगिक मार्गावर केंद्रित होते.

पाचवा जन्म तो सुदूर्जया-भूमीला प्राप्त करून सापेक्ष व निरपेक्षातील संबंधाला उत्तम प्रकारे आत्मसात करतो.

सहाव्या जन्मी अभिमुखी-भूमीला प्राप्त करून बोधिसत्त्व बारा निदाने आत्मसात करतो. अभिमुखी नावाच्या विद्येमुळे त्याच्या मनात अविद्याग्रस्त प्राण्यांप्रती असीम करुणा निर्माण होते.

सातव्या जन्मी बोधिसत्त्व दूरङ्गमा-भूमी' प्राप्त करतो. त्याला देशकालाचे बंधन राहत नाही. तो तृष्णामुक्त होतो. तो दानशील, क्षमाशील, कुशल, वीर्यवान, बुद्धिमान आणि प्रज्ञावान होतो.

आठव्या जन्मी 'अचल' होऊन बोधिसत्त्व कृतकृत्य होतो. त्यांच्याकडून अनासायेच कुशल कर्म घडतात व तो प्रत्येक कामात सफल होतो.

नवव्या जन्मी साधुमती-भूमि प्राप्त करून बोधिसत्त्व सर्व धम्म पद्धती, दिशा व काळाच्या सीमांना जिंकून पार करतो.

दहाव्या जन्मी बोधिसत्त्व 'धम्म-मेधा' बनतो.त्याला बुद्धाची दिव्य दृष्टी प्राप्त होते.

### प्रश्न १३७ : बोधिसत्त्वाच्या रूपाने घेतलेल्या पुनर्जन्माचा वृतांत आपल्याला उपलब्ध आहे काय?

**उत्तर** - बोधिसत्त्वाच्या अवतारांच्या कथा 'जातककथा' या ग्रंथात उपलब्ध आहेत. त्या शेकडो कथा आहेत. या कथांद्वारे असे शिकविले जाते की, कोणीही मनुष्य नवनवीन अवतारांच्या लांब श्रृखंलेद्वारे एखादे श्रेष्ठ व अतिउत्तम ध्येय साध्य करू शकतो, जेणेकरून त्याने वाईट प्रवृत्तींशी झगडून सदगुणांचा विकास करण्यास समर्थ व्हावे.

जातककथेनूसार बुद्धाच्या व्यक्तिमत्त्वात गुणांची पराकाष्ठा समाविष्ट आहे. अवतार-वादानुसार बोधिसत्त्वाला पूर्णतः निर्मल असण्याची आवश्यकता नाही. तो जन्मोजन्मी क्रमशः पवित्र होत जातो व त्याचे अनुकरण करणाऱ्यांचे रक्षण करतो. 'बुद्ध' होण्यास बोधिसत्त्वाला दहा जन्मांपर्यंत श्रेष्ठतम जीवनाचे बंधन घातले आहे, असे कोणत्याही धर्मात नाही. हे अनुपम आहे. (परंतु जातककथा या बोधकथा आहेत. सर्वसाधारण नागरिकास चटकन समजावे एवढाच त्यांचा उद्देश आहे, असे आमचे प्राजंळ मत आहे. 'आत्म्यामुळे पुनर्जन्म' असा त्याचा अर्थ नाही : संकलिका).

**प्रश्न १३८ : बोधिसत्त्वाच्या अनेक जन्मांचा सिद्धान्त व ब्राह्मणांच्या अवतारवादाचा सिद्धान्त यांत काय फरक आहे?**

**उत्तर** - जातककथांचा आधार किंवा बोधिसत्त्वाच्या अनेक जन्मांचा सिद्धान्त, ब्राह्मणाच्या अवतारवादाच्या सिद्धान्ताहून वेगळा आणि ईश्वराच्या अवतारवादी सिद्धान्ताच्या प्रतिकूल आहे. जातककथेच्या सिद्धान्तानुसार बुद्धाच्या व्यक्तिमत्त्वामध्ये गुणांच्या उच्चतम श्रेष्ठतेचा समावेश आहे. अवतारवादानुसार ईश्वराला आपल्यास 'निर्मल' करावयाची आवश्यकता नसते. ब्राह्मणी सिद्धान्त असे प्रतिपादन करतो की, ईश्वराचा अवतार आपल्या स्वतःच्या आचरणात अपवित्र असेल, किंवा अनैतिक जरी असेल, तरीदेखिल तो आपल्या अनुयायी लोकांचे भक्तांचे रक्षण करतो. परंतु बुद्ध होण्यापूर्वी बोधिसत्त्वाला दहा जन्मी श्रेष्ठतम जीवन घालविलेच पाहिजे. अशा तऱ्हेची अट कोणत्याही धर्मात नाही हे अनुपम आहे. कोणताही धर्म आपल्या संस्थापकास या प्रकारे परीक्षेत उत्तीर्ण होणे अनिवार्य आणि आवश्यक असल्याची शिकवण देत नाही.

**प्रश्न १३९ जातककथेनुसार बोधिसत्त्वाच्या वर्गवारीचे कोणते प्रकार सांगितलेले आहेत?**

**उत्तर** -

१. पञ्ञाधिक(प्रज्ञाधिक) किंवा उद्घातीतज्ञ - 'जो प्रज्ञेद्वारे सर्वात हळूहळू सम्बोधी प्राप्त करतो तो'

२. सद्धाधिक (श्रद्धाधिक) किंवा विपचितज्ञ- 'जो श्रद्धेद्वारे हळूहळू सम्बोधी प्राप्त करतो तो.'

३. वीर्याधिक किंवा ज्ञेय-'जो उत्साहाद्वारे लवकरच सम्बोधी प्राप्त करतो तो.' प्रज्ञाधिक बोधिसत्त्व बुद्धीचा मार्ग अवलंबितात. श्रद्धादिक श्रद्धेचा मार्ग अवलंबितात आणि वीर्याधिक उत्साहपूर्ण कृतीचा मार्ग अवलंबितात. पहिला बुद्धीच्या मार्गदर्शनाने चालतो आणि त्वरा करीत नाही. दुसरा श्रद्धापूर्ण असतो आणि प्रज्ञेच्या मार्गदर्शनाची पर्वा करीत नाही आणि तिसरा जे चांगले दिसेल ते विलंब न लावता त्वरित करतो. जेव्हा त्याला दिसून येते की, हाच अत्युतम मार्ग आहे, तेव्हा विलंब न लावता आणि त्याचे कोणते परिणाम स्वतःला भोगावे लागतील याची पर्वा न करता त्यास तो त्वरितच अवलंबितो.

**प्रश्न १३९ (अ) : जातककथांचे प्रतिबिंब कोणत्या साहित्यात बघायला मिळते ?**

**उत्तर** - पुष्कळशा गैरबौद्ध साहित्यात जातक कथांचे प्रतिबिंब बघायला मिळते. कत्यहारी जातक दुष्यंत-शकुंतला आख्यानांत हुबेहूब दिसून येते. खरे पाहिले तर जातक कथा कालिदासाहून सातशे वर्षे जुन्या आहेत. सम्राट हर्षवर्धनाच्या काळात पंडित आर्यशूराने त्यांचे पाचव्या शतकांमध्ये संस्कृतमध्ये भाषांतर केले होते, असे चिनी प्रवासी इर्चिंग ह्याच्या सातव्या शतकातील प्रवास वर्णनावरून समजते. जातकांतील पुष्कळशा कथांना महाभारतातील आख्यानांत संमिलित केले गेले. जसे-वर्तकापोतक जातकाला आदिपर्वातील २२९ व्या अध्यायातील शार्ङ्गकोपाख्यानात, उन्मादयन्ती जातकास सरिता सागरमधील

उन्मादिनीच्या कथेमध्ये, विश्वंभर जातकास तारावलोकच्या कथेमध्ये, इत्यादी.

त्यांना संस्कृतमध्ये भाषांतरित केले गेले. ''पंचतंत्र'' आणि ''हितोपदेश'' ह्या कथांमध्ये मिळते. सहाव्या शतकात खुसरू नौशेखान बादशाहाच्या वेळेस पेहेलनी भाषेमध्ये आणि त्यानंतर सीरीयन भाषेमध्ये भाषांतरित होऊन 'कीलग आणि डॉमनग' नावाने प्रसिद्ध झाले. पंचतंत्रातील कर्कटक आणि दमनक कथा सुप्रसिद्ध आहेतच. त्यानंतर हिब्रू, अरबी, ग्रीक, स्पॅनिश तथा लॅटिनमध्ये देखील त्यांची भाषांतरे झालीत. जातककथांच्या शेवटी जी उपदेशपर वाक्ये दिसून पडतात, ती केवळ अर्वाचीन कथांमध्येच दिसून येतात; दोन हजार वर्षांपूर्वीच्या कथांमध्ये दिसून येत नाहीत. जातककथांमध्ये भ. बुद्धांच्या पूर्वीच्या काही दंतकथा (Folk lore) जसे महासुदस्सन जातकदेखिल संमिलित आहेत. यांतील पुष्कळशा कथा 'इसापनीती' मध्ये आढळतात. त्या जातककथांपेक्षा नंतरच्या आहेत. ग्रीक लोकांच्या आवागमनाने त्या तेथे पोहोचल्या होत्या.

इ.स. पूर्व चवथ्या शतकात, अलेक्झांडरच्या भारतावरील आक्रमणाच्या काळी त्याच्यासोबत बाब्रीयस, फिड्रस, इत्यादि ग्रीक कवि देखिल आले होते. त्यांनी जातक कथांचे गद्य-पद्यमय भाषांतर करून त्यांना ग्रीसमध्ये नेले. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी की, मूळ कथांची नावे त्यांनी गाळून टाकली. आठव्या शतकात सेंट जॉन ऑफ दमास्कस ने Bartaam and Gosaphet ही कथा लिहिली. मुस्लीम बादशहांच्या वेळी अरबी, तुर्की आणि पारसी भाषांमध्ये जातक कथांना भाषांतरीत करून युरोपात नेण्यात आले.

## भ. बुद्ध व त्यांचे समकालीन

**प्रश्न १४० : समकालीन तीर्थंकरांचा भगवंतांशी व्यवहार कसा होता?**

उत्तर- बुद्धांचे समकालीन दुसऱ्या मतांचे जे अनेक तीर्थंकर किंवा संस्थापक होते, त्यांच्यात निगण्ठनाथपुत्रांचे (महावीरांचे) स्थान विशिष्ट होते. त्यांचा एक शिष्य सिंह-सेनापति होता.

एकदा सिंह सेनापतीला भगवंताची कीर्ती ऐकून त्यांच्या दर्शनाची इच्छा झाली, पण निगण्ठनाथ पुत्रांनी त्याला परवानगी दिली नाही. पुढे दोन वेळा तसेच घडले. परंतु तिसऱ्या वेळेस अतिशय तीव्र इच्छा झाल्यामुळे तो भगवंताच्या दर्शनास निगण्ठनाथपुत्रांची परवानगी न विचारताच निघून गेला.

तेथे गेल्यावर त्याने भगवंताना विचारले-'भन्ते! मी ऐकले आहे की, श्रमण गौतम अक्रियावादी असून अक्रियेकरिताच ते धर्मोपदेश देतात. काय लोकांचे असे म्हणणे बरोबर आहे?'

'सिंहा! एका अर्थाने मला अक्रियावादी म्हणता येईल'

'भन्ते! कोणत्या अर्थाने आपणास अक्रियावादी म्हणणे योग्य आहे?'

'सिंहा! मी पापकर्मे न करण्याचा उपदेश देतो. म्हणून मी अक्रियावादी आहे.'

सिंह सेनापतीने अशाच प्रकारचे पुष्कळसे प्रश्न विचारले आणि जेव्हा त्याचे पूर्णतः समाधान झाले, तेव्हा श्रद्धापूर्वक तो म्हणाला, 'भन्ते! आपण केलेले समाधान अद्‌भुत आहे. आपला शरणागत उपासक म्हणून आपण माझा स्वीकार करावा.'

'सिंहा! तुझ्यासारख्या वजनदार व्यक्तीने पूर्ण विचार करूनच कोणताही निश्चय करणे योग्य आहे.'

'भन्ते! आपल्या या सांगण्याने मी अधिकच संतुष्ट झालो आहे. दुसऱ्या संप्रदायाच्या समर्थकांना माझ्यासारखा कोणी शिष्य मिळाला असता तर मोठ्या अभिमानाने साऱ्या वैशालीमध्ये दवंडी दिली असती की, सिंह सेनापती आमचा शिष्य झाला आहे. परंतु आपण मला पूर्ण विचारांती निर्णय घेण्याचा सल्ला देत आहात. भन्ते! मी दुसऱ्यांदा भगवान बुद्धांना, धम्माला व संघाला शरण जात आहे.'

'सिंहा! तुझे घर दीर्घ काळपर्यंत निगण्ठाकरिता पाणपोई सारखे राहिले आहे. तेव्हा असे समजू नकोस की, आता ते भिक्षा मागण्यास आल्यावर त्यांना भिक्षा द्यायला नको.'

'भन्ते! हे ऐकून मी अधिकच प्रसन्नचित्त झालो आहे. मी असे ऐकले होते की, श्रमण गौतम फक्त आम्हालाच दान द्या असे म्हणतात. परंतु आपण तर मला निगण्ठांनाही दान द्यायला सांगत आहात. भन्ते! मलाही ते उपयुक्त वाटते. मी तिसऱ्यांदा भगवंतांना शरण जात आहे.'

हा संवाद भगवंतांच्या समकालीन आचार्याविषयी सहज-उदारतेचे उत्कृष्ट उदाहरण आहे.

**प्रश्न १४१ : धम्म-सेनापती सारिपुत्र व मोद्गल्यायन याचे परिनिर्वाण झाले, तेव्हा भ.बुद्धांनी काय प्रतिक्रिया व्यक्त केली.?**

**उत्तर** -सारिपुत्त (सारिपुत्र) व मोग्गल्लान(मोदगल्यायन) हे भगवंताचे अग्रशिष्य होते. त्यांच्या परिनिर्वाण समयी भ.बुद्ध भिक्षुसंघासोबत वज्जी देशात गंगा नदीच्या काठावर असलेल्या उक्काचेला गावी विहार करीत होते. तेव्हा भगवंतांनी भिक्खूसंघाला असा उपदेश केला

'भिक्खूंनों! जोपर्यंत सारिपुत्र मोद्गल्यायन यांचे परिनिर्वाण झाले नव्हते तोपर्यंत मला या संघात उणीव भासत नव्हती. सारिपुत्र मोद्गल्यायन यांचे परिनिर्वाण झाले तेव्हापासून मला संघामध्ये उणीव भासू लागली आहे. भिक्खूनों! ज्या दिशेला सारिपुत्र मोद्गल्यायन विहार करीत असत तेथे कोणाचीच आवश्यकता भासत नसे.भिक्खूनों आश्चर्य आहे की, अशा प्रकारची जोडी परिनिवृत्त झाली तरीही तथागताच्या मनात दुःख क्लेश नाही, भिक्खूंनो जे काही उत्पन्न होते त्याचा विनाश खचितच होत असतो. परंतु ज्याप्रमाणे एखाद्या विशाल वृक्षाचा मध्यभाग तुटून पडावा, तशा प्रकारचा भास सारिपुत्र मोद्गल्यायन यांचे परिनिर्वाण झाल्यामुळे संघाविषयी तथागतांना होत आहे. म्हणून भिक्खूंनो स्वतःच आपले दीपक बना ''अत्त दीपो भव'', स्वतःलाच शरण जा. दुसऱ्यांना शरण जाऊ नका.'

भ.बुद्ध श्रावस्तीच्या जेतवनांत निवास करीत असतांना आयु. सारिपुत्र देहत्यागाची अनुमती घेण्याकरिता त्यांच्याकडे गेले. तथागतांच्या चरणावर डोके ठेवून ते म्हणाले, 'आपल्या चरणवंदनेच्या एकमेव आशेसाठी मी एक सहस्र कल्पापर्यंत पारामितांचा अभ्यास केला. माझी ती इच्छा पूर्ण झाल्यामुळे माझ्या आनंदाला पारावार राहिला नाही.'

तथागतांची अनुमती मिळाल्यावर आयु सारिपुत्रांनी ज्या खोलीत जन्म झाला होता त्याच खोलीत जावून परिनिर्वाण प्राप्त केले. त्यांच्या अस्थी जेव्हा भ.बुद्धांजवळ नेण्यात आल्या तेव्हा ते म्हणाले, 'भिक्खूनों तो सर्वात अधिक बुद्धिमान होता. उत्साही व परिश्रमी

होता. त्याच्यात संग्रहवृत्तीचा लवलेशहि नव्हता. पापाविषयी त्याला घृणा होती. तो जितेंद्रिय होता. तो करुणा व मैत्रीचे मूर्तिमंत प्रतीकच होता.' त्याचवेळी आयु. महामोद्गल्यायन यांचीही तथागतांच्या शत्रुंनी हत्या केली. सारिपुत्र व मोद्गल्यायन त्यांचे दोन मुख्य शिष्य होते. सारिपुत्राला धम्म सेनापती म्हणत असत.

**प्रश्न १४२ : आनंद स्थविरांनी भगवंतांची सेवा कशा प्रकारे केली?**

**उत्तर** -भगवंतांचे वय जेव्हा बरेच झाले तेव्हा त्यांना सेवकाची आवश्यकता वाटू लागली. प्रथम त्यांनी नंदास निवडले त्यानंतर आनंदास - जे शेवटपर्यंत त्यांच्यासोबतच राहिले. ते त्यांच्यासोबत रात्रंदिन राहणारे प्रियतम मित्र होते. जेव्हा कुशिनारा येथील उपवनात दोन शाल वृक्षांच्या मध्ये ते विश्राम करू लागले तेव्हा अंतिम समय जवळ आल्याचे समजले व त्यांनी आनंदाला तसे सांगितले की रात्रीच्या तिसऱ्या प्रहरी त्यांचे महापरिनिर्वाण होईल. ते ऐकून स्थविर आनंदाला रडू कोसळले.

तेव्हा भगवंतांनी आनंदाला धीर दिला. त्यांनी आनंदाची स्तुती करून भिक्खूंना सांगितले की, आनंद बुद्धिमान असून आपल्या मधुर भाषणामुळे आणि मैत्रीपूर्ण व्यवहारामुळे आनंद दीर्घकाळपर्यंत त्यांच्यासोबत राहिले. त्यांनी प्रयासपूर्वक आपल्या आश्रवांपासून मुक्ती मिळवावी असा उपदेश केला.

भगवंतांचे महापरिनिर्वाण त्या उजाड नगराशेजारी होऊ नये, ते एखाद्या मोठ्या नगरात व्हावे असे आनंदास वाटू लागले. परंतु भगवंतांनी कुशिनारा याच लहानशा नगरीची स्तुती करीत सांगितले की, एके काळी ती महासुदर्शन राजाची राजधानी असून तिचे नाव केशवती होते. त्यांनी आनंदास दोन प्रमुख गोष्टी सांगितल्या.

१. चुन्दास किंवा इतर कोणास असे वाटू नये की, त्याच्याकडील जेवणामुळेच भगवंताचे परिनिर्वाण झाले
२. कुशिनाराच्या मल्ल लोकांना तिसऱ्या प्रहरी होणाऱ्या परिनिर्वाणाची बातमी द्यावी. वैशाख पौर्णिमेला रात्रीच्या तिसऱ्या प्रहरी तथागतांचे महापरिनिर्वाण झाले (इ.स.पूर्वी ४८३)

**प्रश्न १४३ : पूर्ण काश्यपाचे काय मत होते?**

**उत्तर** -सिद्धार्थाच्या वेळी ब्राह्मणवादाव्यतिरिक्त आणखी ६२ दर्शनिक होते. त्यांपैकी पूर्ण काश्यप, मक्खली गोसाल, अजित केसकम्बल, पकुध कच्चायन, संज्जय वेलट्ठीपुत्र आणि महावीर हे सहा जण प्रमुख होते. पूर्ण काश्यपाचे मत 'अक्रियावाद' नावाने प्रसिद्ध होते. ते असे की, 'कर्माचा' आत्म्यावर कशाहीप्रकारे कोणताही प्रभाव पडत नसतो. कोणी कितीही वाईट कर्म करो किंवा कितीही पुण्यप्रद कर्म करो, त्याचा आत्म्यावर परिणाम होत नाही. मेल्यावर काहीही उरत नसते, न आत्मा, न शरीर; सिद्धार्थास हे मत पटले नाही.

**प्रश्न १४४ : मक्खली गोसालाची काय शिकवण होती?**

**उत्तर** -मक्खली गोसालाचे मत 'नियतिवाद' या नावाने ओळखले जाई. ते एक प्रकारचे 'पूर्ण निश्चयवादी' होते. न कोणी काही करू शकतो, न कोणी काही व्हावयाचे थांबवू शकतो. घटना घटतात, दुःखाचा कोणीहि नाश करू शकत नाही. त्याचे प्रमाण कोणीही

कमी-अधिक करू शकत नाही. हे सिद्धार्थास मान्य नव्हते. त्यामुळे माणसाला केवळ भाग्यावर विसंबून राहावे लागेल, असे सिद्धार्थास वाटले.

**प्रश्न १४५ : अजित केसकम्बलाचा उच्छेदवाद तो कोणता?**

**उत्तर** -उच्छेदवाद म्हणजे एक प्रकारचा संपूर्ण नाशवाद. त्याची शिकवण होती की, होम आदी यज्ञ व्यर्थ आहेत. कर्माची फळे आत्म्यावर कसालाही प्रभाव पाडू शकत नाही. ना कुठे स्वर्ग आहे ना नरक. कष्ट आणि दुःख एकाएकी समाप्त होईल. आत्म्यास चौऱ्यांशी लक्ष जन्म घ्यावे लागतील (योनीमधून जावे लागेल) तेव्हाच त्याला दुःखापासून मुक्ती मिळेल. सिद्धार्थास ते मत पटले नाही. कारण त्यानुसार खाणे-पिणे व मौज करणे याशिवाय काहीच उरत नाही.

**प्रश्न १४६ : अन्योन्यवाद कशाला म्हणतात?**

**उत्तर** - पकुध कच्चायन नावाचा दार्शनिक 'अन्योन्यवादाचे' समर्थन करीत असे. त्याच्या म्हणण्यानुसार प्राणिमात्रांचे सात तत्त्वांपासून निर्माण होते.ती तत्वे अशी- पृथ्वी, जल, तेज, वायू, सुख, दुःख आणि आत्मा. प्रत्येक तत्त्व स्वतंत्र असून संपूर्ण आणि नित्य आहे. त्याचा नाश होत नाही. कोणाचे शिर जर कापले तरी त्याचा 'मृत्यू' होत नसतो. त्याने एवढेच होते की, शस्त्राने सात तत्त्वांमध्ये प्रवेश केला. सिद्धार्थास हे सर्वथा अमान्य होते. कारण त्यानुसार माणसाने कोणतेही वाईट कर्म केले तरी त्याला दोष देता येणार नाही.

**प्रश्न १४७ : विक्षेपवाद कशाला म्हणतात?**

**उत्तर** - संजय वेलट्ठीपुत्र नावाचा दार्शनिक विपेक्षवादी होता. तो म्हणे, 'कोणी मला विचारले की स्वर्ग कोठे आहे? मला जर वाटले की, आहे, तर मी म्हणेन होय आहे' त्याच्या मनास जसे योग्य वाटेल तेच तो म्हणेल असा त्याचा विक्षेपवाद होता. त्याचे मत तर्कावर अधिष्ठित नव्हते. त्यामुळे सिद्धार्थास अमान्य होते कारण त्यामुळे माणसाचे जीवन निरुद्देश होऊन जाते.

**प्रश्न १४८ : निगण्ठनाथपुत्र महावीरांचे मत काय होते?**

**उत्तर** - त्यांच्या मतास चातुर्यामसंवर वाद म्हणतात. त्यांचे म्हणणे असे की, आत्म्याला आपल्या पूर्वजन्माचे वाईट कर्म व या जन्माचे कर्म मिळून त्यानुसार पुढील जन्म ग्रहण करावा लागतो. त्यासाठी तपश्चर्येद्वारा पूर्वजन्माच्या कर्माचा नाश करायला हवा. या जन्मीच्या वाईट कर्माना थांबविण्याकरिता महावीरांनी धर्माचा उपदेश केलेला आहे. तो असा-

१. हिंसा न करणे | २. चोरी न करणे
३. खोटे न बोलणे आणि | ४. ब्रह्मचर्याचे पालन करणे

परंतु पूर्वजन्मीच्या वाईट कर्माची माहिती कोणासहि नसते. या जन्मी देहदंडनाची तपश्चर्या केल्याने त्या वाईट कर्माचा नाश झाला किंवा नाही, किती कर्माचा नाश झाला व किती कर्मे अजून शिल्लक आहेत, याविषयी कोणासही माहिती नसते. सिद्धार्थाला हे मंजूर नव्हते, कारण त्यामुळे माणसाचे जीवन काय-क्लेश व तपश्चर्या यांनाच समर्पित होउन जाईल व माणसाच्या इच्छा आणि स्वाभाविक प्रवृत्ती यास काहींच वाव राहणार नाही.

**प्रश्न १४९ : सहा दार्शनिकांनी सिद्धार्थास काय शिकवण दिली?**

**उत्तर** -पूर्णकाश्यप, मक्खली गोसाल, अजित केसकम्बल, पकुध कच्चायन, संजय वेलट्ठिपुत्र आणि निगण्ठनाथपुत्र (महावीर) या सहा दर्शनिकांपैकी एकाचेही तत्वज्ञान सिद्धार्थास आवडले नाही. त्याला असे वाटले की, ते सर्वजण निराशावादी किंवा असहाय होते व त्यांना कोणत्याही चांगल्या-वाईट परिणामाची विशेष चिंता नव्हती.

**प्रश्न १५० : निगण्ठनाथ (महावीर) यांनी कोणता उभयकोटि प्रश्न भगवंतांना विचारण्यास अभयकुमाराला पाठविले होते?**

**उत्तर** – एकदा महावीर स्वामींनी अभयकुमाराला भ. बुद्धांना एक उभय कोटी प्रश्न विचारण्यास पाठविले. तेव्हा त्याने विचारले 'काय श्रमण गौतम कधी कठोर पण बोलत होते?' हा प्रश्न विचारण्याचा त्याचा हेतू असा की, जर भगवंतांनी नकारार्थी उत्तर दिले, तर दोन-एक उदाहरणे अशी देईल की, जेव्हा भ. बुद्धांनी देवदत्ताला नारकीय वगैरे म्हटले होते. आणि जर त्यांनी होकारार्थी उत्तर दिले. तर तो त्यांना असे विचारील की, स्वतः कठोर वाणीचा उपयोग करून इतरांना मधुर वाणीचा उपयोग करण्याचा उपदेश ते कां देत असतात? तेव्हा भगवंतांनी त्याच्या प्रश्नाला उत्तर देतांना म्हटले, 'ह्या प्रश्नाचे उत्तर सर्वथा 'होय' किंवा सर्वथा 'नाही' असे दिले जावू शकत नाही. त्यावेळी अभय कुमाराच्या मांडीवर बाळ होते. भगवंतांनी विचारले, 'राजकुमार! तुझे किंवा दाईंचे लक्ष असतांना जर या बाळाने तोंडात मातीचा बकणा भरला, तर तू काय करशील?'

'भन्ते! मी त्याला काढून टाकीन. भन्ते! जर मी पहिल्यांदा सहजपणे काढू शकलो नाही, तर डाव्या हाताने त्याचे डोके पकडून उजव्या हाताच्या बोटाने जबरदस्तीने काढीन मग रक्त निघाले तरी बेहतर.'

'असे करण्याचे काय कारण?'

'भन्त! माझ्या मनात या बालकाविषयी दया आहे.'

'राजकुमार! अगदी त्याचप्रकारे तथागताला माहीत असते की, जे वचन असत्य आहे, अनर्थ करणारे आहे आणि दुसऱ्यांना अप्रिय आहे. तसे वचन तथागत कधीच बोलत नाहीत त्याचप्रमाणे जे वचन सत्य परंतु इतरांना अप्रिय वाटणारे व अनर्थकारी असेल, तर तसेहि वचन तथागत बोलत नाहीत. जे वचन सत्य व हितकर परंतु दुसऱ्यांना अप्रिय वाटणारे असेल, तसे वचन वेळकाळ ओळखून तथागत कधी बोलततातही तर कधी बोलत पण नाहीत कारण तथागतांच्या मनांत प्राणिमात्रांच्याविषयी अनुकंपा आहे.'

**प्रश्न १५१ : भगवंतांचे प्रमुख समर्थक कोणकोण होते?**

**उत्तर** -भगवंतांचे अगणित समर्थक होते. परंतु त्यातील प्रमुख येणेप्रमाणे

१. राजा बिम्बिसार भगवंताप्रति अत्यंत श्रध्दावान होता आणि धर्माच्या कार्यात त्याने पुष्कळ सहाय केले.
२. श्रावस्तीमधील धनाढ्य सेठ अनाथपिण्डिक अत्यंत धार्मिक आणि दानशूर होता. त्याने जेत राजकुमाराकडून विहारासाठी उपयुक्त अशी जागा खरेदी करावयास सर्व जागेवर सोन्याची कार्षापणें पसरवून जागा विकत घेतली व सुंदर विहार बांधला

त्याला ‘अनाथपिण्डिकाचा जेतवनाराम’ किंवा ‘जेतवन विहार’ असे म्हणत.

३. जीवक नांवाचा निष्णात वैद्य राजगृहात राहत असे. त्याने आपला ‘आम्रवन’ नावाचा बगीचा संघास दान केला. तो भिक्षुंना फुकट औषधी देत असे.

४. वैशाली ही लिच्छवी लोकांची राजधानी होती व तिथे आम्रपाली नावांची प्रसिद्ध गणिका राहत असे. तिने भिक्षुसंघास आपले ‘आम्रवन उद्यान’ दान म्हणून दिले.

५. विशाखा ही श्रावस्तीमधील अत्यंत श्रीमंत महिला होती. तिने भगवंताकडून आठ वर मागून घेतले ते असे -

अ. भिक्खूसंघाने पावसाळ्यात तिचे चिवराचे दान स्वीकारावे

ब. बाहेर जाणाऱ्या भिक्खूंनी अन्नदान स्वीकारावे

क. बाहेरून येणाऱ्या भिक्खूने तिचे अन्नदान स्वीकारावे

ड. रोगी भिक्खूंनी अन्नदान स्वीकारावे

इ. रोग्यांची सेवा करणाऱ्या भिक्खूंनी अन्नदान स्वीकारावे

फ. रोगी भिक्खूंनी औषधीचे दान स्वीकारावे

ह. खीरेचे पायस अन्नदान स्वीकारावे

ज. भिक्खुणीने वस्त्रदान स्वीकारावे

विशाखेने ‘पूर्वाराम विहार’ संघास दान केला.

**प्रश्न १५२ : भगवंतांचे प्रमुख प्रशंसक कोणकोण होते?**

**उत्तर** - भगवंतांचे असंख्य प्रशंसक होते. त्यापैकी काही प्रमुख येणेप्रमाणे

१. **धानंजानी ब्राह्मणी-** ती भारव्दाज ब्राह्मणाची पत्नी होती व भगवंताची अन्यन्य भक्त होती. परंतु भारद्वाज तथागतांची घृणा करीत असे. त्याने एकदा पुष्कळ ब्राह्मणास जेवावयास बोलाविले. भोजन सुरू असतांना धानंजनी त्रिरत्नाची स्तुती करू लागली. त्यामुळे क्षुब्ध होउन सर्व ब्राह्मण धानंजानीला शिवीगाळ करीत, जेवणावरून उठून निघून गेले. त्यानंतर भारव्दाज ब्राह्मण जेवावयास बसला. तेव्हाही तिने तसेच केले. त्यावर तो अत्यंत क्षुब्ध होउन तरातरा भगवंताकडे जावयास निघाला. तेथे जाऊन भगवंतास त्याने प्रश्न विचारले- ‘‘सूखपूर्वक रहावयास आपल्यास कुणाची हत्या करायला हवी?’’. भगवंतांनी उत्तर दिले की, सुखपूर्वक रहावयास ‘क्रोधाची’ हत्या करावी आणि त्यास धम्माचा उपदेश केला. त्यामुळे भारद्वाज ब्राह्मणाने गृहस्थ जीवनाचा त्याग करून प्रव्रज्या घेतली.

२. **विशाखेची दृढ श्रद्धा-** तिचा जन्म अंग जनपदामधील भद्दीय नगरात झाला होता. तिच्या पित्याचे नाव धनंजय आणि मातेचे सुमना असे होते. विशाखेचा पिता अत्यंत श्रीमंत होता. नंतर ते सर्वजण साकेत येथे गेले. पुढे तिचे मिगार श्रेष्ठीचा पुत्र पुण्यवर्धन याच्याशी लग्न झाले. भिगारश्रेष्ठी निर्ग्रथांचा (जैन नग्न साधूंचा) उपासक होता. परंतु विशाखा नागड्या लोकांची घृणा करीत असे व त्यामुळे तिच्या घरी येणाऱ्या निर्ग्रथांचा आदर सत्कार करावयास ती त्यांच्यापुढे जात नसे. या गोष्टीचा मिगारश्रेष्ठीस फार राग होता. एकदा विशाखेने भगवंतास व भिक्खूसंघास आमंत्रित केले. पडद्याआड राहूनच

जेव्हा मिगारश्रेष्ठीने भगवंतांचे प्रवचन ऐकले. तेव्हा तो एवढा प्रभावित झाला की तत्काळ तो भगवंतांचा उपासक झाला. विशाखेमुळे मिगारास धम्मश्रवणाचा लाभ झाल्यामुळे तो तिला मातेसमान मानू लागला व विशाखेचे नाव 'मिगारमाता' असे पडले.

३. **मल्लिकेची श्रद्धा-** मल्लिका श्रावस्तीच्या राजाची राणी होती. तिची भगवंतांवर अपार श्रद्धा होती. एकदा अशी बातमी राजवाड्यात पोहोचली की, भगवंतांनी असे म्हटले आहे की, प्रियजन शोक, संताप, कष्ट, दुःख आणि अनुताप यांस कारणीभूत होतात. त्याचे राजाला आश्चर्य वाटले व त्याने मल्लिकेजवळ त्या गोष्टीची चर्चा केली तेव्हा मल्लिकेने स्पष्टपणे सांगितले की, भगवंतांची वचने खरीच असतात. त्यामुळे राजा फार नाराज झाला. मल्लिकेने एका सुज्ञ ब्राह्मणास भगवंताकडे पाठवून त्याचा अर्थ समजावून घेतला व तो राजास सांगितला. तेव्हा राजाने ती गोष्ट कबूल केली की, आप्तजनांचे वाईट घडल्यास त्यामुळे माणसाला शोक, संताप, कष्ट आणि दुःख होते.

४. **एका गर्भिणीची श्रद्धा-** भगवान भग्ग देशाच्या सुसुंभार पर्वतावरील भेसकलावनात थांबलेले होते. तेव्हा पद्म नावाच्या बोधिकुमाराचा प्रासाद बनून तयार झालेला होता. त्याचा गृहप्रवेश करण्यापूर्वी त्याने भगवंतास भिक्खूसंघासहित निमंत्रण दिले आणि मोठ्या श्रद्धेने धम्माचे श्रवण केले तेव्हा त्याने स्पष्ट केले की, तो आपल्या मातेच्या गर्भात असतानाच तिने भगवंताकडे जाऊन असे नम्र निवेदन केले होते की, तिच्या गर्भातील संतान मुलगा असो वा मुलगी त्यास शरणागत उपासक समजावे. त्यास जेव्हा जाण आली तेव्हापासून तो स्वतःस भगवंताचा उपासक मानू लागला.

५. **राजा प्रसेनजिताने भगवंताची केलेली स्तुती-** भगवान बुद्ध श्रावस्तीमधील अनाथ पिण्डिकाच्या जेतवनारामात थांबलेले होते. कौशल नरेश प्रसेनजित एका बनावटी युद्धावरून वापस आलेला होता व प्रसन्न होता. तो भगवंताच्या भेटीस गेला. त्याने गंधकुटीमध्ये प्रवेश केला व तथागताच्या चरणावर डोके ठेवून त्यांच्या चरणाचे मुके घेतले. त्यांना हातांनी स्पर्श केला व म्हणाला, ''भगवन्! मी कोशल नरेश प्रसेनजित आहे.'' तेव्हा भगवंतानी विचारले, ''महाराज! या शरीरामध्ये अशी कोणती विशेषता आहे की या शरीराप्रती एवढा भक्तिभाव दाखवीत आहात''

## भगवान बुद्धांचे विरोधक

**प्रश्न १५३ : भगवंतांवर कोणकोणते मिथ्या दोषारोपण करण्यात आले?**

**उत्तर** -भगवान बुद्धांच्या विरोधकांनी त्यांच्यावर अनेक अयोग्य आणि खोटेनाटे आरोप केले व त्यांची बदनामी करावयाचे प्रयत्न केलेत. त्यापैकी मुख्य आरोप येणेप्रमाणे-

१. जादूटोणा करून लोकांना धम्मदीक्षा देण्याचा आरोप
२. समाजावर व्यर्थ भार होण्याचे दोषारोपण
३. सुखी जीवनास उजाडण्याचा आरोप
४. जैन धर्मीयांद्वारे हत्येचा मिथ्यारोप
५. तीर्थंकरांद्वारे अनैतिकेचा मिथ्यारोप

६. देवदत्ताचे भगवंताशी ईर्षेमुळे शत्रुत्व
७. ब्राह्मणांचा विरोध

**प्रश्न १५४ : जादुटोणा करून लोकांना धर्मदीक्षा देण्याचा आरोप भगवंतावर करण्यात आला काय?**

**उत्तर** -होय, एकदा भगवान बुद्ध वैशालीमधील कुटागार नावाच्या शाळेत थांबले असताना भद्दीय नावाचा लिच्छवी त्यांच्याजवळ येऊन म्हणाला, ''भगवन् लोक म्हणतात की, श्रमण गौतम एक जादूगार आहेत व ते जादूटोणा करून दुसऱ्या मतांच्या शिष्यांचे मत परिवर्तन करतात. तेव्हा याविषयी आपले काय म्हणणे आहे''

भगवंत म्हणाले, भद्दीय! अफवा, परंपरा किंवा लोकापवाद यावर विसंबून राहू नये. एखादी गोष्ट धर्मग्रंथात सांगितली आहे किंवा ती तर्कसिद्ध किंवा अनुमानावर आधारित आहे किंवा बाह्यतः ती खरी वाटते किंवा तुम्हास ती न्याय्य वाटते, म्हणून ती मान्य करू नका. तसेच ती एखाद्या आदरणीय व्यक्तीने सांगितली आहे, ती मानलीच पाहिजे अशा भावनेनेही तुम्ही तिचा स्वीकार करू नका. परंतु भद्दीय! अमूक एक गोष्ट पापकर्म आहे, हे स्वतः आपल्या अनुभवाने निरीक्षण करून पाहिल्यावर किंवा अनुभवी विद्वानांनी ते निंद्य-कर्म आहे, असे सांगितले व त्यामुळे हानी होण्याचा संभव आहे असे जर आढळले तर त्याचा तुम्ही त्याग करा. भद्दीय माझ्या शिष्यांना मी फक्त असा उपदेश करतो की, शिष्यांनो लोभयुक्त विचारांचे नियमन करा. म्हणजे कोणतेही लोभमूलक कार्य काया, वाचा, मनाने तुमच्याकडून घडणार नाही. द्वेष व अविद्या यांच्या आहारी जाऊ नका. ही शिकवण जर जादूटोणा असेल तर ती जगाच्या हिताची व सुखाची ठरणार आहे.''

**प्रश्न.१५५ : समाजावर व्यर्थ भार होण्याचे दोषारोपण भगवंतांवर करण्यात आले होते काय?**

**उत्तर** - होय. एकदा भारद्वाज ब्राह्मण आपल्या शेतात पेरणी करीत असता भगवान बुद्ध तेथे भिक्षेसाठी गेले. त्यांना पाहून ब्राह्मण म्हणाला, ''हे श्रमण, मी नांगरतो, पेरतो मगच पीक आल्यावर खातो. तुलाही असेच श्रम करून उपजिविका करावयास पाहिजे.'' तेव्हा भगवंत म्हणाले, ''मीसुद्धा खाण्यापूर्वी नांगरतो व बी पेरतो. श्रद्धा हे माझे बीज, तपस्या ही वर्षा, प्रज्ञा हे जू व नांगर, पापभिरूता हा दंड, विचार ही जू बांधण्याची दोरी आणि स्मृती (चित्ताची जागरूकता) ही नांगराचा फाळ व पैराणी आहेत.''

हे ऐकल्यावर भारद्वाजाने काश्याच्या पात्रांत खीर भरून ती भगवंतांना अर्पण करावयास आणली. तेव्हा भगवंत म्हणाले, ''पुरोहितासारखी दक्षिणा मी घेत नाही. उपदेश केल्यावर जे मिळते, ते माझ्यासाठी अखाद्य आहे. कारण मी निःस्वार्थपणे उपदेश करीत असतो. तेव्हा ते तू एखाद्या निर्दोष व सत्प्रवृत्त श्रमण ब्राह्मणास दे.'' हे ऐकताच भारद्वाजाचे डोळे उघडले व त्याने भगवंताचे पाय धरले आणि प्रव्रज्या व उपसंपदा ग्रहण केली.

**प्रश्न १५६ : सुखी गृहस्थ जीवनास उजाडण्याचा आरोप भगवंतांवर लावला होता काय?**

**उत्तर** - होय. मगध देशातील पुष्कळसे तरुण थोर सरदारपुत्र तथागताचे शिष्य झालेले पाहून

काही लोक असंतुष्ट व क्रोधित झाले. ते चिडून बोलू लागले, "श्रवण-गौतम मातापित्यांना निःसंतान व विवाहित स्त्रियांना विधवा बनवीत आहे. तो कुळांना उद्ध्वस्त करीत आहे." भिक्खूंच्या कानी हा आरोप पडताच त्यांनी तथागतांना जाऊन सांगितला. तथागत म्हणाले, भिक्खूंनो! ही टीका फार दिवस चालणार नाही. सप्ताहभरच ती टिकेल व आपोआपच ती शांत होईल. त्यांनी चिडविले तर तुम्ही त्यांना असे उत्तर द्या की, 'जे महावीर असे तथागत आहेत, ते लोकांना सद्धम्माच्या मार्गानेच घेऊन जातात. ते धम्मानेच लोकांना वळवितात, हे जाणणारांनी त्यांचा मत्सर का करावा ?' **(नयन्ति ते महावीर। सद्दमने तथागत। धम्मेन नीयमानानं का उस्सुय्या बिजानतं ॥)** त्यानंतर खरोखरच लोकांना समजून आले की, तथागत लोकांना धम्माच्या मार्गाने नेत आहेत, अधम्माच्या मार्गाने नव्हे आणि दोष देणे आपोआप बंद झाले.

**प्रश्न १५७ जैन धर्मीयांद्वारे (तैर्थिक) हत्येचा मिथ्यारोप त्यांच्यावर लावण्यात आला काय ?**

**उत्तर** - होय. आपला प्रभाव कमी होत असलेला पाहून काही जैन तिर्थंकरांनी भगवंतांविरुद्ध षडयंत्र रचले. त्यांनी सुंदरी नावाच्या गणिकेस गाठून भगवंतांविषयी खोट्यानाट्या अफवा पसरविल्या की, ती भगवंतांकडे त्यांच्या गंधकुटीमध्ये रात्र घालवीत असते. काही दिवसांनी तिर्थंकरांनी हत्याऱ्या भाडोत्री लोकांकडून सुंदरीची हत्या करवून तिचे प्रेत जेतवनाशेजारी एका कचऱ्याच्या ढिगाऱ्यावर फेकविले. त्यानंतर राजाच्या कर्मचाऱ्यांनी शहानिशा करतांना हत्याऱ्यांना दारूच्या गुत्त्यावर पैशाच्या वाटणीबद्दल झगडा करताना पकडले.

**प्रश्न १५८ तिर्थंकराद्वारे भगवंतांवर अनैतिकतेचा मिथ्यारोप लावण्यात आला काय ?**

**उत्तर** - होय. तिर्थंकरांनी जनतेवरील त्यांचा प्रभाव कमी होत असलेला पाहून भगवंतास आणि संघास बदनाम करण्यासाठी चिंचा नांवाच्या ब्राह्मण स्त्रीस गाठले. तिने अफवा पसरविली की, गंधकुटीमध्ये वारंवार गेल्यामुळे तिला गर्भधारणा झाली. परंतु तिने पोटावर बांधलेले लाकूड तिच्या खोकल्यामुळे घसरले व तिने घेतलेले सोंग उघडकीस आले.

**प्रश्न १५९ : देवदत्त ह्या चुलतभावाने इर्षेमुळे भगवंतांशी शत्रुत्व केलेले होते काय ?**

**उत्तर** - होय. देवदत्तास लहानपणापासूनच इर्षा होती. सिद्धार्थाने प्रव्रज्या घेतल्यावर त्याने यशोधरेसमोर प्रेमाचे नाटक केले. परंतु तिने त्याला साफ झिडकारले. एकदा भगवान गृध्रकुट पर्वताच्या छायेत चंक्रमण करीत होते. तेव्हा देवदत्ताने वरून एक मोठी शिळा ढकलून दिली. परंतु संयोगाने ती भगवंतापासून दूर जाऊन पडली. त्याने एका पहारेकऱ्यास भगवंताला ठार करावयास पाठविले, परंतु त्याने परत येऊन साफ नकार दिला. त्यानंतर नालागिरी नावाच्या मस्त हत्तीला भगवंतावर सोडावयास माहुताला प्रेरित केले. परंतु तो हत्ती शांतपणे उभाच राहिला. ते आश्चर्य पाहून राजगृहवासी निवासी म्हणून लागले -

**दण्डेनेके दमयन्ति अंकुसेहि कसाहि च ।**
**अदण्डेन असत्येन नागो दन्तो महेसिना ॥**

(कोणी काठीने, कोणी अंकुशाने आणि कोणी चाबकाने (जनावराचे) दमन करतात. परंतु **महर्षी बुद्धाने काठीवाचून किंवा कोणत्याही शस्त्रावाचून हत्तीचे दमन केले)** ते सर्व प्रयत्न

विफल झाल्यावर तो अजातशत्रू राजाकडे गेला. परंतु त्यानेही त्यास धुडकावून लावले. त्याच्यावर सर्व जनतेचा रोष वाढूं लागला व त्यास भीक मागावयाची पाळी आली.

**प्रश्न १६० : अनेक अविद्य ब्राह्मणांनी भगवान बुद्धांचा विरोध केला काय ?**

**उत्तर -** अविद्य ब्राह्मणांचा विरोध -

१) कोशल अनपदामध्ये भ्रमण करीत असतांना भगवान बुद्ध थून नावाच्या गावी गेले. त्या गांवी ब्राह्मणच राहत असत. ते सर्व गृहपती अश्रद्धाळू, मिथ्यादृष्टी व लोभी होते. भगवंतास पाणीदेखिल पिण्यास मिळू नये म्हणून त्यांनी एका विहिरीशिवाय इतर सर्व विहिरींमध्ये गवत आणि कचरा टाकला. संपूर्ण गावाच्या लोकांनी भगवंतांना व त्यांच्या अनुयायांना पाणीसुद्धा मिळू नये असा कट केला. परंतु तेथील एका ब्राह्मणाच्या दासीने कसलीही पर्वा न करता भगवंतांना व भिक्खूंना पाणी पाजले. त्याबद्दल त्या दासीला भयंकर मारहाण सहन करावी लागली.

२) दोन नावाचा ब्राह्मण एकदा तथागताकडे गेला व तो तक्रार करू लागला की, श्रमण-गौतम कोण्याही वृद्ध, वयोवृद्ध, आयुप्राप्त ब्राह्मणाच्या आगमनावर उठून त्याचा आदर-सत्कार करीत नाही, हे बरोबर नाही. त्यावर भगवंतांनी त्यास विचारले की, तो कोणत्या प्रकारचा ब्राह्मण आह ? तेव्हा त्याने खुलासा केला की, ब्राह्मण पाच तऱ्हेचे असतात-ब्रह्म सदृश ब्राह्मण, देव सदृश ब्राह्मण, बन्धनयुक्त ब्राह्मण, बंधन-भंजक ब्राह्मण आणि अन्त्यज ब्राह्मण. परंतु त्यास त्यांची कर्मे माहीत नव्हती. भगवंतांनी त्या सर्वांची कर्मे समजावून सांगितल्यावर 'दोन' ब्राह्मणाचे समाधान झाले की, सर्व ब्राह्मणांहून भगवान बुद्ध उत्तम होते व तो त्यांचा शरणागत उपासक बनला.

## भगवंतांच्या धम्माचे आलोचक

**प्रश्न १६१ : भ. बुद्धांचे आलोचक त्यांच्यावर कोणत्या बाबतीत टीका करीत असत ?**

उत्तर - १. संघात सर्वांना मुक्तपणे प्रवेश देण्याबाबत टीका.

२. भिक्खूंसाठी व्रत-ग्रहणाच्या सक्तीबद्दल टीका

३. अहिंसेच्या सिद्धान्तावर टीका

४. जगाला दुःखाच्या अंधकाराने झाकण्याचा आरोप

५. अनित्यतेला निराशेचे कारण म्हणण्याचा अपप्रचार

६. आत्मा नाही, परंतु पुनर्जन्म आहे, ह्या म्हणण्यावर टीका

७. उच्छेदवादी (विनाशवादी) असल्याची टीका

**प्रश्न १६२ : संघात सर्वांना मुक्तपणे प्रवेश देण्याबाबत भगवंतांवर टीका करण्यात आली काय ?**

**उत्तर -** होय. टीकाकारांचे म्हणणे असे होते की, संघात प्रवेश मिळण्याबाबत कसलेही बंधन नसल्यामुळे काही लोकांनी संघात प्रवेश घेतल्यानंतर संघ सोडून पुन्हा ते गृहस्थाश्रमात जातील आणि त्यामुळे लोक असे म्हणू लागतील की, श्रमण गौतमाच्या धम्मात स्वारस्य नसले पाहिजे.

तथागतांचे म्हणणे असे होते की, ''सद्धम्म अमृतरूपी सरोवराप्रमाणे असून, मलिन मनाचा मनुष्य ह्यात स्नान करून निर्मल होतो. जर मलिन चित्तधारी काही लोक त्या सरोवरापर्यंत पोहोचूनही त्यात स्नान करून निर्मल बनावयाचे प्रयत्न करीत नसतील तर तो त्यांचा दोष आहे, सरोवराचा नव्हे.'' काही निवडक लोकांनीच सद्धम्मरूपी सरोवराचा फायदा घ्यावा, अशी तथागतांची इच्छा नव्हती, हे टीकाकार विसरले होते.

**प्रश्न १६३ : भिक्खूंसाठी व्रत-ग्रहणाच्या सक्तीसंबंधीची भगवंतांवर टीका करण्यात आली काय ?**

**उत्तर** - भिक्खूंसाठी व्रत-ग्रहणाच्या सक्तीसंबंधीची भगवंतावर टीका करण्यात येत असे. 'पंचशील पुरेसे नाही काय? आणखी भिक्खूंना इतर व्रतांच्या ग्रहणाची काय आवश्यकता आहे?' असे प्रश्न टीकाकार नेहमी विचारीत असत. गृहस्थ उपासक पंचशील ग्रहण करून संसारात राहूनही शांत व श्रेष्ठ असे निर्वाण प्राप्त करू शकतो. परंतु भिक्खूंना मात्र व्रतग्रहण करणे नैतिकतेच्या दृष्टीने अधिक मौलिक आहे. व्रतामुळे अधःपतनापासून त्यांचे निश्चितपणे रक्षण होते व त्यांचे आचार-विचार सर्वथा पवित्र राहण्यास मदत होते.

**प्रश्न १६४ : भगवंतांच्या अहिंसा सिद्धान्तावर कशा प्रकारची टीका करण्यात येत असे ?**

**उत्तर** - अहिंसेच्या सिद्धान्तावर टीकाकारांचे म्हणणे असे होते की, अहिंसेचे पालन करणे म्हणजे 'अन्याय' व अत्याचाराला शरण जाणे होय. पण तथागतांनी शिकविलेल्या अहिंसा-तत्त्वाचा हा पूर्णतः विपर्यास होता. सिंह सेनापतीला उपदेश देताना तथागतांनी स्पष्ट केले होते की, जो दंडनीय आहे, त्याला दंड मिळायलाच पाहिजे. जो आपल्या अपराधाचा दंड भरतो, त्याला तो स्वतःच जबाबदार असतो. आपल्या अकुशल कर्माच्या परिणामामुळे तो दंड भोगतो व न्यायधीश आपले केवळ कर्तव्य म्हणून दंडाची शिक्षा फर्मावितो. जेव्हा दंडनीय व्यक्तीला समजेल की, त्याचा दंड त्याच्या कर्मांचेच फळ आहे, तेव्हा त्याला दंड भोगतांना दुःख न होता पश्चात्ताप होईल. तथागतांच्या उपदेशात अहिंसेला मुख्य स्थान आहे, परंतु ती निरपेक्ष नाही. त्यांनी शिकविले आहे की, पापाला पुण्याने जिकावे. परंतु जर चांगल्या गोष्टीचा पापामुळे नाश होणार असेल तर अशा पापाला नष्ट करण्यासाठी हिंसेचाही आश्रय घ्यावा लागल्यास ते त्यांना अमान्य नव्हते.

भगवंतांनी श्रेणीय बिंबिसाराला असे स्पष्टपणेच उत्तर दिले की, अहिंसेच्या नांवाखाली सैनिकांनी आपल्या देशाप्रती त्यांचे जे कर्तव्य आहे, त्यापासून विन्मुख होऊ नये. त्यांनी संघासमोर अशी घोषणा केली की, राज्याच्या कोणत्याही सैनिकास प्रव्रज्या देण्यात येऊ नये.

**प्रश्न १६५ : जगाला दुःखाच्या अंधकाराने झाकण्याचा भगवंतांवर आरोप करण्यात आला काय ?**

**उत्तर** - होय. जगाला दुःखाच्या अंधकाराने झाकण्याचा मिथ्यारोप त्यांचे विरोधक करीत असत. भगवंतांनी असा उपदेश केला होता की, दारिद्र्य, उधारी, कर्ज घेणे, तगादा लावला जाणे, मारपीट होणे आणि मायेच्या बंधनात पडणे ह्या इहलोकांतील गोष्टी सांसारिक पुरुषांकरिता अतिशय दुःखप्रद आहेत. ह्यावरून स्पष्ट होते की, भगवंतांची दुःखाची व्याख्या

भौतिक स्वरूपाची होती.

दुःख ही वस्तुस्थिती आहे व त्या सत्य वस्तुस्थितीस आपण नाकारू शकत नाही, ह्याकडे त्यांनी लक्ष वेधले. त्यांनी दुःखाची निर्मिती केली नाही. विद्यमान असलेल्या दुःखाची जाणीव करून दिली, आणि त्यावर अभूतपूर्व असा साधा, सोपा उपाय सुचविला. ह्याबद्दल आपण त्यांचे सदैव ऋणी राहिले पाहिजे.

**प्रश्न १६६ : अनित्यतेला निराशेचे कारण म्हणण्याचा अपप्रचार विरोधकांनी केला होता काय ?**

**उत्तर** – होय. भगवंतांनी आपल्या प्रथम उपदेशामध्येच सांगितले होते की, जन्म, जरा, मरण दुःखद आहे. कदाचित त्यामुळेच त्यांच्या धर्माला निराशेचा गडद रंग दिला गेला असावा. परंतु जर एखादा सिद्धान्त सत्य असेल तर तो कथन केलाच पाहिजे. मग तो कितीही कटू का असेना! जीवन अनित्य आहे, जन्म-जरा-मरण दुःखद आहे, हे सांगतांना त्यासोबतच, भगवंतांनी त्या दुःखाचा अंत कसा करावा, ह्याचाही मार्ग सांगितलेला आहे. म्हणून त्यांच्या धम्मास निराशावादी म्हणता येत नाही. धम्माचे जे शास्ता दुःखाचा अंत पहावयास एवढे उत्सुक होते, त्यांना निराशावादी म्हणता येणार नाही.

**प्रश्न १६७ : 'आत्मा' नाही आणि 'पुनर्जन्म' आहे, यासंबंधी टीका झाली काय?**

**उत्तर** – होय. आत्मा नाही पण पुनर्जन्म आहे, या सिद्धान्तावर टीका झाली. भ. बुद्धांनी म्हटले आहे की, आत्मा नाही, परंतु 'पुनर्जन्म आहे.' यामुळे त्यांचे टीकाकार त्यांच्यावर परस्परविरोधी सिद्धान्ताचे प्रचारक असल्याचा आरोप करीत असत. त्यांच्या टीकाकारांचे म्हणणे असे होते की, जर 'आत्माच' नाही तर 'पुनर्जन्म' कसा होऊ शकेल ? परंतु तथागतांचे म्हणणे होते की, आंब्याची कोय असते. तिच्यापासून आंब्याचा वृक्ष निर्माण होतो. आणि आंब्याच्या वृक्षाला आंबे लागतात. हाच 'आंब्याचा' पुनर्जन्म होय. पण तेथे आत्म्याचे अस्तित्व कोठेही नाही. म्हणजेच आत्म्याशिवाय 'पुनर्जन्म' होऊ शकतो.

**प्रश्न १६८ : उच्छेदवादी म्हणजे विनाशवादी असल्याची टीका झाली काय ?**

**उत्तर** – होय. एकदा अरिट्ठ नांवाच्या भिक्खूचा तथागतांच्या एका मताविषयी गैरसमज झाला. ती गोष्ट तथागतांना समजताच त्यांनी त्याला बोलवणे पाठविले. तो आल्यावर त्याला भ. बुद्ध उच्छेदवादी आहेत किंवा नाहीत ह्याविषयी प्रश्न विचारले असता तो भिक्खू गप्प बसला. तेव्हा तथागतांनी त्याला सांगितले, ''काही श्रमण-ब्राह्मण चुकीने, गैरसमजुतीने किंवा खोटपणाने मी विनाशवादी असल्याचा आरोप करतात आणि म्हणतात की, मी प्राणिमात्रांच्या नाशाची, उच्छेदाची शिकवण देतो. परंतु ते सत्य नाही. मी असेच शिकवीत आलो आहे की, दुःखाला अस्तित्व आहे तसाच अंतही आहे.''

## भगवंतांची मानवता

**प्रश्न १६९ : भगवंतांची दृष्टी सर्वांप्रती करुणामयी होती काय ?**

**उत्तर** –होय. भगवंतांनी सर्वांसाठी असा उपदेश केलेला आहे की, सर्व प्राण्यांचे मंगल व्हावे, सर्व प्राणी सकुशल राहावेत आणि सुखी राहावेत. कोणी दुर्बल असो वा सबल, उच्च हो अथवा खालच्या पातळीवर, मोठे असो वा लहान, जवळ असो वा दूर, सर्वच प्राणी

सुखी असोत. कोणी कुणास धोका देऊ नये, कुणी कुणाची घृणा करू नये, द्वेष करू नये, वाईट चिंतू नये. ज्याप्रमाणे आई आपल्या एकुलत्या पुत्राची जीवापाड जपणूक करते, त्याप्रमाणे माणसाने सर्व प्राण्यांविषयी दयाभाव ठेवावा व आपल्या शत्रूवर देखील प्रेम करावे.

**प्रश्न १७० : भगवंतांनी दुःखीजनांचे कशा प्रकारे सांत्वन केले ?**

**उत्तर -** १) एकदा दानशील विशाखेची नात मरण पावली व ती अतिशय दुःख होऊन अश्रू गाळीत भगवंतांकडे गेली. भगवंतांनी तिचे सांत्वन केले.

२) किसा गौतमी श्रावस्तीच्या एका व्यापाऱ्याची सून होती. तिचे एकुलते एक तान्हे मूल मरण पावले. तिने त्याआधी कुणाचाही मृत्यू पाहिलेला नव्हता. त्यामुळे ती पागलासारखी हिंडू लागली व ''माझ्या बाळास जीवदान द्या'' असे म्हणत रडू लागली. भगवंतांकडे आल्यावर त्यांनी तिला श्रावस्तीमधील ज्या घरी कधीच कोणाचाही मृत्यू झाला नाही, अशा घरून मुठभर मोहरीचे दाणे आणावयास सांगितले. किशा गौतमी खूप हिंडली, परंतु तिला एकही घर मृत्यूविना सापडले नाही. तेव्हा ती भगवंतांकडे परत गेली. तिला कळून चुकले की, सर्वच अनित्य आहे. त्यानंतर भगवंतांनी तिचे सांत्वन केले.

३) रोगी भिक्खूची सेवा : एकदा एका भिक्खूला अतिसार झाला व तो अतिशय क्षीण झाल्यामुळे त्यास हालचाल करता येत नव्हती व त्यामुळे तो स्वतःच्या मलमूत्रामध्येच पडून राहिला. फिरत फिरत भगवान तेथे गेले व त्या भिक्खूची कोणीच सेवा करीत नाही, असे पाहून त्यांनी व आयु. आनंदानी त्या भिक्खूस स्नान घातले व त्यास नवीन बिछान्यावर निजविले. त्यानंतर त्यांनी सर्व भिक्खूंना बोलावून त्यांना असा उपदेश केला की, प्रत्येक भिक्खूने आपल्यासोबत असलेल्या रोगी भिक्खूची सेवा केलीच पाहिजे व जो रोग्याची सेवा करील, त्यास भगवंताची सेवा केल्याचे श्रेय मिळेल.

४) स्थविर वक्कलीचा आजार : एकदा स्थविर वक्कली अतिशय आजारी पडले व तथागतांचे दर्शन घ्यावयाची त्यांस तीव्र अभिलाषा झाली. तेव्हा भगवंतांनी त्यास भेट दिली आणि उपदेश करताना तथागतांनी म्हटले, ''वक्कली! माझ्या ह्या घाणेने भरलेल्या शरीराचे दर्शन करण्यात काय ठेवले आहे? जो धम्माचे अवलोकन करतो, तोच मला पाहतो.''

**प्रश्न १७१ : भ. बुद्धांना कोणत्या गोष्टी ग्राह्य व कोणत्या अग्राह्य (म्हणजे नामंजूर) होत्या ?**

**उत्तर -** १) त्यांना दारिद्र्य नापसंत होते : धनाशिवाय मनुष्य दानधर्म करू शकत नाही. अतिथिसेवा, पितृसेवा, राजसेवा व देवसेवा इत्यादी करू शकत नाही. भगवंतांनी दारिद्र्याची किंवा गरिबीची प्रशंसा केली नाही. त्यांनी स्वतः संन्यासदीक्षा घेऊनही दारिद्र्याचे जीवन सुखी जीवन असते, असे त्यांनी कधीच म्हटले नाही.

२) त्यांना संग्रहवृत्ती नापसंत होती : त्यांनी एकदा आनंदाला उपदेश केला, ''आनंदा! संग्रहवृत्ती म्हणजे लोभ. तृष्णा ही लोभाचे कारण आहे. तृष्णमुळे आसक्ती येते व आसक्तीमुळे मानसिक दास्यता येते. सर्व तृष्णा समूळ नष्ट करून त्याची लालसा न धरता त्यांचा त्याग, नाश व परित्याग करूनच मी बुद्धत्व प्राप्त केले आहे.''

३) भ. बुद्धांना सुसंगती इतकी प्रिय होती की, त्यांना सुसंगति-प्रिय बुद्ध, असे म्हटले असते

तर शोभून दिसले असते. त्यांनी आपल्या अनुयायांना सुसंगती करावयास प्रेरित केले व कल्याण मित्रांची संगती करा, म्हणजे अकुशल धम्माचा ऱ्हास व प्रज्ञेची वृद्धी होईल, असा उपदेश केला.

तथागत एकदा आनंदाला म्हणाले, 'आनंदा! सत्संगती हे श्रेष्ठ जीवन होय. ज्याचे कल्याण-मित्र आहेत, तो आर्य-अष्टांगिक मार्गावरून अधिकाधिक प्रगती करतो आणि श्रेष्ठ जीवन व्यतीत करतो.'

**प्रश्न १७२ : भगवंतांनी कोणत्या गोष्टी पूर्णतः निषिद्ध मानल्या ?**

**उत्तर -** ज्यावेळी भगवंतांनी आपल्या शासनाचा पाया रचला, त्याआधी त्या काळच्या समाजाने खाली दिलेल्या गोष्टींचा स्वीकार केलेला होता-

१) वेदांना स्वप्रमाण मानणे.

२) आत्म्याला मोक्ष मिळतो, ह्यावर विश्वास, अर्थात मोक्षप्राप्तीनंतर पुनर्जन्माचे न होणे.

३) धार्मिक संस्कार आणि यज्ञ इत्यादींचे आयोजन केल्याने आत्म्याला मोक्ष मिळतो असे समजणे.

४) सामाजिक एकतेकरिता चातुर्वर्णी व्यवस्थेस आदर्श मानणे.

५) ईश्वरास सृष्टिकर्ता आणि 'ब्रह्म' ह्यास विश्वाचा मूल आधार असलेले तत्त्व मानणे.

६) आत्म्यावर विश्वास.

७) 'संसरण' म्हणजे आत्म्याचे एका शरीरातून दुसऱ्या शरीरात जाण्यावर विश्वास.

८) कर्मांवर विश्वास म्हणजे पूर्वजन्माच्या कर्मानुसार त्याचा परिणाम म्हणून सध्याचा जन्म मिळाला, असे स्वीकारलले मत.

वर दिलेल्या गोष्टींवर प्रदीर्घ चिंतन करून भगवंतांनी खाली निर्देशिलेल्या गोष्टींचा सर्वथा त्याग केला -

क) मी कुठून आलो, मी कोण आहे यांसारख्या व्यर्थ मानसिक संकल्प-विकल्पाचा भगवंतांनी धिक्कार केला.

ख) त्यांनी आत्म्याविषयीच्या सर्व कल्पनांचा त्याग केला. त्यांनी आत्म्याला ना शरीर, न वेदना, न संज्ञा, न संस्कार आणि न विज्ञान मानले.

ग) सर्वच उच्छेदवादी (नाशवादी) मतांचा अव्हेर केला.

घ) त्यांनी नास्तिकांच्या मतांचा त्याग केला.

ङ) सृष्टीच्या विकासाच्या आरंभाचे ज्ञान कुणास आहे, ह्या गोष्टीस त्यांनी अमान्य केले.

च) त्यांनी या गोष्टींचे खंडन केले की, मानवाची उत्पत्ती कुणा ईश्वराने केलेली आहे अथवा मानव कुणा 'ब्रह्माचा अंश' आहे.

छ) आत्म्याच्या अस्तित्वास त्यांनी पूर्णतः नकार दिला.

**प्रश्न १७३ : भगवंतांनी त्याकाळी प्रचलित असलेल्या मतांपैकी कोणत्या गोष्टींमध्ये परिवर्तन केले ?**

**उत्तर -** क) त्यांनी कार्य करणाऱ्या महान नियमास (कार्य कारण) पूर्णतः मान्यता देऊन त्यास 'प्रतित्यसमुत्पाद' यात सामील केले.

ख) त्यांनी जीवनाच्या निराशावादी दृष्टिकोणाचे खंडण केले. मानवांचे आणि सृष्टीचे भविष्य कोण्या ईश्वराने आधीच निश्चित केलेले आहे, ह्याचेही त्यांनी खंडन केले.
ग) पूर्व जन्माची कर्मे या जन्मीच्या दुःखास कारण असल्याचे मत त्यांनी नाकारले. त्यांनी नवीन कर्मवादाची स्थापना केली.
घ) संसरण अर्थात आत्म्याचे एका शरीरातून दुसऱ्या शरीरात जाणे, या सिद्धान्ताला अमान्य करून, संसरण-रहित पुनर्जन्माच्या सिद्धान्ताचा त्यांनी स्वीकार केला.
ङ) त्यांनी मोक्ष किंवा आत्म्याची 'मुक्ती' या सिद्धान्ताच्या ठिकाणी बौद्ध निर्वाणाची स्थापना केली.
येणेप्रमाणे भगवंतांचे शासन आपल्या मौलिकतेवर अधिष्ठित आहे. जे काही थोडेबहुत जुने आहे, त्यांत पुष्कळसे बदललेले आहे किंवा त्याची नवीन व्याख्या केलेली आहे.

**प्रश्न १७४ : भगवंतांनी कोणत्या गोष्टींना स्वीकार केले ?**
**उत्तर -**
१) प्रथम विशेषता ही की, मनाला त्यांनी सर्वच गोष्टींचा केन्द्रबिंदू म्हणून स्वीकार केले.
मन सर्व गोष्टींच्या पुढे असते. मनावर नियंत्रण असल्यास सर्वच गोष्टींवर नियंत्रण असते. मनच सर्व मानसिक क्रियांमध्ये प्रधान आहे. मनच मुख्य आहे. मन त्या सर्व चैतसिक क्रियांची उपज होय.
सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे मनाची साधना.
२) मन हेच सर्व तऱ्हेचा चांगुलपणा व वाईटपणा यांची उपज करणारा स्रोत होय, ही भ. बुद्धांच्या शिकवणीची दुसरी विशेषता होय.
जे काही वाईट आहे, ज्याचा वाइटाशी संबंध आहे, ते सर्व मनापासून उत्पन्न होते. जे काही चांगले आहे, ज्याचा चांगुलपणाची संबंध आहे, ते सर्वदेखील मनापासूनच उत्पन्न होते. जो कोणी वाईट गोष्ट मनात आणून बोलेल किंवा वागेल, दुःख त्याचा पाठलाग तसेच करील, ज्याप्रमाणे गाडी ओढणाऱ्या बैलांचा पाठलाग त्यामागे येणारी चाके करीत असतात.
चित्ताला निर्मळ ठेवायचा प्रयत्न करणे यातच धम्माचा सारांश आहे.
३) तिसरी विशेषता म्हणजे पापकर्मापासून दूर राहणे.
४) भ. बुद्धांच्या शिकवणीची चौथी विशेषता अशी की, धार्मिक ग्रंथांचे पठन नव्हे, तर धार्मिक जीवन व्यतीत करणे, ह्यास त्यांनी धम्म मानले आहे.

**प्रश्न १७५ : भ. बुद्ध श्रोतावृंदाच्या मनास कशा प्रकारे प्रज्वलित करीत असत ?**
**उत्तर -** भगवंतांनी आनंदास सांगितले, 'आनंदा! वेगवेगळ्या प्रकारची मंडळे असतात. सरदारांचे मंडळ, ब्राह्मणांचे मंडळ, गृहस्थांचे मंडळ, भिक्खूंचे मंडळ आणि इतर लोकांची मंडळे. जेव्हा मी एखाद्या मंडळात प्रवेश करीत असे तेव्हा बसण्यापूर्वी मी माझ्या श्रोतावृंदांच्या स्वरूपाशी एकरूप होत असे आणि त्यांच्या सुराप्रमाणे माझा सूर होत असे. मी त्यांच्याशी त्यांच्या भाषेत बोलत असे व नंतरच धार्मिक प्रवचनाने मी त्यांना सांगत असे; त्यांचे विचार प्रज्वलित करीत असे, आणि त्यांना आनंदित करीत असे.'

* * * *

# द्वितीय खंड

# धम्माची शिकवण

## बौद्धधम्माची रूपरेखा

**प्रश्न १७६ : बौद्धधम्म म्हणजे काय ?**

**उत्तर** - भ. बुद्ध ह्या नांवाने ओळखल्या जाणाऱ्या महामानवाने केलेल्या उपदेशाचे हे संकलन होय. धर्म (Religion) ही संज्ञा बौद्धधम्मास योजणें तंतोतंत बरोबर नाही. कारण तो 'धर्म' नसून एक नैतिक तत्तवज्ञान आहे. 'धर्म' म्हणजे मनुष्याचा संबंध ईश्वराशी कसा स्थापित होईलयाविषयी सांगितलेली व्रतवैकल्यें, विधि, अंधश्रद्धापूर्वक विश्वास इत्यादी जशी इतर धर्मांची वेगवेगळ्या पद्धतीने दिलेली शिकवण आहे ती. बौद्धधम्मात 'ईश्वराच्या' मूळ कल्पनेस नाकारलेले आहे. माणसाने समाजात कसे वागावे म्हणजे समाजात सौख्य व शांती नांदेल, याची नीतिपर शिकवण बौद्धधम्मात दिली आहे. (कृपया टीप १ पहावी)

**प्रश्न १७७ : भ. बुद्धाने केलेल्या उपदेशाला बौद्धधम्म (Buddhism= Buddhist Religion) हे सर्वात योग्य असे नाव आहे काय ?**

उत्तर - नाही, तो केवळ पाश्चिमात्य शब्द आहे. त्याकरिता 'बुद्धधम्म' हे सर्वात योग्य नाव आहे. इतर धम्म (Religion) ईश्वर आणि आत्म्याविषयी सांगतात. परंतु भ. बुद्धांचा 'धम्म' माणसाने आपल्या मनावर ताबा ठेवून चांगली वर्तणूक कशी करावी आणि बहुजनहिताय, बहुजनसुखाय कसे वागावे, हे सांगतो.

**प्रश्न १७७ (अ) : बौद्धधम्माचा सरळ भाषेत काय सारांश आहे?**

**उत्तर** - लोकहा! ह्या जगात कार्य आणि कारण यांचा नेहमीचा संबंध आहे. कार्य घडले त्याचे कारण जर आपल्यास दिसून पडले नाही म्हणून त्या कारणामुळे कार्य घडलेच नाही असे समजणे अज्ञान होय. कारणामुळे कार्य घडतच राहणार; कधीही चुकणार नाही. यास्तव जसे आचरण कराल त्याच्या परिणामापासून तुम्ही वंचित राहू शकणार नाही. तुमच्या सदाचरणांची चांगली फळे व दुराचरणांची वाईट फळें तुम्हांस मिळणारच. कार्यकारणांच्या नेहमीच्या संबंधात कोणीही अडचणी उत्पन्न करू शकत नाही. म्हणूनच यज्ञयाग वगैरे सगळेच खोटेनाटे विधी असतात. बाह्य वस्तूंपासून बक्षिसांची अपेक्षा करूं नका; त्याचप्रमाणें त्यांच्यापासून भीती बाळगण्याचे देखील कारण नाही. सद्गुणांचे बक्षीस सद्गुण आणि दुर्गुणांचे बक्षीस दुर्गुणच असतात. कारण ह्या दोहोंचे माणसाच्या शीलावर जे परिणाम होतात, त्यामुळेच त्यांच्या शीलांचे परिवर्तन घडून येते. शीलामुळेच मनाला सद्गती किंवा दुर्गती प्राप्त होते. यास्तव सुखाच्या प्राप्तीकरिता आर्य अष्टांगिक मार्गाचे म्हणजे शीलमार्गाचे पालन करा.

**प्रश्न १७८ : ज्यांना "Religion" म्हणजे 'धर्म' असे योग्यपणेच संबोधिले आहे, त्या धर्मांमध्ये आणि बौद्धधम्मामध्ये ठळकपणे दिसणारे कोणते फरक आहेत ?**

**उत्तर** - त्यांतील कांही येणेप्रमाणे आहेत - कोण्या निर्माणकर्त्या ईश्वराचे अस्तित्व न मानूनदेखील बौद्धधम्म सर्वोच्च सदाचाराची शिकवण देतो. शाश्वत आणि अशरीर अशा आत्म्याविषयी, जो शरीराबाहेर जातो, अशा अंधश्रद्धामय कल्पनेला न चिकटता जीवनाच्या अखंडतेला बौद्धधम्म मानतो. शरीराबाहेर राहणाऱ्या, दृष्टिगोचर न होणाऱ्या स्वर्गाशिवायच, सुखाच्या अस्तित्वाला बौद्धधम्म मानतो. विशिष्ट रक्षणकर्त्याशिवायच मुक्तीचा मार्ग आणि कोण्या मुक्तिदात्याशिवाय स्वतःच मुक्तिमार्ग शोधणारा आणि विधिवैकल्याशिवाय, प्रार्थनेशिवाय, प्रायश्चित्ताशिवाय, धर्मगुरू किंवा मध्यस्थी करणाऱ्या पुरोहिताशिवायच उद्धारकाप्रमाणे स्वतःकडूनच सुटका करून त्याची इतिश्री म्हणजे निर्वाण होय, असे बौद्धधम्म शिकवितो. हे निर्वाण पवित्रमय असून, सुज्ञतेने आणि दयाभावनेने ओतप्रोत असे निःस्वार्थी जीवन जगून, ह्या जगात आणि ह्याच जीवनात ते मिळविण्याजोगे आहे, असे बौद्धधम्म शिकवितो. ह्याउलट जगातील धर्म Religion ईश्वरास शरण गेल्याने व त्याची पूजा केल्याने पाप नष्ट होते व मृत्यूनंतर आत्मा स्वर्गात जाऊन तो सुखाने राहू शकतो, असे शिकवितात. (टीप १६ बघावी)

**प्रश्न १७८ (अ) : 'धर्म' (मजहब) म्हणजे काय ?**

**उत्तर** - धर्माची कल्पना कधीच स्थिर राहिलेली नाही. एक काळ असा होता ज्यावेळी वीज, पाऊस, पूर इत्यादी गोष्टी आदिकाळाच्या मनुष्याला अनाकलनीय होत्या. ह्या गोष्टींवर ताबा ठेवण्याकरिता ज्याकाही जादूटोण्यासारख्या क्रिया करीत असत, त्यांना ते 'धर्म' समजत असत.

त्यानंतर धर्माच्या विकासाची दुसरी फेरी सुरू झाली. ह्यावेळी धर्माचा अर्थ मनुष्याची श्रद्धा, धार्मिक कर्मकांड, रीतिरिवाज, प्रार्थना आणि बळी देणे असा होता. धर्माचा केंद्रबिंदू त्या स्थळी असतो जिथे एखादी शक्तिविशेष असते; जिच्यामुळे सर्वच घटना घडत आहेत असा विश्वास निर्माण होतो. पुढे त्याच शक्तीला 'ईश्वर', 'परमात्मा', दुनियेचा कर्ता असे म्हणू लागले.

पुढे धर्माच्या कल्पनेत एक नवीनच गोष्ट संमिलीत झाली ती अशी की, प्रत्येक मनुष्याच्या शरीरात एका 'आत्म्याचा' निवास असतो तो आत्मा नित्य आहे, नश्वर आहे आणि मनुष्य जेकांही चांगले वाईट काम करतो त्यायोगे 'ईश्वराप्रती' त्या 'आत्म्याला' उत्तरदायी राहावे लागते. थोडक्यात हाच 'धार्मिक' मान्यतेच्या उत्थानाचा इतिहास आहे. आता 'धर्माचा' अर्थ झालेला आहे तो असा - ईश्वरावर विश्वास, आत्म्याच्या अस्तित्वावर विश्वास, ईश्वराची पूजा, आत्म्याचा सुधार, प्रार्थना इत्यादी करून ईश्वराला प्रसन्न करणे. ह्यामुळे बौद्धधम्माला 'मजहब' किंवा 'धर्म' म्हणता येत नाही.

**प्रश्न १७८ (ब) : बौद्धधम्माविषयी कोणकोणते चुकीचे समज प्रचलित आहेत ?**

**उत्तर** - त्यांचा सारांश येणेप्रमाणे -

१) असा समज की, **बौद्धधम्म** वस्तुतः धम्म नाही, ते केवळ तत्त्वज्ञान आहे. परंतु सत्य हे आहे की बौद्धधम्म हा धर्म, नीती आणि तत्त्वज्ञान यांचा सुंदर संगम आहे. त्याचा आर्य-अष्टांगिक मार्ग पूर्णतः व्यावहारिक आहे.

२) असा समज की, **बौद्धधम्म** निरीश्वरवादी ऊर्फ नास्तिक आहे. तो निरीश्वरवादी आहे हे खरे. बौद्धधम्म कोण्या सर्वशक्तिमान, सर्वव्यापी आणि सर्वज्ञ 'पुरुष' रूपी ईश्वरास मानीत नाही.

बौद्धधम्म मानवास अंधश्रद्धेचा त्याग करून त्या जागी ज्ञानाची (प्रज्ञेची) स्थापना करावयाची शिकवण देतो. येणेप्रमाणे तो माणसाच्या कर्तृत्वास आशावान आणि आशाप्रद बनवितो, म्हणून बौद्धधम्मास 'आस्तिक' म्हणावयास हवे, नास्तिक नव्हे.

३) असा समज की, **बौद्धधम्म** शून्यवादी आहे. हा समज चुकीचा आहे. त्याची शिकवण अशी आहे की ज्याप्रमाणे महासागर एकसारखा खारटरसमय असतो, त्याचप्रमाणे धम्मदेखील विमुक्ती-रसमय आहे. धम्म आध्यात्मिक असून त्याचा उद्देश विमुक्ती म्हणजे 'निर्वाण' आहे जे अत्यंत सुखमय आहे. निर्वाण म्हणजे शून्यता नव्हे. निर्वाणाचा अर्थ अविद्येचा नाश, राग, द्वेष, मोह ह्यांचा नाश, कामतृष्णा, भवतृष्णा आणि विभवतृष्णेचा नाश.

४) असा समज की, **बौद्धधम्म** निराशावादी (Pessimist) आहे; केवळ 'दुःखाची' चर्चा करतो. हे सत्य नव्हे. तो दुःखाच्या अस्तित्वाला कबूल करतो, परंतु सोबतच दुःखापासून मुक्ती मिळविण्याचा मार्गदेखिल दाखवितो तो मार्ग आहे आर्य-अष्टांगिक मार्ग. तो देहदंडाचा, केवळ तपस्येच्या जीवनाचा म्हणजे जे शेवटचे टोक आहे त्याचा किंवा वासनामय, तृष्णामय जीवन जगणे म्हणजे जे दुसरीकडील शेवटचे टोक आहे त्याचा, अशा दोन्ही मार्गांचा त्याग करून 'मध्यममार्गाचा' रस्ता दाखवितो. त्यामुळे दुःखापासून मुक्ती मिळून निर्वाण म्हणजेच परमसुख मार्ग उघडला जातो. (विस्तृत माहितीकरीता टीप क्र. १५ बघावी)

**प्रश्न १७९ : बौद्धधम्माचा सिद्धान्त थोडक्यात काय आहे ?**

**उत्तर**-थेरवादी बौद्धधम्माचा सिद्धान्त म्हणजे भगवंतांनी स्वतः सांगितलेला सिद्धान्त येणेप्रमाणेः

१) सर्व वस्तू कारणामुळे उद्भवतात कोणतीही गोष्ट स्वयंभू नाही.
२) सर्वच वस्तू परिवर्तनशील आहेत. कोणतीही नित्य (Permanent) नाही.
३) कोणी नित्य आत्मा किंवा ईश्वर अस्तित्वात नाही.
४) वर्तमान जीवनाचे अस्तित्व पूर्वजीवन-प्रवाहामुळे आहे व पुढील जीवनाचे अस्तित्व सध्याच्या जीवनाच्या कर्मनियमावर अवलंबून असते.
५) संसाराचे (जीवनमृत्यूचे) दुःखाचे चक्र आर्य-अष्टांगिक मार्गाचे अवलंबन करूनच थांबविता येते व निर्वाण प्राप्त करता येते व जीवन सुखपूर्वक व्यतीत करता येते. (टीप १६ बघावी)

**प्रश्न १७९ (अ) : बौद्धधम्माच्या तत्त्वज्ञानात अनित्य, दुःख आणि अनात्म ह्यांचा काय अर्थ आहे ?**

**उत्तर** - बौद्ध तत्त्वज्ञानाचे तीन स्तंभ आहेत : १) अनित्य, २) अनात्म आणि ३) दुःख. अनित्य (अनिच्च) म्हणजे जे कायमचे स्थिर नाही, क्षणिक आहे, क्षणभंगुर आहे,

परिवर्तनशील आहे, बदलणारे आहे. सृष्टीमध्ये 'मी नाही', 'माझे नाही', 'माझ्या वशीभूत नाही' असा भाव. अहंभाव नसणे. जगात आत्म्याचे अस्तित्व नाही. 'दुःख' हे प्रथम आर्यसत्य होय. म्हणजेच दुःखाला अस्तित्व आहे.

**प्रश्न १८० : सर्वच व्यक्ती बुद्ध होऊ शकतात काय ?**

**उत्तर** - बुद्ध होणे प्रत्येक मनुष्याच्या स्वभावात नसते. माणसाच्या मनाचा विकास होत होत तो बोधिसत्त्व झाल्यावर मगच कालांतराने सतत प्रयत्नांनी तो बुद्धत्वास पोहोचू शकतो. प्रत्येक मानव अविद्येवर मात करून आणि प्रज्ञा प्राप्त करून निर्वाणाप्रत पोहोचू शकतो.

**प्रश्न १८१ : बुद्ध शब्दाचा अर्थ काय आहे ?**

**उत्तर** - सम्बोधी प्राप्त झालेला किंवा जो ज्ञानाने परिपूर्ण आहे असा. बोधी म्हणजे बुद्धत्व किंवा महान ज्ञान आणि सत्त्व म्हणजे प्राणी. बोधिसत्त्व म्हणजे जो कधी ना कधी निश्चितपणे बुद्ध किंवा महाज्ञानी बनेल, असा बुद्धत्व प्राप्तीसाठी प्रयत्नशील माणूस. बुद्धत्व प्राप्त होण्यापूर्वी राजकुमार सिद्धार्थाला बोधिसत्त्वच म्हणत असत. भ. बुद्धांच्या शिकवणीनुसार अशा प्रत्येक मनुष्याला बुद्धत्व प्राप्त होऊ शकते, ज्यास अविद्या व दुःख नष्ट करावयाचे ज्ञान प्राप्त आणि आत्मसात झालेले असेल असा.

**प्रश्न १८१ (अ) : 'बोधी' कशाला म्हणतात ?**

**उत्तर** - 'बोधी' म्हणजे प्रज्ञा. आपल्या अनुभूतीद्वारे सत्याचा साक्षात्कार, आंतरिक सत्याचे ज्ञान, चार आर्यसत्यांना आत्मसात करणारे ज्ञान.

बोध्यंग (= बोज्झंङ्) म्हणजे बोधीची सात अंगे :- स्मृती, धर्मविचय, वीर्य, प्रीती, समाधी आणि उपेक्षा.

बोधिचरिया म्हणते बोधीचे आचरण, बोधीचे जीवन जगणे.

बोधिचित्त म्हणजे सर्व प्राण्यांचा उद्धार व्हावा ह्या सदिच्छा बुद्धतत्त्वाच्या प्राप्तीकरता सम्यक संबोधीमध्ये चित्ताचे प्रतिष्ठित होणे. बोधिपक्ष (बोधिपक्ख) म्हणजे चार आर्यसत्यांकडे घेऊन जाणारा मार्ग, ज्ञानाचा पक्ष.

बोधिसत्त्व (बोधिसत्त) म्हणजे ज्याने पारमिता पूर्ण करण्याचा संकल्प केलेला आहे, ज्याने बोधिचित्त ग्रहण केलेले आहे आणि जो महाकरुणेचा पुरस्कर्ता असतो असा साधक.

**प्रश्न १८२ : अविद्या व दुःख दूर करावयास प्रकाशाचा मार्ग तो कोणता ?**

**उत्तर** - भ. बुद्धांनी सांगितल्याप्रमाणे चार आर्यसत्यांचे ज्ञान. ही 'चार आर्यसत्ये' येणेप्रमाणेः

१) जन्म, व्याधी, जरा, मरण, प्रिय गोष्टींचा वियोग, अप्रिय गोष्टींचा संयोग ही मानवाची दुःखे होत (दुःख).

२) सतत उद्‌भवणारी व कधीच संतुष्ट न होणारी, अन्त नसलेली तृष्णा, हीच दुःख निर्माण होण्यास कारणीभूत आहे (दुःखसमुदय).

३) त्या तृष्णेचा नाश किंवा तिच्यापासून एखाद्याची सुटका होऊ शकते, म्हणजेच दुःखाचा विनाश होऊ शकतो. (दुःखनिरोध)

४) दुःखाचा विनाश करणारी साधने, म्हणजेच आर्य अष्टांगिक मार्गाने दुःखाचा विनाश

होतो. (दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा).

**प्रश्न १८३ : जाति, जरा, मरण ह्यांचा नाश करण्याकरिता सिद्धार्थ-गौतमाने गृहत्याग केला काय ?**

**उत्तर** – नाही. जाति, जरा, मरण ह्या गोष्टी नैसर्गिक आहेत. जाति म्हणजे जन्म घेणे. परंपरागत उत्तर असे आहे की, ते स्वतः जन्म-मरणापासून मुक्त झाले, म्हणजे तोच त्यांचा अंतिम जन्म होता. परंतु शास्त्रीयदृष्ट्या त्याचे उत्तर असे देता येईल की, जरा, व्याधी, मरण ह्यांच्या भीतीमुळे उत्पन्न होणारी अशांती (अस्वस्थता) हिच्यापासून ते मुक्त झाले होते व त्यांना आनंदमय असे निर्वाणसुख प्राप्त झालेले होते. भ. बुद्धांनी उपदेशीलेली शास्त्रीय - मुक्ती ती हीच होय.

**प्रश्न १८४ : भगवान बुद्धांनी दुःख, दुःख समुदय, दुःख निरोध आणि दुःख निरोधगामिनी प्रतिपदा यांचा उपदेश दिला आहे. दुसरे लोकही ह्याच प्रकारचा उपदेश देतात. तर मग भगवंतांच्या उपदेशात व इतरांच्या उपदेशात फरक कोणता ?**

**उत्तर** – दुःखाचे अस्तित्व आहे, ही गोष्ट कोण नाकारू शकतो ? ते सर्वच जण जाणतात. फक्त मतभेद दुःखाच्या कारणाविषयी आहे. काहीजण म्हणतात की, मनुष्य या जन्मी जे काही बरे वाईट भोगतो त्याचे कारण त्याच्या पूर्वजन्मीची कर्मेच असतात. भ. बुद्धांना हे मत मान्य नव्हते. म्हणून त्यांचा दुःख-मुक्तीचा मार्गही वेगळा होता. काहीजण म्हणतात की, मनुष्य जे काही सुख-दुःख भोगतो, ते सर्व ईश्वरनिर्मित आहे. भगवंतांना हेही मत मान्य नव्हते. म्हणून त्यांचा दुःखक्षयाचा मार्ग वेगळा आहे. काही जण म्हणतात की, जे काही सुख-दुःख आहे, ते असणे स्वाभाविक आहे. अशा स्थितीत मनुष्याच्या पुरुषार्थाची काहीच आवश्यकता राहत नाही. भ. बुद्धांना हेही मत मान्य नव्हते. म्हणून त्यांच्या दुःखक्षयाचा मार्ग निश्चित आहे, आणि तो आहे 'आर्य-अष्टांगिक मार्ग.'

**प्रश्न १८५ : दुःखाला कारण होणाऱ्या गोष्टी कोणत्या ?**

**उत्तर** – असंतुष्ट इच्छा आणि अविद्येमुळे उद्भवणारी तृष्णा या गोष्टी दुःखास कारणीभूत होतात. त्यापासून सुटका करण्याकरिता त्यांच्यावर पूर्ण विजय मिळवावयास हवा. तसेच जन्म, ऱ्हास, आजारपण, मृत्यू, प्रिय गोष्टींचा वियोग, अप्रिय गोष्टींशी संयोग, न मिळणाऱ्या गोष्टींविषयीची तृष्णा, ह्या गोष्टी दुःखाला कारण होतात. दुःखाला कारणीभूत होणाऱ्या गोष्टी व्यक्तीनुसार वेगवेगळ्या असतात. परंतु कमीअधिक प्रमाणात सर्वच लोकांना दुःखे भोगावी लागतात.

**प्रश्न १८६ : मानवी दुःखाचे मूळ भगवंतांनी कशात असल्याचे सांगितले आहे ?**

**उत्तर** – अज्ञान-अविद्येत. ह्यावर उपाय म्हणजे अविद्येचा नाश करून प्रज्ञाशील होणे. अविद्या म्हणजे खऱ्या वस्तुस्थितीचे ज्ञान न होणे. जे बहुमोल नसेल ते आपणास बहुमोल वाटते, जेव्हा आम्ही दुःखी व्हायला नको, तेव्हा आपणास दुःख होते; जे भ्रामक असेल ते आपणास खरे वाटते आणि जे खरोखरच अत्यंत बहुमोल असेल त्याकडे दुर्लक्ष करून आपण तृष्णेचा

पाठलाग करतो आणि निरुपयोगी वस्तूचा पाठलाग करण्यात आपले जीवन घालवितो. ह्या अविद्येचा नाश करून प्रज्ञाशील झाल्याने दुःखाचा नाश होतो.

**प्रश्न १८७ : धार्मिक जीवन म्हणजे काय ?**

**उत्तर** - आपल्या स्वतःकरिता आणि समाजाकरिता कमीतकमी दुःख आणि जास्तीतजास्त सुख अर्जित करता येईल अशा तऱ्हेचे जीवनयापन आपणास करता यावे, अशी सदाचाराची वागणूक म्हणजेच धार्मिक जीवन होय.

दुःख म्हणजे 'असंतोषप्रद' भाव. लोक बहुधा पाच उपादान स्कंध आणि पांच स्कंध ह्यांत फरक मानीत नाहीत आणि असे समजतात की, स्कंध म्हणजेच दुःख होत. पण खरी गोष्ट ही आहे की, पांच स्कंधांविषयी आसक्ती उत्पन्न झाली म्हणजे त्यांना उपादान स्कंध म्हणतात व त्यांच्यामुळे दुःखाची उत्पत्ती होते. पांच स्कंधांप्रती असलेल्या आसक्तीचा क्षय झाला म्हणजे दुःखाचा क्षय होतो. पांच स्कंध म्हणजे रूप, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञान ही स्वतःच दुःखे नाहीत किंवा दुःखाचा क्षय नाहीत.

**प्रश्न १८८ : दुःखाला कारणीभूत होणाऱ्या असंतुष्ट इच्छा आणि अविद्येमुळे उद्‌भवणाऱ्या तृष्णेपासून आपली सुटका कशी होऊ शकते ?**

**उत्तर** - जीवनाविषयीची उत्कट तृष्णा व तिच्यापासून मिळणारी शारीरिक सुखे ही दुःखास कारणीभूत आहेत. त्यांच्यावर पूर्ण विजय मिळवून आणि भ. बुद्धांनी शोधून काढलेल्या आणि समजावून सांगितलेल्या आर्य अष्टांगिक मार्गाचे (अरियो अट्ठांगिको मग्गो) अनुसरण करून तृष्णेपासून सुटका होऊ शकते. ह्या मार्गाच्या आठ भागांना 'अंगे' असे म्हणतात. ती पुढे दिल्याप्रमाणे आहेत-

१) सम्यकदृष्टि (सत्यास सत्य व असत्यास असत्य जाणणे) २) सम्यक संकल्प ३) सम्यक वाचा ४) सम्यक कर्मान्त ५) सम्यक आजीविका ६) सम्यक व्यायाम (प्रयत्न) ७) सम्यक स्मृती आणि ८) सम्यकसमाधफ़ (दृढपूर्वक मनन चिंतन).

जो मनुष्य ह्याचे मनःपूर्वक चिंतन आणि त्याचे अनुसरण करतो, तो दुःखापासून मुक्त होतो आणि शेवटी निर्वाणाप्रत पोहोचतो.

**प्रश्न १८८ (अ) : आर्य-अष्टांगिक मार्गाने शील-समाधी-प्रज्ञेची प्राप्ती कशी होते ?**

उत्तर - आर्य-अष्टांगिक मार्गाचे तीन भाग आहेत -

अ. प्रज्ञा स्कंध : १. सम्यक दृष्टी २. सम्यक संकल्प

ब. शील स्कंध : ३. सम्यक वाणी ४. सम्यक कर्मान्त ५. सम्यक् आजीविका

क. समाधी स्कंध : ६. सम्यक व्यायाम ७. सम्यक स्मृती ८. सम्यक समाधी

१) सम्यक दृष्टी (सम्मा दिट्ठी) म्हणजे जसे असेल तसेच बघावयाची दृष्टी. यथाभूत ज्ञान दर्शन. स्थूलपणापासून सूक्ष्मपणापर्यंत जसे असेल तसेच जाणून घेणे व समतेचा भाव राखणे. कोणत्याही गोष्टीकडे बघताना तिच्यावर आपल्या आवडीचा किंवा विरोधाचा लेप न चढविता तिचे यथाभूत मूल्यांकन करणे.

२) सम्यक संकल्प (सम्मासंकप्पो) म्हणजे योग्य संकल्प, उत्तम संकल्प, राग (प्रेम किंवा आवड, प्रेमविहीन किंवा द्वेषविहीन विचार, चिंतन, मनन. शीलाचे पालन करणे म्हणजे

काया व वाचा ह्यांच्या दुष्कर्मापासून दूर राहून सदाचारी जीवन व्यतीत करणे.

३) सम्यक वाणी (सम्मा वाचा) : म्हणजे शुद्ध, पवित्र वाणी, असत्य भाषण, चुगली, निंदा, छल-कपटपूर्ण बोलणे, कटू-कठोर बोलणे, शिव्या किंवा निरर्थक, निकम्मेपणाच्या गप्पा गोष्टी, अनावश्यक बोलचाल न करणे. ह्या गोष्टींना वाणीचा मळ म्हटलेले आहे, त्यांच्यापासून आपला बचाव केला पाहिजे. ह्यांना सोडून इतर संभाषणास पवित्र समजावे.

४) सम्यक कर्म (सम्मा कम्मन्तो) म्हणजे उत्तम कर्म करणे.

**प्रश्न १८९ : तृष्णेची उत्पत्ती कशी होते ?**

**उत्तर** – तृष्णा ही आपोआप उत्पन्न होत नाही. ती काही कारणांमुळे उत्पन्न होते. कार्य-कारण नियमावर ती अवलंबून आहे. भगवंतांच्या शब्दांत सांगायचे म्हणजे **'इमस्मिन् सति इदम् होति, इमस्य उप्पादा इदम् उपज्झति'** हे असे असल्यामुळे त्याची निर्मिती होते. त्याची निर्मिती झाल्यामुळे ह्याचा उद्गम होतो. (This having been, that comes to be; from the arising of this, that arises).

बौद्धधम्मात कार्यकारण नियमास (Law of Causation) प्रतीत्य समुत्पाद (= पटिच्च समुप्पाद) म्हटलेले आहे. प्रतीत्य म्हणजे ह्या कारणामुळे किंवा यावर अवलंबून; समुत्पाद म्हणजे निर्माण होणे किंवा उद्भवणे म्हणून प्रतीत्य समुत्पाद म्हणजे अवलंबित उद्भव (Dependent Origination) तृष्णेचा उद्भव होण्याचे मूळ कारण, येणेप्रमाणे भगवंतांनी शोधून काढले आणि या प्रतीत्यसमुत्पादाच्या नियमाद्वारे (Law of Dependent Origination) त्यांनी संसाराचे रहस्य शोधून काढले. म्हणजे पुनःपुन्हा होणाऱ्या निर्मितीचे किंवा पुनर्जन्माचे, पुनःपुन्हा होणाऱ्या जन्ममृत्यूच्या साखळीचे रहस्य त्यांनी शोधून काढले.

**प्रश्न १८९ (अ) : तृष्णा किती प्रकारची असते ?**

**उत्तर** – तृष्णा तीन प्रकारची असते.

१) काम तृष्णा : भौतिक सुखांची इच्छा, भोग वासना, जे सध्या मिळालेले आहे त्यात संतोष नसणे, जे मिळालेले नाही, त्याविषयी इच्छा करणे, इन्द्रियसुखांची आसक्ती.

२) भव तृष्णा : जिवंत राहावयाची तीव्र इच्छा. मृत्युनंतर देखील स्वर्गलोकात किंवा ब्रह्मलोकात जिवंत राहावयाची लालसा. 'मी', 'माझे', नेहमीच असावे अशी इच्छा. 'मी' राहावा अशी शाश्वत राहावयाची इच्छा.

३) विभव-तृष्णा : पुनः उत्पन्न होणारच नाही, पुनर्जन्म नाहीच, असे मानून, भोगविलास यांची इच्छा. सुख आणि वैभवाचा कामनेपूर्तीसाठी चांगले-वाईट, नैतिक-अनैतिक सर्व प्रकारची साधने वापरणे. 'जोपर्यंत जगायचे भोगविलासात जगायचे' अशी इच्छा.

यास्तव माणसाने जे चांगल्या मार्गाने मिळत नसेल त्याचा लोभ करू नये. अतिलोभामुळे दुःख निर्माण होते. (बघावा प्रश्न २९५)

**प्रश्न १८९ (ब) : उपादान आणि तृष्णेचा काय संबंध आहे ?**

**उत्तर** – उपादान म्हणजे तृष्णेची घोर आसक्ती तृष्णा नेहमीच असावी, सदोदित रहावी असा विचार.

१) ज्या वस्तुविषयी तृष्णा जागृत झालेली आहे आणि जोपर्यंत ती पूर्ण होत नाही, तोपर्यंत व्याकूळ राहणे आणि तृष्णा पूर्ण झाली की दुसरीला जागृत करणे व आणखी दुसऱ्या वस्तूची पृच्छा करणे व ती पूर्ण होताच तिसऱ्या वस्तूची इच्छा करणे; अशा प्रकारची अंतहीन तृष्णा. तृष्णा बीनबुडाच्या बादलीप्रमाणे असते. तिच्याविषयी घोर आसक्ती, जिची कधीच पूर्णता होत नाही, जे आहे त्याविषयी असंतुष्ट, जे नाही तिचा हव्यास.

२) 'मी' आणि 'माझे' ह्याविषयी घोर आसक्ती. माझी वस्तू तुटली, लुटल्या गेली तर व्याकूळ होणे. अहंभावाविषयी तीव्र आसक्ती, शरीर आणि मन पंचस्कंधाविषयी घोर आसक्ती.

३) आपली परंपरा, आपले तत्त्वज्ञान इत्यादी विषयी घोर आसक्ती.

४) आपल्या शीलव्रत-परामर्शा विषयी आसक्ती ठेवणे. आपली व्रतवैकल्ये, उपवास, पूजापाठ, तीर्थस्थान इत्यादीच्याप्रति आवड आणि आसक्ती ठेवणे. त्यांनाच मुक्तीचा मार्ग समजून त्यांच्याविषयी घोर आसक्ती ठेवणे.

**प्रश्न १८९ (क) : माणूस तृष्णेचा दास कसा बनतो ?**

उत्तर - शरीराच्या भुकेचे शमन करावयास आहार ग्रहण करावयाची नैसर्गिक आवश्यकता असते. परंतु भरपूर जेवल्यानंतर जिभेच्या स्वादासाठी आंबट, गोड, तिखट, चटपटे पदार्थ खात राहणे तृष्णेची गुलामी होय.

तहान लागल्यावर स्वच्छ शीतल जल ग्रहण करणे नैसर्गिकच असते, परंतु केवळ चव वाढविण्याकरिता तहान नसतानासुद्धा स्वादिष्ट पेय पीत राहणे तृष्णेची गुलामी होय. याचप्रमाणे नेहमी नवनवीन फॅशनची चमकदार भडक वस्त्रे परिधान करणे व ऐश्वर्य-प्रदर्शनाच्या शर्यतीत लीन होणे, तृष्णेची गुलामी होय. विभिन्न डिझाईनच्या जोडे-चपलांचे ढीग लावणे व वैभवाचे प्रदर्शन करावयाच्या लालसेने त्यांचा उपयोग करणे तृष्णेची गुलामी होय. पद-प्रतिष्ठेकरिता व्याकुळ होणे किंवा त्यांना चिपकून राहणे, विवाह समारोहाच्या वेळी अवडंबर आणि वैभवाचे प्रदर्शन करणे, इत्यादी तृष्णेची गुलामीच होय. आपल्याला प्रत्येक नैसर्गिक आवश्यकतेला तृष्णेच्या गुलामीहून वेगळे करून, त्यावर नजर ठेवणे आवश्यक आहे आणि आवश्यकता व तृष्णा यांच्या भिन्नतेला जागरूकतेने जाणत राहिले पाहिजे.

**प्रश्न १८९ (ड) : तृष्णा उत्पन्न झाल्याने स्पंदन-संवेदन होते का ?**

**उत्तर** - होय. तृष्णा उत्पन्न झाल्याबरोबर शरीर आणि मनावर अत्यंत सूक्ष्म संवदेन होऊ लागते. ही संवेदना जागृत मनाला जरी जाणवत नसली तरी ती अर्धजागृत मनाला होतच असते. जोपर्यंत इच्छित वस्तू प्राप्त होत नाही, तोपर्यंत हे स्पंदन-संवेदन सुरूच राहते.

स्नायूंमधील तंतूमधे ते तणाव उत्पन्न करते. मनामधे विकारांच्या गाठी उत्पन्न करते. परंतु ह्या तणावामधे आणि ह्या ग्रंथींमध्ये अप्रिय संवेदन असले तरी त्या संवेदनेविषयी एक प्रकारचे संमोहन असते, आणि त्या संमोहन-शक्तीमधे अर्धचेतन मन (Sub-consicous mind) हळूहळू डुबक्या घेत असते व त्यांतच बुडून राहण्याची सवय लागते. ह्या तृष्णेमुळे उत्पन्न झालेल्या संमोहनात डुंबून राहावयाचे त्यास व्यसनच लागते आणि मन त्या सवयीस चिपकून जाते.

जेव्हा इच्छापूर्ती होते, तेव्हा हे विशिष्ट प्रकारचे स्पंदन-संवेदन काही वेळेसाठी थांबते. त्यावेळी आपल्या अंतर्मनावर एक वेगळ्या प्रकारचे स्फुरण झाल्यासारखी संवेदना होऊ लागते, जी आपल्याला सुखद वाटते, प्रिय वाटते, रोचक वाटते; परंतु ती खूप वेळ टिकत नाही. ती जेव्हा थांबते, तेव्हा कामनेचे, तृष्णेचे पूर्वीचे स्पंदन-संवेदन पुनः जागृत होते. ह्या अग्नीला सतत प्रज्वलित ठेवण्याकरिता आपण नेहमी नवनवीन इंधन तयार करीत असतो. रूप, रस, गंध, शब्द, स्पर्श आणि मनोविकल्प यांच्या सहाय्याने नवनवीन इंधन तयार करतो. हीच ती तृष्णेची आसक्ती.

**तण्हाय जायते सोको, तण्हाय जायते भयं।**
**तण्हाय विप्पमंतस्स, नत्थि सोको कुतो भयं।।**

**अर्थ** : तृष्णेमुळेच शोक उत्पन्न होतो, भय उत्पन्न होते. तृष्णेपासून मुक्त झाल्याने, शोकच राहणार नाही तर भय कसे राहणार ?

**प्रश्न १९० : सम्यक् दृष्टी म्हणजे काय ? (सम्मादिट्ठी Right understanding)**

**उत्तर** - भ. बुद्धांच्या उपदेशानुसार -

१. दुराचरणाला दुराचरण समजणे 'सम्यक दृष्टी' होय २. सदाचरणाला सदाचरण समजणे 'सम्यक दृष्टी' होय ३. लोभ, मोह, द्वेष ह्यांना दुराचरणाचे मूळ समजणे 'सम्यक दृष्टी' होय. ४. अलोभ, अमोह, अद्वेष ह्यांना सदाचरणाचे मूळ समजणें 'सम्यक दृष्टी' होय. ५. दुःख, दुःखसमुदय, दुःखनिरोध आणि दुःखाचा निरोध करणारा मार्ग ह्या सर्वांना समजून घेणे 'सम्यक दृष्टी' होय. ६. दहा चित्तबंधनापासून मुक्त होण्याचा प्रयत्न करणे 'सम्यक दृष्टी' होय. ७. मनांत आत्म्याला स्थान न देणे 'सम्यक दृष्टी' होय. ८. कोणत्याहि दृष्टिला चिकटून न राहणे 'सम्यक दृष्टी' होय. ९. प्रतीत्य समुत्पाद म्हणजे काय ह्याचे सत्यज्ञान होणे 'सम्यक दृष्टी' होय. १०. बुद्धीने कोणतीही गोष्ट योग्यअयोग्य मानणे 'सम्यक दृष्टी' होय.

अविद्येचा विनाश हाच सम्यक दृष्टीचा उद्देश आहे. ती मिथ्या दृष्टीची विरोधिनी आहे. कर्मकांड आणि क्रियाकलाप याना व्यर्थ समजणे, शस्त्रांचा अयोग्य उपयोग करणे मिथ्या आहे, असे समजणे सम्यक दृष्टी होय. मिथ्या विश्वासापासून मुक्ती, प्रकृतीच्या नियमांविरुद्ध एखादी गोष्ट घडू शकते असे न मानणे, सम्यक दृष्टी होय. कपोलकल्पित गोष्टी ज्यांचा यर्थाततेशी आणि अनुभवांशी संबंध नाही, अशा गोष्टींवर विश्वास न ठेवणे सम्यक दृष्टी होय. माणसाचे मन स्वतंत्र आणि विचार स्वातंत्र्य राखणे, सम्यक दृष्टी होय. आर्य-अष्टांगिक मार्गामध्ये सम्यक दृष्टी श्रेष्ठतम आहे. सम्यक दृष्टी श्रेष्ठतम जीवनाची गुरुकिल्ली होय.

**प्रश्न १९० (अ) : मनाची स्वाभाविक अवस्था कशी असते ?**

उत्तर - १) मन अत्यंत चंचल आहे. एक क्षणदेखिल टिकून राहत नाही. वर्तमान क्षणी टिकतच नाही. सदासर्वदा भूतकाळातील आठवणीत किंवा भविष्यकाळाच्या कल्पनेमध्ये ते रमण करीत असते.

२) त्याला मोहाच्या अवस्थेत राहणे आवडते. कसल्या गोष्टीचे तारतम्य राहत नाही. एक विचार आला की उडी मारून दुसऱ्याच विचारात ते गुंतून जाते, ज्याचा आधीच्या विचाराशी काहीच संबंध नसतो. ते वेड्यासारखे भटकत राहते.

३) ते राग-रंजित (प्रेमवेडे) किंवा द्वेषदूषित असते. एखाद्या गोष्टीचा प्रारंभ जरी झाला तरी ती एकतर प्रिय वाटणारी असते नाहीतर अप्रिय वाटणारी असते. प्रिय असली तर 'पाहिजे' आणि अप्रिय असली तर 'नको' असा भाव असतो.
४) मन समयाच्या जाळ्यात गुंतून असते.
५) विकारांनी ओतप्रोत असे मन हजारो प्रकारच्या खोट्या कल्पनांचे जाळे विणीत असते, त्यामुळे ते शांत नसते.
६) असत्य गोष्टींनी भरलेले मन सत्याचा शोध लावूच शकत नाही. म्हणून मनाला वर्तमानातील तथ्य जाणून घ्यावयास लावणे व त्यास त्याचा बोध करविणे, हेच धम्मकार्य होय.

**प्रश्न १९१ : सम्यक-संकल्प ह्याचा अर्थ काय? (सम्मा संङ्कप्प Right Thoughts)**
**उत्तर** – संकल्प म्हणजे दृढ विचार. मनुष्याच्या मनात संकल्प-विकल्पांचा (अस्थिर विचार) उदय होणे स्वाभाविक आहे. परंतु संकल्प विकल्पांचे 'सम्यक' होणे नितांत आवश्यक आहे. ज्या संकल्पाच्या योगाने आत्महिताबरोबरच परहितही साधले जाते, त्याला 'सम्यक-संकल्प' म्हणतात. बौद्ध परंपरेनुसार जनतेची सेवा करण्याच्या उद्देशाने, साधनेद्वारे, स्वतःला समर्थ बनविण्याच्या उद्देशाने गृहत्याग करणे 'सम्यक-संकल्प' होय. अक्रोध तसेच अहिंसाभाव हे 'सम्यक-संकल्प' आहेत.

माणसाच्या आशा, आकांक्षा आणि महत्त्वाकांक्षा असतात. 'सम्यक-संकल्प' म्हणजे आपल्या आकांक्षा उच्चस्तरीय असाव्यात, निम्न स्तराच्या नसाव्यात; त्या योग्य असाव्यात, अयोग्य नसाव्यात.

**प्रश्न १९२ सम्यक वाणी कशाला म्हणतात ? (सम्मा वाचा Right Speech)**
**उत्तर** – शब्दांची भाषा हीच व्यक्तीला समाजाशी बांधून ठेवणारी साखळी होय. त्यामुळे शब्दांना अतिशय महत्त्व आहे. शब्दांचा सम्यक उपयोग करणे सर्व दृष्टीने यथार्थ आहे. 'मौन' स्वीकारून जे 'मुके बनण्याचे नाटक करतात' त्यांचा बौद्धधम्मात निषेध केलेला आहे. ''मौन'' धारण करणारे तोंडाने कांही बोलत नसले, तरी त्यांच्या मनात विचारांचे तुफान उठलेले असते. मौन राहणें म्हणजे सम्यक वाणी साधणे नव्हे. सम्यक वाणी साधण्याकरिता बोलणे अत्यंत आवश्यक आहे. परंतु असे बोलावे की, ज्यात - १) एकही शब्द मिथ्या नसावा २) एकही शब्द मर्मावर आघात करणारा नसावा ३) कोणाची चुगली करणारा किंवा व्यर्थ नसावा ४) दुसऱ्यांविषयी खोटया गोष्टी न बोलणे, आणि ५) कोणाहीबरोबर विनम्र वाणीचा व्यवहार करणें, सम्यक वाणी होय.

अशी वाणी आत्मसात करावयास अतिशय परिश्रम करावे लागतात. कधीकधी सत्य बोलण्याकरिता कठोर वाणीचाही उपयोग करावा लागतो. अशा सत्य पण कठोर वाणीने आत्महिताबरोबरच परहीतदेखिल साधले जात असेल तर तसे बोलणे आवश्यक असते. सम्यक वाणीचा व्यवहार न कुणाच्या भीतीची पर्वा करतो न कुणाच्या पक्षपाताची. सम्यक वाणीमुळे आपले काय नुकसान होईल, याचीही पर्वा करावयाची नसते. कोण्या वरिष्ठ व्यक्तीने आदेश दिला आहे म्हणून सम्यक वाणीचा त्याग करू नये.

**प्रश्न १९३ : सम्यक्-कर्मान्त म्हणजे काय ? (सम्मा कम्मन्तो Right Actions)**

**उत्तर** - सद्सद्विवेक बुद्धीने विचार करून नंतरच योग्य गोष्टीला योग्य मानणें, म्हणजे 'सम्यक दृष्टी' होय त्यानुसार आचरण करणें, यालाच 'सम्यक-कर्मान्त' म्हणतात. हिंसा करणे, चोरी करणे, व्याभिचार करणे ह्या गोष्टी सम्यक दृष्टीनुसार समाजविरोधी असल्यामुळे, त्या गोष्टी न करणें, 'सम्यक्-कर्मान्त' होय.

**प्रश्न १९४ सम्यक आजीविका म्हणजे काय ? (सम्मा आजीवो Right Livelihood)**

**उत्तर** - आजीविका म्हणजे जीवन निर्वाहाचे साधन. त्याशिवाय कोणताही प्राणी जिवंत राहू शकत नाही. 'भिक्षा' मागून निर्वाह करणेदेखील एक प्रकारची आजीविकाच होय. मनुष्याची आजीविका अशी असावी कीं, त्याचे भरणपोषण तर व्हावेच, परंतु तसे करतांना दुसऱ्याची हानी होऊ नये. बौद्ध परंपरेनुसार शस्त्रांच्या व्यापाराला 'मिथ्या आजीविका' म्हटले आहे. कारण शस्त्रांची निर्मिती मनुष्यघातास कारणीभूत होते. आज शस्त्रांचे व्यापारी जगातील मोठमोठे उद्योगपती मानले जातात. शस्त्रांचा व्यापार ज्याप्रमाणे समाजहितविरोधी व्यापार आहे, तसाच गुलामांचा व्यापारदेखील समाजहितविरोधी आहे.

**प्रश्न १९५ : सम्यक व्यायाम कशाला म्हणावे ? (सम्मा व्यायामो Right Effort)**

उत्तर - आजकाल 'व्यायाम' शब्दाने 'शारीरिक व्यायामाचा' बोध होतो. पूर्वी 'व्यायाम' शब्द 'प्रयत्न' ह्या अर्थाने उपयोगात आणीत असत. आपणांस निरनिराळ्या उद्देशांची प्राप्ती करण्यासाठी नाना प्रकारचे प्रयत्न करावे लागतात. परंतु सर्वश्रेष्ठ प्रयत्न त्यांनाच म्हणावे की, ज्यामुळे आपले चारित्र्य घडविले जाते. १) कोणत्याही अकुशल प्रवृत्ती आपल्या चारित्र्याचे अंग बनू नयेत. २) यदाकदाचित चारित्र्यात काही अकुशल प्रवृत्ती असल्याच तर त्यांचा नाश व्हावा. ३) आपल्यातील कुशल प्रवृत्ती कधीही नाश पावू नयेत. ४) कुशल प्रवृत्ती वृद्धिंगत व्हाव्यात याकरिता सतत प्रयत्नशील असणे, ह्यालाच सम्यक व्यायाम म्हणतात.

**प्रश्न १९६ : सम्यक स्मृतीचा अर्थ काय ? (सम्मा सति Right Mindfulness)**

**उत्तर** - स्मृती म्हणजे सतत जागरूकता, उठताबसता, चालताफिरता, खातापीता, लहानमोठे काम करीत असतांना, करणाऱ्याचे त्याच्याकडे संपूर्ण लक्ष असायला पाहिजे त्याने अन्यमनस्क भावाने कोणतेही काम न करता जागरूकतेने करायला पाहिजे; ह्यालाच 'सम्यक-स्मृती' म्हणतात.

पक्की आठवण ठेवणे व पुण्य धम्माचा स्वीकार करणे म्हणजेच स्मृती होय. कोणते कुशल व कोणते अकुशल, कोणते दोषयुक्त व कोणते दोषरहित, कोणते सेवनीय व कोणते असेवनीय ह्याची बरोबर आठवण ठेवून पुण्य धम्म तेवढेच स्वीकारणे म्हणजेच स्मृती होय.

**प्रश्न १९७ : सम्यक-समाधी म्हणजे काय ? (सम्मा समाधी Right Concentration)**

**उत्तर** - कुशल कार्यात चित्ताची एकाग्रता होणे, म्हणजेच सम्यक्-समाधी होय. समाधी शब्दाचे अनेक अर्थ प्रचलित आहेत. जसे - श्वासोच्छ्वास रोकून धरणें, काही दिवस किंवा

तासाकरिता जिवंतपणी स्वतःला जमिनीत गाडून घेणे, श्वासोच्छ्वास चालू असला तरी जागृतीविहीन होणे, प्राणान्त होणे इत्यादिंनाही 'समाधि' म्हणतात. परंतु अशा समाधीशी 'सम्यक समाधीचा' काहीच संबंध नाही. कोणत्याही एका चांगल्या विषयावर चित्ताला एकाग्र करण्याचा प्रयत्न करणे म्हणजे सम्यक समाधी; स्वभावतः मन (चित्त) चंचल आहे. यास्तव त्याला एकाग्र-चित्त करणे म्हणजेच समाधी होय.

जेवढे पुण्यधर्म आहेत ते सर्व समाधीकडे घेऊन जाणारे आहेत. अशा तऱ्हेने समाधी प्रमुख आहे. समाधीचा अभ्यास केल्याने व समाधी लागण्यानेच खरे ज्ञान होते.

**प्रश्न १९७ (अ) : समाधीचे किती प्रकार आहेत, आणि त्यांत कसल्या अडचणी येत असतात?**

**उत्तर** - समाधी चे चार प्रकार आहेत -

१) लौकिक (लोकीय) - कामभूमि, रूपभूमि आणि अरूपभूमी ह्यांच्या कुशल चित्तांच्या एकाग्रतेच्या अवस्था.

२) लोकोत्तर (लोकुत्तर) - प्रज्ञा भावनेने निर्वाणाचा साक्षात्कार

३) उपचार - क्षीण ध्यानाची अवस्था

४) अर्पणा (अप्पणा) - दृढ ध्यानाची अवस्था.

समाधीमध्ये पाच प्रकारची विघ्ने येत असतात -

१) कामच्छन्द - विषयांत अनुराग, लोभ, मोह, कामवासनेने व्याकूळ.

२) व्यापाद - द्वेष, हिंसा, घृणा करणे.

३) सत्यान मिद्ध (= थीन मिद्ध) - बेहोशी, आळस, तंद्रा, निद्रा.

४) औधत्य-कौकृत्य (= उद्धच्च कुकुच्च) - बेचैनी, व्याकूळता, प्रक्षुब्ध होणे, पश्चात्ताप.

५) विचिकित्सा (= विचिकिच्छा) - संदेह, शंका करणे

समाधीमध्ये ध्यानाची अंगे येणेप्रमाणे.

१) वितर्क (वितक्क) २) विचार ३) प्रीती (पीति) ४) सुख आणि ५) एकाग्रता ( एकाग्गता)

समाधीचे कर्मस्थान किंवा साधन येणेप्रमाणे -

१) दहा २) दहा अशुभ ३) दहा ४) चार ब्रह्मविहार ५) एक अरूप्य ६) एक संज्ञा ७) एक व्यवस्थापन येणेप्रमाणे एकूण सदतीस.

**प्रश्न १९८ : बुद्ध समाधी का लावीत ?**

**उत्तर** - कारण की, समाधीमध्ये पुष्कळ गुण आहेत. समाधीनेच बुद्धत्व प्राप्त होऊ शकते आणि बुद्धत्व प्राप्त केल्यानंतरही समाधीच्या उत्तम गुणांना स्मरण करण्याकरिता ते समाधी लावीत असत.

समाधीचे २८ गुण आहेत. ते येणेप्रमाणे : १. आपली रक्षा होते २. जीवन दीर्घ होते ३. बळ वाढते ४. अवगुणांचा नाश होतो ५. अपयश दूर होते ६. यशाची वृद्धी होते ७. असंतोष दूर होतो ८. पूर्ण संतोष राहतो ९. भय दूर होते १०. निर्भयता येते ११. आळशीपणा दूर होतो १२. उत्साह वाढतो १३.१४.१५. राग, द्वेष, मोह नष्ट होतात

१६. खोटा अभिमान दूर होतो १७. सर्व संदेह दूर होतात १८. चित्ताची एकाग्रता वाढते १९. मन सुंदर होते २०. मन सदा प्रसन्न राहते २१. गंभीरता येते २२. मोठा लाभ होतो २३. नम्रता येते २४. प्रीती येते २५. प्रमोद होतो २६. सर्व संस्कारांच्या क्षणिकतेचे दर्शन होते २७. पुनर्जन्मापासून सुटका होते २८. श्रमणभावाचे यथार्थ फळ प्राप्त होते.

## प्रतीत्यसमुत्पादाचा सिद्धान्त

**प्रश्न १९९ : भ. बुद्धाच्या शिकवणीचा मूलभूत सिद्धान्त कोणता ?**

**उत्तर** - प्रतीत्यसमुत्पाद हा भगवंतांच्या शिकवणीचा मूलभूत सिद्धान्त होय. तो पूर्णतः विज्ञानावर (Science) आधारित असून अतिशय गंभीर स्वरूपाचा आहे. मूळ सिद्धान्त येणेप्रमाणे :

'जाती,' (जन्म घेणे) जरा व मरण ह्यांचा हेतू आहे; म्हणून 'जाती' हेच जरा-मरणाचे कारण होय.

'भव' (समष्टिगत संसार) जातीचा हेतु आहे; म्हणून 'भव' हेच जातीचे कारण होय.

'उपादान' (प्राप्त करण्यासाठी प्रयत्न) 'भवचे' कारण होय.

'तृष्णा' उपादानाचे कारण होय.

'वेदना' ही तृष्णेचे कारण आहे.

'स्पर्श' हा वेदनेचे कारण आहे.

'षडायतन' (सहा इंद्रिये) ही स्पर्शाची कारणे आहेत.

'नाम-रूप' (मन-शरीर) षडायतनाचे कारण आहेत.

'विज्ञान' नाम-रूपाचे कारण आहे.

'संस्कार' विज्ञानाचे कारण आहे.

'अविद्या' संस्कारांचे कारण आहे.

'अविद्या' म्हणजे केवळ विद्येचा अभाव नसून ती चित्ताची अंधकारमय अवस्था होय. अशा अवस्थेमध्ये जे 'अनित्य' आहे, ते 'अनित्य' असल्याचे लक्षात येणे संभवनीय नसते, जे दुःख आहे, ते दुःख असल्याचे लक्षांत येणे संभवनीय नसते. जे 'अनात्म' आहे ते 'अनात्म' असल्याचे लक्षात येणे संभवनीय नसते. ह्यास्तव अविद्या हीच संस्कारांची जनक आहे. जेथे अविद्या नाही, तेथे चित्तावर पडलेली छाया नाही, म्हणजेच संस्कार नाही.

संक्षिप्तरूपाने 'प्रतीत्यसमुत्पाद' येणेप्रमाणे -

१) अविद्येपासून संस्कार (संखार Activities) निर्माण होतात.
२) संस्कारामुळे विज्ञान (विञ्ञान Conciousness)
३) विज्ञानामुळे नामरूप (नाम रूप Mind and Matter or Body)
४) नामरूपामुळे षडायतन (सलायतन Six spheres of senses)
५) षडायतनामुळे स्पर्श (फस्स Contact)
६) स्पर्शामुळे वेदना (वेदना Feeling) सुख, दुःख, ना सुख, ना दुःख.
७) वेदनेमुळे तृष्णा (तण्हा Desire)
८) तृष्णेमुळे उपादान (उपादान Grasping)

९) उपादानामुळे भव (भव Becoming) कम्म भव आणि उपपत्तीभव
१०) भवामुळे जाति (जाती Rebirth)
११) जातीमुळे जरा, मरण, दुःख, शोक, चिंता, निराशा, चित्तखेद यांची उत्पत्ती होते. (Decay, Death, Sorrow, Lamentation, Dispair)
१२) जरा, मरण, दुःख, शोक, निराशा या दुःखाच्या स्कंधांची उत्पत्ति होते.
मूळ पाली भाषेत पटिच्च समुप्पाद येणेप्रमाणे :

**अविज्जा पच्चया संखारा, संखारा पच्चया विञ्ञानं. विञ्ञान पच्चया नामरूपं. नामरूपं पच्चया सळायतनं. सलायतन पच्चया फस्स. फस्स पच्चया वेदना. वेदना पच्चया तण्हा. तण्हा पच्चया उपादानम्. उपादान पच्चया भवो. भव पच्चया जाति. जाति पच्चया जरा-मरण-सोक-परिदेव-दुःख-दोम्मनस्स-उपायास संभवन्ति. एवं एतस्स केवलस्स दुक्खखन्धस्स समुदयो होति।**

वरील बारा निदान किंवा कड्यांपैकी प्रथम दोन भूतकालाविषयी, मधील आठ वर्तमान आणि शेवटच्या दोन भविष्यकाळाविषयी आहेत. ही प्रक्रिया सदोदित (Adinifinitum) सुरूच असते. तिची उत्पत्ती कधी झाली हे सांगता येत नसल्यामुळे, जीवाची (Life-flux) उत्पत्ती अविद्येमुळे कधी झाली, हे सांगता येत नाही. **(= अनतमग्गो यंम् संखारो. अविज्जा पुब्बकोटि न पञ्ञायरे.)**

**प्रश्न २०० : पालीभाषेमध्ये मूलभूत तत्त्व कशा प्रकारे सांगितले आहे ?**

**उत्तर -** पाली भाषेमध्ये मूलभूत तत्त्वास 'निदान' असे म्हटलेले आहे. निदान म्हणजे कारण - परंपरेची मालिका, किंवा अक्षरक्षः अर्थ घेतल्यास 'अवलंबनाचा प्रारंभ'. एकूण बारा निदाने सांगितलेली आहेत.

अविज्जा (अविद्या) - नैसर्गिक धम्माच्या सत्याविषयीचे अज्ञान,
संखार (संस्कार) - कारणामुळे होणारे कार्य,
विञ्ञाय - (विज्ञान) - व्यक्तिमत्त्वाविषयी जाणीव, जसे 'मी आहे, मी!'
नामरूप - (नामरूप) - नाम आणि रूप; (मन आणि शरीर)
सळायतन (षडायतन) - सहा इंद्रिये - नाक, कान, डोळे, जीभ, त्वचा व मन
फस्स - (स्पर्श) - संपर्क
वेदना (वेदना) - स्पर्शेंद्रियांद्वारे अनुभूति
तण्हा (तृष्णा) - सुखोपभोगाची तीव्र इच्छा
उपादान (उपादान) - चिकटून राहणे
भव (भव) - होणें, प्रत्येक अस्तित्वाला वेगवेगळे अस्तित्व मानणे; समष्टिगत संसार
जाति (जाति) - जन्म घेणे.
उपायास - विप्रयास - ऱ्हास, जरा, मरण, शोक, आक्रोश, निराशा

**प्रश्न २०० (अ) : प्रतीत्यसमुत्पाद तत्त्वज्ञान - मनोविज्ञानात प्रमुख कसे ?**

**उत्तर -** भ. बुद्धांच्या समयी 'अस्तिवाद' म्हणजे आत्मा ही शाश्वत वस्तू आहे, असे म्हणणारे तत्त्ववेत्ता होते. त्याविरुद्ध 'नास्तिवादी' म्हणजे आत्मा नावाची कोणतीही वस्तू

अस्तित्वात नाही असे म्हणणारे लोकही होते. तरीदेखील, कार्यकारण नियमानुसार बदल सुरूच असतो. (हा आत्मा नव्हे, मन होय : संकलिका)

**इदं सति इदं होति, इदं असति इदं न होति।**

म्हणजे कारण असल्यावर कार्य घडते, कारण नसल्यास कार्य घडत नाही.
भगवंतांनी कात्यायनाला सांगितले होते-

**यसब्बं अत्थीति खो कच्चान अयमेंको अंतो।**
**सब्बं नत्थीति दुतियो अंतो।**
**एते उभो अंते अनुपगम्म मज्झेत तथागतो धम्मं देसेति**
**अविज्जापच्चयासंखारा ।।पे।।**

अर्थ : हे कात्यायना! सर्वच आहे (= आत्मा नित्य आहे, अविनाशी आहे) हे एक टोक. सर्वच नाही (आत्मा नाहीच) हे दुसरे टोक. ह्या दोन टोकांना न जाता तथागत मध्यममार्गाचा उपदेश करतात. अविद्येमुळे संस्कार, इत्यादी (प्रतीत्यसमुत्पाद) (संयुक्त निकाय बघावा). अविद्येपासून संस्काराची उत्पत्ती होते. अविद्या नष्ट झाल्याने संस्कारांचा नाश होतो, इत्यादी नियम कधीही बदलणारे नाहीत त्यांना 'धर्मनिरामयता', 'धर्मस्थिती' इत्यादी शब्दांनी वर्णिले आहे. भगवंतांनी म्हटलेच आहे -

**उप्पादा वा तथागतानं निताव साधातु धर्मद्वितता धर्मनियमता इदप्पच्चयता। तं तथागतो अभिसंबुज्झति अभिसंमेन्ति। अभिसं बुज्झित्वा अभिसमेन्त्वा आचिक्खाति, देसेति पस्सथाति चाह।**

अर्थ : तथागताचा जन्म झालेला असो वा नसो, ही जी शक्ती, धर्मस्थिती, धर्मनियामतता, कार्यकारणाची परंपरा, ती आहेच आहे, ती राहणारच. तिला जाणून घेऊन, तिचा साक्षात्कार करून, ते लोकांना सांगतात. तिचा लोकांना उपदेश करतात आणि तुम्हीदेखील स्वतःच्या प्रज्ञेने जाणून घ्या, असे आवर्जून सांगतात. (संयुक्त निकाय)

**प्रश्न २०१ : 'नाम' कोणती वस्तू आहे व 'रूप' कोणती ?**

**उत्तर** - रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान या पाच पदार्थांना पंचस्कंध असे म्हणतात. पृथ्वी, आप (जल), तेज आणि वायू या चार महाभूतांना आणि त्यापासून उत्पन्न झालेल्या पदार्थांना 'रूपस्कंध' असे म्हणतात. वेदना म्हणजे अनुभूती (अनुभव). सुखकारक वेदना, दुःखकारक वेदना आणि उपेक्षा वेदना (न सुखकारक ना दुःखकारक) यांना वेदनास्कंध म्हणतात. घर, झाड, गाव, स्त्री, पुरुष इत्यादी पदार्थविषयक कल्पनांना संज्ञास्कंध म्हणतात. ते सर्व चार महाभूतांचे बनलेले आहेत परंतु ही जी पदार्थांना निरनिराळी नावे देण्याची मनाची शक्ती, तिला संज्ञास्कंध म्हणतात. संस्कार म्हणजे मानसिक संस्कार यांचे कुशल, अकुशल आणि अव्याकृत असे तीन प्रकार आहेत. दुसऱ्यास मदत करण्याची इच्छा, प्रेम, जागृती, इ. संस्कार कुशल जाणावेत. लोभ, द्वेष, माया, मत्सर, आळस, इ. अकुशल जाणावेत. जे कुशल व अकुशल नाहीत ते अव्याकृत, उदा. काही पदार्थांची जात्याच आवड असणे किंवा नावड असणे. विज्ञान म्हणजे जाणणे; चक्षुर्विज्ञान, श्रोत्रविज्ञान, घ्राणविज्ञान, जिव्हाविज्ञान, कायाविज्ञान व मनोविज्ञान यांना विज्ञानस्कंध म्हणतात. विज्ञान म्हणजे मन किंवा चित्त. हे पाच स्कंध वासनायुक्त असले म्हणजे त्यांना उपादान स्कंध असे म्हणतात.

त्यांच्यायोगे पुनर्जन्म होतो.

जितक्या स्थूल (दिसणाऱ्या किंवा जड) वस्तू आहेत त्या सर्व 'रूप' आहेत आणि जितके सूक्ष्म मानसिक धर्म (वेदना, संज्ञा, संस्कार, विज्ञान) आहेत, ते सर्व 'नाम' आहेत. नाम व रूप एकमेकावर अवलंबून आहेत. दोन्ही एकमेकांचे आश्रित आहेत. उदा. अंडे झाल्याशिवाय पिलू होऊ शकत नाही, तसेच कोंबडी (पिलू मोठे होऊन) झाल्याशिवाय अंडेही होऊ शकत नाही. कारण पिलू व अंडे एक दुसऱ्याचे आश्रित आहेत. दोन्ही एकमेकाच्या आश्रयानेच होत असतात. ही क्रिया अनंत कालापासून चालत आलेली आहे. (प्र. २३७ पाहावा)

**प्रश्न २०२ : जेथे 'चक्षुर्विज्ञान' असते, तेथे 'मनोविज्ञान' असतेच काय ?**

**उत्तर** -होय. एखाद्या मनुष्याचे डोळे चांगले असले तरीपण जे पहावयाचे ते (म्हणजे रूप) समोर नसेल तर चक्षुर्विज्ञान उत्पन्न होत नाही. मनुष्याचे डोळे चांगले असून बाह्यरूप समोर उपस्थित असेल, तेव्हाच चक्षुविज्ञान उत्पन्न होते. जेथे चक्षुविज्ञान उत्पन्न होते, तेथे 'मनोविज्ञानदेखिल' उत्पन्न होते. संवयीमुळे ही क्रिया घडत असते. प्रथम 'चक्षुविज्ञान' उत्पन्न होते व नंतर मनोविज्ञान. ह्याप्रकारे इतर दुसऱ्या इंद्रियांच्या विज्ञानाबरोबरच मनोविज्ञान उत्पन्न होत असते. डोळे पहातात, मन जाणते; कान ऐकतात, मन जाणते; नाक गंध घेते, मन जाणते; येणेप्रमाणे.

मनोविज्ञान उत्पन्न होताच वेदनाही उत्पन्न होते. जेथे मनोविज्ञान असते तेथेच स्पर्श उत्पन्न होतो, वेदना होते, संज्ञा होते, चेतना होते, वितर्क होतो आणि विचारही होतो.

**प्रश्न २०३ : स्पर्श कसा ओळखावा ?**

**उत्तर** - एका वस्तूने दुसऱ्या वस्तूला मिळणें म्हणजे 'स्पश' होय. टाळी वाजविताना दोन हातांचे मीलन होणे, झांज वाजवितांना एका झांजेचे दुसऱ्या झांजेशी मिळणे, म्हणजेच 'स्पश' होय. ह्या दोन वस्तूंना एकीला चक्षू व दुसरीला रूप समजावे. येणेप्रमाणे चक्षू व रूपाचे मीलन होणे म्हणजेच 'स्पश' होय. चक्षू व रूप ह्यांच्या एकीकरणामुळे चक्षुविज्ञान उत्पन्न होऊ शकते. एवढेच नव्हे तर चक्षुविज्ञानाच्या उत्पन्ना करिता केवळ चक्षू व रूप एकीकरण पर्याप्त नाही; त्याबरोबर विज्ञानाचीही (मनाचीही) आवश्यकता आहे. चक्षू, रूप व विज्ञान (चित्त) तिन्हीचे केन्द्रीकरण होऊनच चक्षुविज्ञान उत्पन्न होते.

**प्रश्न २०४ : 'वेदना' कशी ओळखावी ?**

**उत्तर** - 'अनुभव करणे' वेदनेची ओळख होय. उदा. एखाद्याने कुणावर खुष होऊन त्याला मदत केली, त्यामुळे त्याचा बराच फायदा झाला. हा फायदा आपल्याला मदत केली त्यामुळेच झाला, असा अनुभव करणे वेदनेची ओळख आहे.

**प्रश्न २०५ : 'संज्ञा' कशी ओळखावी ?**

**उत्तर** - 'ओळखणे' संज्ञेची ओळख आहे. तऱ्हेतऱ्हेचे रंग ओळखणे विविध वस्तू ओळखणे व जाणणे. अशा तऱ्हेने 'ओळखणे' संज्ञेची ओळख (परिचय) आहे.

**प्रश्न २०६ : 'चेतना' कशी ओळखावी ?**

**उत्तर** - 'समजणे' व 'दुसऱ्याला तयार करणे' चेतनेची ओळख आहे. उदा. एक मनुष्य

पापकर्मांची चेतना करून दुर्गतीला प्राप्त होतो. तद्वतच दुसरा मनुष्य पुण्यकर्मांची चेतना करून सुगती प्राप्त करतो व त्याने शिकविलेल्या व्यक्तीही सुगती प्राप्त करतात. अशा प्रकारे 'समजणे' व 'तयार करणे' चेतनेची ओळख आहे.

**प्रश्न २०७ : विज्ञान कसे ओळखावे ?**

**उत्तर** – 'जाणून घेणे' म्हणजे विज्ञान होय. जो मनुष्य एखादी गोष्ट डोळ्याने पाहतो, तो तिला विज्ञानाने जाणून घेतो; कानाने ऐकतो, तिलाहि विज्ञानाने जाणून घेतो; नाकाने सुंघतो, तिलाही विज्ञानाचे जाणून घेतो; जिभेने स्वाद चाखतो, तिलाही विज्ञानाने जाणून घेतो; शरीराने स्पर्श करतो, तिलाही विज्ञानाने जाणून घेतो. ह्या सर्व शरीरधर्मांना मनाने अनुभव करतो, त्यांनाही विज्ञानाने जाणून घेतो. अशा तऱ्हेने 'जाणून घेणे' (To understand) विज्ञानाची ओळख आहे.

**प्रश्न २०८ : विज्ञान कसे उत्पन्न होते ?**

**उत्तर** – मन किंवा चित्त किंवा विज्ञान कसे उत्पन्न होते, हे निश्चितपणे सांगता येत नाही. महाभूतांच्या संयोगानेच 'चित्ताची' (= विज्ञानाची) उत्पत्ति होते, असे भौतिकवाद स्पष्टपणे मानतो. परंतु बौद्धधम्म तसे मानीत नाही आणि 'चित्ताची' उत्पत्ती कशी होते, हेही सांगत नाही. भगवंतांनी म्हटलेले आहे, 'भिक्खूंनो! हे जग अनंत आहे. त्याचा आदी किंवा अंत यांचा पत्ता लागत नाही.' चक्षुर्विज्ञानामुळे जे रूप उत्पन्न होते, तेच 'रूप उपादान स्कंध' होय. स्पर्शामुळे जी वेदना म्हणजे 'अनुभूती' उत्पन्न होते, तिलाच वेदना उपादान स्कंध म्हणतात. वेदनेमुळे उत्पन्न होणारी जी 'संज्ञा' तिलाच 'संज्ञा उपादान स्कंध' म्हणतात. संज्ञेमुळे उत्पन्न होणारे विज्ञान ह्यालाच 'विज्ञान उपादान स्कंध' म्हणतात. विज्ञानामुळे उत्पन्न होणाऱ्या संस्कारालाच संस्कार उपादान स्कंध म्हणतात. अशा प्रकारे ह्या पाचही उपादान स्कंधांचा संयोग होतो म्हणजेच एकीकरण होते. भ. बुद्धांनी सांगितलेच आहे की, हे पांचहि उपादान स्कंध प्रतीत्य समुत्पन्न आहेत. प्रत्ययाच्या (म्हणजेच विषयांच्या) उपस्थितीमुळे ते उत्पन्न होतात, प्रत्ययांचा अभाव असल्यास उत्पन्न होत नाहीत. ह्या पांचही उपादान-स्कंधामध्ये जो राग (विषय) आहे, तोच आलय आहे. जी आसक्ती आहे, तीच दुःख-समुदय आहे व त्यांचा नाश करणे हाच दुःखनिरोध होय.

अशा प्रकारे पांचही स्कंध स्वतः दुःखेंही नाहीत किंवा दुःख-निरोधही नाहीत, तर त्यांच्याप्रती असणारा मनुष्याचा जो राग (विषय), जी आसक्ती किंवा जो आलय ह्याच्यामुळे उत्पन्न होणारे जे पांच उपादान-स्कंध आहेत, तेच दुःख आहेत, आणि त्यांच्याप्रती जो राग (विषय), आलय किंवा आसक्ती असते, त्यांचा विनाश करणे म्हणजेच दुःखनिरोध होय. ह्यालाच बौद्धधम्मामधील 'मोक्ष' म्हणता येईल. ह्यालाच 'निर्वाण' असे म्हणतात.

ज्यामुळे 'चित्ताची' उत्पत्ती होते, त्यांना 'चैतसिक' धम्म म्हणतात आणि 'चैतसिकांच्यामुळे' ज्या एका धम्माची उत्पत्ती होते, त्याला 'चित्त' म्हणतात. चैतसिक आणि चित्त दोन्ही सहजातधर्म (सोबत उत्पन्न होणारे) आहेत.

**प्रश्न २०९ : वितर्क म्हणजे काय ? विचार कसा ओळखावा ?**

**उत्तर** – 'कोणत्याहि कामास लागणे' वितर्काची ओळख आहे. जसे सुतार चांगल्या प्रकारे

तासून तयार केलेल्या लाकडाच्या तुकड्यांना जोडतो, तो त्या तुकड्यांना कामी लावतो, ह्यालाच, 'वितर्क' म्हटले जाते.

'अनुमार्जन' विचाराचे लक्षण आहे. जसे काशाच्या ताटाला (भांड्याला) पिटले असता आवाज निघतो. येथे 'पिटणे' ला वितर्क आणि आवाज होण्याला विचार समजावे.

**प्रश्न २१० : चित्त म्हणजे काय ?**

**उत्तर** – चित्ताला मन, मानस, हृदय, पांडुर, मनायतन (मन + आयतन) मनींद्रिय (मन + इंद्रिय), विज्ञान स्कंध, तज्जा (तज्जन्य). मनोविज्ञान धातू, इ. नावांनी ओळखतात. मन इंद्रियांचे प्रतिशरण आहे. अर्थात इंद्रिये नाना विषयांची सूचना मनापुढे उपस्थित करतात, आणि मन त्यांचे प्रत्यनुभव म्हणजे समन्वय आणि व्यवस्थापन करते. (ज्याप्रमाणे राजा पाच गावांहून आलेल्या बळींचे व्यवस्थापन करतो.)

अभिधम्मामध्ये चित्ताच्या कार्यासाठी एक भौतिक आधार असलेली सत्ता स्वीकारलेली आहे. परंतु हा भौतिक आधार शरीरात कोठे आहे, ह्याची माहिती सांगितलेली नाही.

**प्रश्न २११ : जर भगवंतांची संपूर्ण शिकवण प्रत्येक व्यक्तीला सुस्पष्ट होणारी अशी होती, तर बुद्धघोषासारख्या महापंडिताला प्रतीत्यसमुत्पाद ह्या सिद्धान्ताचे ज्ञान महासागराप्रमाणे अफाट आणि गंभीर असल्याचे प्रतिपादन कां करावे लागले ?**

**उत्तर** – भ. बुद्धांनी असे स्पष्ट केले की, त्यांनी प्रत्येक गोष्ट मोकळेपणाने आणि प्रकट रूपात शिकविली. परंतु हेही तितकेच सत्य आहे की, ज्याची आकलनशक्ती पूर्णतः विकसित झालेली आहे, केवळ त्यालाच धम्मतत्त्वाचे खरे सखोल ज्ञान समजू शकते. भ. बुद्धांनी श्रवण करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या हृदयाचा शोध घेऊन त्याच्या वैयक्तिक स्वभावाला व विकासाला जसे सोईस्कर होईल, तेवढेच ज्ञान त्यास शिकविले.

प्रतीत्यसमुत्पादाचे धम्मज्ञान सर्वसाधारण अशा व्यक्तींना दुर्बोध आहे. परंतु भगवंतांच्या बऱ्याच शिष्यांना सम्बोधीच्या दुर्बोध ज्ञानाचे पूर्णतः आकलन झालेले होते.

या सिद्धान्ताद्वारे अविद्येचा नाश झाल्याने जन्म-मरणाचे चक्र कसे थांबते व दुःखाचा नाश कसा होतो, हे स्पष्ट केलेले आहे. अविद्येचा नाश झाल्याने वितराग-संस्कार यांचा नाश होतो. संस्काराच्या नाशाने विज्ञान (consciousness) नाश पावते. विज्ञानाच्या नाशाने नामरूपाचा नाश होतो. नामरूपाच्या नाशाने षडायतानांचा नाश होतो. षडायतनाच्या नाशाने स्पर्शाचा नाश होतो. स्पर्शाच्या नाशाने वेदनेचा (Feelings) नाश होतो. वेदनेच्या नाशाने तृष्णेचा नाश होतो. तृष्णेच्या नाशाने उपादानाचा (Grasping) नाश होतो. उपादानाच्या नाशामुळे 'भव' चा (Becoming) नाश होतो. 'भवच्या' नाशाने जाती (जन्म) चा नाश होतो. जन्म न झाल्यामुळे जरा-मरण-शोक-परिदेव-दुःख-दौर्मनस्य-उपायासान यांचा नाश होतो. याप्रमाणे दुक्ख-स्कंधाचा नाश (निरोध) होतो.

**अविज्जाय असेस, विराग निरोधा संखारा निरोधो, संखारा निरोधा विंञ्ञाय निरोधो, विञ्ञाय निरोधा नामरूपनिरोधो, नामरूपनिरोधा सळायतन निरोधो, सळायतन निरोधा फस्सनिरोधो, फस्स निरोधा वेदना निरोधो, वेदना निरोधा तण्हा निरोधो, तण्हा निरोधा**

**उपादान-निरोधो, उपादाननिरोधा भवनिरोधो, भवनिरोधा जाति निरोधो, जातिनिरोधा जरा-मरण-सोक-परिदेव-दुक्ख-दोमनस्य-उपायासानंम निरोधो होति. एवम् एतस्स केवलस्स दुक्खखन्धस्स निरोधो होति.**

**प्रश्न २१२ : बारा निदाने कोणती ?**

**उत्तर** - जीवनाच्या विकासातील ज्या सांखळ्या त्यांनाच बारा निदाने असे म्हणतात. प्रारंभी हे जीवित आंधळे व ज्ञानविरहित असते. त्या अविद्येपासून संस्कार निर्माण होतात. संस्कारापासून विज्ञान, विज्ञानापासून नाम-रूप, नाम-रूपापासून षड़ायतने, षडायतनामुळे स्पर्श व स्पर्शामुळे वेदना निर्माण होते. वेदनेमुळे तृष्णा, तृष्णेमुळे लोभ (प्रेम), लोभामुळे भव, भवाने जन्म, जन्माने व्याधी, जरा, मरण, शोक, दुःख, चित्तविकार आणि चित्तखेद उत्पन्न होतात. खेद म्हणजेच शोक, चिंता, निराशा होत. ह्याच अविद्यामय प्रारंभामध्ये सर्व दुःखाचे मूळ दडलेले आहे. षडायतने म्हणजे नाक, कान, डोळे, जीभ, त्वचा व मन ह्यांची क्रिया. (प्रश्न १८८ पहावा)

**प्रश्न २१३ प्रतीत्यसमुत्पादाचा मार्ग मध्यममार्ग आहे काय ?**

**उत्तर** - होय. प्रतीत्यसमुत्पाद तत्त्वज्ञानमतांमध्ये मध्यवर्ती आहे. कात्यायनाला उपदेश देताना भ. बुद्ध म्हणाले - (संयुक्तनिकाय पाहावा) :

**सब्बं अत्थीति खो कच्चान अयमेको अंतो। सब्बं नत्थीति अयं दुतियो अंता। एत ते उभो अंते अनुपगम्म मज्झेन धम्मं देसेति अविज्जापच्चया संखारा ।। प ।।**

हे कात्यायना, सर्व आहे (आत्मा नित्य आहे) हा एक अंत. सर्व नाही (आत्मा मुळीच नाही) हा दुसरा अंत. या दोन अंताला न जाता तथागत मध्यल्या मार्गानेच ( म्हणजे आत्मा नाही, आत्म्याचे संसरण नाही; परंतु जीवनप्रवाह आहे : संकलिका) धर्मोपदेश करतो. (तो असा :-) अविद्येपासून संस्कार, संस्कारापासून विज्ञान, इत्यादि प्रतीत्यसमुत्पाद.

प्रतीत्यसमुत्पादानुसार आत्मा (जीव) शाश्वत किंवा अशाश्वत पदार्थ नसून कार्यकारण नियमानुसार बदलणारा आहे. **इदं सति इदं होति, इदं असति इदं न होति।** (कारण असेल तर कार्य होते, कारण नसेल तर कार्य होत नाही.)

**उप्पादा वा तथागतानं अनुप्पादा वा तथागतानं ठिताव सा धातु धम्मट्ठितता धम्मनियामता इदप्पच्चयता। तं तथागतो अभिसंबुज्झति अभिसंमेति। अभिसं बुज्झित्वा अभिसमेत्वा अचिक्खति, देसेति....पस्सखाति चाह।**

(तथागत जन्मला काय किंवा न जन्मला काय, ही जी शक्ती, धम्मस्थिती, धर्मनियामता, कार्यकारणपरंपरा ती आहेच आहे. तथागत तिला जाणतो, तिचा साक्षात्कार करून घेऊन लोकांना सांगतो. लोकांना तिचा उपदेश करतो आणि हिला तुम्ही जाणा, असे म्हणतो. (संयुक्तनिकाय)

## निर्वाणासंबंधी प्रवचने

**प्रश्न २१४ : निर्वाण (निब्बान) म्हणजे काय ?**

**उत्तर** - मनाचे परिवर्तन पूर्णपणे थांबण्याची अवस्था, मनाच्या पूर्ण विश्रांतीची अवस्था,

इच्छा, लालसा व दुःखाच्या अभावाची अवस्था, भौतिक मनुष्य उत्पन्न करण्यास कारणीभूत होणाऱ्या प्रत्येक गोष्टीचा पूर्णपणे लोप होण्याची अवस्था. निर्वाणाप्रत पोहोचण्यापूर्वी मनुष्याचा सतत पुनर्जन्म होतो; जेव्हा तो निर्वाणप्रत पोहोचतो, तेव्हा त्याचा पुन्हा जन्म होत नाही. (कारण पुनः जन्म घ्यावयाची लालसाच संपलेली असते : संकलिका).

आर्यअष्टांगिक मार्ग म्हणजेच मध्यम मार्ग. आर्य - अष्टांगिक मार्गाचे अंतिम ध्येय म्हणजे निर्वाण होय. निर्वाणाचा अर्थ - रागद्वेषापासून मुक्ति, राध नावाचे स्थविर भगवंतांकडे गेले, तेव्हा निर्वाणाचा उद्देश स्पष्ट करताना भगवंतांनी सांगितले, श्रेष्ठ जीवन निर्वाणाश्रित आहे. निर्वाण हेच लक्ष्य होय आणि निर्वाण हेच उद्देश होय.

**प्रश्न २१५ : निर्वाणाची मूलतत्त्वें कोणती ?**

**उत्तर -** 'निर्वाण' म्हणजे मनाच्या विकारांपासून मुक्ती, निर्वाण स्थितीत राहून पुण्यशील असे सर्वश्रेष्ठ जीवन जगता येते. निर्वाण हे आर्य -अष्टांगिक मार्गावरील अंतिम लक्ष्य होय. मनाचे विकार नष्ट झाले म्हणजे उरलेले जीवन निर्वाणाच्या स्थितीमधे सुखाने जगता येते.

**प्रश्न २१६ : केवळ 'योगाभ्यासाने' निर्वाणप्राप्ती होऊ शकते काय ?**

**उत्तर -** नाही. योगाभ्यास करण्यात तत्पर असलेल्या आयुष्मान मेघियच्या मनात तीन प्रकारचे संकल्प - विकल्प वारंवार येऊ लागले होते -

१) कामभोगासंबंधी संकल्प - विकल्प,

२) व्यापाद (क्रोधा) संबंधी संकल्प - विकल्प, आणि

३) विहिंसे (हिंसे) संबंधी संकल्प - विकल्प

आयुष्यमान मेघियने सायंकाळी भगवंतांकडे जाऊन ही गोष्ट सांगितली.

भगवंत म्हणाले - मेघिय! योगाभ्यासाला आरंभ करण्यापूर्वी अपिरपक्व मनाच्या व्यक्तीने आपल्या मनाला परिपक्व बनविले पाहिजे. त्याची साधने अशी - १. सत्संगती, २. सदाचार (धर्म) ३. सदुपदेश ४. सदाचरण आणि ५. प्रज्ञावान होणे.

'मेघिय! ह्या पांच गोष्टींत प्रवीण झाल्यावर भिक्खूला १. आसक्तीचा नाश करण्याकरिता अशुभ भावना (शरीराच्या घृणास्पद स्वरूपाची कल्पना) केली पाहिजे. २. वितर्काचा नाश करण्याकरिता आना-पान स्मृतीची (श्वासोच्छ्वास करताना जागृत राहण्याची) भावना केली पाहिजे. ३. क्रोधाचा नाश करण्याकरिता मैत्रीची भावना केली पाहिजे. ४. अहंकाराच्या नाशाकरिता अनित्यतेची भावना केली पाहिजे ५. अनात्मसंज्ञी होण्याकरिता सुद्धा अनित्यतेची भावना करणे अनिवार्य आहे. जेव्हा अहंकाराचा समूळ नाश होतो, तेव्हा ह्याच जन्मी तो निर्वाणास प्राप्त होतो.'

**प्रश्न २१७ : चिंतन (ध्यान) किती प्रकारचे आहे ?**

**उत्तर -** चिंतन पाच प्रकारचे आहे. १) प्रथम ध्यान हे प्रेममय मैत्रीध्यान होय. त्यात ध्यानकर्त्याने आपल्या अंतःकरणांत असे भरवून घ्यायला पाहिजे की, तो संपूर्ण प्राणिमात्रांच्या सुखाकरिता व त्याचप्रमाणे त्याच्या शत्रूंच्या सुखाकरिता देखील त्याने उत्कट इच्छा करावी. २) द्वितीय ध्यान हे करुणामय ध्यान होय. त्यांत त्याने असा विचार करावयास पाहिजे की, सर्वच प्राणिमात्रांचे जीवन दुःखाने भरलेले आहे. त्यांच्या दुःखाची व चिंतेची हुबेहुब कल्पना

करून त्यांच्याविषयी अतीव करुणा जागृत करावी.

३) तृतीय ध्यान म्हणजे हर्षमय ध्यान म्हणजेच मुदिता होय. दुसऱ्यांच्या उत्कर्षांचा विचार करावा. त्यांच्या आनंदाने स्वतः आनंदी व्हावे.

४) चतुर्थ ध्यान म्हणजे अपवित्रतेवरील ध्यान म्हणजेच उपेक्षा होय. अप्रामाणिकपणाचे फळ व अकुशल कर्मांचे दुष्परिणाम ह्यांचा विचार करावा. क्षणिक सुख नेहमीच कसे क्षुद्र असते व त्याचे परिणाम कसे प्राणघातक असतात, याचा विचार करावा.

५) पाचवे ध्यान प्रसन्नतेवरील ध्यान होय. त्यात आपल्या मनाला प्रेम व द्वेष, जुलूम व दास्य, समृद्धी व न्युनता या भावनांच्या मर्यादेबाहेर येऊन स्वतःच्या प्रारब्धाचा निःपक्षपातपणे व अतिशय धीरगंभीरपणे विचार करायला हवा.

मनुष्य या ध्यानांद्वारे अभिज्ञेप्रत पोहोचतो.

**प्रश्न २१८ : अभिज्ञा म्हणजे काय ?**

**उत्तर** - अभिज्ञा सहा प्रकारच्या आहेत - १. दिव्यचक्षु २. दिव्यश्रवण शक्ती, ३. दिव्य रूपशक्ती-कोणतेही रूप धारण करण्याचे सामर्थ्य ४. पूर्व निवासांस्मृती - पूर्व जन्माच्या (म्ह. जेवढी मानसिक परिवर्तने झाली त्यांच्या स्मृती : संकलिका) ५. परचित्तविजानन - दुसऱ्यांचे विचार समजण्याचे सामर्थ्य ६. आसवक्षयज्ञान - जीवनाच्या प्रवाहाची परिपूर्णता उमजण्याचे ज्ञान.

ह्या आश्चर्यकारक गोष्टी आहेत. परंतु प्रत्येक मनुष्य त्यांना प्राप्त करू शकतो. अभिज्ञेप्रत पोहोचावयाची पाच ध्यानें आहेत. ती यापूर्वीच्या प्रश्नात दिलेली आहेत.

**प्रश्न २१९ : जिच्याद्वारे एखादा मनुष्य मनोविकारांना शांत करून ज्ञान प्राप्त करूं शकतो अशा ध्यानाच्या दोन मुख्य क्रिया कोणत्या ?**

**उत्तर** - 'समथा आणि विदस्सना' - १. पवित्र जीवन जगून आणि तृष्णेला जिंकण्याचे सतत प्रयत्न करून मनोविकारांवर विजय मिळविणे. २) मनन व चिंतनाद्वारे अलौकिक प्रज्ञेची प्राप्ती करून घेणे.

ह्या दोहोंपैकी प्रत्येकीच्या वेगवेगळ्या वीस मुद्रा आहेत.

**प्रश्न २२० : ज्ञानाच्या अंतिम अवस्थेत आणि समाधीच्या स्थितीत मन कोरे असते आणि विचार थांबलेला असतो, असे मानावे काय ?**

**उत्तर** - नाही. तिच्या अगदी विरुद्ध स्थिती असते. त्या अवस्थेत अंतर्मनाच्या दक्षतेची पराकाष्ठा होते आणि ज्ञान आत्मसात करावयाचे सामर्थ्य त्यानुसारच विस्तीर्ण झालेले असते. ज्याप्रमाणे उंच टेकड्यांमधील अरुंद पाऊलवाटेवरून चालणाऱ्या मनुष्याचा दृष्टिकोण संकीर्ण होतो, त्याचप्रमाणे सामान्य जागृत अवस्थेंत असताना माणसाचा दृष्टीकोण संकीर्ण असतो. गरुडाने उंच आकाशात भरारी मारून स्थिरपणे असताना उंचावरून त्याला ज्याप्रमाणे संपूर्ण प्रदेशावर नजर टाकता येते, त्याचप्रमाणे माणसाला ज्ञानाच्या व समाधीच्या सर्वोच्च अवस्थेत असताना, त्याच्या भव्य दृष्टिपथात येणाऱ्या संपूर्ण ज्ञानाचे तत्क्षणीच आकलन होते. विचार थांबलेला नसतो, तो अतिशय तीव्र स्वरूपात प्रखर असतो. परंतु स्वतःविषयी नसून

बहुजनहिताय बहुजनसुखाय असतो.

**प्रश्न २२१ : 'निरोध आणि निर्वाण' एकच आहेत काय ?**

**उत्तर** - तृष्णेचा निरोध होणे म्हणजेच निर्वाण होय. संसारीक अज्ञान पुरुष इंद्रियांच्या विषयोपभोगात डुंबून आनंद मानतात. ते वारंवार जन्म घेतात, त्यांच्या मनात तृष्णामय विचारांची उथळ पुथळ सुरू असते जरा, मरण ह्यांचे वारंवार दुःख भोगतात. परंतु ज्ञानी आर्यश्रावक इंद्रियांच्या सुखोपभोगापासून अलिप्त राहतात. त्यामुळे त्यांच्या 'तृष्णेचा निरोध' होतो आणि तृष्णेचा निरोध झाला की, 'उपादानाचा निरोध' होतो. उपादानाचा निरोध झाला की, 'भवचा' निरोध होतो. भवचा निरोध झाला की, 'जन्म घेणे' बंद होते आणि पुनर्जन्माच्या निरोधाने जन्म, जरा, मरण, शोक इ. दुःखांचा निरोध होतो. अशा तऱ्हेने तृष्णेचा निरोध होणे म्हणजेच निर्वाण प्राप्त होणे होय.

**प्रश्न २२२ : 'निर्वाण' कोणाला प्राप्त होते ?**

**उत्तर** - पुण्य करणारे, स्वीकारण्यास योग्य अशा धम्मालाच मानणारे, जाणून घेण्यास योग्य अशा धम्मालाच जाणणारे, अनुचित धर्माचा त्याग करणारे, योग्य धम्माचा अभ्यास करणारे व साक्षात्कार करण्याजोगा धम्माचा प्रत्यक्ष साक्षात्कार करणारेच 'निर्वाण' प्राप्त करतात. थोडक्यात, आर्य - अष्टांगिक मार्गाचे अनुसरण करणाऱ्यांना निर्वाण प्राप्त होते.

**प्रश्न २२३ : निर्वाणानंतर व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचा लोप होतो काय ?**

**उत्तर** - नाही. निर्वाणानंतर मनुष्य जन्ममृत्यूच्या फेऱ्यापासून (म्ह. तृष्णामय वैचारिक चक्रापासून) मुक्त होतो. त्याचा तृष्णामय जीवनप्रवाह नेहमीकरता बंद होतो आणि उपादानाचा एकदम अंत झालेला असतो.

**प्रश्न २२४ : निर्वाण कांहीसे स्वर्गीय स्थळासमान किंवा स्वर्गासमान आहे, असे बौद्धधम्म शिकवितो काय ?**

**उत्तर** - नाही. जेव्हा कुटदन्ताने भ. बुद्धांना विचारले, 'निर्वाण कोठे आहे?' तेव्हा त्यांनी उत्तर दिले की, 'जेथे जेथे नीतिपर उपदेशांचे म्हणजे आर्य - अष्टांगिक मार्गाचे पालन केले जाते तेथे तेथे निर्वाण असते.'

**प्रश्न २२५ : निर्वाणाप्रत पोहोचण्याच्या हेतूने आपण कुशल कर्म केले पाहिजे, असे बौद्धधम्म शिकवतो काय ?**

**उत्तर** - होय. निर्वाणप्राप्तीचा उद्देश समोर ठेवून कुशल कर्मे करीत राहिल्याने कालांतराने तृष्णा हळूहळू नष्ट होत जाऊन मनुष्यास निर्वाणाची प्राप्ती होऊ शकते. पूर्णतः निःस्वार्थीपणाचाच प्रतिशब्द म्हणजे निर्वाण. 'मी', 'अहं' याचे सत्याला पूर्णपणे शरण जाणे, म्हणजेच निर्वाण. ह्या पृथ्वीवर जिवंतपणीच प्रत्येकाला निर्वाणाची अवस्था प्राप्त होऊ शकते.

**प्रश्न २२६ : निर्वाणाची अवस्था कशी असते ?**

**उत्तर** - निर्वाण केवळ सुखाची अवस्थानसून तिच्यात दुःखाचा लवलेशही नसतो. खरे

पाहता निर्वाण प्राप्त करण्याकरिता, निर्वाणाचा शोध घेण्याकरिता, दुःख भोगावे लागते. शरीराला व मनाला अंकित करून सर्व इंद्रियांवर ताबा मिळवावा लागतो. शारीरिक व मानसिक बंधने तोडावी लागतात. त्यामुळे निर्वाणापूर्वीच्या अवस्थेत दुःख भोगावे लागले तरी, निर्वाणानंतर सुखच सुख मिळते.

शीलावर (Morality) प्रतिष्ठित होऊन, मनाला अंकित केल्यावर मनुष्य कुठेही असो तो निर्वाणाचा साक्षात्कार करू शकतो, म्हणून 'शील' हे निर्वाणाचे मूळ आहे. शीलाशिवाय निर्वाणाचा साक्षात्कार होऊच शकत नाही.

**प्रश्न २२७ : निर्वाण शब्दाची विद्वत्ताप्रचुर चर्चा आपल्याला कोठे आढळते ?**

**उत्तर** - जुन्या पाली ग्रंथकारांनी ज्या शब्दांनी निर्वाणाची व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे, त्या शब्दांची यादी आपल्याला आर. सी. चाईल्डर्स ह्यांच्या पाली भाषेच्या प्रसिद्ध शब्दकोशामध्ये सापडते. त्याचप्रमाणे ती श्रीमती - हाईस डेव्हिड्स यांच्या पाली-इंग्रजी शब्दकोशात पृ. ३६२-३६४ मध्ये विस्तृतपणे आढळते. संयुक्तनिकायांत निर्वाणाची विस्तृत चर्चा आहे.

## पुनर्जन्म आणि आत्मा

**प्रश्न २२८ : मनुष्याच्या वेगळ्या 'आत्म्याची' कल्पना जर आपण नाकारली, तर मनुष्याचे वेगळे व्यक्तीमत्त्व असल्याचा कोणता पुरावा आहे ?**

**उत्तर** - इतर धर्मांमध्ये आत्मे भिन्न असल्यामुळे, व्यक्तीना भिन्न भिन्न समजले जाते. परंतु बुद्धधम्मात आत्म्याचे अस्तित्वच नाकारलेले आहे.

प्रत्येक व्यक्तीला तृष्णा आहे व जीवनाची दुर्दम्य लालसा आहे. बुद्धधम्मात तृष्णेच्या अस्तित्वास महत्त्वाचे स्थान आहे. दोन व्यक्तीना जीवनाची जी तृष्णा आहे, व वेगवेगळे देह आहेत, त्यामुळेच त्यांचे भिन्न भिन्न व्यक्तीत्व सिद्ध होते. (कृपया टीप २ पहावी.)

**प्रश्न २२९ : 'आत्मा' ह्या शब्दात आक्षेप घेण्यासारखे, असे काय आहे?**

**उत्तर** - त्याच्याशी निगडित असलेली कल्पना की, तो अजर-अमर आहे व मनुष्याचे अस्तित्व संपूर्ण विश्वाच्या अस्तित्वापासून वेगळेच आहे. ही विभक्तपणाची कल्पना. ती गैरवाजवी असून ती तर्कसंगत किंवा विज्ञानसंगत (Science) नाही. 'मी' असा वेगळा कुणी नाही. आत्मा नांवाची अपरिवर्तनशील आणि अमर मानलेली वस्तू मर्त्य शरीरात राहूच शकत नाही. (A permanent thing cannot reside in an impermanent body)

**प्रश्न २३० : बौद्धधम्म आत्म्याचे अमरत्व शिकवितो काय ?**

**उत्तर** - नाही. बौद्धधम्मात आत्म्याच्या अस्तित्वासच नाकारलेले आहे. अविद्या ग्रसित लोकांनी चुकीची कल्पना व्यक्त करण्यास 'आत्मा' ह्या शब्दास उपयोगात आणले आहे, असे बौद्धधम्म मानतो. जर प्रत्येक गोष्ट परिवर्तनशील आहे, असे बौद्धधम्म मानतो तर मग मनुष्याचाही त्यांत समावेश झालाच आणि प्रत्येक 'भौतिक' गोष्ट बदलायलाच पाहिजे

आणि जे परिवर्तनशील आहे ते शाश्वत नाही. म्हणून परिवर्तनशील वस्तू अमर राहूच शकत नाही. आत्म्याला जर अपरिवर्तनशील मानले तर तो ह्या परिवर्तनशील शरीरात निवास करू शकतच नाही.

येथे घातलेला 'आत्मा' शब्द ग्रीक भाषेतील Psyche या शब्दाला पर्यायी आहे. 'भौतिक' शब्दाने शारीरिक अंगाला नव्हे तर इतर अवस्थांना संबोधिले आहे.

**प्रश्न २३१ : जन्म म्हणजे काय ?**

**उत्तर** - जन्म म्हणजे 'स्कंधांचा नवीन समूह'

पित्याचा वीर्यजंतू व मातेचा रजकण यांच्या संयोगाचे वेळी नैसर्गिक परिस्थिती अनुकूल असल्यास त्यांत एकाएकी चेतनेचा प्रादुर्भाव होतो व अशा प्रकारे नवीन स्कंधांच्या समूहामुळे जन्म होतो. (कर्नल ऑलकाट म्हणतात : जन्म म्हणजे मृत व्यक्तीच्या अंतिम क्षणीच्या उत्पादक विचाराद्वारे (Regenerative Thoughts मुळे) घडलेले व्यक्तीमत्व.

**प्रश्न २३२ : पुनर्जन्म (Rebirth) संसरणाशिवायच होतो काय ?**

**उत्तर** - होय. संसरण म्हणजे आत्म्याचे एका शरीरातून निघून दुसऱ्या शरीरात प्रवेश करणे. संसरणाशिवाय पुनर्जन्म होतो असे बुद्धधम्मात मानलेले आहे व आत्म्याचे अस्तित्वच नाकारलेले आहे. जसे एका दिव्याच्या ज्योतीने दुसऱ्या दिव्याची ज्योत पेटविणे. दूसरी ज्योत पेटली, पण पहिली न विझाविता. (यात कसलेही संसरण नाही : संकलिका) भगवंतानी पुनर्जन्माचा उपदेश केला आहे, परंतु आत्म्याचे अस्तित्वच मान्य केले नसल्यामुळे, आत्म्याचे संसरण होत नाही, असा उपदेश केलेला आहे.एका झाडाचे अनेक आंबे परंतु त्याची एक कोय पेरली की दुसरे झाड तयार होते, यात झाडाच्या जीविताचे संसरण होत नाही.

**प्रश्न २३३ : पुनर्जन्म कसा होतो ?**

**उत्तर** - माणसाचे शरीर पृथ्वी, आप, तेज आणि वायू यांनी बनलेले आहे व त्यांचे कार्य चेतनेमुळे (= Vitality) सदोदित सुरू असते व माणसाच्या जीविताची क्रिया सुरू राहते. नैसर्गिक नियमानुसार जेव्हा चेतनाशक्ती शरीरातून निघून जाते तेव्हा शरीर थंड होऊ लागते व ते निर्जीव होते (मृत होते). त्यातील चारही महाभूते पृथ्वी, आप, तेज आणि वायू ह्या निसर्गातील समगुणधर्मीय महाभूतांत विलीन होतात, अग्नी अग्नीमध्ये मिसळतो, वायू वायूमध्ये मिसळतो इ. त्याचप्रमाणे योग्य परिस्थिती निर्माण झाल्यावर पित्याचा वीर्यजंतू व मातेचा रजकण एकत्र आल्यास एकाएकी चेतनेचा उदय होतो व जीवन निर्मिती होते. येणेप्रमाणे मृतदेहांतील महाभूते निसर्गात विलीन होतात व निसर्गातील महाभूते पुनः जन्म घेतात. तसेच चेतनाशक्ती देखील निसर्गात विलीन पावल्यावर पुनः उत्पन्न होते व येणेप्रमाणे पुनर्जन्म होतो. परंतु असे होताना अगदी पूर्वीचेच अणुकण पुनः एकत्र येत नाहीत. एकत्र आलेले अणुकण हे निसर्गातील कोणतेही वेगळेच अणुकण असतात. धर्मानंद कोसंबी म्हणतात (बौधानि पृ. ७७) - रूप, वेदना, संज्ञा, संस्कार व विज्ञान हे पंचस्कंध वासनायुक्त असले म्हणजे त्यांना उपादानस्कंध म्हणतात. त्यांच्या योगे पुनर्जन्म होतो. या जन्मी कुशलाकुशल कर्म केले म्हणजे त्याच्या जोरावर दुसऱ्या जन्मी या पाच उपादानस्कंधांचा प्रादुर्भाव होतो. (उत्पत्ती होते) जेव्हा वासनेचा समूळ उच्छेद होतो, तेव्हा या स्कंधांना उपादानस्कंध न

म्हणता नुसते स्कंध म्हणतात. कारण त्यांच्या योगे पुनर्जन्म होण्याचा संभव असतो. अर्हत्पद प्राप्त झाल्यावर वासनेचा समूळ उच्छेद होतो. अर्हत्पदाप्रत पावलेल्या व्यक्तींचे पंचस्कंध त्यांच्या मरणापर्यंत राहतात. अकुशल संस्कार मात्र अर्हत्पद मिळाल्याबरोबर सर्वथैव नष्ट होतात. मरणसमयी अर्हतांच्या पंचस्कंधांचा निर्वाणात लय होतो अर्थात त्यापासून नूतन पंचस्कंध उदय पावत नाही. (यापैकी रूपस्कंध तेवढेच काय ते सृष्टीमधील पृथ्वी, आप, तेज व वायू मध्ये मिसळून जाते.)

**प्रश्न २३४ : 'आत्म्याशिवाय' पुनर्जन्म संभव आहे काय ?**

**उत्तर** - होय. एका दिव्याने दुसरा दिवा पेटविला तर असे म्हणता येणार नाही की, पहिल्या दिव्याने दुसऱ्या जागी संसरण केले. त्याप्रमाणे संसरणाविना पुनर्जन्म शक्य आहे. यथार्थ दृष्टीने पाहिले असता 'आत्मा' नावाची कोणतीच वस्तू अस्तित्वात नाही.

**प्रश्न २३५ : कोण जन्मग्रहण करतो ?**

**उत्तर** - नाम व रूप जन्म ग्रहण करतात. मृत्यूबरोबर एका नाम व रूपाचा सृष्टीमधे लय होतो आणि जन्माबरोबर दुसऱ्या नाम व रूपाचा उदय होतो.

**प्रश्न २३६ : मनुष्याच्या शरीरात आत्मा असतो काय ?**

**उत्तर** -नाही. शरीरात आत्मा नसतो. पण शरीरात जी पंचेंद्रिये आहेत, त्यामुळे आपल्यात राहणारी चेतना (Consciousness) डोळे, कान, नाक, जिव्हा आणि त्वचा ह्या इंद्रियांद्वारे रूप पाहते, वास घेते, शब्दांचे श्रवण करते, रसांचा आस्वाद घेते आणि स्पर्श करू शकते. चक्षू व रूपामुळे चक्षुर्विज्ञान उत्पन्न होते. ते उत्पन्न होताच स्पर्श, वेदना, संज्ञा, चेतना आणि एकाग्रता एकामागून एक उत्पन्न होत जातात. हे सर्व धर्म एकमेकांमुळे उत्पन्न होतात. जाणणारा कोणी ज्ञाता (म्हणजेच आत्मा) नाही.

**प्रश्न २३७ : या शरीरांत आत्मा नसून ते केवळ नाम आणि रूप यांनीच घडलेले आहे काय ?**

**उत्तर** - होय. या शरीरात केवळ नाम आणि रूप आहेत. त्यात कोणी आत्मा किंवा 'मी' किंवा 'अहं' किंवा 'कर्ता' निवास करीत नाही. ह्या शरीराची घडण एखाद्या बाहुबलीसारखी आहे, जिच्यामध्ये दुःखांना आणि हाडामांसाच्या रूपाने घासफूस आणि काठ्या भरलेल्या आहेत.

**नामं च रूपं च इध अत्थि सच्चतो,**
**न हेत्थ सत्तो मनुजो इव अभिसंखातं**
**दुक्खस्स पुञ्जो विणकट्ठसदिसो।। विसुद्धीमग्ग।।**

अर्थ : नाम-रूपाची ही जोडी एकमेकावर आश्रित असते. जेव्हा एक भंग पावते, तेव्हा संबंधामुळे दुसरेही भंग पावते, व मृत्यू होतो.

'नाम' शक्तीविहीन असल्यामुळे स्वशक्तीने वाटचाल करू शकत नाही. ते खाणे, पिणे, बोलणे, किंवा प्राण्यासारखी कोणतीही क्रिया करू शकत नाही. 'रूप' देखिल (नाम नसल्यावर) शक्तीविहीन असते व स्वशक्तीने क्रिया करू शकत नाही. त्याला कसलीही

इच्छा किंवा तृष्णा नसते. न खायची, न प्यायची, न बोलायची किंवा कशाचीही. परंतु नामामुळे चालना मिळून 'रूप' वाटचाल करते आणि रूपामुळे चालना मिळून नाम वाटचाल करते. म्हणून असे म्हटलेले आहे -

ज्याप्रमाणे बोटीमुळे लोक समुद्रात विचरण करतात,
तद्वतच रूपामुळे नामसंच वाटचाल करतो.
ज्याप्रमाणे लोकांमुळे बोट चालते व समुद्रात जाते,
तद्वतच नामामुळे रूपसंच वाटचाल करतो.
ज्याप्रमाणे लोक आणि बोट एकत्र समुद्रपार जातात,
तद्वतच नाम आणि रूप एकमेकांवर विसंबतात.

येणेप्रमाणे 'नाम' व 'रूप' यांना सूक्ष्मदृष्टीने (discernment) पाहिल्यास, आत्म्याच्या संकल्पनेमुळे झालेला गोंधळ नाहीसा होतो.

**प्रश्न २३७ (अ) : जर 'आत्मा' नाही, तर 'मन' असल्याचे काय प्रमाण आहे ?**

**उत्तर** – आपण डोळ्यांने एक वस्तू बघतो, हातांनी उचलतो. ह्या बघण्या आणि उचलण्याच्या क्रियांमधे जो ताळमेळ आहे त्यामुळेच मनाचे अस्तित्व असल्याचे मानणे आवश्यक आहे. 'मनाशिवाय' दोन भिन्न भिन्न क्रियांमधील समन्वय सिद्ध होत नाही. 'आत्म्याचा' अशा तऱ्हेचा कसलाही उपयोग नाही. त्यामुळे आत्म्याचे अस्तित्व असिद्ध आहे.

मन आणि शरीर ह्या दोहोंमुळे तयार झालेले व्यक्तीत्व म्हणजे माणूस. त्यावेगळा 'माणूस' असा कोणीच नाही.

**प्रश्न २३८ : स्कंन्ध म्हणजे काय ?**

**उत्तर** – स्कंध पाच आहेत : रूप स्कंध, वेदना स्कंध, संज्ञा स्कंध, संस्कार स्कंध आणि विज्ञान स्कंध.

'रूप' म्हणजे भौतिक गुण, 'वेदना' म्हणजे संवेदना, 'संज्ञा' म्हणजे अमूर्त कल्पना, 'संस्कार' म्हणजे मनाच्या प्रवृत्ती किंवा मनाचे कल, विज्ञान म्हणजे मानसिक शक्ती किंवा जाणीव (विज्ञान म्हणजे Science नव्हे). ह्यांचे आपण बनलेले आहोत. त्यांच्यामुळे आपणास अस्तित्वाची जाणीव आहे आणि त्यांच्याद्वारे जगाशी आपले व्यवहार चालतात.

**प्रश्न २३९ : असे कोणते कारण आहे की, ज्यामुळे पाच स्कंधांच्या संयोगाने झालेले एक व्यक्तिमत्त्व दुसऱ्या व्यक्तिमत्त्वापासून भिन्न ठरते ?**

**उत्तर** – विज्ञानाद्वारे (Science द्वारे) असे सिद्ध झाले आहे की, आईवडिलांच्या अणुरेणूंमधील वैयक्तिक वैशिष्ट्ये (DNA and Chromosomes) यांच्या मीलनाने अपत्य जन्मास येते. ही वैशिष्ट्ये वेगवेगळ्या अपत्यांमध्ये वेगवेगळ्या प्रमाणात असतात. (तंतोतंत सारख्या प्रमाणात नसतात). त्यामुळे अपत्यांची नैसर्गिक घडण वेगवेगळी असते. एका शिशूला मातेच्या उदरात मिळणारे अन्न दुसऱ्या शिशूला मिळणाऱ्या अन्नापेक्षाही काही अंशी भिन्न असते. ते मिळावयाची वेळदेखील भिन्न भिन्न असते. शिशूचा जन्म झाल्यावर त्याला मिळणारे ममत्व (Psychological strokes) वेगवेगळे असतात. या गोष्टींमुळे शिशूवर त्यांचा वेगवेगळा परिणाम होऊन त्यांची शारीरिक आणि मानसिक घडण वेगवेगळी होऊन निरनिराळी व्यक्तिमत्त्वे तयार होतात. (टीप ३ पाहावी)

**प्रश्न २४० : प्रौढ मनुष्य, ज्याचा शारीरिक व मानसिक बदल झालेला असतो तरीही आपल्या तारुण्यातील प्रसंगांना जाणवू शकतो, तर मग मागील जन्माची स्मृती आपल्या अंतीम जन्माद्वारे वर्तमान जन्मात आपल्याबरोबर का आणता येत नाही ?**

**उत्तर** –मनुष्य मेल्यानंतर पुनः जन्म घेतो ही कल्पनाच चुकीची आहे. स्मृतीचा स्कंधांत समावेश झालेला आहे. आणि मृत्यूमुळे स्कंधांचे परिवर्तन झाल्यामुळे स्मृती नष्ट होते. परिवर्तनाच्या ह्या संपूर्ण साखळीचा शेवट निर्वाणात होतो. (टीप ४ पाहावी)

**प्रश्न २४१ : उपनिषदांची आत्मवादी शिकवण आणि भगवंतांची अनात्मवादी शिकवण यांतील विरोधाभास कशा रीतीने स्पष्ट केलेला आहे ?**

**उत्तर** – उपनिषदाची शिकवण आत्म्याच्या अस्तित्वास जोर देते ती येणेप्रमाणे :

कोणत्याही माणासाचे बोलणे म्हणजे काय, हे जाणण्याचा प्रयत्न न करता बोलणाऱ्याला जाणावे; 'जे दिसते' त्याला जाणण्याऐवजी, जो पाहतो त्याला जाणावे जे कर्म घडले त्याला जाणण्याऐवजी, तो कर्ता आहे त्याला जाणावे वगैरे.'

याउलट भगवंतांची शिकवण अगदी भिन्न आहे. त्यांनी ठामपणे येथे कर्ता कोणी नाही, फक्त कर्म आहे. येथे पाहणारा कोणी नाही, फक्त चव आहे, येथे कोणी कर्ता, अनुभव घेणारा, पाहणारा नाही किंवा आपल्या चेतनेमागे आणि क्रियेमागे कोणी प्रतिनिधी (Agent) नाही. सृष्टीच्या नियमानुसार चमत्कार घडत राहतात, त्यांना घडविणारा कोणीही नसतो.

**कम्मस्स कारको नत्थि, विपाकस्सच वेदका।**
**सुद्धधम्मा पवत्तन्ति एव एतं सम्मादस्सन ॥**

(कोणीही कर्ता नाही. वस्तू घटकांचे चक्र स्वतःच फिरत असते हीच खरी वस्तुस्थिती आहे.)

# पुनर्जन्म आणि कर्मवाद

**प्रश्न २४२ : पुनर्जन्म होण्यास काय कारण आहे ?**

**उत्तर** – भौतिक जगात वस्तूविषयीच्या स्वतःच्या अतृप्त इच्छा (संस्कृतमध्ये तिला तृष्णा व पालीमध्ये तण्हा म्हणतात) व्यक्तिगत अस्तित्वाच्या स्थितीवर अवलंबून असतात. आपले शारीरिक अस्तित्व संपू नये अशी इच्छा टिकून राहिल्याने जी 'भव' शक्ती तयार होते तिच्यामध्ये इतकी बलवान उत्पादक शक्ती असते की, ती ऐहिक जीवनात मनुष्यप्राण्याला खेचून नेते.

**प्रश्न २४२ (अ) : मनाचा विनाश आणि उत्पत्ती कशी होते ?**

**उत्तर** – बौद्ध तत्त्वज्ञान क्षणोक्षणी परिवर्तनशील मनाहून वेगळ्या कोणा नित्य जीवात्माच्या अस्तित्वास मानीत नाही. मृत्यूचा अर्थ असा की, एका शरीर प्रवाहापासून (शरीरदेखील क्षणोक्षणी परिवर्तनशील असल्यामुळे ते वस्तू नव्हे, तो प्रवाहच आहे. मनाच्या प्रवाहाचे (मन सन्तती) विलग होणे, च्युत होणे (= विनाश होणे). त्याचप्रमाणे उत्पत्तीचा अर्थ असा की एका मनप्रवाहाचे दुसऱ्या शरीरप्रवाहात उत्पन्न होणे.

(अ) च्युति (= मृत्यू) : मृत्यु तीन कारणांनी येतो १. आयुष्य संपल्यावर २. पुण्याचे संपणे ३. शरीराची विषम क्रिया - म्हणजे भोजनाची मात्रा, पथ्य-अपथ्य, औषधांचे सेवन यांचे भान न राखणे, वेळी-अवेळी अब्रह्मचारी वर्तन करणे. मृत्युसमयी पापचारी लोकांच्या हृदयाचा वरील भाग प्रथम थंड होतो आणि पुण्यात्मा लोकांच्या हृदयाच्या खालचा भाग प्रथम थंड होतो, त्यानंतर संपूर्ण शरीर थंड पडते. (बघावे बौद्ध दर्शन पृ. १०६)

अन्तराभव - एका शरीरास सोडून गेल्यावर दुसऱ्या शरीरात उत्पन्न होईपर्यंतची मनाची (= जीवाची) जी स्थिती असते, तिलाच अन्तराभव, गन्धर्व, मनोमय असे म्हणतात. अन्तराभवाला जशा शरीरांत उत्पन्न व्हावयाचे असते, तशीच अन्तराभवाची आकृति असते. ती आपल्या मार्गावर एक सप्ताहापर्यंत समय लावू शकते. (याविषयी निश्चित असा विज्ञान-संगत कोणताही आधार आम्हास देता येत नाही : संकलिका)

(ब) उत्पत्ती (जन्म) : मृत्युसमयी मन आपल्या बऱ्या-वाईट कर्मांना साकार रूपाने बघते आणि हुबेहुब तसेच अंतरभवीय रूप धारण करते. मनाच्या कोण्या शरीरात उत्पन्न होण्याकरिता तीन गोष्टींची आवश्यकता असते १) माता ऋतुमती असावी २) पित्याचे बीज उपस्थित असावे आणि ३) गन्धर्व (= अन्तराभव) उपस्थित असावे. त्यासोबतच योनी, बीज आणि कर्माचे दोष बाधक नसावेत.

गर्भातील लिंगभेद - अन्तराभव माता-पित्याच्या मैथुन क्रियेत पाहतो. त्यावेळी जर स्त्रीजन्म घेणार असेल तर पुरुषांत आसक्ति निर्माण होते; आणि पुरुषजन्म घेणार असेल तर स्त्रीमध्ये आसक्ती निर्माण होते.

क) गर्भाधान : मैथुनानंतर घन बीज सुटते आणि रक्ताचा बिंदूदेखील सुटतो. बीज आणि शोणित बिंदु दोन्ही मातेच्या योनीमध्ये मिश्रित होऊन एकपिंड होऊन उकळल्यानंतर थंड झालेल्या दुधाप्रमाणे स्थित होतात. ह्याच पिंडात सर्वच बीजांना आपल्या आत ठेवणारा व ठेवून घेणारे आलय-विज्ञान सामावून जाते. अंतराभव त्यात येऊन जुळते. हिलाच गर्भाची कलल अवस्था म्हणतात. कललाच्या ज्या स्थानी (Consciousness) विज्ञान जुळते, ते त्याचे हृदयस्थान असते. कलल अवस्थेच्या नंतर गर्भ आणखी सात अवस्था धारण करतो. १) अर्बुद २) पेशी ३) धन ४) प्रशाख ५) केश-लोम ६) इन्द्रिय अवस्था आणि ७) व्यंजन (= लिंगभेद) अवस्था.

ह्यापैकी अर्बुद स्थितीमधे गर्भ दह्यासारखा असतो. तो मांसावस्थेपर्यंत न गेलेला अर्बुद असतो. पेशी शिथिल मांसल असतात. थोडा अधिक झाल्यावर घन, शाखेप्रमाणे हात-पाय इत्यादी फुटायला लागतात.

ख) रंग वगैरे : अकुशल कर्मांमुळे किंवा मातेच्या अधिक क्षार रस इत्यादी अन्नपानाच्या सेवनाने बाळाच्या केसांमध्ये विविध रंग तयार होतात. मातेच्या पुष्कळ धावण्या-कुदण्याने किंवा पोहण्याने बाळाची अंगे विकृत होतात. मुलगी असेल तर गर्भ मातेच्या कुशीत डावीकडे असतो आणि मुलगा असल्यास उजवीकडे. प्रसव व्हायच्या वेळी मातेच्या उदरात असह्य कष्ट देणारा वायू तयार होतो, जो गर्भाच्या डोक्याला खाली आणी पायांना वर करतो.

**प्रश्न २४३ : अतृप्त इच्छा व आपुले गुणदोष यांच्यामुळे पुनर्जन्माच्या स्थितीमध्ये, अवस्थेमध्ये व रूपामध्ये बदल होतो काय ?**

**उत्तर** - होय. सर्वसाधारण नियम असा आहे की, जर आपल्याजवळ गुणांचे आधिक्य असेल तर आपण पुढच्या वेळी चांगल्या प्रकारे व सुखाचा जन्म घेऊ (म्हणजेच मनाची स्थिती सुखकर राहील.) जर दोषांचे आधिक्य असेल तर आपला पुढील जन्म दारिद्र्यात व दुःखात होईल. (म्हणजे मनाची स्थिती अधिक दुःखप्रद होईल) (पुनर्जन्माचा अर्थ ''मृत झाल्यावर पुनः जन्म'' असा नाही ह्याच जन्मी भविष्यकाळात होणारा बदल होय, अशी आमची ठाम समजूत आहे : संकलिका)

**प्रश्न २४४ : पुनर्जन्माचा सिद्धान्त कशावर आधारलेला आहे ?**

**उत्तर** - अगदी तंतोतंत न्याय, समतोलपणा आणि आपोआपच होणारे आवश्यक फेरबदल हीच निसर्गाची प्रणाली आहे व ती सर्वत्र लागू होते, असे गृहीत धरलेल्या सिद्धान्तावर बौद्धजनांचा विश्वास आहे. व्यक्तीच्या वेगवेगळ्या जीवनांतील (म्हणजे वेगवेगळ्या समयी) प्रबळ असणाऱ्या पवित्र किंवा पापमय इच्छानुसार पुनर्जन्माचे हे महाचक्र कमी-अधिक गतीने धावतच राहते.

**प्रश्न २४५ : नवीन प्राणिमात्राला जन्म देण्यास कर्माच्या मार्गदर्शनाखाली जी शक्ती कार्य करते, तिला काय म्हणतात ?**

**उत्तर** - तृष्णा जगण्याची इच्छा.

आर्थर शॉपेनहॉवर Schopenhower ह्या अतिशय विद्वान, व्यासंगी आणि आधुनिक जर्मन विचारवंताने असे म्हटले आहे की, ''निसर्गाचा सामान्य नियम म्हणा किंवा आमूलाग्र बदल घडविणारा नियम म्हणा, निसर्गातील सर्वच वस्तूंचे आणि मानवाचेदेखील असे आहे की, त्याला आपल्या आकांक्षेची (तृष्णेची) अधिक जाणीव असते. बुद्धीला दुय्यम दर्जाची व तृष्णेला प्रथम दर्जाची शक्ती म्हणता येईल. मेंदूच्या कार्यप्रणालीत ही इच्छाशक्ती निसर्ग, वस्तू व शरीर यांच्यासारखी, ज्याप्रमाणे आरशात प्रतिबिंब दिसावे त्याप्रमाणे, प्रतिबिंबित होते. बुद्धी दुय्यम असली तरीदेखील तपस्वी तिच्या उपयोगाने तृष्णेचा पूर्णपणे बिमोड करू शकतात.''

**प्रश्न २४५ (अ) : शरीराची उत्पत्ती कशी होते ?**

**उत्तर** - कायिक, वाचिक अथवा मानसिक कर्माच्या प्रत्येक सचेतन क्षणी जी मनःस्थिती असते, तोच 'हेतू' असतो ह्यामुळेच प्रत्येक कर्म एका मनःस्थितीस उत्पन्न करतो; ते कुशलधर्मी असते किंवा अकुशलधर्मी. हे धर्म केवळ मानसिक शक्ती असतात आणि त्या परस्पर एकत्र येऊन 'संसार-लोकाचे' निर्माण करतात.

मानव हा मनोवृत्तींचे केवळ अभिव्यक्तीकरण असतो याच प्रकारे पदार्थ मनोवृत्तींचे शारिरीकीकरण असते. भ. बुद्ध म्हणतात, ''चित्तेन नियतो लोको'' म्हणजे सृष्टी, संसार ही चित्ताची उपज आहे म्हणून चित्तच सर्वोपरी आहे. यास्तव आपण चित्त आणि त्याच्या विशेष गुणधर्मांचे अध्ययन करायला हवे. त्यानेच आपण विश्वातील समस्यांचे योग्य समाधान शोधून काढू शकू.

**प्रश्न २४५ (ब) : पुनर्जन्माच्या सिद्धान्ताचा समाजावर काय प्रभाव पडला ?**

**उत्तर** - जरी भगवंतांनी पुनर्जन्माला नित्य आत्म्याच्या एका शरीरातून दुसऱ्या शरीरात जाण्याला आवागमनाच्या स्वरूपात मानण्यास नकार दिला, तरी पण दुसऱ्या स्वरूपांत परलोक आणि पुनर्जन्मास त्यांनी होकार दिला. जसे - ह्या शरीरात 'जीवन' विभक्त प्रवाहाच्या रूपाने (नष्ट-उत्पत्ती-नष्ट-उत्पत्ती) एक प्रकारची एकता स्थापित केलेली आहे, त्याचप्रमाणे ती शरीराच्या अन्तीसुद्धा सुरूच राहील. पुनर्जन्माच्या तत्त्वज्ञानाविषयींच्या पैलूस अधिक मजबूत करीत भ. बुद्धांनी पुनर्जन्मास नाश आणि उत्पत्तीच्या संधीच्या (=शृंखलेच्या) रूपाने, जसा जीवनप्रवाह ह्या शरीरात सुरू आहे त्याप्रमाणे त्याची श्रृंखला एका शरीरातून पुढच्या शरीरात होते.

अविकारी भरीव आत्म्याच्या कल्पनेमध्ये, पूर्वीच्या संस्कारांना अंतर्भूत करावयास स्थान शिल्लक नव्हते, परंतु क्षणोक्षणी परिवर्तनशील तरल विज्ञानात (जीवनांत) त्याच्या वासना किंवा संस्काराच्या रूपाने आपले अंग व्हावयास कसलीही हरकत नव्हती. क्षणिकता सृष्टीच्या व्याख्येकरिता पर्याप्त होती, परंतु ईश्वराच्या कल्पनेमध्ये, ईश्वराचे कार्य, सृष्टीमध्ये व्यवस्था, समाजात व्यवस्था म्हणजे शोषित, पीडित व्यक्तीना विद्रोहापासून परावृत्त करावयाचे प्रयत्न, कायम राखणे होय. त्यामुळे भ. बुद्धांनी कर्माच्या सिद्धान्तास अधिक मजबूत केले. आवागमन, धनवान-निर्धन असले भेद त्याच कर्माच्या कारणावरून केलेले आहेत. ज्या कर्माचे कर्ता तुम्ही कधी होते, तेच कर्म आज तुमच्या हातून सुटलेल्या तीराप्रमाणे आहे. येणेप्रमाणे त्यांच्या प्रतीत्यसमुत्पादाच्या सिद्धान्ताकडे पाहिल्यास एकीकडे प्रभुता असलेला वर्ग भयभीत होत असे तर दुसरीकडे प्रतिसन्धी (शृंखला) आणि कर्माचा सिद्धान्त त्यांना अगदी निश्चिन्त करीत असे. ह्याच कारणामुळे आपल्यास भ. बुद्धाच्या झेंड्याखाली मोठमोठे राजे-रजवाडे, सम्राट, सेठ-सावकार एकत्रित झालेले दिसतात. ते समजत असत की, हा धर्म सामाजिक विद्रोहाकरिता नसून सामाजिक स्थितीला अधिक मजबूत करावयास सहाय्यक होईल. जाती-जमाती आणि देशांच्या सीमा ओलांडून भ. बुद्धाच्या विचारांनी राज्यविस्तार करावयास पुष्कळच मदत केली. समाज आर्थिक विषमतेला धक्का न लावता भ. बुद्धांनी वर्णव्यवस्था व जातिभेद उच्चनिचतेच्या भेदभावाला हटवायचे प्रयत्न केले व त्यामुळे निम्नवर्गाचा सद्भाव बौद्धधम्माकडे झुकला.

**प्रश्न २४६ : बौद्ध तत्त्वज्ञानानुसार प्रत्येक कार्यास कारण असतेच काय ?**

**उत्तर** - होय. प्रत्येक कार्याला कारण असतेच; तात्कालीक थोडे आधीचे किंवा फार आधीचे. व्यक्तिशः लागू केल्यास ह्या कार्यकारणभावाला कर्म किंवा क्रिया असे म्हणता येईल. ह्याचा अर्थ असा की, आपली स्वतःची कर्मेच दुःख किंवा आनंद आपल्या वाट्यास आणतात.

**प्रश्न २४७ : कर्म म्हणजे काय ?**

**उत्तर** - पालीमध्ये कम्म (संस्कृतमध्ये कर्म) याचा शब्दशः अर्थ आहे करणे, क्रिया. परंतु त्याचा निर्णायक अर्थ गुणवान किंवा गुणहीन संकल्प किंवा इच्छाशक्ती (चेतना) (Volition) हाच आहे. भगवंतांनी म्हटले आहे, "भिक्खूंनो, मी तुम्हाला स्पष्टपणे सांगतो, चेतना म्हणजेच कम्म. संकल्प झाल्यावर प्राणी शरीराने, वाणीने व विचाराने, कोणतेही वर्तन करीत असतो."

**चेतनाहं भिक्खवे कम्मं वदामि। चेतयित्वा कम्मं**
**करोति कायेन वाचाय मनसा। अंगु. (३) (४१५)**

**प्रश्न २४८ : केवळ पूर्वकर्मानुसारच फळे मिळतात काय ?**

**उत्तर** - नाही. कोणी जर म्हणेल की केवळ पूर्वकर्मानुसारच फळे मिळतात (जसे भाग्यात लिहिलेले आहे तेच मिळेल असे म्हणतात), तर ते बरोबर नाही. तसे असते तर या जीवनात धम्मपूर्वक आचरण करूनही फळ मिळणार नाही आणि दुःखाचा विनाश करून निर्वाणाप्रत जावयास संधीच मिळणार नाही. परंतु जर कोणी म्हणेल की कर्मानुसार फळे मिळतात, तर धम्मपूर्वक जीवन जगावयास आणि निर्वाणमार्गावर अग्रेसर होण्याची संधी मिळते. (If anyone says that man must reap according to his deeds (in previous life), in that case there is no religious life, nor is an apportunity afforded for extinction of sorrow. But if anyone says that what a man reaps accords with his deeds, in that case there is religious life, and an opportunity is afforded to the entire extinction of sorrow.)

**प्रश्न २४९ : दुष्ट मनुष्य आपल्या कर्माच्या वाईट परिणामापासून सुटका करून घेऊ शकतो काय ?**

**उत्तर** - नाही. धम्मपद असे सांगते, ''पृथ्वीवर, आकाशात, सागरात किंवा पर्वतराजीमध्ये असे एकही स्थळ नाही की, जेथे अकुशल कर्मामुळे त्याच्यावर अरिष्ट ओढविणार नाही.

**प्रश्न २५० : कुशल कर्मे करणाऱ्या मनुष्यास त्याच्या कर्माच्या परिणामामधून लाभ मिळू शकतो काय ?**

**उत्तर** - होय. कुशल कर्मामुळे त्यास लाभ मिळतोच, तत्काळ किंवा काही कालांतराने. त्याचे लाभस्थळ, शरीर, वातावरण आणि विद्या यांच्या अनुक्रमाने गति-संपत्ती, उपाधि-संपत्ती, काल-संपत्ती आणि प्रयोग संपत्ती असे आहेत. आधुनिक विज्ञानानुसार हे पूर्णतः सुसंगत आहे.

**प्रश्न २५१ : कुशल कर्मामुळे कोणते लाभ होतात ?**

**उत्तर** - भगवंतांनी कुशल कर्मांचे पाच लाभ सांगितलेले आहेत.

१. दृढ नीतिमत्तेचा असल्यामुळे आपल्या उद्योगीपणाने मालमत्ता मिळवितो.
२. त्याची सुकीर्ती दूरवर पसरते.
३. तो कोणत्याही समाजात आत्मसंयमाने व प्रसंगावधान राखून प्रवेश करतो.
४. चिंताविरहित होऊन शांत चित्ताने मरतो.
५. मृत्यूनंतर शरीर नष्ट झाल्यावर ज्या ज्या ठिकाणी त्याचे सत्कर्म जाते, त्या त्या ठिकाणी स्वर्गीय सुख व शांती त्याच्या सत्कर्माच्या पाठोपाठ येते.

**प्रश्न २५२ : केवळ स्वतःच्या कर्मामुळेच सर्वकाही घडते काय ?**

**उत्तर** - नाही. तसे जर असते तर ज्याचे कर्म वाईट त्याला नेहमीकरिताच वाईट स्थितीत राहावे लागले असते. ज्याचे कर्म चांगल तो नेहमीकरिताच चांगल्या स्थितीत राहिला असता.

परंतु तशी वस्तुस्थिती नाही. डॉक्टरचा सल्ला न घेता व औषधपाणी न करताच, त्याचे कर्म चांगले म्हणून त्याची रोगराई बरी होत नाही. (Buddhism does not assert that everything is due to Kamma. If everything were due to Kamma, a man must ever be bad, for it is his Kamma to be bad. One need not consult a physician to be cured of disease, for if one's Kamma is such one will be cured.)

**प्रश्न २५३ : कर्म केल्यावर त्याचा संचय होतो काय व त्याचे फळ कोठे जमा होते ?**
**उत्तर** – माणसाने केलेले कर्म त्याच्यासमवेतच असते. परंतु ते शरीराच्या ह्या भागांत किंवा त्या भागात किंवा ह्या अवयवात किंवा त्या अवयवात जमा झालेले दाखविता येत नाही. ज्याप्रमाणे अग्नी केवळ सूर्यातच नव्हे, तर शेणाच्या गोवरीत, रत्नांमध्ये किंवा कोणत्याही वस्तूमध्ये किंवा त्याच्या बाहेर कोठे वसतो ते दाखविता येत नाही, परंतु वस्तूंमध्ये निहित असतो. त्याप्रमाणे कर्माचे फळ कर्मामध्ये किंवा त्याबाहेर नसते, किंवा फळामध्ये कर्म नसते. परंतु कर्मामुळे नियमानुसार फळाचा आपोआपच एकाएकी उदय होतो.

**न हेत्थ देवो ब्रह्म संसारस्स अत्थि कारको**
**बुद्धधम्मा पवत्तन्ति हेतुसंभारपच्चया ति।**

येथे कोणी विश्वाचा कर्ता नाही, सृष्टीच्या नियमानुसार आपोआपच सृष्टीचे चक्र सुरू राहते.

**प्रश्न २५४ मनुष्य केवळ ह्या पृथ्वीवर जन्म घेतो, असे बौद्धधम्म शिकवितो काय ?**
**उत्तर** – सर्वसाधारण नियम तसाच आहे. ज्यांनी विशेष प्रयत्न करून आपली नैतिक उन्नती त्या पातळीहून अधिक केलेली नसेल, त्यांच्याकरिता तो नियम आहे. परंतु वसती केलेली भूमंडळे या विश्वात अगणित आहेत. (टीप ५ पहा).

**प्रश्न २५५ 'सब्ब पापस्स अकरणं', या गाथेवरून बौद्धधम्मास अक्रियावादी म्हणता येईल काय ?**
**उत्तर** – नाही. 'कर्मे न करणे' ह्याला अक्रियावाद म्हणता येईल. परंतु "सब्ब पापस्स अकरणं" म्हणजे अकुशल कर्मे न करणे, याला अक्रियावाद म्हणता येत नाही. पूर्ण गाथा येणेप्रमाणे "**सब्ब पापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा। सचित्त परियोदपनं एतं बुद्धानसासन।।**" यामध्ये कुसलस्स उपसंपदा म्हणजे कुशल कर्मांना करावे, असा स्पष्टतः क्रियावादी आदेश आहे. सद्गुण प्राप्त करणे आणि स्वतःचे अंतःकरण शुद्ध करणे ह्यांना पूर्णतः क्रियावादच म्हटले पाहिजे. भ. बुद्धांनी शिकविले की, अकुशल कर्मे तर निषिद्ध आहेतच, परंतु कुशल कर्मांचे निःसंशयपणे संपादन केलेच पाहिजे.

**प्रश्न २५६ : सर्व कर्मांमध्ये सर्वात अधिक पुण्यप्रद कशाला म्हटलेले आहे ?**
**उत्तर** – 'धम्मपदामध्ये' स्पष्ट सांगितलेले आहे की, धम्माचा प्रसार म्हणजे सदाचरणाच्या नियमांचा प्रसार करण्याचे पुण्य इतर कोणत्याही चांगल्या कृत्यांपेक्षा अधिक श्रेष्ठ आहे.

**प्रश्न २५७ : कर्म म्हणजे काय ?**
**उत्तर** – मनुष्याच्या संपूर्ण कुशल आणि अकुशल कृत्यांची गोळाबेरीज म्हणजे कर्म, अशी

कर्माची व्याख्या आहे. कार्य आणि कारण ह्या नियमाला (The law of cause and effect) 'प्रतीत्यसमुत्पाद धम्म' (पटिच्च समुप्पाद) असे म्हटलेले आहे. अंगुत्तर निकायात भ. बुद्धांनी अशी शिकवण दिलेली आहे की, माझे कर्म हाच माझा ठेवा, माझे कर्मच माझा वारसा, माझे कर्मच मला जन्म देणारे गर्भस्थान, माझे कर्मच माझे नातलग आणि माझे कर्मच माझे आश्रयस्थान होय.

नैतिक पातळीवर तसेच शारीरिक आणि इतर पातळ्यांवर परिणाम करणारा कार्यकारणभाव म्हणजे कर्म. बौद्ध तत्त्वज्ञानानुसार मानवी कार्यात चमत्काराला स्थान नाही. मनुष्य जे पेरतो, तसेच फळ त्याला मिळायला पाहिजे आणि मिळेलच.

कर्माचा कर्ता कोणी 'आत्मा' असतो काय ? याचे उत्तर बुद्धघोषाने दिले ते येणेप्रमाणे (विशुद्धिमार्ग ग्रंथ पाहावा)

**कम्मस्स कारको नत्थि विपाकस्स च वेदको।**
**सुद्धधम्मापवत्तन्ति एव ऐतं सम्पादस्सनं।।**

(अर्थ - कोणी कर्ता नाही जो कर्मास करतो, अवयवांच्या वस्तुघटकांचे चक्र स्वतःच फिरत असते. हीच खरी वस्तुस्थिती होय) आत्म्याची कल्पना बौद्धांना अमान्य आहे. कोणी आत्मा कर्म करतो, हे त्यांना मान्य नाही. बौद्धधम्मानुसार चेतना (will किंवा volition) कर्म करते. वेदना (Feeling) ही स्वतःच कर्माच्या फळाचा उपभोग घेते. याशिवाय कोणी करणारा व कोणी उपभोग घेणारा नाही Thoughts themselves are the thinkers.

**प्रश्न २५८ : भ. बुद्धांच्या संपूर्ण शिकवणीचा गर्भितार्थ एका शब्दात कसा व्यक्त करता येईल ?**

**उत्तर** – न्याय या शब्दाने. कारण भगवंताचा धम्म शिकवितो की, प्रत्येक मनुष्याला त्याच्या कुशल वा अकुशल कर्मानुसार अगदी तंतोतंत मोबदला मिळतो. कितीही क्षुल्लक असो, आणि गुप्तपणे केलेले असो, चांगले कृत्य असो वा वाईट असो, कर्माच्या प्रमाणात त्याचा परिणाम तराजूच्या तंतोतंत मापाप्रमाणे न चुकता मिळतो.

**प्रश्न २५९ : बौद्ध लोकांनी जर अकुशल कर्मे केलीत तर त्यांच्या परिणामापासून त्यांचे संरक्षण भ. बुद्ध करतीलच, असा बौद्धांचा विश्वास आहे काय ?**

**उत्तर** – मुळीच नाही. प्रत्येक अकुशल कर्माचे फळ त्याला मिळतेच. आपला स्वतःचा उद्धार स्वतःच करायला पाहिजे. जोपर्यंत तो तसे करीत नाही, तोपर्यंत तो अज्ञानी राहील व तृष्णेच्या बेड्यातून मुक्त होणार नाही. भ. बुद्ध केवळ 'मार्गदाता' आहेत.

**प्रश्न २६० : अकुशल कर्मामुळे कोणते नुकसान होते ?**

**उत्तर** – भगवंतांचा उपदेश आहे की, अकुशल कर्मामुळे पाच प्रकारचे नुकसान होते.

१. नीतिमान नसल्यामुळे दुष्कर्म करणारा आळसाने मोठ्या दारिद्र्यात पडतो.

२. त्याच्या वाईट नावाचा दूरवर प्रसार होतो.

३. ज्या कोण्या समाजात तो प्रवेश करतो - ब्राह्मणांच्या, सरदार उमरावांच्या, गृहपतींच्या वा श्रमणांच्या - तो गोंधळलेल्या मनःस्थितिने प्रवेश करतो.

४. जेव्हा मरतो तेव्हा तो अतिशय चिंताक्रांत व अस्वस्थ असतो.

५. मृत्यूनंतर शरीराचा नाश झाल्यावरही जेथे जेथे त्यांचे दुष्कर्म जाते म्हणजे जेथे तेथे त्याच्या दुष्कर्माचा परिणाम जातो किंवा त्याच्या दुष्कर्माची आठवण जाते, तेथे तेथे दुःख व शोक उद्‌भवतात. (असे पॉल कॅरेस यांचे विवेचन आहे : संकलिका)

**प्रश्न २६१ : अकुशल कर्मे माणसाला कोठे ओढून नेतात ?**

**उत्तर** - संजीव, कालसूत्र, संघान्त, रौख, महारौख, ताप, प्रताप आणि अविची यांपैकी एका अवस्थेत नेतात. यातनेचे कालमान मनुष्याच्या अकुशल कर्मावर अवलंबून असते. या अवस्था पृथ्वीवरच माणसाच्या जिवंतपणीच भोगावयास मिळतात.

**प्रश्न २६२ : कर्म वेदेनेचे मूळ आहे काय ?**

**उत्तर** - होय. ह्याशिवाय वेदना उद्‌भवण्यास आठ कारणे आहेत, ज्यांच्यामुळे जगातील सर्व जीव सुख-दुःख भोगतात.

१. वायूचे होणे २. पित्ताचा प्रकोप होणे ३. कफ वाढणे ४. सन्निपात होणे ५. ऋतू बदलणे ६. जेवणात गडबड होणे ७. बाह्य प्रकृतीचा प्रभाव होणे ८. कर्माचे फळ मिळणे.

**प्रश्न २६३ : माणसाचे मोठेपण किंवा लहानपण कर्मावर अवलंबून असते काय ?**

**उत्तर** - होय. भगवंतांनी म्हटले आहे की, प्रत्येक प्राण्याचे कर्म त्याचे स्वतःचे असते ते त्याचा वारसा, त्याचे कारण, त्याचा नातलग, त्याचे शरण आहे. कर्मामुळेच प्राणी उच्च किंवा नीच स्थितीला पोचतात.

**(कम्मस्सका, माणव सत्था, कम्मदायादा कम्मयोनी कम्मबंधु कम्मपटिसरणा कम्मंम सत्थे विभजति यदिदं हिनप्पाणितताया। मज्झिमनिकाय (३) २०३)**

**प्रश्न २६३ (अ) : सृष्टीमधे कोणकोणत्या वस्तूंचे अस्तित्व नाही ?**

**उत्तर** - सृष्टीमधे तीन वस्तूंचे अस्तित्व नाही -

१) सृष्टीमधे अजर, अमर, सचेतन किंवा अचेतन काहीही नाही.

२) संस्कार नित्य (= कधीही नाश न पावणारे) नाहीत.

३) परमार्थतः कोणी जीव किंवा आत्मा (अशी वस्तू) नाही.

## शील आणि सदाचरण

**प्रश्न २६४ : बौद्धांची जगन्मान्य 'पंचशील' तत्वे कोणती ?**

**उत्तर** - बौद्धजन विहारात सामुदायिकपणे पठण करतात ती पंचशील तत्वे अशी : हा विशिष्ट शिष्टाचार, अर्थातच ज्यांना केवळ पंचशीलांचे पालन करावयाचे असते अशा सामान्य गृहस्थाकरिताच सांगितलेला आहे. भिक्खूने ब्रह्मचर्याचे पालन कडक रीतीने करायलाच पाहिजे. तसेच जे काही विशिष्ट काळासाठी संपूर्ण दहा शीलांपैकी आठ शीलांचे पालन करण्याचे बंधन स्वतःस घालून देतात, त्या उपासकांनीसुद्धा या कालावधीत ब्रह्मचर्य पाळायलाच पाहिजे.

१) **पाणातिपाता वेरमणी, सिक्खापदं समादियामि ।**
प्राणिहिंसा करणार नाही, असे व्रत मी स्वीकारतो.

२) **अदिन्नादाना वेरमणी, सिक्खापदं समादियामि ।**
चोरी करणार नाही, असे व्रत मी स्वीकारतो.

३) **कामेसु मिच्छाचारा वेरमणी, सिक्खापदं समादियामि ।**
व्यभिचार करणार नाही, असे व्रत मी स्वीकारतो.

४) **मुसावादा वेरमणी, सिक्खापदं समादियामि ।**
असत्य बोलणार नाही, असे व्रत मी स्वीकारतो.

५) **सुरा मेरय मज्ज पमादट्ठाणा वेरमणी, सिक्खापदं समादियामि ।**
मद्यपान करणार नाही, असे व्रत मी स्वीकारतो.

**प्रश्न २६५ : पंचशीलांचा उद्देश काय आहे ?**

**उत्तर** - दैनंदिन व्यवहारामध्ये जो पंचशीलांचे कडक रीतीने पालन करील त्याला मानवी दुःखे उत्पन्न करणाऱ्या प्रत्येक कारणापासून खचितच मुक्ती मिळेल. कारण मानवी दुःखे यांपैकी कोणत्या ना कोणत्या कारणामुळेच उद्‌भवलेली असतात. भ. बुद्धांनी सर्वच लोकांना पंचशीलांचा उपदेश केलेला आहे. त्यामुळे जरी कोणी बौद्ध नसेल, तरीसुद्धा पंचशीलांचे पालन करणे त्यास खचितच लाभदायक होईल. मात्र, 'त्रिसरण' ग्रहण केल्यावरच कोणालाही बौद्ध होता येते.

**प्रश्न २६६ मद्यपान करावयास धम्माची संमती आहे काय ?**

**उत्तर** - नाही. धम्मिक सुत्तामध्ये मादक पेय न पिण्याविषयी आपणांस सक्त ताकीद दिली आहे. त्याचप्रमाणे दुसऱ्यांना उद्यत न करण्यास किंवा पिणाऱ्यांच्या वर्तनास मंजुरी न देण्यास सांगितले आहे.

मद्यपान दुर्गुणांचा, गुन्ह्यांचा, वेडेपणाचा आणि अज्ञानाचा मार्ग दाखवितो, असे सांगितलेले आहे. जी शेवटी नशेखोर बनविते ती दारू आणि नशा आणणारे मादक पेय न घेण्याविषयीचा उल्लेख पांचव्या शीलामध्ये आहे.र

**प्रश्न २६७ : पंचशीलांचे पालन केल्याने मनुष्याला कोणते लाभ होतात ?**

**उत्तर** - मनुष्याने जेवढ्या अधिक नियमांचे पालन केले तेवढ्याच अधिक प्रमाणात त्यास लाभ होतो. जितक्या दीर्घ काळापर्यंत तो त्या नियमांचे पालन करील तितक्याच अधिक प्रमाणात त्याला कुशल कर्माच्या लाभाची प्राप्ती होईल. जो एकाही नियमाचे उल्लंघन न करता सर्व नियमांचे पालन करील त्याला उच्चतर आणि सुखकर आयुष्यलाभ होईल.

**प्रश्न २६८ :सामान्य लोकांसाठी स्तुत्यपर समजली जाणारी इतर कोणती शीले आहेत ?**

**उत्तर** - 'अष्टशील'. त्यात पंचशीले तर आहेतच, शिवाय आणखी तीन शीलांचा त्यात समावेश केलेला आहे. बौद्ध उपासक आणि उपासिका या शिलांचे उपोसथव्रत धारण करताना पालन करतात. प्रत्येक शुक्लपक्षांतील अष्टमी, चतुर्दशी व पौर्णिमा या दिवशी उपोसथव्रत धारण करता येते.

६) **विकाल भोजना वेरमणी, सिक्खापदं समादियामि ।**
अवेळी भोजन करणार नाही, असे व्रत मी स्वीकारतो.
७) **नच्च-गीत-वादित-विसूक-दस्सना वेरमणी, सिक्खापदं समादियामि ।**
नृत्य-गायन-संगीत आणि तमास-दर्शन करणार नाही, असे व्रत मी स्वीकारतो.
८) **माला-गंध-विलेपन धारण, मंडन-विभूसत्थाना वेरमणी, सिक्खापदं समादियामि ।**
हारतुरे, अत्तरे, सुगंधी द्रव्ये, उटणे किंवा अलंकार धारण करणार नाही, असे व्रत मी स्वीकारतो.

**प्रश्न २६९ : भिक्खूंनी पाळावयाची दशशीले कोणती ?**
**उत्तर** - अष्टशीलाशिवाय आणखी दोन शीलांचा दशशीलामध्ये समावेश आहे, ती येणेप्रमाणे
९) **उच्चासयना - महासयन वेरमणी, सिक्खापदं समादियामि ।**
उच्च, मौलिक शय्याशयन न करणे, असे व्रत मी स्वीकारतो.
१०) **जात-रूप-रजत-पट्टीगहणा वेरमणी, सिक्खापदं समादियामि ।**
सोने, चांदीचा लोभ मी करणार नाही, असे व्रत मी स्वीकारतो.
भिक्खूंनी सर्वच दहा शीले कडकपणे पाळावयाची असतात.

**प्रश्न २७० : दहा अकुशल कर्मे कोणती ?**
**उत्तर** - दहा पापकर्मे ज्यांना पाली भाषेमध्ये दस अकुसलकम्मपथ असे म्हणतात ती अशी
१. प्राणघात २. अदत्तादान ३. व्यभिचार ही तीन कायिक पापे होत.
१. असत्यभाषण २. चहाडी ३. कठोर भाषण ४. व्यर्थ बडबड ही चार वाचिक पापे होत.
१. परद्रव्यासक्ती २. क्रोध व ३. नास्तिकता ही तीन मानसिक पापे होत. येथे नास्तिकता याचा अर्थ 'परोपकार करण्यात अर्थ नाही', शीलपालन करण्यात अर्थ नाही, समाधीपासून काही लाभ नाही, इत्यादी विचार.

**प्रश्न २७१ : बौद्ध जीवनमार्ग कोणता ?**
**उत्तर** - १) शुभ कर्मे करीत राहणे, अशुभ कर्मात सहयोगी न होणे, कोणतेही पापकर्म न करणे हाच बौद्ध जीवनमार्ग होय.
२) लोभ व तृष्णा यांच्या आहारी न जाणे हा बौद्ध जीवनमार्ग होय. लोभ व तृष्णा ह्यांच्यापासून दुःख व भय उत्पन्न होतात. जो लोभमुक्त व तृष्णामुक्त असतो, त्याला दुःख नसते व भयही नसते.
३) कोणालाही क्लेश न देणे व दुसऱ्यासंबंधी द्वेषभावना न बाळगणे हा बौद्ध जीवनमार्ग होय. जर माणसाने निरुपद्रवी, शुद्ध व निष्पाप मनुष्याला उपद्रव दिला, तर ज्याप्रमाणे वाऱ्यावर फेकलेली धूळ फेकणाऱ्यावरच येऊन पडते, त्याचप्रमाणे त्या माणसाला त्या उपद्रवाचा परिणाम भोगावा लागतो.
४) क्रोध न करणे, शत्रुता विसरून जाणे आणि आपल्या शत्रूंनाही मैत्रीभावाने जिंकणे हाच बौद्ध जीवनमार्ग होय.
५) मनुष्याने अक्रोधाने क्रोधाला जिंकावे, दुराचाराला सदाचाराने जिंकावे, लोभ्याला उदारतेने जिंकावे आणि खोटे बोलणाऱ्याला सत्यभाषणाने जिंकावे. वैराने वैर कधीही शांत होत नाही. अवैरानेच ते शांत होते, हा सनातन धम्म आहे.

६) कामाग्नीसारखा अग्नी नाही, द्वेषासारखे दुर्दैव नाही, उपादान स्कंधासारखे दुःख नाही, लोभासारखा पूर नाही आणि निर्वाणापेक्षा मोठे सुख नाही.

७) मन माणसाला जसे घडविते, मनुष्य तसाच होतो. सन्मार्गाने पुढे जावयाचे मनाला शिकविणे, हे पुण्यमार्गातील पहिले पाऊल होय, अशी बौद्ध जीवनमार्गाची मुख्य शिकवण आहे.

८) पापापासून दूर राहावे, पुण्य करीत राहावे, स्वतःचे विचार शुद्ध ठेवावेत, अशी भ. बुद्धांची शिकवण आहे.

९) जर स्वतःला अहंभाव असेल तर मनुष्याने त्या अहंभावावर विजय मिळविण्याचा प्रयत्न करावा. म्हणजेच आत्मविजयी होण्यास प्रयत्नशील असावे. हाच बौद्ध जीवनमार्ग होय. मनुष्य हाच स्वतःचा स्वामी आहे. जेव्हा तो स्वतःला संयमी बनवितो, तेव्हा तो दुर्लभ स्वामित्वाला प्राप्त करतो.

१०) मनुष्य स्वतः केलेल्या पापाबद्दल स्वतःच भुर्दंड भरतो व तो स्वतःला स्वतःच पापापासून शुद्ध करू शकतो. तेथे दुसरा कोणी येत नाही. तो निश्चितपणे स्वतःच स्वतःचा संरक्षक आहे. त्याचे संरक्षण दुसरा कोण करणार? जो स्वतःच स्वतःचे संरक्षण करतो, त्याला स्वतःसारखा दुसरा संरक्षक मिळणे दुर्लभ आहे.

११) न्यायी होणे आणि सत्संगती धरणे, हाच बौद्ध जीवनमार्ग होय. पापी व नीच पुरुषाची संगत करू नये. सदाचारी व श्रेष्ठ पुरुषांनाच आपला मित्र बनवावे. जर माणसाला बुद्धिमान, दूरदृष्टी, शहाणा, धैर्यवान, संयमी साथी लाभला नाही तर जसा एखादा राजा जिंकलेला प्रदेश मागे सोडून एकटाच पुढे जातो, त्याप्रमाणे त्याने आपला जीवनपथ जंगलातील गजराजाप्रमाणे एकट्यानेच आक्रमावा.

१२) जगात मातृत्व, पितृत्व आणि श्रमणत्व सुखकर आहेत. म्हणून मनुष्याने प्रज्ञावान, बुद्धिमान, शहाण्या, क्षमाशील, धर्मधर व श्रेष्ठ व्यक्तीच्या मार्गाने जावे. जसा अविचारी माणासांमध्ये विवेकशील, निद्रिस्थांत जागृत, त्याचप्रमाणे शहाणा मनुष्य मूर्खांना मागे सारून पुढे सरत असतो.

१३) प्रत्येक कार्य करताना सावधान राहणे, विवेक राखणे, अप्रमादी व उत्साही राहाणे हा बौद्ध जीवनमार्ग होय.

१४) ज्याप्रमाणे व्यवस्थित शाकारलेल्या घरात पावसाचे पाणी गळू शकत नाही त्याचप्रमाणे चिंतनयुक्त मनात विकार प्रवेश करू शकत नाही. क्षुब्ध झालेल्या गजाला अंकुशाने माहूत जसे आपल्या ताब्यात ठेवतो, तसे चित्ताला ताब्यात ठेवून त्यावर स्वामित्व गाजवावे. वाईट मार्गाकडे वळलेले मन शत्रूपेक्षाही आपले अधिक अहित करते. आईबाप व आप्तेष्ट जेवढे हित करू शकतील त्याहूनही अधिक हित सन्मार्गाकडे वळलेले चित्त करीत असते.

१५) अप्रमादी जेव्हा प्रमादाला जिंकतो, तेव्हा तो शोकमुक्त होतो. म्हणून प्रमाद करू नयें. काम-भोगापासून दूर राहावे. अप्रमादी मनुष्यच ध्यानलाभ करतो. अप्रमाद अमर असतो. परंतु प्रमाद म्हणजे जणू मृत्यूची पायरीच! प्रमाद एक कलंक आहे, सतत प्रयत्नशील राहून व सम्यक दृष्टीने चिंतन करून प्रमादरूपी विषारी बाणाला बाहेर काढून फेकून द्यावे. जो अप्रमादी व जागरूक आहे, स्मृतिमान आहे, सुविचारी आहे, संयमी आहे, विवेकी आहे

अशा पुरुषाचे यश सारखे वाढतच असते.

१६) दारिद्र्य हे दुःखाचे मूळ होय. परंतु दारिद्र्यनाशाने सुख लाभेलच असे नाही. सुख उच्च राहाणीवर अवलंबून नसते. शुद्ध आचरण हाच सुखाचा मूलमंत्र आहे, हाच बौद्ध जीवनमार्ग आहे.

१७) भूक सर्वांत मोठा रोग, आरोग्य सर्वांत मोठा लाभ, संतोष सर्वांत मोठे धन, विश्वास सर्वांत श्रेष्ठ नातेवाईक आणि निर्वाण सर्वात मोठे सुख होय.

१८) धर्माचे दान सर्वांत श्रेष्ठ दान व धर्माचे माधुर्य सर्वांत श्रेष्ठ माधुर्य होय. क्रोधयुक्त वाणी दुःखद असते. आघात केल्यास प्रत्याघात होईल. स्वतंत्रता, उदारता, सदिच्छा व निःस्वार्थपरायणता ही जीवनाला तितकीच आवश्यक आहेत जितकी रथाच्या चाकाला खीळ. हाच बौद्ध जीवनमार्ग होय.

१९) सर्वच प्रकारचे असत्य भाषण टाळावे. तथागत जसे बोलतात तसे वागतात; जसे वागतात तसे बोलतात. कारण की, ते यथाभाषी तथाकारी आणि यथाकारी तथाभाषी आहेत. हा बौद्ध जीवनमार्ग होय.

२०) सम्यक मार्गाचे अनुसरण करावे. तो बहुजन सुखासाठी आहे. सन्मार्गाचे अनुसरण करणे, बौद्ध जीवनमार्ग होय.

२१) आर्य अष्टांगिक मार्ग हा सर्वश्रेष्ठ मार्ग असून, तथागत हे केवळ पथप्रदर्शक आहेत. स्वतःच्या उन्नतीचा प्रयत्न ज्याचा त्याने स्वतःच करावयाचा असतो, अप्रमाद निर्वाणाचा मार्ग होय, व प्रमाद मृत्यूचा मार्ग होय. अप्रमादी अमर असतात व प्रमादी मृतवत्.

२२) जे सत्याला सत्य व असत्याला असत्य म्हणून जाणतात, त्यांना सम्यक दृष्टीसंपन्न म्हणावे. त्यांनाच सत्याचा लाभ होतो. सन्मार्गगामी बनावे. सन्मार्गगामी लोक इहलोकी आणि इतर सर्व लोकी सुखी होतात.

**प्रश्न २७२ : शीलमार्गाचे व्रत म्हणजे ज्या दहा पारमिता त्या कोणत्या ?**

**उत्तर** - १) शील-शील म्हणजे नैतिकता. अकुशलापासून अलिप्त व कुशल करण्याची प्रवृत्ती बळावणे. शील म्हणजे पापभीरूता.

२) दान : दुसऱ्यांच्या कल्याणाकरिता आपली संपत्ती, रक्त, शरीराचे अवयव, एवढेच नव्हे तर आपल्या प्राणाचेही बलिदान करणे म्हणजेच दान.

३) उपेक्षा : उपेक्षा म्हणजे अनासक्ती, फलाची विशेष आशा न करता निरपेक्ष भावाने साधना करण्यात मग्न असणे.

४) नैष्कर्म्य : ह्याचा अर्थ आहे सांसारिक काम-भोगांचा त्याग.

५) वीर्य : वीर्य म्हणजे सम्यक् प्रयत्न. जे एकदा करण्याचा निश्चय केला ते पूर्ण झाल्याशिवाय न थांबणे.

६) क्षांती : क्षांतीचा अर्थ आहे क्षमा-शीलता. घृणेने घृणा संपत नाही तर क्षमा-शीलतेनेच घृणेचा नाश होतो.

७) सत्य : सत्य म्हणजे मृषावादी नसणे केवळ सत्यच बोलणे.

८) अधिष्ठान : अधिष्ठानाचा अर्थ आहे आपल्या उद्देशापर्यंत पोहचण्याचा दृढ निश्चय.

९) करु णा : करुणा म्हणजे सर्व मनुष्यप्राण्यांप्रती प्रेमपूर्वक दया करणे.
१०) मैत्रीः सर्व प्राणिमात्रांकरिता भ्रातृभावना असणे. शत्रू असो किंवा मित्र, मानव असो किंवा अन्य प्राणी, सर्वांप्रती भ्रातृभावना असणे.
ह्या सर्व सद्गुणांचा अभ्यास करून त्यांना अंगी बाणविण्याचे प्रयत्न करावे लागतात.

**प्रश्न २७३ : सदाचरण म्हणजे काय ?**

**उत्तर** - शारीरिक सदाचरण तीन प्रकारचे, वाणीचे चार प्रकारचे आणि मनाचे तीन प्रकारचे आहेत.

शारीरिक सदाचरण म्हणजे १) जीवहिंसा व प्राणीहिंसा यांचा त्याग करून प्रत्येक प्राणीमात्रांवर अनुकंपा करणे. २) चोरीपासून विरत राहून प्रामाणिकपणे उपजीविका करणे, व ३) मिथ्याचारापासून दूर राहणे.

वाणीचे सदाचरण म्हणजे १) असत्य बोलणे, सर्वथा सोडून देणे. २) चुगल्या न करता, भांडणे न लावता ऐक्य निर्माण करणें, प्रेम व आनंद निर्माण करणे. ३) कटुवचन न बोलता सर्वांना प्रिय व आनंददायी असेच बोलणे, आणि ४) व्यर्थ बडबड न करता, समयानुकूल व हितकर असेच बोलणे.

मनाचे सदाचरण म्हणजे १) निर्लोभी असणे व परधन आपले व्हावे अशी हाव कधीच न धरणे. २) आपल्या मनात द्वेषाला थारा न देणे, आणि ३) आपली दृष्टी सम्यक आणि संकल्प प्रमादरहित ठेवणे.

भ. बुद्धांच्या उपदेशानुसार सदाचरणाचा अर्थ असा आहे.

**प्रश्न २७४ : उत्तम शील कोणते ?**

**उत्तर** - कीर्ती मिळावयाच्या आशेने पाळलेले शील हीन, पुण्यफळाच्या आशेने पाळलेले मध्यम, व हे माझे कर्तव्य आहे अशा भावनेने पाळलेले उत्तम समजावे.

आपणांस दुसऱ्या जन्मी सुख मिळावे म्हणून पाळलेले शील हे हीन, आपणाला मोक्ष मिळावा या हेतूने पाळलेले मध्यम, व सर्व प्राणिमात्रांच्या हितासाठी पाळलेले शील उत्तम होय.

**प्रश्न २७५ : हानिकारक शील कोणते ?**

**उत्तर** - जो अविद्वान मनुष्य पाप्यांचा सहवास करतो आणि शीलवंतांच्या समागमात राहत नाही, जो नियमभंगाची परवा करीत नाही, ज्याच्या मनात विशेषतः पापविचार घोळत असतात, व जो आपल्या इंद्रियांचे रक्षण करीत नाही, त्याचे शील हीनभागी होते.

**योध सेवति दुस्सीले सीलवन्ते न सेवति।**
**वत्थुवीतिक्कमे दोसं न पस्सति अविद्दसु।।**
**मिच्छासंकप्प बहुलो इंद्रियानि न रक्खति।**
**एव रूपरस्स वे सीलं जायते हीनभागियं।।**

**प्रश्न २७५ (अ) : शीलव्रत परामर्श ह्याचा अर्थ काय ?**

**उत्तर** - शीलव्रतपरामर्श (= सीलब्बत परामास) म्हणजे बाह्य कर्मकांडावर विश्वास. जसे - माळा, टिळा, बाह्य आडंबर, नदी-स्नान, तीर्थाटन, कथापाठ, उपवास-व्रत, इत्यादीमध्ये

विश्वास व त्यांत आसक्ती. आपल्या तत्त्वज्ञानाविषयीची आसक्ती. त्या सर्वांना धर्म समजून त्यांच्यामुळे मुक्ती मिळेलच अशी धारणा.

**प्रश्न २७६ : मरणस्मृतीच्या अभ्यासाने आळस नष्ट होतो काय ?**

**उत्तर** - होय. ज्याचा मोह म्हणजे आळस बळकट त्यास मोहचारित म्हणतात. मरणाचे निर्भयपणे चिंतन केले असता आळस नष्टप्राय होऊन जातो, ते असे-

**पवातदीपतुल्याय सायुसंततिया खयं।**
**परूपमाय संपस्सं भावये मरणस्सतिं।।**

वाऱ्याच्या झोतावर ठेवलेल्या दिव्याप्रमाणे आपल्या आयुष्याचा नाश होत चालला आहे, हे इतरांच्या उदाहरणाने जाणून मरणस्मृती वाढवावी (मरणाचे चिंतन करावे).

**महासंपत्ति संपत्ता यथा सत्ता मत्ता इध।**
**तथा अहं मरिस्सामि मरणं मम हेस्सति।।**

ज्यांना मोठी संपत्ती प्राप्त झाली होती, ते पुरुषही या जगातून जसे नाहीसे झाले, तसा मीही मरणार आहे.

अशा रीतीने मरणाचे निर्भयपणे चिंतन केले असता आळस नष्टप्राय होऊन जातो व अंतःकरणात जागृती उत्पन्न होऊन मनुष्य कर्तव्यदक्ष होतो.

**प्रश्न २७७ : कामवासना नष्ट करावयास कायगतास्मृती कशा प्रकारे मदत करते ?**

**उत्तर** - ज्याची कामवासना इतर मनोवृत्तींहून बळकट त्याला रागचरित असे म्हणतात. कायगतास्मृतीचा अभ्यास केल्याने, म्हणजे विवेकाने आपल्या शरीराचे अवलोकन केल्याने, कामवासेनचा हळूहळू लोप होतो. शरीरातील निरनिराळ्या पदार्थांकडे वैराग्यपूर्ण दृष्टीने पाहावयाची सवय करावी. मांस, आंतडे, अस्थि इत्यादिंकडे ज्ञानदृष्टीने पाहावे. जेथे फाडलेले प्रेत पाहावयास सापडेल तेथे जाऊन ते अवश्य पाहावे. त्यांपैकी ज्या भागाकडे पाहून विशेष वैराग्य उत्पन्न होईल त्या भागाची आपल्या शरीराची तुलना करावी. या माझ्या देहाची एकत्र असलेली हाडे निरनिराळी होऊन पडणार आहेत, अशी कल्पना करावी. अशा रीतीने शरीरातील एखाद्या भागाचे वैराग्यपूर्ण चिंतन करावे. स्त्री-पुरुषांकडे पाहताना कांतीशिवाय केवळ हाडांचा सांगाडा असल्याची कल्पना करावी. अशा प्रकारे चिरकालपर्यंत चिंतन केल्याने कामवासना नष्ट होते.

**प्रश्न २७८ : भ. बुद्धांचा उपदेश सारांश रूपाने केवळ एकाच गाथेमध्ये असलेली गाथा कोणती ?**

उत्तर -
**सब्ब पापस्स अकरणं**
**कुसलस्स उपसम्पदा**
**सचित्त परियो दपनं**
**एतं बुध्दानं सासनं।**

'सर्वच अकुशल कर्मांना न करणे,
कुशल कर्मांना करणे,
चित्ताला परिशुद्ध करणे,
हीच बुद्धांची शिकवण होय.'

प्रथम ओळीमध्ये विनयपिटका मधील संपूर्ण भावना अंतर्भूत आहे दुसऱ्या ओळीमध्ये 'सुत्त पिटकाची' व तिसऱ्या ओळीमध्ये 'अभिधम्म पिटकाची' भावना अंतर्भूत आहे. त्यांच्यात केवळ आठ पाली भाषांचा समावेश आहे. तथापि, ज्याप्रमाणे दवबिंदूमध्ये ताऱ्यांचे प्रतिबिंत पडून तो चमकतो त्याचप्रमाणें संपूर्ण बुद्धधम्माची भावना त्यातून झळाळते. (प्रश्न २५५ पाहावा)

**प्रश्न २७९ प्रत्येक बौद्धाला अनुसरण्यास योग्य असे तीन मार्गदर्शक कोण ?**

**उत्तर** - त्रिसरण.

'माझे मार्गदर्शक म्हणून मी भ. बुद्धांचे अनुसरण करतो माझा मार्गदर्शक म्हणून मी धम्माचे अनुसरण करतो माझा मार्गदर्शक म्हणून मी संघाचे अनुकरण करतो.' (टीप ६ पाहावी)

**प्रश्न २८० : डॉ. बाबासाहेब आंबेडकरांबद्दल श्रद्धा असणाऱ्या काही जणांना असे वाटते की, धर्म परिवर्तनाच्या वेळी बौद्ध उपासक बनविण्यासाठी बुद्ध, धम्म व संघ ह्यांच्यासोबतच 'भीमं सरणं गच्छामि' हे चौथे शरणही ग्रहण करावयास हवे. परंतु हे योग्य आहे काय?**

**उत्तर** - नाही. असे केल्याने कोणी त्रिशरणागत उपासक तर कोणी चार-शरणागत उपासक असा भेद उत्पन्न होऊन बौद्धांमध्ये फूट पडण्याची शक्यता आहे. म्हणून सर्वांनी त्रिशरण ग्रहण करणेच योग्य आहे.

**प्रश्न २८१ : त्रिशरणाचा स्वीकार करताना बौद्धाच्या मनात काय उद्देश असतो ?**

**उत्तर** - त्याला म्हणावयाचे असते की, तो भ. बुद्धांना आपल्या सर्वज्ञ गुरूप्रमाणे, मित्राप्रमाणे आणि आदर्श विभूतीप्रमाणे मानतो तो धम्माला न्यायाची आणि सत्याची आवश्यक तत्त्वे समाविष्ट असलेला, पृथ्वीवर मनःशांतीच्या अनुभवाकडे नेणारा मार्ग आहे, असे मानतो आणि संघाला तो भ. बुद्धांनी शिकविलेल्या उत्कृष्ट धम्माच्या अध्यापकाप्रमाणे व आदर्श विभूतीप्रमाणे मानतो.

**प्रश्न २८२ : बौद्ध धम्माची मूलत्त्वे कोणती ?**

**उत्तर** - आत्मविकास आणि विश्वबंधुत्व. बौद्ध धम्माचे दोन आधारस्तंभ आहेत, प्रज्ञा आणि करुणा. धम्म म्हणजे सदाचरण. म्हणजेच जीवनाच्या सर्व क्षेत्रांमध्ये एका माणासाचा दुसऱ्या माणसाप्रती चांगला व्यवहार. 'मित्र' (किंवा मैत्रेय) म्हणजे दयाशील करुणेने ओतप्रोत अशा बुद्धधम्माच्या तत्त्वांमुळे बौद्धधम्माला उदात्त व सर्वोच्च स्थान प्राप्त झाले आहे.

**प्रश्न २८३ : भ.बुद्धांनी आपल्या पूर्वीच्या पांच सोबत्यांना (पंचवर्गीय भिक्खू) उद्देशून केलेल्या पहिल्या प्रवचनाला आपण काय म्हणतो ?**

**उत्तर** - 'धम्मचक्रप्रवर्तन सूत्र' धम्माच्या तत्त्वज्ञानाची व्याख्या करणारे सूत्र, धम्मचक्रप्रवर्तन सूत्रामधून त्यांनी कोणत्या विषयांचे प्रतिपादन केले होत? 'चार आर्यसत्ये' आणि 'आर्य अष्टांगिक मार्ग'. त्यांनी तपस्व्यांच्या अति कठोर देहदंडनाच्या मार्गाला निरुपयोगी घोषित

केले आणि अति वासनासक्त मार्गाचाही निषेध केला; ह्या दोन्ही टोकांमधील अतिरेक टाळून मध्यममार्ग म्हणजेच आर्य अष्टांगिक मार्गाची शिफारस करून त्यांनी तो समजावून सांगितला. (टीप ७ पाहावी)

**प्रश्न २८४ : साधनेमध्ये अडचण आणणाऱ्या पांच दुर्बलता कोणत्या ?**
**उत्तर** - साधनेमध्ये अडचण आणणाऱ्या पांच दुर्बलता येणेप्रमाणे - जीवहिंसा, चोरी, मिथ्याभाषण, काममिथ्याचार आणि मादक पदार्थांचे सेवन. ह्या पाच दुर्बलता नष्ट झाल्यावर चार स्मृति-स्थानांची उत्पत्ती होते.

**प्रश्न २८५ : जीवनांतील तीन घात कोणते ?**
**उत्तर** - शीलघात, चित्तघात, दृष्टिघात. एक माणूस प्राणिहिंसा करतो, चोरी करतो, कामभोगसंबंधी मिथ्याचार करतो, खोटे बोलतो, चुगली करतो, कठोर बोलतो आणि व्यर्थ बोलतो, यांना शीलघात म्हणतात. एक माणूस लोभी असतो, दौर्मनस्ययुक्त असतो, हा चित्ताचा घात आहे. कोणी माणूस अशा तऱ्हेच्या चूक धारणेने ग्रस्त असतो की, दान देण्यात, त्याग करण्यात, परित्याग करण्यात काहीच पुण्य नाही. चांगल्या-वाईट कर्मांचे काहीच फळ मिळत नसते, न हे जग आहे, न दुसरे जग आहे, न माता आहे, न पिता आहे, न स्वोत्पन्न प्राणी आहे. जगांत असे कोणी ब्राह्मण-श्रमण नाहीत, जे अत्युच्च शीलव्रताच्या शिखरावर पोहोचलेले आहेत व जीवनाची पूर्णता प्राप्त केली आहे, दृष्टिघात होय.

**प्रश्न २८६ : मृत्युनंतरच्या जीवनाची चिंता व्यर्थ असे भगवंतांनी का म्हटले आहे ?**
**उत्तर** - हा असा प्रश्न आहे कीं, ज्याच्या उत्तराने मनुष्याचे काहीच हित सिद्ध होत नाही. ह्या जीवनाचा अंत म्हणजे श्रेष्ठ जीवनाचा आरंभ किंवा निर्वाणप्राप्ती असा नसल्यामुळे, किंवा प्रज्ञेची प्राप्ती असा नसल्यामुळे भगवंतांनी हा प्रश्न अव्याकृत ठेवला आहे.

## धम्म कशाला म्हणावे ?

**प्रश्न २८७ : पुण्य-धम्म म्हणजे काय ?**
**उत्तर** - शील, श्रद्धा, वीर्य, स्मृती आणि समाधी हे पुण्य धम्म आहेत.

**प्रश्न २८८ : शील कसे ओळखावे ?**
**उत्तर** - सदाचरणाचा आधार शील आहे. ज्ञानी मनुष्य शीलाच्या आधाराने दृढ राहून आपल्या चित्ताला वश करून घेतात. संयमी व बुद्धिमान भिक्खू शीलाच्या आधारेच तृष्णेला नष्ट करतो.

**प्रश्न २८८ (अ) : भगवंतांच्या धम्माने सामाजिक परिवर्तनासाठी कशा तऱ्हेची मदत केली ?**
**उत्तर** - भगवंतांचा धम्म, त्याचे मौलिक रूप प्रतीत्यसमुत्पादाच्या रूपाने अत्यंत क्रांतिकारी स्वरूपाचा होता. संसार, समाज, मनुष्य ह्या सर्वांना त्याने क्षणोक्षणी परिवर्तनशील असल्याचे घोषित केले. परिवर्तनानुसार आपले व्यवहार आणि आपल्या समाजाच्या परिवर्तनासाठी नेहमीच तयार राहावयाची तो शिकवण देत असे. भगवंतांनी स्वतःचे सगळ्यात महत्त्वाचे

असे तत्त्वज्ञान (म्हणजे धम्म), यासदेखील केवळ एका नावेसमान उपमा दिली आणि त्यापासून फक्त फायदा तेवढा घ्या अशी शिकवण दिली. एवढेच नव्हे तर, जोवर धम्म लोकोपयोगी राहील तोपर्यंतच त्याचा वापर करा, अशी निग्रहाची शिकवण दिली.

**प्रश्न २८९ : श्रद्धा कशी ओळखावी ?**

**उत्तर –** मनात प्रसन्नता निर्माण करणे श्रद्धेची ओळख आहे. चित्तास सर्व बाधांपासून अलिप्त, स्वच्छ, प्रसन्न आणि निर्मळ करून मनात उच्च महत्त्वाकांक्षा निर्माण करणे श्रद्धेचे कार्य आहे. एखादा मनुष्य अप्राप्त गोष्टीला प्राप्त करण्याकरिता प्रयत्न व परिश्रम करतो. कारण त्याच्या मनात ती गोष्ट प्राप्त करण्याची महत्त्वाकांक्षा असते. ही महत्त्वाकांक्षा श्रद्धेमुळे निर्माण झालेली असते. भगवंतांनी 'संयुक्त निकायात' असे म्हटले आहे. 'श्रद्धेमुळे मनुष्य नदीच्या प्रवाहाला पार करून जातो', अधिक प्रयत्नशील राहून तो पुढे सागराला पार करण्याची आकांक्षा बाळगतो, दृढ संकल्पाने दुःखाचा नाश करतो, आणि प्रज्ञेने तो दुःखमुक्त होतो.'

**प्रश्न २९० : वीर्य कसे ओळखावे ?**

**उत्तर –** 'दृढ करणे' वीर्याची ओळख आहे. वीर्य म्हणजे प्रयत्न. ज्याप्रमाणे एखादा मनुष्य पडत असलेल्या घराला खांबाचा आधार देऊन घराला पडण्यापासून वाचवितो, म्हणजेच घराला दृढ करतो. त्याप्रमाणे वीर्यापासून दृढ केले गेलेले सर्व धर्म ढळत नाहीत. भगवंतांनी म्हटले आहे, 'भिक्खूंनो! वीर्यवान आर्यश्रावक पाप सोडून पुण्य ग्रहण करतो, दोष सोडून दोषरहित होण्याचा प्रयत्न करतो. तो स्वतःला शुद्ध करीत असतो'.

**प्रश्न २९० (अ) : 'स्मृती' ला कसे ओळखावे ?**

**उत्तर –** अगदी 'बरोबर आठवण ठेवणे' आणि 'स्वीकार करणे' ह्यालाच स्मृती म्हणतात. स्मृती आठवण करून देत असते की अमूक-अमूक कुशल आहे, हे अकुशल आहे. हे दोषयुक्त आहे, हे दोषयुक्त नाही. हे वाईट, हे चांगले. हे कृष्ण, हे शुक्ल, ही चार स्मृतिप्रस्थान आहेत, हे सारे सम्यक प्रयत्न आहेत, ह्या चार रिद्धी आहेत, ही पाच इंद्रिये आहेत, ते पाच बळ, ही सात बोध्यंगे, हा आर्य अष्टांगिक मार्ग, ही शपथ, ही विदर्शना, ही विद्या आणि ही विमुक्ती. स्मृती उत्पन्न होऊन शोध घेते की कोणते धर्म हितकर आहेत आणि कोणते अहितकर. हे धर्म फायद्याचे आणि हे धर्म नुकसानकारक, असा शोध घेऊन सांगते. त्यामुळे योगी अहितकारक धर्मांना सोडून देतो आणि हितकारक धर्मांचा स्वीकार करतो. येणेप्रमाणे स्वीकार करणे, यासच स्मृतीची ओळख म्हटलेले आहे.

**प्रश्न २९० (ब) : 'समाधी' ला कसे ओळखावे ?**

**उत्तर –** 'प्रमुख असणें' ही समाधीची ओळख आहे. जेवढे पुण्यधर्म आहेत ते सर्व समाधीच्या प्रमुख असण्यामुळे असतात. समाधीकडेच झुकतात, समाधीकडेच घेऊन जातात आणि समाधीमधेच स्थित होतात. ज्याप्रमाणे एखादी मीनार असते तिच्या सर्वच पायऱ्या सर्वांत वरच्या माळ्याकडे प्रमुख नेणाऱ्या असतात, वरच्या माळ्याकडेच जातात, तिथेच जाऊन अंत पावतात, तिथेच शेवटास जातात. भगवंतांनी म्हटलेच आहे, ''भिक्खूंनो! समाधीचा अभ्यास करा. समाधी लागल्याने खरे ज्ञान प्राप्त होते.'' (बघा प्रश्न १९७)

**प्रश्न २९० (क) : ज्ञानाला कसे ओळखावे ?**

**उत्तर** - 'कापणे' ज्ञानाची ओळख आहे आणि 'दाखवून देणे' देखील ज्ञानाची ओळख आहे. ज्ञान उत्पन्न झाल्याने अविद्यारूपी अंधार दूर होतो आणि विद्यारूपी प्रकाश उत्पन्न होतो. त्या प्रकाशात चारही आर्यसत्ये स्पष्टपणे दिसू लागतात. त्यावेळी योगी अनित्य, दुःख आणि अनात्म यांना उत्तम प्रकारे ज्ञानाद्वारे जाणून घेतो. याप्रमाणे 'दाखवून देणे' देखील ज्ञानाची ओळख आहे.

**प्रश्न २९१ : धम्म कशाला म्हणावे ?**

**उत्तर** - १) जीवनाला पवित्र ठेवणे, याला धम्म म्हणावे.

२) जीवनात पूर्णता प्राप्त करणे, याला धम्म म्हणावे.

३) निर्वाण प्राप्त करणे, याला धम्म म्हणावे.

४) तृष्णेचा त्याग करणे, याला धम्म म्हणावे.

५) सर्व संस्कार अनित्य आहेत असे मानणे, याला धम्म म्हणावे.

६) कर्माला मानव जीवनाच्या नैतिक क्रमाचा आधार मानणे, याला धम्म म्हणावे.

(भगवंतांनी बोधिपक्षीय धम्माचा केलेला अंतिम उपदेश प्र. ९४ मध्ये पाहावा.)

**प्रश्न २९२ : जीवनाला पवित्र ठेवणे, यालाच धम्म म्हणावे काय ?**

**उत्तर** - होय. जीवहिंसा, चोरी व मिथ्याचारापासून मनुष्य विरक्त झाला तर त्यास त्याची शारीरिक पवित्रता समजावी. तो खोटे बोलण्यापासून विरक्त झाला तर त्यास त्याच्या वाणीची पवित्रता समजावी. कामछन्द, व्यापाद (द्वेष) आणि आळस यांच्यापासून विरक्त झाला तर त्यास त्याची मानसिक पवित्रता समजावी. अशा प्रकारे जो शरीर, वाणी व मन ह्यांनी पवित्र झालेला असेल, त्यालाच लोक निष्कलंक म्हणतात.

**प्रश्न २९३ : जीवनात पूर्णता प्राप्त करणे, ह्यालाच धम्म म्हणावे काय ?**

**उत्तर** - होय. शरीराची, वाणीची आणि मनाची पूर्णता प्राप्त करणे म्हणजेच संपूर्ण जीवनात पूर्णता प्राप्त करणे होय. चित्तमलांचा पूर्णपणे क्षय करून चित्त-विमुक्तीचा अनुभव करणे, ह्यालाच मनाची पूर्णता म्हणतात.

भगवंतांनी सुभूतीला उपदेश करताना सांगितले, 'चित्ताच्या सर्व अवस्थांना लक्षात ठेवून कोणत्याही प्रकारची आसक्ती न ठेवता बोधिसत्त्व दान देतो, हीच बोधिसत्त्वाची 'दान-पारमिता' होय'. तो स्वतः दहा कुशल मार्गांचा अवलंब करीत विचरण करतो आणि दुसऱ्यांनाही तसेच करण्याची प्रेरणा देतो, हीच त्याची 'शील पारमिता' होय. तो स्वतः क्षमाशील होऊन दुसऱ्यांनाही क्षमाशील राहण्याची प्रेरणा देतो, ती त्याची 'शांतीपारमिता' होय. तो सतत पाच पारमितांची पूर्ती करण्यातच मग्न असतो व दुसऱ्यांनाही तसाच उपदेश करतो, ही त्याची 'वीर्य पारमिता' होय. तो कौशल्याने समाधीचा लाभ घेतो व पुन्हा जन्म घेत नाही, ही त्याची 'समाधी पारमिता' होय. तो भौतिक व अभौतिक वस्तूंमध्ये न गुरफटता स्वभावधर्माविषयी विचार करतो व दुसऱ्यांनाही तसेच करण्याची प्रेरणा देतो, ही त्याची 'प्रज्ञा पारमिता' होय. ह्या सर्व पारमितांचा विकास करणे ह्यालाच 'धम्म' म्हटलेले आहे.

**प्रश्न २९४ : निर्वाण प्राप्त करणे, ह्यालाच धम्म म्हणावे काय ?**

**उत्तर** - होय. भगवंतांनी म्हटले आहे की, 'निर्वाणापेक्षा अधिक सुखद काहीच नाही'. त्यांच्या उपदेशात निर्वाणाला प्रमुख स्थान आहे. त्यांच्या पूर्वीचे लोक 'आत्म्याचा मोक्ष' यालाच निर्वाण समजत असत. आत्म्याला मोक्ष मिळवून द्यावयाच्या चार पद्धती होत्या १) लौकिक (खाणे, पिणे व मौज करणे) २) यौगिक ३) ब्राह्मणी आणि ४) औपनिषदिक. परंतु भ. बुद्धांनी विशद केलेल्या निर्वाणाचे स्वरूप त्यांच्या पूर्वीच्या लोकांनी सांगितलेल्या स्वरूपाहून सर्वथा भिन्न होते.

भगवंत म्हणतात, 'राग-द्वेष प्रज्वलित अग्नी समान असून ते मनुष्याला जाळून टाकतात. मनुष्य राग, द्वेष, लोभ, मोह यांच्यापासून मुक्त झाला तर त्याला दुःख, पीडा व मानसिक वेदना यांची अनुभूती होणार नाही. तो त्यांच्यापासून मुक्त होऊन ह्याच जीवनात निर्वाण प्राप्त करू शकतो, निर्वाण ह्याच जीवनात प्राप्य आहे; ते सर्वोत्तम व आकर्षक आहे. बुद्धिमान श्रावक ते हस्तगत करू शकतो.

निर्वाणाचा अर्थ आहे आपल्या प्रवृत्तीवर एवढा ताबा ठेवणे, जेणेकरून मनुष्य पूर्णतः धम्माच्या मार्गावर चालू शकेल. याशिवाय अधिक ह्याचा अर्थ नाही. निर्वाणाचा मार्ग म्हणजेच आर्य अष्टांगिक मार्ग.

शब्दाच्या व्युत्पत्तींचे दृष्टीने 'निर्वाण' शब्दाचा अर्थ 'विझणे' असा आहे. परंतु हे रागाग्नी, मोहग्नी व द्वेषाग्नीचे विझणे होय. सर्व प्रकारच्या प्रवृत्तींचे नष्ट होणे नव्हे. निर्वाण प्राप्त करावयास आर्य अष्टांगिक मार्गाचा अवलंब करणे आवश्यक आहे. निष्कलंकतेचा मार्ग म्हणजेच निर्वाणाचा मार्ग. याप्रमाणे निर्वाण व परिनिर्वाण ह्यात फार मोठा फरक आहे. परिनिर्वाण म्हणजे शरीर, मन, चेतना ह्यांची सर्व प्रकारची प्रक्रिया बंद होणे; म्हणजे पूर्णपणे विझून जाणे; अर्थात मनुष्याचा अंत होणे.

**प्रश्न २९५ : तृष्णेचा त्याग ह्यालाच धम्म म्हणावे काय ?**

**उत्तर** - होय. 'आरोग्य सर्वांत मोठा लाभ असून संतोष सर्वांत मोठे धन आहे', असे भगवंतांनी धम्मपदात म्हटलेले आहे. त्यांच्या म्हणण्याचा अभिप्राय हाच होता की, मनुष्याने लोभाच्या आहारी जाऊ नये. लोभाला ताब्यात ठेवले पाहिजे. लोभाच्या इच्छेतूनच तृष्णेचा जन्म होतो व लोभ वाढत जातो. तृष्णा व लोभ ह्यांच्यामुळेच पुष्कळशी वाईट कर्मे मनुष्याच्या हातून घडतात. तृष्णा कधीच नष्ट न होणारी आहे. यास्तव संतोष सर्वात मोठे धन असून 'तृष्णा' व 'लोभ' ह्यांना वशीभूत केल्याने ते प्राप्त होते, असे भ. बुद्धांचे सांगणे आहे.

**प्रश्न २९६ : सर्व संस्कार अनित्य आहेत असे मानणे, ह्यालाच धम्म म्हणावे काय ?**

**उत्तर** - होय. अनित्यतेच्या सिद्धान्ताचे तीन भाग पडतात १. अनेक तत्त्वांच्या मिश्रणाने वस्तू बनलेल्या असून सर्वच वस्तू अनित्य आहेत २. व्यक्तिशः प्राणी अनित्य आहे ३. प्रतीत्यसमुत्पन्न वस्तुंचे 'आत्मतत्व' अनित्य आहे.

प्रत्येक वस्तू हेतू व प्रत्ययांपासून उत्पन्न होते. कोणत्याही वस्तूला स्वतंत्र अस्तित्व नाही. हेतू-प्रत्ययांचा उच्छेद झाल्यावर वस्तूंचे अस्तित्व नष्ट होते.

पृथ्वी, जल, अग्नी व वायु ह्या चार महाभूतांपासून प्राण्यांचे शरीर उत्पन्न होते. ह्या चार

महाभूतांचे पृथक्करण झाले की प्राणी नष्ट होतो. ह्याचा सारांश असा की, मानव निरंतर परिवर्तनशील आहे, निरंतर संवर्धनशील आहे. तो आपल्या जीवनाच्या दोन भिन्न क्षणांतही एकच नसतो.

सर्व वस्तू अनित्य असून परिवर्तनशील आहेत. असे नसते तर जीवनाचा विकासच थांबला असता. मानवजातीची प्रगती सर्वथा थांबली असती. यास्तव कोणत्याही वस्तूविषयी आसक्ती ठेवू नये, हीच शिकवण मिळते. संपत्ती, नातलग, मित्रमंडळी आणि परिचित लोक ह्यांच्याविषयी अनासक्ती बाळगा. कारण सर्व वस्तू अनित्य आहेत, असा भ. बुद्धांचा उपदेश आहे.

**प्रश्न २९७ : 'कर्माला' मानव जीवनाच्या नैतिक क्रमाचा आधार मानणे, ह्याला धम्म म्हणावे काय ?**

**उत्तर -** होय. विश्वाच्या नैतिक क्रमांना बनविणारा कोणी 'ईश्वर' नाही. कर्मनियमानुसार विश्वासाचा नैतिक क्रम बनलेला आहे. भगवंतांच्या उपदेशानुसार विश्वाचा नैतिक क्रम चांगला असो वा वाईट असो, तो सर्वथा मनुष्यावर अवलंबून आहे. नैतिक क्रम वाईट असल्यास मनुष्य अकुशल कर्म करतो. नैतिक क्रम चांगला असल्यास मनुष्य कुशल कर्म करतो. आणि ज्याप्रमाणे रात्र दिवसाचा पाठलाग करते, त्याचप्रमाणे मनुष्याच्या कर्माचा परिणाम (कर्म-विपाक) त्याचा पाठलाग करीत असतो ह्यालाच कर्माचा नियम म्हटलेले आहे. कुशल कर्माने प्रत्येकाला लाभ होतो व अकुशल कर्माने प्रत्येकाची हानी होते. कर्म व त्याचा विपाक ह्यांच्यात काळाचे कमीअधिक अंतर होऊ शकणे शक्य आहे. यास्तव भ. बुद्धांचा उपदेश आहे की, सदासर्वदा कुशल कर्म करावे. म्हणजे नैतिक क्रम चांगला होऊन मानवतेचा लाभ होईल.

ह्या दृष्टीने पहाता कर्मांचे प्रकार येणेप्रमाणे -

१. दिट्ठधम्मवेदनीय कर्म - ह्याच जन्मात फळ देणारे कर्म.

२. उपपज्जवेदनीय कर्म - उत्पन्न झाल्यावर फळ देणारे कर्म.

३. अपरापरियवेदनीय कर्म - अनिश्चित काळी फळ देणारे कर्म.

४. अहोसि कर्म - फल न देणारे अति दुर्बल कर्म.

व्यक्ती जगात येतात आणि जातात, परंतु विश्वाचा नैतिक क्रम टिकून राहतो ( शाश्वत राहतो) आणि त्याच्याबरोबर कर्म नियमसुद्धा टिकून राहतो. ह्याच कारणामुळे अन्य धर्मांत ईश्वराला जे स्थान आहे, तेच भ.बुद्धांच्या धम्मात नैतिकतेला आहे. 'विश्वाचा नैतिक क्रम' टिकून ठेवणे सर्वथा 'कर्म नियमाच्या सिद्धान्तावर' अवलंबून आहे. ह्यामुळेच 'कर्माचा नियम' धम्माचे एक महत्त्वपूर्ण अंग आहे.

## अधम्म कशाला म्हणावे ?

**प्रश्न २९८ : अधम्म कशाला म्हणावे ?**

**उत्तर -** १) अनैसर्गिक गोष्टींवर विश्वास ठेवणे, यास अधम्म म्हणावे.

२) ईश्वरावर विश्वास ठेवणे, यास अधम्म म्हणावे.

३) ब्रह्मसायुज्यावर आधारित धम्मास अधम्म म्हणावे.
४) आत्म्यावर विश्वास ठेवण्याला, अधम्म म्हणावे.
५) धम्माच्या पुस्तकांचे केवळ वाचन करून, आचरण न करणे, यास अधम्म म्हणावे.
६) धार्मिक पुस्तकास अचूक असल्याचे गृहीत धरणे, यास अधम्म म्हणावे.

**प्रश्न २९९ अनैसर्गिक गोष्टींवर विश्वास करणे, यास अधम्म का म्हणावे ?**

**उत्तर** - परा-प्राकृतिक वादाचे खंडन करण्यात भगवंतांचे तीन हेतू होते. - पहिला हेतू हा की, मनुष्य बुद्धिवादी बनला पाहिजे. दुसरा हेतू असा की, मनुष्याने स्वातंत्र्यपूर्वक सत्याचा शोध घेतला पाहिजे आणि तिसरा हेतू असा की, मिथ्या-विश्वासाच्या मुख्य कारणाला समूळ नष्ट करायला पाहिजे. हा 'हेतुवाद' बुद्धधम्माचा प्रमुख सिद्धान्त आहे. भगवंतांनी मल्लांची नगरी अनुपिय येथे विहार करीत असताना भूग्गव परिव्राजकांना खालील गोष्टी सांगितल्या. त्यापूर्वी त्यांनी सुनक्खतासही हेच स्पष्ट केले होते की -
१) ते सामान्य माणसाच्या शक्तीच्या बाहेरील पराप्राकृतिक चमत्कार दाखवीत नसतात.
२) ते सृष्टीच्या आरंभाचे रहस्य सांगावयाची हमी देत नाहीत आणि
३) त्यांचा धम्म त्यांच्या स्वतःच्या बुद्धत्वामुळेच निर्माण झाला आणि दुःखाचा अंत करावयास त्या धम्मानुसार आचरण करावे लागते.

**प्रश्न ३०० : ईश्वरावर विश्वास ठेवण्यास अधम्म का म्हणावे ?**

**उत्तर** - भ. बुद्ध म्हणतात, 'ईश्वराश्रित धर्म कल्पनाश्रित आहे'. धम्माची धुरा ईश्वर व मनुष्यांतील संबंध नसून, मनुष्य व मनुष्य यांच्यातील संबंध आहे. मनुष्याने मनुष्याशी कसा व्यवहार करावा, ह्याचे निवेदन म्हणजेच धम्म होय; जेणेकरून सर्वजण सुखी राहू शकतील. भ. बुद्ध धार्मिक अवडंबराचे विरोधक होते. कारण त्या सर्वांच्या मुळाशी मिथ्या विश्वास असतो व अंधश्रद्धा असते. तथागतांच्या आर्य अष्टांगिक मार्गाचा सम्यक दृष्टि हा महत्त्वाचा भाग असून मिथ्या विश्वास हा तिचा शत्रू होय.

**प्रश्न ३०१ : ब्रह्म सामुज्यावर आधारित धम्मास मिथ्या-धर्म का म्हणावे ?**

**उत्तर** - भ. बुद्धांच्या वेळी 'वेदान्त' प्रचलित होता. त्यांत ब्रह्म व जीव एकच असल्याचे मानलेले आहे. भगवंतांचे म्हणणे असे की, प्रत्येक गोष्टीला काहीना काही प्रमाण असायलाच पाहिजे. प्रमाण दोन प्रकारचे : प्रत्यक्ष प्रमाण व अनुमान प्रमाण. ब्रह्माला कोणीच प्रत्यक्ष पाहिले नाही आणि ब्रह्माचे अस्तित्व आहे, ह्याचे अनुमान करणेही अशक्य आहे. यास्तव धर्म ब्रह्मावर आधारित आहे, असे म्हणणे मूर्खपणाचे व आंधळेपणाचे होय. ब्रह्मच यथार्थ नसल्यामुळे 'ब्रह्माश्रित धर्म' व्यर्थ आहे.

**प्रश्न ३०२ : आत्म्यावर विश्वास ठेवण्याला अधम्म कां म्हणावे ?**

**उत्तर** - भ. बुद्धांनी म्हटलेले आहे की, जो धर्म आत्म्यावर आधारित आहे, त्याला कल्पनाश्रित धर्म म्हणावे. आजपर्यंत कोणीच आत्म्याला पाहिलेले नाही. तो अज्ञात व अदृश्य आहे. मन किंवा चित्त वास्तव आहे, आत्मा वास्तव नाही. आत्म्यावरील विश्वाससुद्धा 'ब्राह्मणी' धर्माचेच अंग होय. त्यानुसार 'आत्मा' अमर असून दुसऱ्या जन्मात तो दुसरे शरीर धारण करतो. 'आत्म्याविषयी' लोकांत नाना प्रकारची मते व नाना प्रकारच्या कल्पना आहेत.

आत्म्याचे अस्तित्व नाकारून भगवंतांनी 'नामरूपाचा' सिद्धान्त पुढे मांडला आहे. हा सिद्धान्त म्हणजे मानवाचा अतिशय सूक्ष्म, कठोर विश्लेषणाचा परिणाम होय. 'नामरूप' एका प्राण्याचे सामुहिक (म्हणजे त्याच्या सर्व इंद्रियांना एकत्रित धरून ठेवलेले) नाव आहे. प्रत्येक प्राणी काही भौतिक व काही मानसिक तत्वांच्या संमिश्रणाने बनलेला आहे. त्या तत्त्वांनाच 'स्कंध' म्हणतात. पृथ्वी, जल, वायू व अग्नी ह्या चार भौतिक तत्त्वांच्या परिणामांनी शरीर बनलेले आहे. याव्यतिरिक्त ज्याच्यायोगे प्राण्याची रचना होते, तिला 'चेतना' (नाम-स्कंध) म्हणतात. नाम-स्कन्धाच्या अंतर्गत वेदना (सहा इंद्रिये व त्यांच्यापासून होणारी अनुभूती), संज्ञा व संस्कार आहेत. ह्या तीनमध्ये विज्ञानाचाही (चेतनेचा) समावेश होतो. जेव्हा विज्ञानाचा (चित्ताचा, चेतनेचा) उदय होतो, तेव्हा मनुष्यात जीव निर्माण होतो. म्हणजेच चित्त मनुष्याच्या जीवनात प्रधान वस्तू आहे. चित्ताची प्रकृती ज्ञानमूलक, भावनामूलक व क्रियाशील असते. मनुष्य किंवा प्राणी ज्या क्रिया करतो, त्या चित्ताद्वारे पूर्ण केल्या जातात. भ. बुद्ध म्हणतात की, सर्व कार्य चित्ताद्वारे केले गेल्यावर आत्म्याची आवश्यकताच काय? आणि ज्याचे 'कार्यच' नाही, असा 'आत्मा' मानणे कितपत संयुक्तिक आहे? अशा प्रकारे आत्म्याचे अस्तित्व भगवंतांनी असिद्ध केले असून आत्म्याचा स्वीकार करणे अधम्म होय, असे म्हटले आहे.

यज्ञकर्म करण्यास (अधर्म) अधम्म म्हणावे. कल्पनाश्रित विश्वास ठेवण्यास अधम्म (अधम्म) म्हणावे.

**प्रश्न ३०३ : धम्माच्या पुस्तकांचे केवळ वाचन करून, आचरण न करणे, यास अधम्म का म्हणावे ?**

**उत्तर** – मनुष्य अनेक ग्रंथांचे वाचन करू शकतो, पण ते जर त्याला काही समजलेच नाही तर त्याचे वाचन निष्प्रयोजन आहे. व्यर्थ विषयांच्या हजार श्लोकांपेक्षा धम्माचा केवळ एकच श्लोक जाणला, परंतु त्यानुसार आचरण केले, तर त्यास मोक्षाचा मार्ग म्हणता येईल.

**सहस्समपि चे वाचा अनत्थ अनत्थपदसंहिता।**
**एकं अत्थपदं सेय्यो यं सुत्वा उपसम्मति।।**

**प्रश्न ३०४ : धार्मिक पुस्तकांना अचूक असल्याचे गृहीत धरणे, यास अधम्म का म्हणावे ?**

**उत्तर** – तथागत कालामांना उपदेश करताना म्हणाले, "कालामांनो! एखादी गोष्ट केवळ ह्याकरिता तुम्ही तिला खरी मानू नका; केवळ परंपरेने प्राप्त झाली म्हणून, केवळ पुष्कळसे लोक तिचे समर्थक आहेत म्हणून, केवळ ग्रंथांत लिहिलेली आहे म्हणून, केवळ वरवर पाहाता ती पटणारी दिसते म्हणून, केवळ ती विश्वास करण्यास अनुकूल आहे म्हणून, केवळ ती वरवर पाहिली असता खरी वाटते म्हणून, किंवा केवळ ती एखाद्या पूज्य आचार्यांनी सांगितलेली आहे म्हणून खरी मानू नका."

'कालामांनो! जेव्हा तुम्ही केवळ स्वतःच्या अनुभवाने हे जाणाल की, 'ह्या गोष्टी अहितकर आहेत, निंदनीय आहेत, सद्गुणी पुरुषांद्वारा निषिद्ध मानल्या गेल्या आहेत, ह्या गोष्टी केल्याने कष्ट होतात, दुःख होते'. तेव्हा हे कालामांनो! तुम्ही त्यांचा त्याग केला पाहिजे."

**प्रश्न ३०५ : यज्ञकर्म करण्यास अधम्म म्हणावे काय ?**

**उत्तर** – होय. ब्राह्मणी धर्म यज्ञावर अवलंबित होता. यज्ञामध्ये सुरापान, पशूंचेबळी आणि हर प्रकारचा आमोद-प्रमोद असे; परंतु त्यांना धर्मामध्यें सम्मिलित केले गेलेले होते. भगवंतांस हे सर्वथा नामंजूर होते. कूटदन्त, उज्जय आणि उदायी या ब्राह्मणांशी झालेल्या संभाषणांत भ. बुद्धांनी ते स्पष्ट केलेले आहे.

**प्रश्न ३०६ : कल्पनाश्रित विश्वास ठेवण्यास अधम्म म्हणावे काय ?**

**उत्तर** – होय. अशा तऱ्हेचे प्रश्न त्यावेळी विचारले जात असत – १. मी पूर्वी होतो काय ? २. मी पूर्वी नव्हतो काय ? ३. मी पूर्वी काय होतो ४. मी कशापासून कसा झालो ? ५. मी भविष्यात काय होईन ? वगैरे. त्याचप्रमाणे संदेहशील प्रश्न विचारले जात – १. मी आहे का ? २. मी नाही का ? ३. प्राणी कुठून आले व कुठे जातील ? वगैरे. त्याप्रमाणे आत्म्याविषयीचे तसेच प्रश्न विचारले जात आणि विश्वाच्या आरंभाविषयी व अंताविषयी प्रश्न विचारले जात.

भगवंतांचे म्हणणे असे होते की, या प्रकारचे प्रश्न 'अव्याकृत' आहेत. म्हणजे त्यांचा जाणूनबुजून उलगडा केलेला नाही. त्यांच्यामुळे विचारणाऱ्याचे किंवा उत्तर देणाऱ्याचे कुणाचेही भले होत नाही. त्या प्रश्नाचे उत्तर माणूस सर्वज्ञ असेल, तोच देऊ शकतो; परंतु अशी कोणतीही व्यक्ती राहूच शकत नाही. म्हणून अशा तऱ्हेच्या प्रश्नांना भगवंतांनी धम्मापासून दूरच ठेवले.

**प्रश्न ३०७ : जैन धर्माची व बौद्धधम्माची शिकवण सारखीच आहे काय ?**

**उत्तर** – नाही. जैन धर्माचे संस्थापक तीर्थंकर महावीर यांचे म्हणणे असे की, माणूस जे काही सुख किंवा दुःख अनुभवीतो, ते सर्व त्याच्या पूर्वजन्माचा परिणाम होय. त्यांचे म्हणणे असे की, पूर्वजन्माच्या दुष्कर्मांचे निराकरण झाल्याने (= नष्ट झाल्याने) आणि नवीन दुष्कर्मे न केल्याने भविष्यामध्ये काहीच संग्रह होत नाही. त्यामुळे दुष्कर्मांचा क्षय होतो आणि त्यामुळे दुःखाचा क्षय होतो. जेव्हा दुःखाचा क्षय होतो तेव्हा सुख-दुःख अनुभव करावयाच्या शक्तीचा (म्हणजे वेदनेचा) क्षय होतो. जेव्हा वेदनेचा क्षय होतो, तेव्हा संपूर्ण दुःखाचा मूलोच्छेद होतो. अशीच निगण्ठनाथाची शिकवण होती. परंतु कोणासही मागील जन्माच्या दुष्कर्माबद्दल माहिती नसते.

परंतु भ. बुद्धांनी प्रश्न केला की, काय तुम्हास ठाऊक आहे की, येथेच आणि आत्ताच, ह्या अमुक क्षणीच अकुशल प्रवृत्तीचा मूलोच्छेद झालेला आहे, आणि कुशल प्रवृत्तीची स्थापना झाली आहे ? त्यास उत्तर मिळाले, ''नाही''. त्यावर भगवंतांनी उपदेश केला की, ''चित्तास'' (= म्हणजे मनास) अकुशल प्रवृत्तीला कुशल प्रवृत्तीमध्ये बदलविण्याची सवय व्हावयास हवी. त्यांनी चित्ताच्या साधनेस अग्रस्थान दिले. चित्ताच्या साधनेमुळेच संस्काराची सुधारणा होऊ शकते, असे त्यांनी स्पष्ट केले.

**प्रश्न ३०८ : धर्म आणि मजहब यांत काय फरक आहे ?**

**उत्तर** – मजहब म्हणजे ईश्वरावर विश्वास, आत्म्यावर विश्वास, ईश्वराची पूजा, आत्म्याचा सुधार, प्रार्थना इत्यादी करून ईश्वरास प्रसन्न करणे. धम्म म्हणजे सदाचार, ज्यामधे एका मनुष्याने दुसऱ्याशी कसे वागावे ह्याचा ऊहापोह आहे, जेणेकरून सर्वत्र सुख, शांती नांदेल.

# सद्धम्म कशाला म्हणावे

**प्रश्न ३०९ सद्धम्म कशाला म्हणावे ?**

**उत्तर** - १) सद्धम्माची कार्ये - मनातील मळ नष्ट करून त्यास निर्मल बनविणे आणि विश्वाला धर्मराज्य बनविणे.

(२) धम्माला तेव्हाच सद्धम्म म्हणावे, जेव्हा तो प्रज्ञेची वृद्धी करील.

(३) धम्माला तेव्हाच सद्धम्म म्हणावे, जेव्हा तो मैत्री भावनेला वृद्धिंगत करील.

(४) धम्माला तेव्हाच सद्धम्म म्हणावे, जेव्हा तो सामाजिक भेदभावांना नष्ट करील.

**प्रश्न ३१० : सद्धम्माची कार्ये कोणती?**

**उत्तर** - (१) मनाचा मळ नष्ट करून त्यास निर्मळ बनविणे.

(२) विश्वाला धर्म राज्य बनविणे.

धम्माने माणसाला अशी शिकवण द्यायला हवी, जेणेकरून कुशल कर्म कोणते व अकुशल कर्म कोणते याची त्याला जाणीव व्हावी. जेणेकरून कुशल कर्म करावयास प्रेरणा व अकुशल कर्मांपासून बचाव करावयाचे ज्ञान त्यास होईल.

दुसरी विशेष गोष्ट अशी की, भगवंतांनी या गोष्टीवर जोर दिला की, माणसाला इतके साहस असावे की, इतर कोणीही सोबत नसेल, तरी त्याने उचित मार्गावर एकट्यानेच मार्गक्रमण करावे.

**प्रश्न ३११ : सद्धम्माने प्रज्ञेची वृद्धी होते काय?**

**उत्तर** - होय

(१) धर्माला सद्धम्म तेव्हाच म्हणावे, जेव्हा तो सर्वांकरिता ज्ञानाची द्वारे खुली करील.

(२) धर्माला सद्धम्म तेव्हाच म्हणावे, जेव्हा तो अशी शिकवण देईल की, केवळ विद्वान होणेंच पर्याप्त नाही; ज्यामुळे पांडित्याचा टेंभा मिरविण्याची प्रवृत्ती होईल.

(३) धम्माला तेव्हाच सद्धम्म म्हणावे, जेव्हा तो असे शिकवील की, प्रत्येकाला केवळ 'प्रज्ञेची' आवश्यकता आहे.

**प्रश्न ३१२ : सद्धम्माने मैत्री भावनेची वृद्धी होते काय?**

**उत्तर** - होय

(१) धर्माला तेव्हाच सद्धम्म म्हणावे, जेव्हा तो अशी शिकवण देईल की, केवळ 'प्रज्ञा' पर्याप्त नसून प्रज्ञे बरोबर 'शील' असणे आवश्यक आहे.

(२) धर्माला तेव्हाच सद्धम्म म्हणावे, जेव्हा तो अशी शिकवण देईल की, प्रज्ञा व शील यांच्या सोबत करूणेचीही आवश्यकता आहे.

(३) धर्माला तेव्हाच सद्धम्म म्हणावे, जेव्हा तो अशी शिकवण देईल की, करुणेपेक्षाहि अधिक 'मैत्रीची' आवश्यकता आहे.

**प्रश्न ३१३ : सद्धम्माने सर्व सामाजिक भेदभाव नष्ट होतात काय?**

**उत्तर** - होय

(१) धर्माला सद्धम्म तेव्हाच म्हणावे, जेव्हा तो मनुष्या-मनुष्यामधील सर्व प्रकारच्या

भेदभावाच्या भिंती पाडून टाकण्यास समर्थ असेल. भ. बुद्ध जातिवादाचे सर्वोच्च विरोधक आणि समानतेचे सर्वोच्च समर्थक होते. जातिवाद व असमानता ह्यांचे समर्थन करणारा एकही तर्क त्यांनी शिल्लक ठेवला नाही, त्या सर्वांचे त्यांनी खंडन केले. असे 'अश्वलायन-सूत्तांमध्ये' दिलेले आहे.

(२) धर्माला सद्धम्म तेव्हाच म्हणावे, जेव्हा तो अशी शिकवण देईल की, कोणत्याही मनुष्याचे मूल्यांकन त्याच्या 'जन्माने' नव्हे तर त्याच्या 'कर्मानेच' झाले पाहिजे. असे अग्निक-भारद्वाज सूत्तामध्ये दिलेले आहे.

(३) धर्माला सद्धम्म तेव्हाच म्हणावे, जेव्हा तो मनुष्या-मनुष्यांमध्ये समानतेचा भाव वृद्धिंगत करील. भगवान बुद्धांचा धम्म मनुष्याच्या स्वतःच्या पुण्यपूरक प्रवृत्तीमधून उत्पन्न होणारा, अत्यंत न्यायसंगत धम्म आहे.

**प्रश्न ३१४ : आलवक यक्षाने भगवंतांना कोणते धार्मिक प्रश्न विचारलेत?**

**उत्तर** - आलवक यक्षाने अनेक प्रश्न विचारले. ते प्रश्न व त्यांची उत्तरे येणेप्रमाणे -

(१) सर्वश्रेष्ठ धन कोणते? कोणते कर्म सुखदायक आहे? सर्वांत मधुरतम रस कोणता? सर्वश्रेष्ठ जीवन कोणते?

उत्तर - श्रद्धा सर्वश्रेष्ठ धन होय. धम्मानुसार राहिल्याने सुख मिळते. सत्यरस सर्व रसांत मधुरतम आहे. प्रज्ञामूलक जीवन सर्वश्रेष्ठ जीवन होय.

(२) माणूस कशा प्रकारे पुरास ओलांडू शकतो? समुद्रास कसे लांघतो? दुःखाचा शेवट कशा प्रकारे करू शकतो?

उत्तर - श्रद्धेने माणूस (दुःखाच्या) पुरास ओलांडून जाऊं शकतो. अप्रमादाने समुद्रास (भवसागर) पार करतो. प्रयत्नांनी दुःखाचा नाश करतो व प्रज्ञेने परिशुद्ध होतो.

(३) माणूस ज्ञान कसे प्राप्त करतो? धन कसे प्राप्त करतो? मित्र कसे प्राप्त करतो? कोणास अनुताप होत नाही?

उत्तर - अर्हतांच्या धम्मावर श्रद्धा ठेवल्याने, आज्ञाकारी राहिल्याने, अप्रमादी राहिल्याने व मन लावून श्रवण केल्याने माणूस ज्ञान प्राप्त करतो. जो योग्य तेच करील, दृढ निश्चयी असेल, जागरूक असेल तो धन प्राप्त करतो. जो देतो तो मित्र प्राप्त करतो. जो श्रद्धावान उपासकामध्ये सत्य, सदाचारी असतो व ज्याला धीर, सच्छिलता आणि उदारता असते, त्यास अनुताप होत नाही.

भगवंताच्या उत्तरांनी यक्षाचे पूर्ण समाधान झाले व तो त्यांचा शरणागत उपासक झाला.

**प्रश्न ३१५ एका देवाने भगवंतांना विचारलेले प्रश्न कोणते?**

**उत्तर** - असे सांगतात की, भ. बुद्ध जेतवनात राहत असताना एक देव (किंवा यक्ष) ब्राह्मणाचे रूप घेऊन आला व त्याने भगवंतांना पुढील प्रश्न विचारलेत -

(१) सर्वांत धारदार तलवार, प्राणघातक विष, भयानक अग्नी आणि अंधारी रात्र कोणती?

उत्तर - संतापाने बोललेला शब्द ही सर्वांत धारदार तलवार; लोभ हे सर्वांत प्राणघातक विष; कामासक्त मनोविकार हा सर्वांत भयानक अग्नी होय आणि अज्ञान (अविद्या) सर्वांत अंधारी रात्र होय.

(२) सर्वांत मोठा लाभ, मोठी हानी, अभेद्य चिलखत आणि उत्तम हत्यार कोणते?

उत्तर - जो दुसऱ्यांना देतो, त्याला सर्वांत मोठा लाभ होतो. जो कृतज्ञता व्यक्त न करता हांवरटपणे स्वीकारतो, त्याची सर्वांत मोठी हानी होत असते. संयम हे सर्वांत अभेद्य चिलखत आहे आणि शहाणपण हे सर्वोत्तम शस्त्र होय.

(३) सर्वांत घातक चोर कोण? अमूल्य ठेवा कोणता? बळजबरीने हिसकावून घेण्यांत सर्वांत यशस्वी कोण? सर्वांत सुरक्षित खजिना कोणता?

उत्तर - अकुशल विचार हा सर्वांत घातक चोर होय. सद्गुण हा सर्वांत मूल्यवान ठेवा होय. सर्व ठिकाणी बळजबरीने प्रत्येक वस्तूवर स्वामित्व गाजविणारे केवळ मनच होय. अमरत्व हा सर्वांत सुरक्षित ठेवा होय.

(४) मोहक काय असते? घृणास्पद काय असते? सर्वांत भयंकर दुःख कोणते? सर्वोच्च आनंद कोणता?

उत्तर - कुशल मोहक असते. अकुशल घृणास्पद असते. अविवेकबुद्धी सर्वांत यातनाकारक दुःख होय. मुक्ती हेच सर्वोच्च सुख होय.

(५) विध्वंस कशामुळे घडतो? मैत्री कशामुळे तुटते? सर्वांत जबर असा ज्वर कोणता? सर्वोत्तम वैद्य कोण?

उत्तर - अज्ञान (अविद्या) हे जगाच्या विध्वंसाला कारणीभूत असते. मत्सर आणि स्वार्थ ह्यांच्यामुळे मैत्री तुटते. द्वेष हा सर्वांत जबर असा ज्वर होय आणि बुद्ध हा सर्वांत उत्तम वैद्य होय.

**प्रश्न ३१६ : बौद्धधम्मामध्ये महासागराचे कोणते आठ गुण आहेत?**

**उत्तर -** भगवंतांनी येणेप्रमाणे स्पष्ट केले -

(१) महासागर आणि भगवंतांची शिकवण दोन्ही हळूहळू अधिकाधिक खोल होत जातात.

(२) सर्व प्रकारच्यां परिवर्तनांतही आपल्या व्यक्तिमत्त्वाचे संरक्षण करतात.

(३) मृत शरीरांना बाहेर शुष्क भूमीवर फेकून देतात.

(४) ज्याप्रमाणे विशाल सरिता महासागराला जाऊन मिळाल्यावर आपापल्या नावांना मुकतात व तेव्हापासून पुढे त्या महासागरामध्येच त्यांची गणना होते; तद्वतच सर्व जाती आपापल्या वंशावळी सोडून देऊन संघात प्रवेश करतात, भिक्खू होतात व शाक्यमुनींचे पुत्र म्हणून गणले जातात.

(५) सर्व प्रवाहांचे महासागर हेच ध्येय असते. तथापि, त्याला कधीच पूर येत नाही, तो कधी रिकामाही होत नाही. त्याचप्रमाणे धम्माला कोट्यावधी लोकांनी स्वीकारले तरी त्याची वाढ होत नाही किंवा तो कमी होत नाही.

(६) ज्याप्रमाणे महासागराच्या जलास एकच म्हणजे खारट स्वाद असतो, त्याचप्रमाणे बौद्धधम्माला एकच सुवास आहे; तो म्हणजे उद्धार होय.

(७) महासागर आणि धम्म दोघेही रत्न, मोती व अमूल्य जडजवाहीर यांचे भंडार होय.

(८) दोघेही प्रबळ असून प्राणिमात्रांना निवासस्थानाप्रमाणे आश्रय देतात.

**प्रश्न ३१७ : बौद्धधम्माची तत्त्वे महासागरासारखी असावयास कोणते आश्चर्यकारक गुण कारणीभूत आहेत?**

**उत्तर -** (१) धम्माची शिकवण शुद्ध असून ती उच्चकुलीन किंवा हीन कुलीन, श्रीमंत वा

दरिद्री असा दुजाभाव करीत नाही.
(२) धम्माची शिकवण स्वच्छ जलासारखी आहे, जी भेदभाव न करता सर्वांना स्वच्छ करते.
(३) धम्माची शिकवण त्या अग्नीसारखी आहे की, जो स्वर्ग आणि पृथ्वी यांच्या अंतरामध्ये अस्तित्वात असणाऱ्या लहानमोठ्या सर्व वस्तूंना भस्मसात करतो.
(४) ती अनेक स्वर्गांसारखी आहे; कारण येथे अमर्याद जागा आहे. सर्वच लोक स्त्री-पुरूष, मुली-मुले, महाप्रबळ व अतिशूद्र अशा सर्वांच्या स्वागताकरिता भरपूर जागा आहे.

**प्रश्न ३१७ (अ) : शुद्धधम्म कशाला म्हणतात ?**
**उत्तर** - तो सार्वजनिक, सार्वदेशिक, सार्वकालिक असतो. तो शील, समाधी आणि प्रज्ञेवर अधिष्ठित असतो. तो प्रकृतीच्या नियमांवर आधारित असतो. प्रकृतीचे अभंग नियम येणेप्रमाणे -
१) सर्वच अनित्य आहेत, परिवर्तनशील आहेत, अविरत बदलत राहतात. स्थिर आणि नित्य काहीच नाही.
२) सर्वच पदार्थ, वस्तु, प्राणी, स्थिती, अवस्था, घटना, रूप, चित्त आणि चित्ताच्या वृत्ती प्रतिक्षण अत्यंत तीव्र गतीने उत्पाद, स्थिती आणि लय होत असतात. उदय-व्यय होत असतात.
३) कारणाशिवाय कसलेही कार्य घडून येत नाही. कार्यकारण शृंखला सदोदित कायमच असते.
४) घटना क्रमवत घडते, सृष्टीचा क्रम अव्याहतपणे सुरूच असतो. त्या घटनांना घडविणारा कोणी सूत्रधार किंवा ईश्वर अस्तित्वात नाही.
५) चारही महाभूत (= पृथ्वी, अग्नी, वायू आणि जल)

आपापल्या स्वभावानुसार नेहमीच प्रभावित असतात ते सर्वांसाठी समान असतात. त्यांचे परिणाम सर्वांना भोगावेच लागतात. कुणावर कृपा तर कुणावर रोष अशी त्यांची वागणूक नसते. त्यासाठी कोणी कितीही पूजापाठ, मंत्र, जप, तप केलेत तरी त्यांची वागणूक बदलत नाही. त्यांचे परिणाम बदलत नाही.
६. जसे बीज तसेच फळ
७. एका बीजापासून एक वृक्ष निर्माण होतो, परंतु एकाच वृक्षाला प्रत्येक ऋतूमध्ये अनेक फळे येतात आणि त्यांच्यापासून अनेक बीज.
८. संपूर्ण विश्व प्रकंपनच प्रकंपन आहे, नित्य प्रज्वलित असते. एका जाळ्यात गुंफलेले आहे.

भगवंतांनी याच धम्माची शिकवण दिली.

## मूर्तिपूजा व पूजाअर्चा

**प्रश्न ३१८ : म. बुद्धांना मूर्तिपूजा - पूजाअर्चा मान्य होती काय?**
**उत्तर** - नाही. ते मूर्तिपूजेच्या - पूजाअर्चेच्या विरुद्ध होते. देवी, देवतांची पूजा, पिशाच्च

वृक्षदेवता इत्यादींची पूजा भ. बुद्धांनी निरुपयोगी ठरविली. बाह्य पूजा एक बंधन असून, एखाद्याला जर उच्च प्रतीची प्रगती साधावयाची असेल तर त्याला ते बंधन तोडायलाच पाहिजे.

**प्रश्न ३१९ : बौद्धजन भ. बुद्धांच्या मूर्तीची, स्मारकांची तसेच स्मृतिचिन्हांची आदरयुक्त भावाने पूजा करीत नाही काय?**

**उत्तर** - होय करतात. परंतु मूर्तिपूजकाच्या भावनेने नव्हे. बौद्धजन भ. बुद्धाच्या मूर्तीची आणि त्यांच्या स्मारकांची तसेच स्मृतिचिन्हांची पूजा करताना ह्या कल्पातील सर्वश्रेष्ठ, परमज्ञानी, अत्यंत परोपकारी आणि अपार करुणाशील पुरुषश्रेष्ठांचे केवळ स्मरण म्हणून, पूज्यभावनेने आदरांजली वाहतात. सर्वच समाज कोणत्यातरी विशिष्ट गोष्टीमुळे महान मानल्या गेलेल्या स्त्री-पुरुषांची स्मारके आणि स्मरणचिन्हे जपून, संग्रह करून ठेवतात आणि त्याविषयी आदरबुद्धी बाळगतात. त्याचप्रमाणे बौद्धजन भ. बुद्ध व त्यांच्या स्मृतिचिन्हाविषयी आदर बाळगतात.

कर्म-सिद्धान्तावर बौद्धांचा विश्वास असल्यामुळे ते कुणाची पूजा करून त्यामुळे आपल्या दुःखापासून मुक्ती मिळावी, अशी अपेक्षा करीत नसतात. ते स्वतःवरच आत्मविश्वास ठेवून स्वतःचे शुद्धीकरण करतात. कर्मसिद्धान्त त्यांना आशा, आत्मविश्वास, समाधान आणि नैतिक धैर्य प्रदान करतो. कर्मसिद्धान्तावर पूर्ण विश्वास असल्यामुळे ते अकुशल कर्मापासून अलिप्त राहतात.

**प्रश्न ३२० : भ. बुद्धांनी पूजेअर्चेविषयी काय सांगितले आहे?**

**उत्तर** - महापरिनिर्वाण सूत्रांत ते म्हणतात की, सदोदित करीत असलेल्या पूजेने, किंवा स्वतःच्या भक्तीने, किंवा दुसऱ्याच्या भक्तीने, किंवा एखाद्या मूर्तीच्या पूजेने नव्हे, तर केवळ आर्य - अष्टांगिक मार्गाचा अवलंब करून पवित्र जीवन जगण्यानेच पुण्यलाभ होतो व मुक्ती मिळू शकते.

**प्रश्न ३२१ : विधिवैकल्यविषयी भ. बुद्धांचे काय मत होते?**

**उत्तर** - अंधश्रद्धा वाढविण्यास आणि निर्जीव रूपांना कवटाळण्यास ज्या कारणीभूत होतात अशा विधिवैकल्यांचा आणि इतर बाह्य अवडंबरांचा त्यांनी सुरुवातीपासूनच कठोर विरोध केला.

**प्रश्न ३२२ : पूजाअर्चा करावयासाठी अर्पण करण्यात येणाऱ्या पुष्पमालेपासून आपणास काहीच लाभ होत नाही काय?**

**उत्तर** - तो केवळ विधी आहे. केवळ फुले वाहिल्याने पुण्य मिळत नाही. परंतु जर कोणी एखाद्या पवित्र व्यक्तीला आदराच्या भावनेने, हार्दिकपणे, अत्यंत आत्मीयतेने आणि शुद्ध मनाने फुले किवा माला अर्पित करीत असेल, तर खरोखरच तिला उदात्त आराधना म्हणायला पाहिजे.

**प्रश्न ३२३ भगवंतांनी 'परित्राणाचा' उपदेश दिला होता काय?**

**उत्तर** – होय. भगवंतांनी 'परित्राणाचा' उपदेश अशा लोकांसाठी दिला होता की, ज्यांचे आयुष्य अजून बाकी आहे, त्यांनी परित्राण पाठ करून स्वतःला अकुशल कर्मांपासून अलिप्त करण्याचा प्रयत्न करावा आणि स्वतःचा लाभ करावा. जे मरणासन्न असून त्यांची जगण्याची आशा नाही, त्यांच्याकरिता परित्राण - देशनेमुळे मनास शांती मिळते. मरण हे अटळ आहे. तरीपण 'परित्राणाचा प्रताप' निश्चित असून रोग्याजवळ जर परित्राण - देशनेचा पाठ केला तर रोगी अस्वस्थ असूनदेखील त्यास बरीच शांती मिळते.

**प्रश्न ३२४ : परित्राण पाठामध्ये कोणत्या सुत्रांचा समावेश होतो?**

**उत्तर** – परित्राण पाठामध्ये खालील सूत्रांचा समावेश होतो.

(१) महामंगल सुत्त : सर्वांचे मंगल व्हावे या उद्देशाने जे सदाचरण करावयाचे त्याबद्दलचा संकल्प.

(२) रतन सुत्त : बुद्ध, धम्म आणि संघ या त्रिरत्नांनी केलेल्या महान कार्याचे वर्णन व त्याबद्दलचा संकल्प.

(३) करणीयमेत्त सुत्त : जी कुशलकर्मे करावयाची त्याबद्दल संकल्प.

(४) महामंगल गाथा : सर्व प्राणिमात्रांचे मंगल व्हावे अशी प्रार्थना.

(५) पुण्यानुमोदन : कुशल कर्म करणाऱ्या सर्वांची स्तुती

(६) जयमंगल अष्टगाथा : भ. बुद्धांच्या महान कार्याचे वर्णन केलेल्या गाथा, (याच लेखिकेच्या बौद्ध जीवनचर्या ह्या पुस्तिकेत मूळ पालिगाथा व मराठी पद्यमय भाषांतर सविस्तर दिलेले आहे)

**प्रश्न ३२५ : 'परित्राण' सफल न होण्याची कारणे कोणती?**

**उत्तर** – परित्राण रक्षा करण्यास सफल न होण्याची तीन कारणे आहेत -

(१) कोणत्याही कर्म-फलामध्ये विघ्न आणल्यास, (२) पापाने विघ्न पडल्यास, (३) परित्राण - देशना पाठावर विश्वास नसल्यास, लोकांच्या आपल्या स्वतःच्या करणीमुळे (कर्मामुळे) परित्राणात रक्षा-बल राहूनही, तो असफल होतो.

**प्रश्न ३२६ : मरण पावलेल्या लोकांच्या पुण्यस्मरणानिमित्त दान देणे फलदायी असते काय?**

**उत्तर** – होय. पुण्यकर्माचे फल सर्वांना दिले जाऊ शकते, परंतु पापकर्माचे फल इतरांना दिले जाऊ शकत नाही, कारण पाप सूक्ष्म आहे, पुण्य महान आहे. पाप लघु असल्याकारणाने करणाऱ्यालाच ते फलदायी आहे. पण, पुण्य महान असल्यामुळे ते देवता आणि मनुष्यांमध्ये वाटले जाऊ शकते. जो कोणी दान देतो तो शीलाचे पालन करतो. उपोसथ व्रताचे पालन करतो आणि मोठ्या आनंदित व प्रसन्न मनाने कार्य करतो. त्यामुळे त्याचे मन पुण्याकडे ओढले जाते.

**प्रश्न ३२७ : बौद्धांचे संस्कारविधी कोणते ?**

**उत्तर** – बौद्धधम्मात कर्मकांडाला महत्त्व दिलेले नाही. तथापि माणसाच्या जीवनातील टप्पे

विशिष्ट संस्कार विधीद्वारे दर्शविले जाणे, ही एक सामाजिक गरज आहे. बौद्धांचे संस्काराविधी येणेप्रमाणे :

(१) मंगल दिवस - सोयीनुसार परंतु पौर्णिमेला विशेष महत्त्व.
(२) गर्भमंगल - गर्भधारणेच्या तीन महिन्यांनंतर सोयीनुसार परित्राण पाठ.
(३) नामकरण : जन्मानंतर पाच आठवड्यांमध्ये परित्राण पाठ.
(४) अन्नप्राशन : शिशूच्या जन्मानंतर पाचव्या किंवा सहाव्या महिन्यात परित्राण पाठ.
(५) केशकर्तन (जावळ काढणे) : शिशूच्या जन्मानंतर ३ वर्षात कान टोचणे ५ वर्षात.
(६) विद्यारंभ : वयाच्या सातव्या वर्षापर्यंत.
(७) साक्षगंध : विवाहापूर्वी उभयपक्षांची जोडाजोडी, यथासंभव
(८) विवाह : मुलगी १८ वर्षांची व मुलगा २१ व्या वर्षांचा किंवा अधिक असलेच पाहिजेत. भिक्खूंकडून किंवा योग्य सद्गृहस्थाकडून पार पाडावा. पती व पत्नीच्या कर्तव्याची शपथ देववितात.
(९) प्रव्रज्या : अस्थायी काही काळाकरिता ३/५/७/१५ दिवसांसाठी निदान एकदा श्रामणेरत्व द्यावे.
(१०) अंतिम संस्कार : भिक्खूद्वारे किंवा सद्गृहस्थांद्वारे त्रिशरण पंचशील प्रार्थना.

**प्रश्न ३२८ : बौद्धांचे सण व मंगल दिवस कोणते?**

**उत्तर -** (१) वैशाखी पौर्णिमा : बुद्धजयंती, ज्ञानप्राप्ती व महापरिनिर्वाण दिन
(२) आषाढी पौर्णिमा : महामाया देवीच्या कुशीत बौधिसत्त्वाने प्रवेश केला.
(३) धम्मविजय दिन (अशोक विजयादशमी) : याच दिवशी स. अशोकाने प्रतिज्ञा केली होती की, मी आजपासून शस्त्राद्वारे विजय संपादन न करता धम्मप्रचाराद्वारे दया, शांती व अहिंसा यांच्याद्वारे विजय संपादन करीन. मोठा उत्सव करतात.
(४) प्रत्येक पौर्णिमा : उपोसथ-व्रत करावे.
(समग्र वर्णन संकलिकेच्या बौद्धजीवनचर्या पुस्तिकेत पाहावे)

**प्रश्न ३२९ बौद्धांची तीर्थस्थाने व मंगलस्थळे कोणते?**

**उत्तर -** (१) बुद्धगया : भगवंतास संबोधी प्राप्त झाली. बिहार राज्यात
(२) कुशीनगर : भगवंतांचे महापरिनिर्वाण झाले. उ.प्र. गोरखपूरजवळ
(३) लुंबिणी : सिद्धार्थाचा जन्म नेपाळ - भारत सीमेवर
(४) सारनाथ : प्रथम धम्मप्रवचन
(५) श्रावस्ती, राजगृह, वैशाली, नालंदा, सांची, अजिंठा, वेरूळ, दीक्षाभूमी (नागपूर) इ.
(पाहावे बौद्ध जीवनचर्या ही संकलिकेची पुस्तिका)

**प्रश्न ३३० : इतर समाजाने केलेली सत्यनारायणाची कथा आणि बौद्धांनी केलेला परित्राणपाठ यात काही फरक आहे काय?**

**उत्तर -** होय. मूलभूत फरक आहे. सत्यनारायणाच्या कथेचा उद्देश असा असतो की, उपासकाने केलेल्या पापांचे देवतेच्या कृपेमुळे निवारण व्हावे व त्यास पुण्यलाभ होऊन सौख्य प्राप्त व्हावे. ही कथा म्हणजे उपासकाने अंधश्रद्धेने व स्वार्थाने प्रेरित होऊन केलेली

देवतेची अतोनात स्तुती होय.

परंतु सदाचरणाचा मार्ग कोणता व माणसाचे उत्तम मंगल कसे साध्य करता येईल, हे परित्राण पाठात विशद केलेले आहे. त्यामुळे परित्राण पाठाचे आयोजन केल्याने माणसाने मन शुद्ध होते तो कुशल कर्मे करावयास प्रेरित होतो; व त्यामुळे भविष्यात त्यावर संकटे कमीच येतात व त्यास पुण्यलाभ होऊन तो सुखी होतो.

## बौद्धांच्या वंदना

**प्रश्न ३३० (अ) : बौद्धांची तिशरण व पंचशील कोणती आहेत ?**

**उत्तर** - तिशरण व पंचशील येणेप्रमाणे -

**नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा सम्बुद्धस्स ।।**
**नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा सम्बुद्धस्स ।।**
**नमो तस्स भगवतो अरहतो सम्मा सम्बुद्धस्स ।।**

### तिसरणानि

**बुद्धं सरणं गच्छामि ।**
**धम्मं सरणं गच्छामि ।**
**संघं सरणं गच्छामि ।**
**दुतियम्पि, बुद्धं सरणं गच्छामि ।**
**दुतियम्पि, धम्मं सरणं गच्छामि ।**
**दुतियम्पि, संघं सरणं गच्छामि ।**
**ततियम्पि, बुद्धं सरणं गच्छामि ।**
**ततियम्पि, धम्मं सरणं गच्छामि ।**
**ततियम्पि, संघं सरणं गच्छामि ।**

### पंचसीलानि

**पाणातिपाता वेरमणी**
**सिक्खापदं समादियामि ।**
**आदिन्नादाना वेरमणी**
**सिक्खापदं समादियामि ।**
**कामेसु मिच्छाचारा वेरमणी**
**सिक्खापदं समादियामि ।**
**मुसावादा वेरमणी**
**सिक्खापदं समादियामि ।**
**सुरामेरय-मज्ज-पमादट्ठाना वेरमणी**
**सिक्खापदं समादियामि ।**

### बुद्धसासन

**सब्बपापस्स अकरणं कुसलस्स उपसंपदा।**
**सचित्तपरियोदपनं एतं बुद्धानं सासनं।।**
**साधु ! साधु !! साधु !!!**

**टीप - मूळ पाली डाव्या पानावर दिलेले असून त्याचे मराठी रूपांतर उजव्या पानावर आहे. मराठी रूपांतराची चालही मूळ पाली प्रार्थनेसारखीच आहे.**

## वंदन

नमूया त्या भगवंता अर्हंता संपूर्ण सम्बुद्धास ।।
नमूया त्या भगवंता अर्हंता संपूर्ण सम्बुद्धास ।।
नमूया त्या भगवंता अर्हंता संपूर्ण सम्बुद्धास ।।

## तीन अनुसरणे

बुद्धाला अनुसरतो मी।
धम्माला अनुसरतो मी।
संघाला अनुसरतो मी।

दुसऱ्यांदा बुद्धाला अनुसरतो मी।
दुसऱ्यांदा धम्माला अनुसरतो मी।
दुसऱ्यांदा संघाला अनुसरतो मी।

तिसऱ्यांदा बुद्धाला अनुसरतो मी।
तिसऱ्यांदा धम्माला अनुसरतो मी।
तिसऱ्यांदा संघाला अनुसरतो मी।

## पंचशील

प्राण्यांची हिंसा न करणे
व्रत हे असे घेतो मी।
चोरीचे कर्म न करणे
व्रत हे असे घेतो मी।
कामभोग-मिथ्याचारा न करणे
व्रत हे असे घेतो मी।
मिथ्यावादा न करणे
व्रत हे असे घेतो मी।
सुरा, मादकमद्य, प्रमादसेवन न करणे
व्रत हे असे घेतो मी।

## बुद्धशासन

सर्व पापेचि न करणे, कुशलाची उपसंपदा।
चित्ता परिशुद्ध करा, हेचि बुद्धांचे शासन।।
साधु ! साधु !! साधु !!!

**प्रश्न ३३० (ब) : तिरत्न-वंदना कशाला म्हणतात ?**

**उत्तर** - बुद्ध वंदना, धम्म वंदना व संघ वंदना ह्या तिरत्न वंदना होत. ह्या बाबासाहेब आंबेडकरांनी लिहिलेल्या पाली शब्दकोशातून घेतलेल्या आहेत; त्या येणेप्रमाणे -

## बुद्ध-वंदना

**इतिपि सो भगवा अरहं,**
**सम्मा सम्बुद्धो,**
**विज्जाचरण सम्पन्नो,**
**सुगतो, लोकविदू, अनुत्तरो,**
**पुरिसदम्मसारथी,**
**सत्थादेवमनुस्सानं,**
**बुद्धो भगवा' ति।**
**बुद्धं जीवितं परियन्तं सरणं गच्छामि ॥१॥**
**ये च बुद्धा अतीता च**
**ये च बुद्धा अनागता।**
**पच्चुप्पन्ना च ये बुद्धा**
**अहं वन्दामि सब्बदा ॥२॥**
**नत्थि मे सरणं अञ्ञं,**
**बुद्धो मे सरणं वरं।**
**एतेन सच्चवज्जेन,**
**होतु मे जयमंगलं ॥३॥**
**उत्तमंगेन वंदे' हं,**
**पादपंसु वरूत्तमं।**
**बुद्धे यो खलितो दोसो,**
**बुद्धो खमतु तं ममं ॥४॥**
**यं किञ्चि रतनं लोके,**
**विज्जति विविधा पुथु।**
**रतनं बुद्धसमं नत्थि,**
**तस्मा सोत्थि भवन्तु मे ॥५॥**
**यो सन्निसिन्नो वरबोधिमूले,**
**मारं ससेनं महतिं विजेत्वा।**
**सम्बोधिमागच्छि अनंतञाणो,**
**लोकुत्तमो तं पणमामि बुद्धं ॥६॥**

## बुद्ध-वंदना

झाले जगी या अरहन्त,
सम्यक सम्बुद्ध,
विद्याचरणसंपन्न,
सुगत, लोकविद् मर्मज्ञ,
भवसागर सारथी,
शास्ते देवमनुष्यांचे,
हे बुद्ध भगवंत ।
बुद्धा जीवनपर्यंत अनुसरतो मी ।।१।।
जे चि बुद्ध अतीतांत,
वा जे बुद्ध अनागत।
वसती जगी या जे बुद्ध
वंदितो त्यां मी सर्वदा ।।२।।
नसे मज आश्रय अन्य,
बुद्धचि मम शरणोत्तम।
वचनाने ह्या सत्य,
होवो मम जयमंगल ।।३।।
उत्तमंगानि वन्दे मी,
शिरी, रज चरणोत्तम।
बुद्धाठायी मी दोषी,
बुद्ध करोत क्षमा मज ।।४।।
या जगी रत्ने दिसती,
विद्यति विविधहि किती।
रत्नचि बुद्धासम ना
मम कल्याणी भविष्यी हे।।५।।
जै बैसले बोधिवृक्षामुळाशी,
जिंकूनी त्या मार-सैन्या ही महती।
सम्बोधि मिळवूनी ज्ञाने अनंते,
लोकोत्तमा, वंदी बुद्धा मी त्यांते।।६।।

## धम्म वंदना

स्वाक्खातो भगवता धम्मो
संदिट्ठिको अकालिको
एहिपस्सिको ओपनयिको
पच्चत्तं वेदितब्बो विञ्ञूहीति'
धम्मं जीवितं परियन्तं सरणं गच्छामि ॥१॥

ये च धम्मा अतीता च,
ये च धम्मा अनागता।
पच्चुप्पन्ना च ये धम्मा,
अहं वन्दामि सब्बदा ॥२॥

नत्थि मे सरण अञ्ञं,
धम्मो मे सरणं वरं।
एतेन सच्चवज्जेन,
होतु मे जयमंगलं ॥३॥

उत्तमंगेन वन्दे' हं,
धम्मं च, तिविधं वरं।
धम्मे यो खलितो दोसो,
धम्मो खमतु तं ममं ॥४॥

यं किञ्चि रतनं लोके,
विज्जति विविधा पुथु।
रतनं धम्म समं नत्थि,
तस्मा सोत्थि भवन्तु मे ॥५॥

अट्ठङ्गिको अरियपथो जनानं,
मोक्खप्पवेसो उजुको'व मग्गो।
धम्मो अयं सन्तिकरो पणीतो,
निय्यानिको तं पणमामि धम्मं ॥६॥

## धम्म वंदना

उत्तम विशद हा धम्म
फलदायी, अन् तत्काळही
इथेचि दिसतो, या हो, बघा हो
निर्वाणमार्गी, सूज्ञचि समजति।
धम्मा जीवनपर्यंत अनुसरतो मी ॥१॥

जे चि धम्म अतीतांत,
वा जे धम्म अनागत।
असती जगी या जे धम्म
वंदितो त्यां मी सर्वदा ॥२॥

नसे मज आश्रय अन्य,
धम्मचि मम शरणोत्तम।
वचनाने ह्या सत्य,
होवो मम जयमंगल ॥३॥

उत्तमंगानि वन्दे मी,
धम्म हा, तिविध वर* ।
धम्मा ठायी मी दोषी,
धम्म करो क्षमा मज ॥४॥

या जगी रत्ने दिसती,
विद्यति विविधही किती।
रत्नचि धम्मासम ना,
मम कल्याणी भविष्यी हे ॥५॥

अष्टांगी सुखदायी जनमार्ग जैसा,
मुक्तीप्रती सरळ हा मार्ग तैसा।
हा धम्म मज नेई शांतीपदाते,
धम्मोत्तमा, वंदी धम्मा मी त्यांते ॥६॥

* तिविध वर म्हणजे तिन्ही दृष्टींनी श्रेष्ठ असे जणुं काही वरदान.

## संघ वंदना

सुपटिपन्नो भगवतो सावकसंघो,
उजुपटिपन्नो भगवतो सावकसंघो,
ञायपटिपन्नो भगवतो सावकसंघो,
सामीचिपटियन्नो भगवतो सावकसंघो,
यदिदं चत्तारि पुरिस युगानि,
अट्ठ पुरिस-पुग्गला,
एस भगवतो सावकसंघो,
आहुणेय्यो, पाहुणेय्यो,
दक्खिणेय्यो, अञ्जलि-करणीयो,
अनुत्तरं पुञ्ञक्खेतं लोकस्सा ति।
संघं जीवितं परियन्तं सरणं गच्छामि ॥१॥
ये च संघा अतीता च,
ये च संघा अनागता।
पच्चुप्पन्ना च ये संघा,
अहं वन्दामि सब्बदा ॥२॥
नत्थि मे सरणं अञ्ञं,
संघो मे सरणं वरं।
एतेन सच्चवज्जेन,
होतु मे जयमंगलं ॥३॥
उत्तमंगेन वन्दे' हं,
संघं च तिविधोत्तमं।
संघे यो खलितो दोसो,
संघो खमतु तं ममं ॥४॥
यं किञ्चि रतनं लोके,
विज्जति विविधा पुथु।
रतनं संघसमं नत्थि,
तस्मा सोत्थि भवन्तु मे ॥५॥
संघो विसुद्धो वरदक्खिणेय्यो,
सन्तिन्द्रियो सब्बमलप्पहिनो।
गुणेहि नेकेहि समिद्धिपत्तो,
अनासवो तं पणमामि संघं ॥६॥

## संघ वंदना

सुमार्गी भगवंतांचा श्रावकसंघ,
सरळमार्गी भगवंतांचा श्रावकसंघ,
न्यायमार्गी भगवंतांचा श्रावकसंघ
उचितमार्गी भगवंतांचा श्रावकसंघ
ऐसा असेचि चौपुरुष युगली *
अष्टपुरुष पुदगली *
ऐसा भगवंतांचा श्रावकसंघ
आतिथ्याला, दाक्षिण्याला
दान द्यायला, पूज्य वंदनेला
अत्युत्तम पुण्यक्षेत्रही लोकांसाठी।
संघा जीवनपर्यंत अनुसरतो मी ।।१।।
जे चि संघ अतीतांत
वा जे संघ अनागत ।
असति जगी या जे संघ
वंदितो त्या मी सर्वदा ।।२।।
नसे मज आश्रय अन्य
संघचि मम शरणोत्तम ।
वचनाने ह्या सत्य
होवो मम जयमंगल ।।३।।
उत्तमंगानि वन्दे मी
संघा या तिविधोत्तम** ।
संघाठायी मी दोषी
संघ करो क्षमा मज ।।४।।
या जगी रत्ने दिसती,
विद्यति विविधही किती।
रत्नचि संघासम ना,
मम कल्याणी भविष्यी हे।।५।।
संघ विशुद्ध दानास योग्य,
शान्तेंद्रियचि सर्व मळमुक्त योग्य।
निष्पाप संपन्न तो बहु गुणांते,
अनासवा वंदी संघा मी त्याते।।६।।

* सोतापन्न, सकदागामी, अनागामी आणि अरहत अशा चार पुरुष जोड्या आणि त्या प्रत्येकाचे मार्ग व फळ मिळून आठ पुद्गल (पुद्गल = व्यक्ती)
** तिन्ही प्रकारांनी श्रेष्ठ असलेल्या ह्या संघाला.

**प्रश्न ३३० (क) : बौद्धांच्या इतर पूजा व वंदना कोणत्या?**

**उत्तर -** तिरत्न वंदनेशिवाय महायानाच्या प्रभावाने खाली दिलेल्या पूजा व वंदना यांचाही वंदनेमधे समावेश झालेला आहे त्यात पुष्पपूजा, प्रदीपपूजा, सुगंधिपूजा, धातूपूजा, चैत्यवंदना आणि बोधीवंदना आलेले आहेत.

## विविध वंदनं

### पुप्फपूजा

**वण्ण-गंध-गुणोपेतं,**
**यं तं कुसुमसन्ततिं ।**
**पूजयामि मुनिन्दस्स,**
**सिरीपादसरोरुहे ॥१॥**

**पूजेमि बुद्धं कुसुमेन' नेन,**
**पुञ्ञेन मेतेन लभामि मोक्खं।**
**पुप्फं मिलायति यथा इदं मे,**
**कायो तथा याति विनासभावं ॥२॥**

### दीपपूजा

**घनसारप्पदित्तेन,**
**दीपेन तमधंसिना ।**
**तिलोकदीपं संबुद्धं,**
**पूजयामि तमोनुदं ॥३॥**

### सुगंधिपूजा

**सुगन्धि-काय-वदनं,**
**अनंत-गुण-गंधिना ।**
**सुगन्धिना'हं गन्धेन,**
**पूजयामि तथागतं ॥४॥**

**गंधसंभारयुत्तेन,**
**धूपेनाहं सुगंधिना।**
**पूजये पूजनेय्यन्तं,**
**पूजाभाजनमुत्तमं ॥५॥**

### धातुपूजा

**बुद्धं धम्मं च संघं च,**
**सुगततनुभवा, धातवो धातुगब्भे।**
**लंकायं जम्बुदीपे, तिदसपुरवरे,**
**नागलोके च थूपे ॥६॥**

## विविध वंदना

### पुष्पपूजा

वर्ण, गन्ध, गुण सुंदरहि
ऐसी कुसुमसंपदा।
पूजितो मी मुनींच्या ह्या
कमळासम सिरीपदा ॥१॥

पूजे मी बुद्धा कुसुमांनी, म्हणूनि,
पुण्याने, मैत्रीने मिळेल मोक्ष।
कोमेजते पुष्प जैसेचि येथे,
काया तशी जाई विनाशभावे ॥२॥

### प्रदीपपूजा

घनतमा घ्वंसितो दीप
अज्ञानास तथागत।
त्रैलोक्यदीप सम्बुद्धा
तैलदीपें मी पूजितो ॥३॥

### सुगंधिपूजा

सुगंधि काया, वदनहि
अनंत, गुण, गंध हा।
सुगंधपूर्ण गंधाने
पूजितो मी तथागता ॥४॥

गंधसंभारयुक्त अन्,
धूपचन्दनसुगंधित।
पूजितो पूजनीयहि त्या,
पूजाभाजन उत्तम ॥५॥

### धातुपूजा

बुद्धा, धम्मा व संघा,
बुद्धकायावशेषा, अस्थि पूजे।
लंका व जम्बुद्वीपे, वा देवनगरे,
नागलोके व स्तूपे ॥६॥

सब्बे बुद्धस्स बिम्बे सकलदसदिसे,
केसलोमादिधातुं वंदे।
सब्बेपि बुद्धं दसबलतनुजं,
बोधीचेत्यं नमामि ॥७॥

## चेतिय वंदनं

वन्दामि चेतियं सब्बं,
सब्बाठानेसु पतिट्ठतं ।
सारीरिक-धातु महाबोधिं
बुद्ध-रूपं सकलं सदा ॥८॥

## बोधिवंदनं

यस्य मूले निसिन्नोव,
सब्बारि विजयं अका।
पत्तो सब्बज्युतं सत्था,
वंदे तं बोधिपादपं ॥९॥

सर्व बुद्धाची रूपे, सकळदशदिशींचे,
पूज्य केस आणि अस्थि, वंदे।
सर्व बुद्धांना, दशबलशरीरा,
बोधीचैत्या नमामि ।।७।।

## चैत्यवंदना

वंदितो सर्व चैत्यांना,
सर्व स्थानी प्रतिष्ठित।
स्तूप, वृक्ष महाबोधि,
बुद्ध रूप सर्वहि सदा ।।८।।

## बोधीवंदना

ज्या वृक्षाच्या छायेत
विजयश्री त्या तथागता ।
प्राप्तिली सर्वज्ञता जेथे
वंदितो महाबोधि त्या ।।९।।

**प्रश्न ३३० (ड) : पूजेनंतर करावयाचा संकल्प कोणता?**

**उत्तर** : पूजेनंतर करावयाचा संकल्प येणेप्रमाणे :

**इमाय धम्मानुधम्म-पटिपत्तिया बुद्धं पूजेमि।**
**इमाय धम्मानुधम्म-पटिपत्तिया धम्मं पूजेमि।**
**इमाय धम्मानुधम्म-पटिपत्तिया संघं पूजेमि ॥१॥**
**अद्धा इमाय पटिपत्तिया**
**जातिजरामरणम्हा**
**परिमुञ्चिस्सामि ॥२॥**
**इमिना पुञ्ञकम्मेन मा मे बालसमागमो।**
**सतं समागमो होतु यावं निब्बानपत्तिया ॥३॥**
**देवो वस्सतु कालेन सस्ससम्पत्ति हेतु च।**
**फीती भवतु लोको च राजा भवतु धम्मिको ॥४॥**

**प्रश्न ३३० (इ) : धम्मपालन गाथा कोणत्या?**

**उत्तर** - धम्मपालन गाथा खालीलप्रमाणे आहेत :

**सब्बपापस्स अकरणं, कुसलस्स उपसम्पदा।**
**सचित्तपरियोदपनं, एतं बुद्धानं सासनं॥१॥**
**धम्मं चरे सुचरितं, न तं दुच्चरितं चरे।**
**धम्मचारी सुखं सेति, अस्मिं लोके परम्हि॥२॥**
**न तावता धम्मधरो, यावता बहु भासति।**
**यो, च अप्पम्पि सुत्वान, धम्मं कायेन पस्सति।**
**स वे धम्मधरो होति, यो धम्मंनप्पमज्जति॥३॥**

**प्रश्न ३३० (फ) : सब्बसुख गाथा कोणत्या ?**

**उत्तर** - सब्बसुख गाथा येणेप्रमाणे :

**सब्बे सत्ता सुखी होन्तु, सब्बे होन्तु च खेमिनो।**
**सब्बे भद्राणि पस्सन्तु, मा कञ्चि दुक्खमागमा ॥१॥**
**यानी' ध भूतानी समागतानि,**
**भुम्मानि वा यानि व अन्तळिक्खे।**
**सब्बे भूता सुमना भवन्तु,**
**अथो' पि सक्कच्च सुणन्तु भासितं॥२॥**
**तस्मा हि भूता निसामेथ सब्बे,**
**मेत्तं करोथ मानुसिया पजाय।**
**दिवा च रत्तो च हरन्ति ये बलिं,**
**तस्मा हि ने रक्खथ अप्पमत्ता ॥३॥**

**संकल्प**

ऐशा धम्मानुधम्म आचरणे-बुद्धा पूजितो मी ।
ऐशा धम्मानुधम्म आचरणे-धम्मा पूजितो मी ।
ऐशा धम्मानुधम्म आचरणे- संघा पूजितो मी ॥१॥
ऐशा धम्मानुधम्म आचरणे
जन्मजरामरणमुक्तिप्रति जाणे
सुविश्वासे जाणतो मी ॥२॥
ऐशाचि पुण्यकर्माने न घडो मूर्खसंगती ।
घडो संगति संतांची, प्राप्ती हो निर्वाणाची ॥३॥
वर्षा होवो सुसमयी, वृद्धि होवोच पिकांची ।
उन्नति होवो चराचरांची, प्रणाली ही धार्मिकतेची ॥४॥

**धम्मपालन गाथा**

सर्व पापेचि न करणे, कुशलाची उपसंपदा।
चित्ता परिशुद्ध करा, हेचि बुद्धाचे शासन॥१॥
धम्मा धरू सुचरिते, न त्या धरू दुश्चरिते।
धम्मचारी सुखी निजती, ह्या लोकी परलोकीहि॥२॥
न तो धम्मधर होतो, बहु बहु जो बोलतो।
शिकुनी अल्प जरी सुत्त, धम्मा कायेने सिद्धीतो॥
तोचि धम्मधर होतो, जो कधीही हलगर्जी न करीतो ॥३॥

**सब्बसुख गाथा**

सर्व प्राणी सुखी होवो, आणि कल्याणही घडो ।
सर्वचि सन्मार्गी जावो, ना दुःखचि हो कुणा जना ॥१॥
ती सर्व भूतें अदृश्य येथे,
पृथ्वीवरी वा जे अन्तरिक्षी ।
होवो समाधानी ते सर्व प्राणी,
ऐकूनी आणि लक्षात ठेवूनी ॥२॥
यास्तव अहो तुम्ही ऐकाचि सगळे,
प्रेमाची वर्षा करा हो प्रजेवरी ।
दिवसा व रात्री जे कष्ट घेती,
त्यांचे करा हो रक्षण तुम्हीही ॥३॥

**प्रश्न ३३० (ग) : परित्राण पाठ केव्हा करतात ?**

**उत्तर** - परित्राण म्हणजे रक्षण. म्हणूनच एखाद्यास रोग झाल्यास, किंवा गृहप्रवेशाप्रसंगी, विवाह कार्यात, भोजन दानानंतर परित्राण पाठ केला जातो. त्यामध्ये आवाहन, महामंगलसूत्र, करणीयमेत्त सूत्र, रतनसूत्र, महामंगल गाथा, पुण्यानुमोदन व जयमंगल अठ्ठगाथा यांचा प्रामुख्याने समावेश होतो. मंगल कार्याप्रसंगी मुले-मुली जयमंगल अठ्ठगाथा एकत्रितपणे म्हणतात, ती पुढे दिलेली आहे -

## जयमङ्गल अट्ठगाथा

बाहु सहस्समभिनिम्मित सावुधन्तं,
गिरीमेखलं उदित घोर ससेन मारं।
दानादि धम्मविधिना जितवा मुनिन्दो,
तं तेजसा भवतु ते जयमंगलानि॥१॥

मारातिरेक-मभियुज्झित सब्बरत्तिं
घोरम्पनालवक मक्खमथद्ध-यक्खं।
खन्ति सुदन्तविधिना जितवा मुनिन्दो
तं तेजसा भवतु ते जयमंगलानि॥२॥

नालागिरिं गजवरं अतिमत्तभूतं,
दावग्गि चक्कमसनीव सुदारूणन्तं।
मेत्तम्बुसेकविधिना जितवा मुनिन्दो
तं तेजसा भवतु ते जयमंगलानि॥३॥

उक्खित्त खग्गमतिहत्थ सुदारूणन्तं,
धावन्ति योजनपथंगुलिमालवन्तं।
इद्धीभिसंखत मनो जितवा मुनिन्दो,
तं तेजसा भवतु ते जयमंगलानि॥४॥

कत्वान कट्ठमुदरं इव गब्भिनीया,
चिञ्चाय दुट्ठवचनं जनकाय मज्झे।
सन्तेन सोमविधिना जितवा मुनिन्दो
तं तेजसा भवतु ते जयमंगलानि॥५॥

सच्चं विहाय-मतिसच्चक वादकेतुं
वादाभिरोपितमनं अतिअन्धभूतं।
पञ्ञापदीपजलितो जितवा मुनिन्दो
तं तेजसा भवतु ते जयमंगलानि॥६॥

नन्दोपन्द-भुजगं विवुधं महिद्धिं
पुत्तेन थेर भूजगेन दमापयन्तो।
इद्धुपदेसविधिना जितवा मुनिन्दो,
तं तेजसा भवतु ते जयमंगलानि॥७॥

दुग्गाहदिट्ठि भुजगेन सुदट्ठ हत्थं
ब्रह्मं विसुद्धि जुतिमिद्धि बकाभिधानं।
ञाणागदेन विधिना जितवा मुनिन्दो,
तं तेजसा भवतु ते जयमंगलानि॥८॥

एतापि बुद्ध जयमंगल अट्ठगाथा,
यो वाचको दिनदिने सरते मतन्दी।
हित्वाननेक विविधानि चुपद्दवानि
मोक्खं सुखं अधिगमेय्य नरो सपञ्ञो॥९॥

## जयमंगल अष्टगाथा

बाहु सहस्र अति घोर सैन्यायुधाने
गिरिमेखलारूढहि वार केला तयाने।
मारास जिंकीले त्या, दानादि-धम्मविधिने
बुद्धाची महती ऐसी, मंगल तुझे तयाने।।१।।

मारापरि हृदयी निष्ठुर यक्ष, त्याला
दुर्द्धर्ष आवलक घोर, ऐशा जीवाला।
रात्रीच जिंकीले त्या, बल शांति, संयमाने
बुद्धाची महती ऐसी, मंगल तुझे तयाने।।२।।

नालागिरी गजपति अतिमत्त प्राणी
दावाग्निचक्र भययुक्त वीज-प्रमाणी।
गजराज जिंकीला तो, मित्रत्व सुवर्षेने
बुद्धाची महती ऐसी, मंगल तुझे तयाने।।३।।

खड्गा धरी स्वहस्ती, धावीत जाई योजन
अंगुलीमाल तैसा, भययुक्त सर्वहि जन।
जिंकी तयास अपुल्या इद्धि-मनोबलाने
बुद्धाची महती ऐसी, मंगल तुझे तयाने।।४।।

बांधूनि काष्ठ उदरी दिसण्यास गर्भिणी ती
चिंचा जनात लांछन लावी, ही बुद्धप्रचीती।
जिंकी तियेस सौम्य, शांति मनोबलाने
बुद्धाची महती ऐसी, मंगल तुझे तयाने।।५।।

सत्याभिमुख श्रमण तो, सच्चक असत्यवादी
ऐसा दुरभिमानी, गर्विष्ठ तो विवादी।
जिंकी तयास उज्वल प्रज्ञाप्रदीप मनाने,
बुद्धाची महती ऐसी, मंगल तुझे तयाने।।६।।

इद्धि विविध भुजंगा नंदोपनंद नामे,
परि मोद्गल्यायनाने, मुनिशिष्य जो तयाने।
जिंकी तयास अपुल्या सद्गुणी श्रमणबलाने,
बुद्धाची महती ऐसी, मंगल तुझे तयाने।।७।।

विशुद्ध ज्योति, इद्धि, संपन्न ब्रह्मबकही
दंशे तयास मिथ्या दृष्टीच सर्प जणुं ती।
जिंकी तयास अपुल्या संबोधि औषधाने
बुद्धाची महती ऐसी, मंगल तुझे तयाने।।८।।

ऐशाचि बुद्ध-जयमंगल अष्टगाथा
जे वाचीती प्रतिदिनीं ह्याचि सुगाथा।
हीतही बहू नि मुक्ती त्यांच्या उपद्रवांची,
सुख जे मिळेल मनुजा ते मोक्षाणिशांति।।९।।

# प्रज्ञेपूर्वक स्वीकार

**प्रश्न ३३१ : ज्यांचा आम्ही केवळ श्रद्धापूर्वक स्वीकार करायलाच पाहिजे, अशी बुद्धीस न पटणारी काही ठरावीक मते बौद्ध धम्मात आहेत काय?**

**उत्तर** – नाही. केवळ श्रद्धा म्हणून कोणत्याच गोष्टींचा स्वीकार करायला नको, असे आपणाला कळकळीने सांगण्यात आलेले आहे. त्या मग ग्रंथात लिहिलेल्या असोत, वाडवडिलांकडून परंपरागत आलेली असोत, किंवा संतमहात्म्यांकडून शिकविलेल्या असोत, प्रज्ञेस न पटणाऱ्या गोष्टीचा स्वीकार करू नये.

भ. बुद्धांनी असे आवर्जून सांगितले आहे की, कोणत्याही गोष्टीवर केवळ ती तशी सांगितली आहे म्हणून विश्वास ठेवू नये किंवा परंपरागत चालत आलेल्या आहेत म्हणून रूढीवर विश्वास करू नये किंवा इकडून तिकडे पसरणाऱ्या अफवांवर, किंवा ऋषिमुनींच्या लिखाणावर, केवळ या कारणांने की, अमुक ऋषीने आपल्या ग्रंथामध्ये तसे लिहिलेले आहे म्हणून, किंवा एखाद्या देवतेने आपल्याला अमुकअमुक प्रेरणा दिली, असा आपला समज करून, म्हणजेच अंतःप्रेरणेने धर्माचे प्रकटीकरण झाल्याचे गृहीत धरून किंवा आपणच गृहीत धरलेल्या वेड्यावाकड्या धारणांवर आधारलेल्या अनुमानावर, किंवा तर्कावर विश्वास ठेवून, किंवा जी केवळ आवश्यक गोष्टीसारखी भासते ह्यावरून, किंवा आपल्या स्वतःच्या गुरूंनी किंवा स्वामींनी केवळ अधिकारास्तव अधिकारवाणीने सांगितलेली आहे, म्हणूनही त्यावर विश्वास ठेवू नये.

**प्रश्न ३३१ (अ) : प्रज्ञा म्हणजे काय ?**

**उत्तर** – भ. बुद्धांचा आर्य-अष्टांगिक मार्ग शील, समाधी, प्रज्ञा व मैत्रीवर आधारलेला आहे.

शील म्हणजे शरीर व वाणी यांच्या दुष्कर्मापासून दूर राहून सदाचारी जीवन जगणे.

समाधी म्हणजे मनास वश करणे - उत्तम प्रयत्नांद्वारे, नेहमी जागरूक राहून, आवडणाऱ्या, द्वेषयुक्त किंवा मोहयुक्त गोष्टींवरून आपल्या मनास दूर करून.

प्रज्ञा म्हणजे सम्यक् दृष्टी आणि सम्यक् संकल्प. सम्यक् दृष्टी म्हणजे यथाभूत ज्ञानाचे दर्शन. स्थूल वस्तुपासून सूक्ष्मतम वस्तूपर्यंत प्रत्येकास ती जशी आहे तसेच तिला जाणणे व नेहमी समताभाव राखणे. सम्यक संकल्प म्हणजे रागविहीन (प्रियभाव न ठेवणे), द्वेषविहीन (= अप्रिय भाव न ठेवणे) अशा अवस्थेत विचार, चिंतन व मनन करणें. (मैत्रीविषयी प्रश्न ३३८ बघावा).

**प्रश्न ३३२ : आपण कोणत्या गोष्टींवर विश्वास ठेवायला पाहिजे?**

**उत्तर** –भ. बुद्धांनी स्पष्टपणे सांगितले आहे ते असे ''केवळ तुम्ही तसे ऐकलेले आहे म्हणून तुम्ही त्यावर विश्वास करू नका, तर तुमच्या सद्सद्विवेकबुद्धीला पटेल तरच त्यावर विश्वास ठेवा आणि मग त्यानुसार तुम्ही निर्धास्तपणे कार्य करा'' (अंगुत्तरनिकायमधील कालाम सुत्त, तसेच महापरिनिर्वाण सुत्त पाहावे)

**प्रश्न ३३३ : बौद्धधम्म ढोंगाला उत्तेजन देतो काय?**

**उत्तर** - अजिबात नाही. धम्मपदात सांगितले आहे, ''जो बोलतो परंतु त्याप्रमाणे वागत नाही त्याचे सुंदर शब्दही एखाद्या सुंदर परंतु सुगंध नसलेल्या फुलाप्रमाणे निष्फळ ठरतात.'' **यथापि रूचिरं पुप्फं वण्णवन्तं अगन्धकं। एवं सुभासिता वाचा अफला होति अकुब्बतो ॥ ध । ४/८**

**प्रश्न ३३४ : बुद्धवचनाला प्रमाण मानावे काय?**

**उत्तर** - भगवंतांनी म्हटले आहे, ज्याप्रमाणे सोन्याचांदीची परीक्षा करूनच ते ग्राह्य मानतो, त्याप्रमाणे माझ्या वचनासही स्वानुभवाच्या कसोटीवर परीक्षण करून ग्रहण करावे. केवळ माझ्याविषयी आदरबुद्धी आहे, म्हणून नव्हे.

**प्रश्न ३३५ : एखादे 'बुद्ध वचन' आहे किंवा नाही, हे समजण्याला मार्ग कोणता?**

**उत्तर** - सुत्त पिटकांतील सूत्रांशी तुलना केल्यावर, विनय पिटकात शोधाशोध केल्यावर जर ते वचन सूत्राशी किंवा विनयाशी मिळत नसेल तर निश्चितपणे असा विश्वास करावा की, ते भगवंतांचे वचन नव्हे. सूत्राशी व विनयाशी तुलना केल्यावर जर ते खरे दिसत असेल तर विश्वास करावा की, ते अवश्य भगवंताचे वचन आहे.

**प्रश्न ३३६ : भ. बुद्धांचा धम्म सांदृष्टिक आहे काय? 'या' आणि 'बघा' असे म्हणू शकतो, असा आहे काय?**

**उत्तर** - होय. भगवंतांचा धम्म सांदृष्टिक आहे. भ. बुद्ध अशाच गोष्टींचा त्याग करायला सांगत असत, ज्याला कोणी भ्रमामुळे सुख मानलेले आहे. खऱ्या सुखाचा त्याग करायला ते सांगत नव्हते. त्यांनी निर्वाणाचा उपदेश ह्याकरिताच दिला आहे; कारण निर्वाण 'परमसुख' आहे. पण 'निर्वाणाची' प्राप्ती करणारी 'प्रज्ञा' सहज प्राप्त होऊ शकत नाही. क्रमाक्रमानेच प्रज्ञेची प्राप्ती होते. प्रथम मनुष्याच्या मनात श्रद्धा उत्पन्न होते. म्हणून तो ज्ञानी मनुष्याच्या जवळ जाऊन त्याची सेवा करू लागतो, त्याच्या सहवासात राहून त्याने उपदेशिलेल्या धम्माचे तो श्रवण करतो, त्याचे मनन करतो. मनन केल्याने त्या धम्माप्रती आवड निर्माण होते. आवड निर्माण होताच उत्साह वाढतो व उत्साह वाढला म्हणजे तो त्यानुसार आचरण करतो. आचरण केल्यामुळे त्याच जन्मात तो परमज्ञानाची प्राप्ती करू शकतो. अशा प्रकारे भ. बुद्धांचा धम्म ह्याच जन्मात मुक्तीचा साक्षात्कार करून देऊ शकणारा 'नगद' धम्म आहे, असे आपण म्हणू शकतो. परलोकाची प्रतीक्षा करायला सांगणारा 'उधार' धम्म नाही.

**प्रश्न ३३७ : प्रज्ञा व शील यांचे काय महत्त्व सांगितले आहे?**

**उत्तर** - एकदा असा प्रश्न निघाला की, ब्राह्मण म्हणून स्वीकार करावयास कोणत्याही पुरूषाच्या अंगी कोणकोणते गुण असावयास पाहिजेत. त्यावर ब्राह्मणांनी उत्तर दिले, ''१) ब्राह्मण कुलीन मातापित्याच्या पोटी जन्मला असावा, २) वेद-मंत्रधारी असावा, ३) चांगल्या (गोऱ्या) वर्णाचा देखणा असावा, ४) शीलवान असावा, ५) पंडित असावा, मेधावी असावा''.

"परंतु रूप-सौंदर्याला सोडून इतर चार गुण अंगी असलेल्यालाही 'ब्राह्मण' म्हणू शकतो. वेदमंत्रधर नसला तरी त्याला ब्राह्मण म्हणू शकतो. सुलक्षणी माता-पित्यापासून जन्मला नसला तरी त्याला 'ब्राह्मण' म्हणू शकतो, परंतु शील व प्रज्ञा असणे अनिवार्य आहे. शीलामुळे प्रज्ञा शुद्ध होते, प्रज्ञेमुळे शील. जेथे शील आहे, तेथे प्रज्ञा आहे व जेथे प्रज्ञा आहे तेथे शील आहे".

## मैत्री भावना

**प्रश्न ३३८ : मैत्री भावना म्हणजे काय?**

**उत्तर** - 'मीलनाचा' आनंद आहे, पण 'वियोगाचे' दुःख नाही, अशा भावनेला 'मैत्री-भावना' म्हटले आहे. सर्व प्राण्यांवर प्रेम करणे म्हणजे सर्वांशी मैत्री करणे होय. परंतु मनुष्याला 'प्रेमाचा बाण' तेव्हाच विदीर्ण करतो, जेव्हा तो एखाद्या विशिष्ट व्यक्तीवर आपले मन केंद्रीत करतो व त्यामुळे त्याला वियोगाचे दुःख होते. म्हणून भ. बुद्धांनी प्रेमाला दुःखाचे मूळ म्हटले आहे आणि सर्व प्राणिमात्रांशी 'मैत्री' करण्याचा आदेश दिला आहे; जेणेकरून वियोगाचे दुःख होऊ नये.

**प्रश्न ३३९ : मैत्री भावनेपासून कोणते फायदे होतात?**

**उत्तर** - मैत्री भावनेपासून दहा फायदे होतात.

१) मैत्री-भावना ही चित्ताला विमुक्त करणारी असून मैत्री भावनेच्या अनुकूल आचरण करणारा सुखाने झोपतो.

२) सुखाने झोपून उठतो.

३) त्याला वाईट स्वप्ने पडत नाही.

४) तो सर्व लोकांना आवडतो.

५) मनुष्यांशिवाय इतरांनाही प्रिय होतो.

६) देवता त्यांची रक्षा करतात.

७) लवकरच त्याची समाधी लागते.

८) तो सर्वांगाने प्रसन्न राहतो.

९) भयभीत न होता तो मृत्यूला सामोरा जातो, आणि

१०) तो अर्हतपदापर्यंत जरी पोहोचू शकला नाही, तरी ब्रह्मलोकात तो अवश्य जन्म ग्रहण करतो. (ब्रह्मलोक म्हणजे चित्ताची सदोदित आनंदी अवस्था)

**प्रश्न ३४० : मैत्री, करुणा, मुदिता तसेच उपेक्षेची भावना सर्वांप्रती समभावानेच केली पाहिजे काय?**

**उत्तर** - नाही. मैत्री सर्वांशी केली पाहिजे. परंतु 'करुणा' त्यांच्यावर करावी जे आपल्यापेक्षा अधिक दुःखी आहेत. 'मुदिता' त्यांच्याविषयी जे आपल्यापेक्षा अधिक सुखी आहेत. आणि 'उपेक्षा' तर केवळ त्यांचीच करावयाची असते जे विनाकारण चांगल्या गोष्टींचा विरोध करतात.

**प्रश्न ३४१ : अपराध्याचा अपराध सिद्ध झाल्यावर त्याला शासनाद्वारे दंड दिलाच जातो. अशा दंडनीतीचे भगवंतांनी समर्थन केले आहे काय?**

**उत्तर** – होय. भगवंतांनी कोठेच दंडनीतीचा विरोध केलेला नाही. अपराध्याला त्याच्या अपराधाबद्दल शिक्षा मिळत असते. त्याला जबाबदार त्याचा अपराधच असतो, न्यायाधीश नसतो, असे भगवंतांचे म्हणणे होते. परंतु काही परिस्थितीमध्ये भगवंतांनी क्षमानीतीचे दंडनीतीपेक्षाही अधिक समर्थन केले आहे व तिला अधिक लाभदायक म्हटले आहे. अंगुलिमाल डाकूची कथा ह्याच उदाहरण आहे. त्यांनी अंगुलिमालास क्षमा केली होती. (परंतु तो भिक्खू झाल्यावर लोकांनी त्याला दगडांनी मारून रक्तबंबाळ केले. तेव्हा भगवंतांनी त्याला ते निमूटपणे सहन करण्यावा उपदेश दिला. पुढे अंगुलिमाल अर्हतपदास पोहोचला.)

## अहिंसा

**प्रश्न ३४२ : अहिंसेचा अर्थ काय?**

**उत्तर** – भिक्खूचा कोणत्याही प्रकारें प्राणिहत्येशी संबंध नसावा. परंतु त्यास भिक्षेमध्ये मांसाचे दान मिळाले तर तो त्याचा निरपेक्षभावाने स्वीकार करू शकतो. यज्ञयागामधील पशुबली ही जीवहिंसा करावयाची चेतना आहे, त्यामुळे ती त्याज्य आहे. मारू नका, सर्व प्राण्यांविषयी मैत्री भावना असू द्या. याप्रमाणे बौद्ध धम्मातील अहिंसेचा अर्थ असा की, जेथे जीवहत्या करणे अत्यंत आवश्यक असेल, तेथेच ती करावी. परंतु जेथे जीवहत्या करावयाची चेतना असेल (यज्ञयागात सांगितल्याप्रमाणे) ती हिंसा एकदम त्याज्य होय.

**प्रश्न ३४३ : न्याय कारणासाठी केलेले युद्ध किंवा हिंसा यांस तथागतांनी मनाई केली होती काय?**

**उत्तर** – नाही. तथागतांनी सिंह सेनापतीला केलेल्या उपदेशात ह्याचे पूर्णतः स्पष्टीकरण केलेले आहे. जो शिक्षेस पात्र आहे, त्याला शिक्षा व्हायलाय पाहिजे. तथापि तसे करताना सर्वांप्रती पूर्णपणे प्रेम आणि करुणेने ओतप्रोत राहावे, असे तथागत शिकवितात. कोणालाही त्यान केलेल्या गुन्ह्याबद्दल शिक्षा करायलाच पाहिजे. त्याला आपले दुःख न्यायाधीशाच्या वाईट इच्छेमुळे भोगावे लागत नसून त्याने केलेल्या दुष्कृत्यामुळे भोगावे लागते. जो दंड शासनकर्ता फर्मावितो, तो दंड दुष्टांवर ओढवून आणण्यास त्याची दुष्कृत्ये कारणीभूत असतात. जेव्हा न्यायाधीश शिक्षा फर्मावितो, तव्हा त्याने द्वेषाला आपल्या मनात थारा देऊ नये. जेव्हा एखाद्या खूनी इसमास मृत्यूदंड होतो, तेव्हा त्याने द्वेषाला आपल्या मनात थारा देऊ नये. जेव्हा एखाद्या खुनी इसमास मृत्यूदंड होतो, तेव्हा त्याने असे समजावे की, तो दंड त्याच्या स्वतःच्या कर्माचे फळ आहे. ज्या क्षणी त्यास हे समजून येईल की, त्या शिक्षेमुळे त्याचे मन शुद्ध होणार आहे त्या क्षणी तो आपल्या दुर्दैवाबद्दल शोक करण्याचे सोडून देईल. त्या दुष्ट शक्ती, त्या मानवी असोत, दैवी असोत वा नैसर्गिक असोत, तथागत त्यांच्याशी धैर्याने संघर्ष करावयाचा उपदेश देतात. तथागत म्हणाले, 'हे सेनापती सिंहा! तू धैर्याने संघर्ष कर आणि पूर्ण उत्साहाने लढ, परंतु सत्याचा सैनिक हो म्हणजे तथागत तुला आशीर्वाद देतील'.

**प्रश्न ३४४ : 'अहिंसा परमोधर्मः' हे भ. बुद्धांचे वचन आहे काय?**

**उत्तर** - नाही. 'अहिंसा परमोधर्मः' हे महाभारतातील वचन आहे, बौद्ध ग्रंथातील नव्हे. खरोखरच ही गोष्ट केवळ आश्चर्याची नव्हे तर पश्चात्तापाचीही आहे की, महाभारतात 'अहिंसा परमोधर्मः' चा उपदेश सांगितलेला असूनही कौरव-पांडवांचे महायुद्ध झाले व लाखो लोकांचे प्राण गेले.

भिक्खूंना 'त्रिकोटी परिशुद्ध' मांसोळीचे मांस ग्रहण करण्याची अनुज्ञा 'विजय पिटकात' आहे त्यामुळे त्यांच्यासाठी शाकाहार अनिवार्य नाही. आजकाल मोठमोठ्या देशांत मोठमोठ्या यंत्रांद्वारे पशुहत्या करून त्याचे मांस डब्यामध्ये भरून परदेशी पाठविले जाते. ते कोणत्याही एका विशेष व्यक्तिकरिता तयार केलेले नसते.

म्हणून असे म्हणावे लागते की, 'त्रिकोटी परिशुद्ध मांसाचा' नियम व्यक्तिगत जबाबदारीला दृष्टीसमोर ठेवून बनविला गेला असावा.

**प्रश्न ३४५ : अहिंसेच्या बौद्ध सिद्धान्ताविषयी कोणकोणते चुकीचे समज निर्माण झालेत?**

**उत्तर** - अहिंसा किंवा जीवहिंसा न करणें, हे भगवंतांच्य धम्माचे एक महत्त्वपूर्ण अंग आहे. अहिंसेचा करुणा व मैत्रीशी अत्यंत जवळचा संबध आहे. परंतु प्रश्न असा आहे की, ते केवळ 'शील' होते की तो एक नियम होता? अहिंसेला निरपेक्ष असे बंधन मानल्यास, अहिंसेमुळे वाईटासाठी चांगुलपणाचे बलीदान करावे लागेल, किंवा दुर्गुणासाठी सद्गुणांचे. श्रीलंकेमधील बौद्ध भिक्खू विदेशी आक्रमणकर्त्यांवर तुटून पडले व त्यांनी लोकांनाही लढावयास उद्यत केले. दुसरीकडे ब्रह्मदेशातील भिक्खूंनी तसे करावयास मनाई केली व तो देश परतंत्र झाला. ब्रह्मदेशातील लोक अंडी खातात, परंतु मासोळी खात नाहीत. काही दिवसांपूर्वी जर्मनीमधील बौद्ध समितीने असा प्रस्ताव केला की, पंचशीलांपैकी ते प्रथम शील सोडून केवळ चार शिलांचेच पालन करतील.

परंतु भगवंतांनी अहिंसेला शील (Principle) म्हणून ग्रहण केले, नियम (Rule) म्हणून नाही. त्यांनी अहिंसेला जीवनाचा एक मार्ग मानले. म्हणून जेथे सद्गुणांचा बचाव करावयाचा असेल व हिंसेशिवाय ते शक्य नसेल, तेथेच नाइलाज म्हणून हिंसा करावी लागेल, असा उपदेश करतांना भगवंतांनी प्रज्ञासंगत फारच उत्तम शिकवण दिलेली आहे.

**प्रश्न ३४६ : भ. बुद्धांनी मुर्दार मांस व मांस भोजन ह्यांतील भेद स्पष्ट केला आहे काय?**

**उत्तर** - होय. भगवंतांनी म्हटले आहे की, 'प्राणि हिंसा करणे, मारणे, पिटणे, बांधून ठेवणे, चोरी, मृषावाद, कपट करणे, फसविणे, व्यभिचार ही सर्व मुर्दार-मांस भोजनेच होत ज्यामुळे मनुष्य अपवित्र होतो.

काम-भोग, अपवित्र जीवन, निर्दयता, विश्वासघात, गर्वांधता तसेच कृपणता, ही सर्व मुर्दार मांस भोजने आहेत, ज्यामुळे मनुष्य अपवित्र होतो.

क्रोध, विद्रोह, ईर्ष्या, फुशारकी, अहंकार, ही सर्व मुर्दार मांस भोजने आहेत, ज्यामुळे मनुष्य अपवित्र होतो.

विशिष्ट अन्न सेवन केल्याने मनुष्य पवित्र होत नाही, तद्वतच मांसाचे सेवन केल्याने

मनुष्य अपवित्र होत नाही. इंद्रियांवर प्रभुत्व मिळवून, संयम करून, सत्त्वाची कास धरून, करुणामय होऊन, बंधनमुक्त होऊनच मनुष्य पवित्र होतो व दुःखावर विजय मिळवितो'.

**प्रश्न ३४७ : बौद्ध धम्मात मांसाहार सर्वथा निषिद्ध आहे काय?**

**उत्तर** - नाही. लंकावतार सारख्या महायान बौद्ध धम्मग्रंथामध्ये मांसाहार करणे, सर्वथा निषिद्ध सांगितलेले आहे. पाली बौद्ध वाङमयामध्ये प्राणघात करणे निषिद्ध आहे, मांसाचा व्यापार निषिद्ध आहे. परंतु मांसाहाराचा निषेध नाही. बौद्धगृहस्थ पशुघात करीत नाही आणि भिक्खूदेखील अशा मांसाचे सेवन करीत नाहीत, जे विशेषेकरून व्यक्तिगत रूपाने त्यांच्यासाठीच तयार केले गेले असते.

तिबेटमध्ये अन्नधान्ये व फळे, भाजीपाला इ. फार कमी उत्पन्न होतात. तेथे जैविकेसाठी मांसाहार आवश्यक असल्यामुळे तेथील बौद्ध लोक मांसाहार करतात. कालमान व परिस्थितीनुसार मांसाहार आवश्यक असल्यास तो निषिद्ध नाही.

## विपश्यना भावना

**प्रश्न ३४७ (अ) : विपश्यना कशाला म्हणतात?**

**उत्तर** -आपल्या स्वरूपाचे यथाभूत (जसे आहे तसेच) दर्शन करण्याला विपश्यना (किंवा विदर्शना) म्हणतात. सतिपठ्ठान म्हणजे सतत जागरूक राहणे. निरंतर अप्रभावी राहून स्मृतिभाव केल्याने हळूहळू साधकाची अंतर्दृष्टी किंवा प्रज्ञाचक्षू उघडते. त्या प्रज्ञाचक्षूद्वारे साधक नामरूपाचे (पंचस्कंधाचे) यथाभूत दुःख अनात्म स्वभावाचे दर्शन करू लागतो. येणेप्रमाणे आपल्या स्वरूपाच्या यथाभूत दर्शन करण्याला विपश्यना म्हणतात. तिच्या वर्धापन करण्याला सतिपठ्ठान विपश्यना भावना म्हणतात. ही तत्काळ फळदायी आहे, इथेच तिचे फळ प्राप्त होते. ही भावना निर्वाणापर्यंत पोचविणारी आहे आणि साधक तिचा अभ्यास करून येथेच (या पृथ्वीवरच) स्वतःच साक्षात्कार करू शकतो.

आपल्या स्वतःच्या शरीराच्या आत अंतर्मुखी होऊन या शरीरास, चित्तास आणि चित्तवृत्तींना तसेच चारही महाभूतांना त्यांच्या गुणधर्म स्वभावानुसार जाणणे व अनुभव करणे की, हे सर्व तरंगच तरंग आहेत, हे सर्व केवळ प्रवाहमात्र आहेत आणि या प्रकारे त्यांच्या खऱ्याखऱ्या वस्तुस्थितीला जाणून घेऊन त्यांच्या बंधनापासून मुक्त राहणे, हिलाच 'विपश्यना साधना' म्हणतात आणि हाच मंगलपथ आहे.

विपश्यना भावनेसाठी -

१. शीलानुसार वर्तन ठेवून
२. समाधीमध्ये चित्तास दृढ करून
३. प्रज्ञेनुसार अनित्य, अनात्म आणि दुःखबोधासहित, जागृत राहून, समताभाव कायम राखून, आपल्या देहामध्ये संवेदनेच्या मार्गे, सहज दिसणाऱ्या सत्यापासून सूक्ष्म सत्यापर्यंत अनुभूतिपूर्वक दर्शन घ्यावे लागते.

विपश्यना म्हणजे विशेषकरून पाहणे, अंतर्मुखी होऊन स्थूल सत्याचे विभाजन करीत करीत सूक्ष्मतम सत्यापर्यंत पोहोचणे, प्रज्ञेचे कर्मस्थान, चित्तशुद्धीचा मार्ग, संचित संस्कारांनी

उर्दीण होऊन (बाहेर निघून येणे) त्या संस्कारांची निर्जरा (शुद्ध) करण्याची भावना.

आपले विकार म्हणजे संचित कर्मसंस्कारांच्या गाठीदेखील तरंगांच्या पुंजमात्रच आहेत. त्यांना जर उकलता आले तर या संस्कारांची निर्जरा होऊन आपण दुःखापासून मुक्ती मिळवू शकतो. विपश्यना साधना हाच अभ्यास करविते. (बघा प्रश्न ५९२ (अ))

**प्रश्न ३४७ (ब) : विपश्यना बौद्ध साहित्यात कुठे आढळते?**

**उत्तर** - सतिपठ्ठान विपश्यना भावना सूत्रपिटकातील दीर्घनिकाय महासती पठ्ठान सूत्रामध्ये विपश्यनेचा उल्लेख आढळतो. परंतु केवळ महापठ्ठानसूत्र वाचून आचार्यांच्या निर्देशनाविना विपश्यना करणे नवीन साधकांना शक्य होऊ शकत नाही.

विपश्यना भावनेद्वारा साधक आपल्या मनास अप्रमत्त करून आपले शरीर आणि मन यांना सतत जागरूक ठेवून, आपल्या चित्तास शुद्ध, निर्मळ आणि निर्विकार बनवीत, समाधीला प्राप्त करीत परमसत्याचा साक्षात्कार करू शकतो.

भगवंतांनी म्हटलेच आहे,'भिक्खूंनो प्राण्यांच्या शुद्धीकरिता शोक संतापाला दूर ठेवण्यासाठी, दुःख दौर्मनश्याचा नायनाट करावयास, लोकोत्तर मार्गावर आरूढ होण्यासाठी आणि निर्वाण साक्षात्कारासाठी हा केवळ एकच मार्ग आहे.'

विपश्यना म्हणजे 'विशेष पाहणे'. **(विसेसेन पस्सति इति विपस्सना।)**

**प्रश्न ३४७ (क) : विपश्यनेची तयारी करी करावी?**

**उत्तर** - जी व्यक्ती निष्ठापूर्वक ध्यानासाठी बसू इच्छिते आणि अंतर्दृष्टी प्राप्त करू शकते. त्या व्यक्तीला सांसारिक गोष्टी, अतिविचार यांपासून सुटी घेणे आवश्यक असते. तिथे पंचशीलांचे पालन केलेच पाहिजे. जीवहिंसा न करणे, चोरी न करणे, व्यभिचार न करणे, खोटे न बोलणे आणि दारू इत्यादी मादक पदार्थांचे सेवन न करणे यांना पंचशील म्हणतात.

निर्वाण परम मंगलमय आहे. त्याला प्राप्त करण्याचा मार्गदेखील मंगलमय आहे. विपश्यनेचा साधक निश्चिंतपणे धम्ममार्गाचे ज्ञान आणि निर्वाण साध्य करू शकतो. म्हणून या मार्गावरील साधकाचा अंतिम लक्ष्यप्राप्तीवर पूर्ण विश्वास असणे आवश्यक आहे.

साधकाने सुखासनामध्ये बसावे. नेहमी बसावयाच्या पद्धतीने बसावे जेणेकरून वारंवार आसन बदलण्याची आवश्यकता नसावी. ज्यांना जमिनीवर बसायची सवय नसेल त्यांनी आपल्या सोयीनुसार आसनावर बसावे. आता साधकाने ध्यानाच्या अभ्यासाला प्रारंभ करावा.

**प्रश्न ३४७ (ड) : विपश्यना साधनेचा आरंभ कशा रीतीने करावयाचा असतो ?**

**उत्तर** - स्वाभाविक श्वासोच्छ्वास करण्याला आनापान स्मृती म्हणतात. साधकाने आपले लक्ष श्वास प्रश्वासावर केंद्रित करावे. श्वास घेते समयी पोट वर जाते आणि सोडल्यावर ते खाली जाते. जर सुरुवातीसच पोट वर खाली जाण्याचा भास मिळत नसेल तर पोटावर एक हात किंवा दोन्ही हात ठेवल्याने ती क्रिया स्पष्टपणे जाणवेल. आता साधकाने पोटाच्या उठण्याखाली जाण्याच्या क्रियेवर ध्यानाला केंद्रित करावे. स्मृती, समाधी आणि ज्ञानाला जागृत करावयास साधकाला अतिशय सोपी आणि सहज करणारी अशी ही क्रिया आहे. जसजसा अभ्यास वाढेल तसतसा श्वास प्रश्वासाच्या येण्याजाण्याचा व पोटाच्या वरखाली होण्याचा अभ्यास होत जाईल.

साधकाने सुस्थिर चित्ताने श्वासाकडे लक्ष द्यावे आणि त्यावर लक्ष केंद्रित करावे. श्वासाचे येणेजाणे व पोटाचे उठणे बसणे या वर लक्ष तर द्यावे, परंतु शब्दांचे उच्चारण करू नये. जोरजोराने श्वास घ्यायची देखील आवश्यकता नाही.

**प्रश्न ३४७ (इ) : विपश्यना करते वेळेस जर वेगवेगळे विचार आणि कल्पना मनात गर्दी करू लागल्या, तर काय केले पाहिजे?**

**उत्तर** – या क्रिया मानसिक आहेत. त्यांच्याकडे डोळेझाक करून चालत नाही. कोणताही विचार किंवा कोणतीही कला मनात आल्याबरोबर तिचे त्वरित अवलोकन केले पाहिजे. मनात तिच्याकडे बघायला पाहिजे. जसे - होय ही कल्पना मनात आली. हा विचार मनात आला. त्या कल्पनेमध्ये किंवा विचारांमध्ये साधकाने गुंतू नये, वाढवायचे प्रयत्न करू नये. त्याकडे केवळ दृष्टिक्षेप करावा. केवळ दृष्टिक्षेपाने तो विचार निघून जाईल, सतत जागरूकता आणि सावधगिरी बाळगणे, हाच या साधनेचा प्राण आहे.

समजा की एखादी कल्पना आली. तत्काळ मनातल्या मनात 'कल्पना आली', 'कल्पना आली' असे बघावे. एखादा विचार आला तर मनातल्या 'मनात विचार आला' विचार आला असे ध्यान करावे. एखादी इच्छा जागृत झाली की 'इच्छा जागृत झाली' असे ध्यान करावे. त्यात गुंतू नये. तिच्याविषयी आणखी विचार करून तिला वाढवू नये. केवळ दृष्टिक्षेप करावा. मी विचार करीत आहे, मी कल्पना करीत आहे, मी इच्छा करीत आहे, असे नव्हे. त्यात आपल्या 'मी' ला जोडू नये. माझी इच्छा , माझी कल्पना, माझा विचार माझी समज असेदेखील नाही. 'मी' आणि 'माझे' या प्रक्रियेमध्ये गुंतायचे नाही, फसायचे नाही. तटस्थ भावाने येणारे विचार, कल्पना, इच्छा, संकल्प यांच्याकडे बघावे. असे ध्यान करताच, त्यांच्याकडे नुसते बघताच, ते स्वतःच लोप पावतील आणि आपण आपल्या साधनापथावर पुढील मार्गावर चालत राहू.

जर साधक हात उचलू इच्छित असेल तर मनातल्या मनात करावे 'इच्छितो', 'इच्छितो'. हात उचलल्यास 'उचलतो' 'उचलतो', हात फैलवीत असेल तर 'फैलवीत आहे', 'फैलवीत आहे', ठेवीत असेल तर, 'ठेवीत आहे', 'ठेवीत आहे' या सगळ्या क्रिया खूप हळूहळू आणि प्रत्येक स्थितीचे सूक्ष्म अवलोकन करीत राहिले पाहिजे. जर ध्यान करताना एखादी ज्योत, एखादे दृश्य, एखादा रंग दिसला तर 'दिसत आहे', 'दिसत आहे'. त्या दृश्यांना वारंवार मनातल्या मनात बघावे आणि बघतच राहावे. जोपर्यंत त्या दृश्यांचा लोप होत नाही. त्यांचा लोप झाल्यानंतर पुनः श्वास-प्रश्वासावर ध्यान केंद्रित करावे.

**प्रश्न ३४७ (फ) : विपश्यना करताना साधकाला कधीकधी असह्य पीडा किंवा यातनांचा अनुभव येतो का?**

**उत्तर** –होय. समाधीमध्ये थोडी प्रगती झाल्यावर कधी कधी साधकास असह्य पीडा होऊ लागते किंवा श्वास गुदमरल्यासारखे वाटू लागते. सुरा भोसकल्यासारखे वाटते किंवा शरीरावर लहान लहान किडे चालत असल्याचा भास होतो, इत्यादी. साधक ज्या क्षणी आपले ध्यान बंद करेल तत्क्षणीच हे अनुभवदेखील लोप पावतील, परंतु ध्यान पुनः सुरू करताच ते अनुभव पुन सुरू होईल. हे कष्टकारक अनुभव एखाद्या आजारामुळे नसतात. ते शरीरातच

विद्यमान असतात. परंतु आपण इतर कार्यात सलंग्न असल्यामुळे हे दोष लपलेले असतात, सुप्त असतात. ध्यान करतेवेळी ते जागृत होतात, कारण मनाची शक्ती प्रबळ झालेली असते व त्यामुळे साधक त्यांना अनुभवू शकतो. जर साधक आपल्या ध्यानांत मग्न राहिला तर या अप्रिय अनुभवांवर तो हळूहळू विजयी होतो आणि पुढे त्यांचा प्रभाव होत नाही.

शरीराला जर कांपरे सुटले, तर एखाद्या भिंतीला टेकून बसावे किंवा आपल्या जागीच लेटावे. त्यानंतर पुनः आपले ध्यान सुरू करावे.

**प्रश्न ३४७ (ह) : विपश्यना साधनेत परिपक्क झाल्यानंतर साधक झोपेच्या आवश्यकतेपासून मुक्त होऊ शकतो का?**

**उत्तर -** होय, विपश्यना आचार्यांचे हेच म्हणणे आहे. सतत एक दिवस आणि एक रात्र या साधनेचा अभ्यास केल्यावर साधकाला असा अनुभव येतो की त्याचे ध्यान विशेष प्रगाढ होत चालले आहे. जर कोणी व्यक्ती त्याला दिसली तर 'बघत आहे' 'बघत आहे' याचे दोन-तीन वेळा ध्यान करावे. त्यानंतर श्वासाच्या येण्याजाण्यावर ध्यान लावावे. जर या साधनेविषयी एखादी शंका आली तर मनातल्या मनात ध्यान करावे 'शंका आली', 'शंका आली' कधीकधी तो उत्तम परिणामांची आशा करील, तेव्हा 'आशा करीत आहे', 'आशा करीत आहे' असे ध्यान करावे. सारांश असा की, साधकाने आपल्या मनाच्या प्रत्येक स्थितीला सावधानीपूर्वक बघावे आणि प्रत्येक स्थितीचे ध्यान करावे. त्यानंतर श्वास-प्रश्वासावर ध्यान लावावे. प्रातःकाळी उठण्यापासून रात्री झोपेपर्यंतची वेळ साधनेची असते. येणेप्रमाणे साधक जोपर्यंत जागत राहील त्या संपूर्ण वेळी पूर्णतः प्रमादरहित आणि सावधान राहील. त्यांत कसलीही शिथिलता येऊ देऊ नये. साधनेत परिपक्क झाल्यावर साधक स्वतःच असा अनुभव प्राप्त करेल की त्याला आता झोपेची आवश्यकता राहिलेली नाही आणि तो रात्रंदिवस अखंडपणे साधना करू शकेल.

साधक जर येणेप्रमाणे रात्रंदिवस साधनेत रममाण राहिला तर त्याचे ध्यान एवढे जागृत प्रखर आणि प्रगाढ होईल की त्याला 'उदय व्यय' या विपश्यनेच्या चतुर्थ ज्ञानाची प्राप्ती होईल आणि विपश्यना ज्ञानाच्या परम अवस्थेची प्राप्ती होईल.

**प्र.३४७ (ज) : विपश्यनेद्वारा पीडा नष्ट कशी होते ?**

**उत्तर -** विपश्यना साधनेद्वारा मनाला वश केल्याने जी आंतरिक शांती मिळते, जी प्रीती जो आनंद मिळतो त्याची तुलना तुच्छ इंद्रियसुखासोबत होऊ शकत नाही. इंद्रियजन्य सुखाच्या आधी आणि नंतर दुखःच असते. जसे कोढ झालेल्या व्यक्तीने खाजविण्याच्या पूर्वी आणि नंतर. परंतु ध्यानाच्या प्रीतिसुखाच्या आधी तसेच नंतरदेखील कसलीही किंवा दुःख नसते. या साधनमार्गाद्वारे अभूतपूर्व शांती मिळते. विपश्यनेद्वारे मानसिक पीडा नष्ट होते.

**प्रश्न ३४७ (झ) : विपश्यना साधनेची शिकवण कोठे देण्यात येते आणि तेथील कार्यक्रमाची रूपरेखा कशी असते.**

**उत्तर -** विपश्यना विश्व विद्यापीठाची स्थापना इगतपुरी (रेलवे स्टेशन मुंबई व नाशिक यांच्यामध्ये) श्री. सत्यनारायण गोयंका, विपश्यना आचार्य यांनी १९७५ मध्ये केली. येथे जवळजवळ ७०० साधक एकवेळी निवास करू शकतात. त्यांच्या राहण्याची सर्व व्यवस्था

तेथे आहे. तेथे दहा दिवस पूर्णतः मौन राहून अत्यंत उत्साहपूर्वक ध्यान साधना करतात.

तेथील कार्यक्रमाची रूपरेखा येणेप्रमाणे असते. या कार्यक्रमाचे निष्ठेने पालन करणे अनिवार्य असते.

सकाळी ४ वाजता उठणे, ४.३० ते ६.०० पर्यंत ध्यान धारणा

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६.०० | ते | ६.३० | - | वंदना आणि मंगल कामना |
| ६.३० | ते | ८.०० | - | नित्यकर्म आणि नाश्ता |
| ८.०० | ते | ९.०० | - | सामूहिक ध्यानसाधना |
| ९.०० | ते | ११.०० | - | ध्यान साधना |
| ११.०० | ते | १२.०० | - | भोजन |
| १२.०० | ते | १३.०० | - | विश्राम |
| १३.०० | ते | १४.३० | - | ध्यान साधना |
| १४.३० | ते | १५.३० | - | सामूहिक ध्यान साधना |
| १५.३० | ते | १७.०० | - | ध्यान साधना |
| १७.०० | ते | १८.०० | - | चहापाणी व विश्राम |
| १८.०० | ते | १९.०० | - | सामूहिक ध्यान साधना |
| १९.०० | ते | २०.३० | - | मार्गदर्शनाखाली प्रवचन |
| २०.३० | ते | २१.३० | - | प्रश्नोत्तर आणि शंका समाधान |
| २१.३० | ते | २२.०० | - | विश्राम, रात्री भोजन दिले जात नाही. |

साधनेच्या प्रथम दिवशी साधकांना पंचशील पाळण्याचा संकल्प दहा दिवसांकरिता देण्यात येतो. येथे कसल्याच प्रकारचे शुल्क घेतले जात नाही.

शिबिराच्या प्रथम साडेतीन दिवस, समाधीच्या म्हणजे चित्ताच्या एकाग्रतेचा अभ्यास करवितात. येणाऱ्या व जाणाऱ्या श्वासोच्छ्वासावार ध्यान लावायचा अभ्यास करवितात. हिलाच 'आनापान साधना' म्हणतात. शिबिराच्या चौथ्या दिवशी साधकांना 'विपश्यना' दिल्या जाते. जी प्रज्ञेचा अभ्यास असते. शिबिराच्या साडेसहा दिवसांत साधकांना हिचा अभ्यास करावा लागतो. अंतर्मुखी होऊन आपल्या शरीरात होणाऱ्या संवेदनांचा केवळ साक्षी भावाने बसून चित्ताद्वारे जाणण्याचा अभ्यास करावा लागतो.

स्थूल सत्यापासून सूक्ष्म, सूक्ष्मतर आणि सूक्ष्मतम सत्यापर्यंत जाणावयाचा हा अभ्यास असतो. शरीराच्या संवेदना केवळ तरंग तरंग आहेत. धाराप्रवाहच धाराप्रवाह आहेत आणि भंगच भंग आहेत, असे साधकांना या साधनेद्वारे जाणवते. शिबिरात जात, धर्म, वर्ण, लिंग, देश यांचे कसलेही बंधन नाही.साधनेचा हा विधी सार्वजनिक, सार्वदेशिक आणि सार्वकालिक आहे.

शिबिरात प्रवेश घ्यावयाचा असल्यास माहिती खालील पत्त्यावर संपर्क करू शकता. श्री व्यवस्थापक, विपश्यना विश्व विद्यापीठ, धम्मगिरी, मु.पो. इगतपुरी, जि. नाशिक, (महाराष्ट्र) -४२२४०३

**प्रश्न ३४७ (य) : चार स्मृती-उपस्थानांची भावना (विपश्यनेची भावना) केल्याने कोणते फायदे होतात?**

**उत्तर -** कायानुपश्यना, वेदनानुपश्यना, चित्तानुपश्यना आणि धर्मानुपश्यना यांना चार उपस्थान म्हणतात. कायगता स्मृती म्हणजे विवेक कायम ठेवून आपल्या शरीराचे अवलोकन करणे. कायानुपश्यना करणारा भिक्खू एकांत स्थळी आसन लावून, शरीर सरळ ठेवून, स्मृतीला समोर ठेवतो. तो जाणीवपूर्वक श्वास घेतो. तो संपूर्ण कायेस अनुभवीत श्वास घेण्याची व उच्छ्वास सोडण्याची सवय करतो. कायेत उत्पन्न धर्मास विवेकपूर्वक बघतो. विनाश-धर्मास बघतो. तो सृष्टीतील वस्तूंना 'मी' 'माझे' अशा भावानेने ग्रहण करीत नाही.
तो चालणे, फिरणे, इत्यादी प्रत्येक क्रियेस जागरूकपणे करतो. हिलाच विपश्यना म्हणतात.

वेदनानुपश्यी भिक्खू सुख वेदनेचा (अनुभूतीचा) अनुभव करीत जाणतो की, मी सुख वेदनेचा अनुभव करीत आहे, त्याचप्रमाणे दुःख वेदनेचा, असुख-अदुःख वेदनेचा देखील.

चित्तानुपश्यी भिक्खू जाणतो की, ह्या वेळी माझे चित्त रागाने (प्रीतीने) ग्रासलेले आहे, सद्वेष आहे किंवा सन्मोह आहे.

धर्मानुपश्यी भिक्खूसमक्ष येणारे जे विषय आहेत (धम्म आहेत) त्या सर्वांविषयी तो चिंतन करतो. तो सृष्टीतील कोणत्याही वस्तूस 'मी', 'माझे' असे ग्रहण करीत नाही.

तो रात्रंदिवस सुरू असणाऱ्या क्रियांपैकी कुठल्याही क्रियेत आसक्त होत नाही; ना कुठल्या अनुभूतीमध्ये, ना कुठल्या विषयासंबंधीच्या विचारांत किंवा मनाच्या कुठल्या अवस्थेमध्ये (= सुखाची किंवा दुःखाची अवस्था) देखील रममाण होत नाही. कुठल्याही गोष्टीला 'मी', 'माझे' असे समजत नाही.

त्यामुळे त्याला थकवा येत नाही. तो आसक्तीपासून मुक्त होतो. त्याच्या क्लेशांचे शमन होते. त्याच्या दुःखाचा अंत होतो.

ही गोष्ट केवळ अभ्यासाद्वारे अनुभविली जाऊ शकते. असे सांगतात की त्यामुळे तो -

१) अनेक रिद्धी प्राप्त करतो.

२) तो अमानवीय दिव्य शब्दांचे तसेच मानवीय शब्दांचे श्रवण करू शकतो.

३) इतर व्यक्तींच्या किंवा इतर प्राण्यांच्या चित्तास जाणू शकतो.

४) अनेक प्रकारच्या पूर्व जन्माबद्दल जाणू शकतो.

(परंतु ह्याचे प्रत्यक्ष प्रमाण सध्याच्या जगात उपलब्ध नाही. अभ्यासामुळे कदाचित हे फायदे होत असतील : संकलिका) (बोधिपक्षीय धम्माकरिता प्रश्न १०२ बघावा).

**प्रश्न ३४७ (र) : मरण स्मृतीची भावना कशी केली जाते? तिचे काय फायदे आहेत?**

**उत्तर -** मृत्यूचे निर्भयपणे चिंतन केल्याने आळस दूर होतो व मनात चैतन्य निर्माण होते,

त्यामुळे माणूस कर्तव्यदक्ष होतो.

**महासंपत्तिसंपत्ता यथा सत्ता मत्ता इध ।**
**तथा अहं मरिस्सामि मरणं मम हेस्सति ॥**

अर्थ : ज्यांना पुष्कळ धनसंपत्तीचा लाभ झाला, ते लोक सुद्धा ह्या जगातून चालते झाले. त्याचप्रमाणे मीसुद्धा (कधी ना कधी) मरणारच आहे.

**ईसकं अनिवत्ततं सततं गमनुस्सुकं।**
**जीवितं उदया अत्यं सुरियो विय धावति॥**

अर्थ : ज्याप्रमाणे सूर्य उदयापासून अस्तापर्यंत धावतच राहतो, त्याप्रमाणे जाण्यास उत्सुक असे हे जीवन, थोडेसुद्धा मागे न वळता, धावतच राहते.

**प्रश्न ३४७ (ल) : कायगता-स्मृती चे काय फायदे आहेत ?**

**उत्तर -** ह्याचे एक उत्तम उदाहरण येणेप्रमाणे -

श्रीलंकेतील अनुराधपूर शहराच्या जवळच एक टेकडी होती. तिला चैत्यपर्वत म्हणत असत. तेथे महाविण्णा नांवाचा एक भिक्खू राहत असे. एके दिवशी तो अनुराधपुरास भिक्षाटनाकरिता निघाला. त्याच रस्त्याने आपल्या पतीशी भांडण करून माहेरास निघालेली एक सुंदर स्त्री येत होती. त्या भिक्खूला बघून, त्याला मोहित करायच्या इच्छेने, ती स्त्री जोरजोरात हसू लागली. भिक्खूने एकाएकी डोळे उचलून त्या स्त्रीकडे पाहिले, तेव्हा त्याला तिचे दांत दिसून पडले आणि त्या दातांमुळे त्याला त्याच्या नेहमीच्या चिंतनाच्या विषयाची म्हणजे हाडांच्या सापळ्याची आठवण झाली. त्यामुळे त्या सुंदर स्त्रीच्या शरीराकडे त्याचे लक्ष गेले नाही आणि त्याच्या समक्ष हाडांचा मूर्तिमंत सापळाच उभा आहे असा त्यास भ्रम झाला. तो तसाच पुढे चालत राहिला. त्या स्त्रीच्या मागे तिचा पती येत होता, त्याने भिक्खूला पाहिल्यावर प्रश्न केला, ''महोदय, ह्या मार्गाने गेलेल्या अलंकृत आणि अत्यंत सुंदर तरुण स्त्रीला तुम्ही बघितले कां ?'', तेव्हा भिक्खू म्हणाला -

**नाभिजानामि इत्थी वा पुरिसो वा इतो गतो।**
**अपिच अट्ठिसंघाटो गच्छतेस महापथे॥**

अर्थ : येथून स्त्री गेली किंवा पुरुष गेला ह्याबद्दल मला माहिती नाही. परंतु ह्या महापथाने एक हाडांचा सापळा निश्चितच जात आहे.

कायगतास्मृती ह्या कर्मस्थानाने कामविकार बहुधा नष्ट होतात आणि योग्याला प्रथम ध्यानापर्यंत पोहोचण्यास मदत मिळते. त्यानंतर दुसऱ्या कर्मस्थानाच्या मदतीने पुढील ध्यानाची पायरीदेखील गाठता येते.

# गृहस्थांसाठी उपदेश

**प्रश्न ३४८ : गृहस्थाचे खरे हितशत्रू कोणते व खरे मित्र कोणते?**

**उत्तर -** हितशत्रू येणेप्रमाणे - १) घरी आल्यावर काहींना काही घेऊन जाणारा २) शब्दांनीच उपकार करू पाहणारा ३) हांजी हांजी करणारा व ४) पापकर्मात सहाय्य करणारा. त्यांचा बिकट मार्गाप्रमाणे दुरूनच त्याग करावा.

हितैषी असे खरे मित्र येणेप्रमाणे - १) उपकार करणारा २) दुःखाने दुःखी व सुखाने सुखी होणारा ३) सदुपदेश करणारा ४) अनुकंपा करणारा. खऱ्या मित्रांची जोपासना करावी.

**प्रश्न ३४९ गृहस्थाने पूजा करावयाच्या सहा कर्तव्यदिशा कोणत्या?**

**उत्तर -** खऱ्या मित्रांची पारख झाल्यानंतर, तरुण गृहस्थाने सहा दिशांच्या पूजेस लागावे.

१) आईबापांना पूर्व दिशा समजावे.

२) गुरूला दक्षिण दिशा समजावे.

३) पत्नीला पश्चिम दिशा समजावे.

४) आप्तमित्रांस उत्तर दिशा समजावे आणि

५) सेवकांना खालची दिशा समजावे आणि -

६) श्रमण-ब्राह्मणांना म्हणजे साधुसंतांना वरची दिशा समजावे.

**प्रश्न ३५० : मातापित्यांची कर्तव्ये कोणती?**

**उत्तर -** १) मातापित्यांनी आपल्या संततीचे दुर्गुणांपासून रक्षण करावे, २) त्यांना सद्‌गुणी बनवावे ३) त्यांना कला आणि शास्त्रे शिकवावीत ४) त्यांचा योग्य वर किंवा वधूसोबत विवाह करून द्यावा, आणि ५) त्यांना आपला वारसाहक्क द्यावा.

दान, प्रियवचन, अर्थचर्या (उपयोगी पडणे) आणि समानात्मता (दुसऱ्याला आपल्यासारखे लेखणे) अशी ही चार लोंकसंग्रहाची साधने आहेत. ही साधने नसती तर केवळ जन्म दिला म्हणून मुलाने आईचा किंवा बापाचा गौरव केला नसता. ज्याला ही चार साधने सापडली तोच प्रपंचात यशस्वी होतो.

**प्रश्न ३५१ : विवाहाविषयी बौद्धधम्मात काय सांगितले आहे?**

**उत्तर -** संपूर्ण ब्रह्मचर्याची अवस्था ही सर्वतोपरी अध्यात्मिक विकासाला आवश्यक अशी बाब असून ती अत्यंत प्रशस्तिप्रद आहे. परंतु एका पत्नीशी विवाह आणि तिच्याविषयीची निःसीम इमानदारी ह्यालाही एकप्रकारचे ब्रह्मचर्यच समजले जाते. बहुपतित्वाच्या किंवा बहुपत्नीत्वाच्या रूढीला अज्ञानपूर्ण आणि वासनोत्तेजक असे संबोधून भ. बुद्धांनी तिची निंदा केलेली आहे. याविषयी अंगुत्तर - निकायामधील चवथ्या प्रकरणांतील पंचावन्नावी गाथा पाहावी.

**प्रश्न ३५२ संततीची कर्तव्ये कोणती?**

**उत्तर** - पूर्वदिशा जे आईबाप त्यांची पाच गोष्टींनी पूजा करावी १) संततीने आपल्या मातापित्याला गरज पडेल तेव्हा त्यांची कामे करावीत २) त्यांच्या म्हातारपणी त्यांचे भरण-पोषण आणि सहाय्य करावे ३) कौटुंबिक जबाबदाऱ्यांचे पालन करावे व कुळात व जनांत चालत आलेली सत्कार्ये चालू ठेवावीत ४) त्यांच्या मालमत्तेचे रक्षण करावे व त्यांच्या वचनांत वागून त्यांचे उत्तराधिकारी होण्यास स्वतःला योग्य बनवावे, आणि ५) त्यांचे देहावसान झाल्यावर त्यांच्या स्मृतीचा आदर करावा व त्यांच्या नावे दानधर्म करावा.

**प्रश्न ३५२ (अ) : कुमारी मुलींची कर्तव्ये कोणती?**

**उत्तर** - एकदा मेंडक याचा नातू उग्गह भगवंतांना भोजनाचे निमंत्रण द्यावयास आला आणि दुसऱ्या दिवशी भोजन संपल्यावर आपल्या मुलींना उपदेश द्यावयाची त्याने भगवंतांना विनंती केली. भगवंतांनी उपदेश केला, ''मुलींनो! तुम्हाला ज्या पतीला मातापिता सोपवून देतील, त्याच्या आधीच सकाळी उठत जावे, झोपायला नंतर जावे, प्रत्येक काम मन लावून कराल. सर्व वस्तूंना व्यवस्थित ठेवाल. सर्वांशी गोड बोलाल, आणि या सर्व सवयी आतापासूनच लावून घ्या.''

''हादेखील अभ्यास करा की तुमच्या पतीचे मातापिता, सखेसोयरे व साधुसंत, जे कोणी घरी येतील, त्यांचा तुम्ही आदरसत्कार कराल, स्वागत कराल, त्यांना बसायला स्थान आणि प्यायला पाणी द्याल.'' पतीचे जे कांही काम असेल ते दक्षतेने कराल, त्याला यशस्वितेने करावयाचे कौशल्य मिळवाल, जेणेकरून ते काम तुम्ही स्वतःच करू शकाल.

''जेवढे नोकरचाकर असतील त्या सर्वांच्या कामाकडे लक्ष द्या की कोणी किती काम केले आणि किती करायचे ठेवले. आजाऱ्यांची सुश्रूषा कराल आणि त्यांना योग्य असे भोजन द्याल.''

''जे रुपये पैसे, जे धन, जे सोनेचांदी पती घरी आणतील त्याला सुरक्षित ठेवाल, त्याची हिफाजत कराल.''

**प्रश्न ३५३ : धन्याची सेवकाविषयी कर्तव्ये कोणती?**

**उत्तर** - खालील दिशा जे सेवक त्यांची धन्याने येणेप्रमाणे पूजा करावी - १) सेवकांचे सामर्थ्य पाहून त्यांना काम द्यावे २) त्यांना योग्य वेतन द्यावे ३) आजारी पडले तर त्यांची शुश्रूषा करावी ४) वारंवार त्यांना उत्तम भोजन द्यावे. ५) उत्तम कामाकरिता त्यांना बक्षीस द्यावे.

**प्रश्न ३५४ : सेवकाची धन्याविषयी कर्तव्ये कोणती?**

**उत्तर** - धन्याने योग्य कर्तव्यपूर्वक पूजा केल्यास सेवक पाच प्रकारांना उपकारक होतात - १) धनी उठण्यापूर्वी ते उठतात २) धनी निजल्यावर निजतात ३) धन्याच्या मालाची चोरी करीत नाही ४) उत्तम तऱ्हेने काम करतात ५) सर्वत्र धन्याची कीर्ती पसरवितात.

**प्रश्न ३५५ : साधुसंतांप्रती गृहस्थाची कर्तव्ये कोणती?**

**उत्तर -** वरची दिशा जे साधुसंत त्यांची गृहस्थाने येणेप्रमाणे पूजा करावीः १) देहाने त्यांचा आदर करावा २) वाचेने आदर करावा ३) मनाने आदर करावा ४) त्यांना काही लागल्यास द्यावे ५) भिक्षेला आल्यास त्यांना आडकाठी आणू नये.

**प्रश्न ३५६ : साधुसंत गृहस्थांवर कशा प्रकारे अनुग्रह करतात?**

**उत्तर -** गृहस्थाने साधुसंतांची कर्तव्यपूर्वक पूजा केल्यास ते त्याच्यावर अनुग्रह करतात १) पापापासून त्यांचे निवारण करतात २) कल्याणकारक मार्गाला लावतात ३) प्रेमपुरस्सर अनुग्रह करतात. ४) उत्तम धर्म शिकवितात आणि ५) शंकेचे निवारण करून मनाचे समाधान करतात.

**प्रश्न ३५७ : पतीची कर्तव्ये कोणती?**

**उत्तर -**पश्चिम दिशा जी पत्नी तिची पतीने पाच गोष्टीने पूजा करावी १) पतीने पत्नीची प्रेमाने काळजी घ्यावी. तिच्याशी आदरपूर्वक दयाळूभावाने वागावे. २) एकपत्नीव्रत राहून तिच्याप्रती प्रामाणिक असावे ३) तिचा सन्मान करावा जेणेकरून इतरही तिचा सन्मान करतील, असे करावे ४) तिला योग्य वस्त्रांभूषणांनी खुष ठेवावे आणि ५) घरचा कारभार तिच्यावर सोपवावा.

**प्रश्न ३५८ : पत्नीची कर्तव्ये कोणती?**

**उत्तर -** १) पत्नीने आपल्या पतीवर प्रेम करावे. आपल्य घरादाराला व्यवस्थित ठेवावे. पाहुण्यांचे आतिथ्य करावे. २) पातिव्रत्य राखावे ३) मितव्ययी असावे ४) सर्वच कामकाजांत कुशलता आणि दक्षता दाखवावी आणि ५) नोकरचाकरांना प्रेमाने संभाळावे.

**प्रश्न ३५९ : उपासकांची विविध कर्तव्ये कोठे सांगितलेली आहेत?**

**उत्तर -** सिगालोवाद - सुत्रांत त्यांत म्हटले आहे की, सद्धर्म माणसाचे धन व्यर्थ खर्च होऊ नये याची शिकवण देतो. मादक पदार्थांचे सेवन न करणे, अनुचित समयी म्हणजे रात्री बेरात्री बाजारात न फिरणे, मेळें-तमाशे पाहण्याची सवय न लावणें, जुगार न खेळणे, कुसंगति न करणे व आळशी न होणें, या गोष्टींची सद्धर्म शिकवण देतो.

**प्रश्न ३६० : शिक्षकांप्रती शिष्याची कर्तव्ये कोणती?**

**उत्तर -** दक्षिण दिशा जे गुरू त्यांची शिष्याने पाच गोष्टींनी पूजा करावी १) गुरू जवळ आले म्हणजे उभे राहून, शिष्याने आपल्या शिक्षकांप्रती आदर व्यक्त करावा, २) त्यांची सेवा आजारसमयी करावी ३) त्यांच्या आज्ञेचे पालन करून त्यांची कामें करावी ४) त्यांनी दिलेल्या सूचनांचे पालन करावे ५) ते शिकवतील ते समजावून घ्यावे व उत्तम रीतिने शिकावे.

**प्रश्न ३६१ : शिक्षकांची कर्तव्ये कोणती?**

**उत्तर -** शिष्याने गुरूंची कर्तव्यपूर्वक पूजा केली, तर शिष्यावर येणेंप्रमाणे अनुग्रह करतात -

१) चांगला आचार शिकवितात २) चांगल्या रीतीने कलाकौशल्य शिकवितात ३) जे काही त्यांना येत असेल ते सर्वकाही शिष्याला शिकवितात ४) आपल्या आप्तमित्रांत त्यांची स्तुति करतात आणि ५) कोठे गेला तरी त्याला अडचण पडूं नये अशी विद्या त्याला शिकवितात.

**प्रश्न ३६२ : आप्तमित्रांबद्दल गृहस्थाची कर्तव्ये कोणती?**

**उत्तर** - गृहस्थाने उत्तर दिशा जे आप्तमित्र त्यांची पूजा येणेंप्रमाणे करावी, १) त्यांना देण्यासारख्या वस्तू असतील त्या द्याव्या २) ते घरी आले तर त्यांचेशी प्रियभाषण करावे ३) त्यांचे काम पडल्यास ते करावे ४) आपणांसारखेच त्यांना लेखावे व त्यांचा अपमान कधीही करू नये, आणि ५) त्यांच्याशी निष्कपट वर्तन ठेवावे.

**प्रश्न ३६३ : आप्तमित्रांची कर्तव्ये कोणती?**

**उत्तर** - गृहस्थाने आप्तमित्रांची कर्तव्यपूजक पूजा केल्यास ते उपकारक होतात १) बेसावध असता एकाएकी संकट आले तर त्यावेळी ते त्यांचे रक्षण करतात २) अशा प्रसंगी संपत्तीचे ही रक्षण करतात ३) संकटांमुळे हा घाबरून जातो तेव्हा ते त्याला धीर देतात ४) विपत्ति आली तरी ते त्याला सोडीत नाहीत ५) त्यांच्या संततिवरसुद्धा ते उपकार करतात.

**प्रश्न ३६४ : माणसाचे जीवन सुखमय करावयास धनसंपत्ती मदत करते काय?**

**उत्तर** - होय, परंतु धनसंपत्तीची लालसा दुःखास कारणीभूत होते. श्रीमंत माणूस जर आपल्या धनाचा उपयोग मानव जातीच्या लाभाकरिता म्हणजे दलितांसाठी, पिडीतांसाठी आणि अज्ञान दूर करण्यासाठी करीत असेल तर त्याचे धन त्याला पुण्य मिळविण्यास निश्चितच मदत करील.

परंतु जर तो धनाचा लोभ करून त्यावर प्रभुत्व असावे म्हणून त्याचा संचय करीत असेल, तर ते त्याच्या नैतिक संवेदनेला दुर्बल करून, त्याला अपराध करावयास प्रेरणा देते. या जीवनातच त्याला शाप देण्यास कारणीभूत होते.

**प्रश्न ३६५ : भगवंतांनी धनिकांच्या साठी कोणता उपदेश केला?**

**उत्तर** - भगवंतांनी दरिद्रतेला ''जीवनाचे सौभाग्य'' म्हणवून तिची प्रशंसा कधीही केली नाही; त्यांनी गरिबांना, 'तुम्ही दारिद्र्यातच संतुष्ट रहा' असा उपदेश केला नाही. त्याविरूद्ध त्यांनी धनःसंपत्तीचे स्वागत केले व तिला सद्धर्माने मिळवावयास प्रोत्साहित केले. परंतु त्यांनी ह्या गोष्टीवर विशेष जोर दिला की धनसंपत्तीवर देखिल जीवनमर्यादेचा अंकुश असायलाच हवा.

**प्रश्न ३६५ (अ) : भगवंतांनी धनसंपत्तीच्या विनाशाची कोणती सहा महाद्वारे असल्याचे सांगितलेले आहे?**

**उत्तर** - भगवंतांनी धनसंपत्तीच्या विनाशाची सहा महाद्वारे असल्याचे सांगितले, ते असे -

१. दारू इत्यादी मादक पदार्थाचे सेवन

२. भल्यताच वेळी बाहेर भटकणे

३. नाटक तमाशा इत्यादींचे व्यसन

४. पापचारी मित्रांची संगंत

५. जुगार खेळणे, व

६. आळस

या सहा धनसंपत्तीच्या विनाशाच्या कारणांचा अवलंब करू नये.

"हे गृहपती पुत्र! धनसंपत्तीचा विनाश करणारी, भांडण वाढविणारी, रोगाचे मूळ, बदनामी करणारी, लाज लज्जेचा त्याग करावयास लावणारी आणि प्रज्ञेला दुर्बल करणारी ही दारू, माणसाचा लवकरच सर्वनाश करते."

"ज्याला रात्रीबेरात्री बाहेर फिरावयाची सवय लागते. त्याच्याने स्वतःचे देखील संरक्षण होत नाही. बायकोमुलांचे संरक्षण होत नाही. धनसंपत्तीचे रक्षण होत नाही. तो रात्रंदिवस चिंतेतच राहतो. त्याला खोटे बोलायची सवय जडते आणि तो स्वतःकरिता अनेक अडचणी उत्पन्न करतो."

"ज्याला नाटक तमाशाची सवय जडते तो आज कुठे नाचगाणे आहे याच्या माहीती मध्येच राहतो, त्याचे घरच्या कामात मन लागत नाही."

"ज्याला जुगारात धन मिळते, तो त्या धनासोबतच दुसऱ्याचे वैरदेखील सोबत घेतो. आपले धन गेले तर त्याचे दुःख होते. त्याच्या बोलण्यावर कोणी विश्वास करीत नाही. आप्तमित्र त्याचा तिरस्कार करतात. त्याच्यासोबत कोणीही आपल्या मुलीचा विवाह करायला तयार नसतात."

"ज्याची पापचारी मित्रांशी संगति हेते त्याला जुगारी, ठग, दारुडे, चोर यांची सोबत जडते आणि असे मित्र त्याच्या विनाशाला कारणीभूत होतात."

"आळशी माणूस 'आज फार थंडी आहे', 'आज फार ऊन्ह आहे', 'आज फारच संध्याकाळ झालेली आहे', 'आज फार भूक लागलेली आहे', 'आज खूप थकलेलो आहे', असे म्हणतो आणि काम करायचे टाळतो. येणेप्रमाणे आळसामुळे त्याला नवीन काही प्राप्त होत नाही आणि त्याच्याजवळ असलेल्या धनसंपत्तीचा लोप होतो."

**अतिसीतं अतिउन्हं अतिसायमिहं अहु ।**
**इति विस्सट्ठकम्मंतें अत्था अच्चेन्ति माणवे ॥**

अर्थ- फार थंडी, फार ऊन्ह, फारच सायंकाळ झाली इत्यादी बहाणे करीत जे तरुण काम करणे सोडून देतात त्यांना धनसंपत्तीदेखील सोडून जाते.

**प्रश्न ३६६ : दानधर्म केल्याने कोणते फायदे होतात?**

**उत्तर** – भगवंतांनी अनाथपिंडिक नावाच्या श्रीमंत व्यापाऱ्यास दानधर्माची महती सांगितली. दानशूर माणूस सर्वांना आवडतो. मृत्युसमयी त्याचे अंतःकरण शांत व आनंदी असते.

आपले अन्न दान केल्याने आपली शक्ती वाढते. वस्त्रे दान दिल्याने आपले सौंदर्य वाढते. विहाराचे दान दिल्याने आपल्याला सुखाचा मोठाच ठेवा प्राप्त होतो. दान योग्य वेळी व योग्य रीतीने द्यावयाचे असते; त्यास चातुर्य लागते.

जो प्रेमळ व करुणावंत होऊन श्रद्धापूर्वक दान करतो त्याच्या मनातील द्वेष, क्रोध व मत्सर कमी होतो.

वृक्षाचे रोपटे लावणारा माणूस भविष्यातील सावली, फुले व फळे यांची सोय करून ठेवतो, तशीच दानाचीही महिमा आहे. जो गरजवंतांची मदत करतो, त्याला आनंद मिळतो व तो अमरपदाच्या मार्गाने पुढे जातो.

**प्रश्न ३६७ : दान-पुण्याचे चार प्रकार कोणते ?**

**उत्तर** - १) पहिला प्रकार असा की, दाने मोठी असतात, परंतु पुण्य फारच थोडे असते. सुमार्गाहून भटकलेल्या मनुष्याचे हे उदाहरण होय. जो देवी देवतांच्या यज्ञांच्या कारणास्तव प्राण्यांचा बळी देतो व यथेच्छ मद्य प्राशनाची मेजवानी करतो.

२) जेव्हा लोभापायी व अकुशल हेतूने एखादा मनुष्य जे दान योजलेले असते त्याच्यातूनही एक भाग स्वतःकरिता ठेवतो, तसली दाने लहान व पुण्यही थोडेच असते.

३) जो मनुष्य मोठ्या प्रेमाने दान देऊन व करुणा वाढावी अशी उत्कट इच्छा करतो, त्याचे दान लहान तरी पुण्य मोठे असते.

४) जेव्हा एखादा निःस्वार्थी अंतःकरणाचा व प्रगाढ-शहाणपण असलेला मनुष्य देणग्या देतो व अशा प्रकारच्या शिक्षण संस्थांची स्थापना करतो की जेणेकरून मानवजातीचे सर्वोत्तम होईल, त्याच्या मित्रांची मने ज्ञानाच्या प्रकाशाने उजळण्यास आणि त्यांच्या गरजांची परिपूर्ती करण्यास त्या कामी येतात, ते दान मोठे असते व पुण्यही मोठे असते.

**प्रश्न ३६७ (अ) : बौद्ध उपासकांनी श्राद्ध करावे का?**

**उत्तर** - होय, मातापिता किंवा प्रियजन किंवा गुरुजन यांच्या स्मृतीप्रीत्यर्थ श्रद्धापूर्वक केलेल्या दानाला श्राद्ध असे म्हणतात. हे आवश्यक नाही की ते दान त्यांच्या मृत्युदिनालाच केले पाहिजे हे दान कोणत्याही मंगल दिवशी, पौर्णिमेला इत्यादी किंवा उपोसथ दिवशी केले जाते.

श्रद्धेपूर्वक दिलेले दान, गरिबांना कपड्याचे वाटप, अन्नदान करणे, विद्यादान करणे, श्रमदान करणे, इत्यादींद्वारे सदभाव, प्रेम आणि करुणापूर्वक दान दिले जाते. ते आपली स्वतःची श्रेष्ठता दाखविण्यासाठी, अहंभावाने किंवा कोण्या स्वार्थाने प्रेरित होऊन केले जात नाही.

बौद्धधम्मात आत्म्याच्या अस्तित्वासच नाकारलेले असल्यामुळे, मृत मातापिता किंवा प्रियजनाच्या आत्म्यास शांती मिळण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. श्राद्ध केवळ त्यांच्या श्रद्धेपूर्वक स्मृतीकरिता सन्मानपूर्वक केले जाते.

**प्रश्न ३६८ : गृहस्थास अनुकूल पण प्राप्त करावयास कठीण अशा गोष्टी कोणत्या?**
**उत्तर** - भगवंतांनी अनाथपिंडिकास उपदेश करतांना सांगितले की, न्यायतः धन प्राप्त करणे ही सर्वात महत्त्वाची गोष्ट आहे. न्यायतः फार परिश्रमपूर्वक, बाहुबलाने घाम गाळून जो धन कमवितो ते मोठेच सौभाग्य आहे. पंचशीलाचे पालन, उदारपूर्वक वागणूक आणि प्रज्ञापूर्वक जीवनयापन उत्तम होय. लोभ, द्वेष, लालच, आळस, तंद्रा, चित्ताची अस्थिरता आणि संशयीपणा हे सर्व मनावरील कलंक आहेत आणि प्रज्ञेने त्यांच्यापासून मुक्तता मिळवावयास हवी.

**प्रश्न ३६९ : दुसऱ्याबद्दल अनुदारतेविषयी धम्मपदाची काय शिकवण आहे?**
**उत्तर** - दुसऱ्यांचे दोष अगदी सहजपणे दिसतात, परंतु स्वतःचे दोष दिसणे कठीण असते. आपल्या शेजाऱ्याचे दोष तो भुशासारखे पाखडतो. परंतु ज्याप्रमाणे खोटेपणाने खेळणारा जुगारी आपला हरविणारा फांसा लपवितो, त्याचप्रमाणे माणूस आपल्या स्वतःच्या दोषांवर पांघरूण घालतो.

**प्रश्न ३७० : गरीबांप्रती माणसाच्या सामाजिक कर्तव्याविषयी भ. बुद्धांनी आपणास कोणता उपदेश दिला आहे?**
**उत्तर** - त्यांनी म्हटले आहे की, मनुष्याने निव्वळ उत्पन्नाचे चार भाग करावेत आणि त्याचा एक भाग लोककल्याणासाठी अर्पण करावा (सध्या असलेला आयकर हा असल्याच तऱ्हेचा आहे, पण तो न चुकविता दिलाच पाहिजे.)

**प्रश्न ३७१ : शूद्र व हिणकस धंदे कोणते?**
**उत्तर** - मद्य विकणे, कत्तलीकरिता जनावरे विकणे, विष विकणे, प्राणघातक हत्यारे विकणे, आणि गुलामांचा व्यापार करणे.

**प्रश्न ३७२ : गृहस्थ राहूनदेखील शांती आणि सुखाचा लाभ होऊ शकतो काय?**
**उत्तर** - होय. भगवंतांनी अनाथपिंडिकास उपदेश करतांना स्पष्ट केले, माणूस कोणताही परंतु योग्य व्यवसाय करो, कारागीर असो, व्यापारी असो, सरकारी नोकर असो अथवा गृहत्याग करून ध्यानभावनेमध्ये मग्न असो, त्याला आपने काम मनःपूर्वक करायला हवे. त्यांनी परिश्रमी आणि उत्साही राहायला हवे. जीवन संघर्षात राहूनही जर त्यांनी आपल्या मनांत ईर्ष्या आणि घृणा यांना थारा दिला नाही आणि संसारात राहूनही स्वार्थपूर्ण नव्हे तर परमार्थपूर्ण जीवन ते घालवू लागले, तर यात शंका नाही की, त्यांचे मन आनंद, शांती आणि सुखाने परिपूर्ण होईल.

**प्रश्न ३७३ : धर्मनिष्ठेची प्रगति कोणास साध्य होत नाही ?**
**उत्तर** - पित्याचा वध करणारा किंवा मातेचा वध करणारा किंवा पवित्र अर्हतांचा वध करणारा संघात भांडणाचे बी पेरणारा किंवा जो अतिशय विषयासक्त असतो त्याला.

**प्रश्न ३७४ : भ. बुद्धांनी महामंगल सूत्रांमध्ये कोणत्या कल्याणकारी गोष्टींचा उपदेश केलेला आहे ?**

**उत्तर** – महामंगल सूत्रामध्ये उपदेशिलेल्या कल्याणकारी गोष्टी येणेप्रमाणे :-

(१) मूर्खांची संगती करू नका.

(२) विद्वानांची संगती करा.

(३) आदरणीय व्यक्तींचा आदर करा.

(४) अनुकूल देशात निवास करा.

(५) चांगली कामे करा.

(६) चित्तास स्थिर ठेवा.

(७) अनेक विषयांचे ज्ञान असू द्या.

(८) विद्वान व्हा.

(९) संयमी राहा.

(१०) बोलणे मधुर, लाघवी व सत्य असू द्या.

(११) मातापित्याची सेवा करा.

(१२) पत्नी व पुत्राचे पालनपोषण करा.

(१३) उपजीविकेचे साधन निःसंशयी व सुस्पष्ट असू द्या.

(१४) दानधर्म करा.

(१५) धम्माचरण करा.

(१६) नातेवाइकांशी चांगले संबंध ठेवून त्यांना वेळोवेळी मदत करा.

(१७) निर्दोष कर्मे करा.

(१८) पापकर्मापासून अलिप्त राहा.

(१९) मादक पदार्थांचे सेवन वर्ज्य करा.

(२०) धम्म कार्यात प्रमादरहित असा.

(२१) गौरवाची भावना जोपासा.

(२२) मनाच्या शांतीची जोपासना करा.

(२३) क्षमाशील असा.

(२४) संतुष्ट असा.

(२५) कृतज्ञ असा. लीन असा.

(२६) सुसमयी धम्माचे श्रवण करा.

(२७) मधुरभाषी, मितभाषी असा.

(२८) नेहमी श्रमणांचे दर्शन घ्या.

(२९) ब्रह्मचारी राहा.

(३०) चार आर्यसत्यांचा अंगीकार करा.

(३१) निर्वाणाचा साक्षात्कार करा.

(३२) वेळोवेळी धम्मचर्चा करा.

(३३) वैराग्य अंगी बाणा व तपस्वी व्हा. (देहदंड नव्हे)

(३४) निंदा, स्तुती, लाभ, हानी ह्या ऐहिक धर्माच्या सानिध्यात आल्यावरही चित्ताला अस्थिर होऊ देऊ नका. चित्तास निर्मळ ठेवा.

या सर्व उपदेशांत असा कोणता उपदेश आहे बरे की, ज्याला 'मनुष्यासाठी दिलेला नाही, देवासाठी दिलेला आहे', असे आपण म्हणू शकतो?

**प्रश्न ३७५ : बुद्ध धम्म कशावर आधारित आहे?**

**उत्तर** -भ. बुद्धांच्या धम्माचे मूळ मुख्यत्वेकरून त्याच्या अभ्यासातच आहे. सतत अभ्यासाने तो आत्मसात होतो. अभ्यासच त्याचे सार असून अभ्यासाच्या बळावरच तो उभा आहे, टिकून आहे. अभ्यास म्हणजे आचरण-सदाचरण.

**प्रश्न ३७६ : दहा संयोजन बंधने कोणती?**

**उत्तर** - स्वतःविषयीचा भ्रम (सक्काय - दिट्ठी); संशय (विचिकिच्छा); धर्मभोळ्या कल्पनांनी गुरफटलेल्या विधींवर भरवसा (सिलब्बत - परामास) शारीरिक विषयवासना (कामासक्तता); द्वेष, दुष्ट विचार, (पतीग्घ), सृष्टीतील जीवनाविषयी प्रेम (रूपराग), स्वर्गसुखाची इच्छा, (अरूपराग), गर्व (मान), स्वार्थ (उद्धच्च), अज्ञान (अविद्या) ही दहा संयोजन बंधने मनुष्याच्या प्रगतीच्या मार्गातील भयंकर विघ्ने होत.

**प्रश्न ३७७ : पाच 'निवारणे' कोणती?**

**उत्तर** - लोभ, द्वेष, आळस, गर्व आणि संशय ही पाच निर्वारणे किंवा अडथळे होत.

**प्रश्न ३७८ : भ. बुद्धाच्या उद्देशांमध्ये कोणत्या बाबींचा सूक्ष्मपणे ऊहापोह केलेला सापडतो?**

**उत्तर** - आपल्या मनाला प्रशिक्षित करून ज्ञान प्राप्तीस मदत व्हावयास आत्मपरीक्षणाची पद्धती अनुसरणे आवश्यक आहे. म्हणून भगवंतांनी विचार, चेतना, मनाचे कार्य, संयोजन बंधने व मनुष्याच्या प्रगतीला सहाय्यक होणाऱ्या बाबींचा सूक्ष्मपणे विचार करावयाचा उपदेश केलेला आहे.

**प्रश्न ३७९ : भगवंतांनी आयु. आनंदाला सांगितलेल्या सर्वात अधिक फलदायी व पुण्यदायी भिक्षा कोणत्या?**

**उत्तर** - पहिली भिक्षा म्हणजे सुजाताने दिलेली खीर होय. ती खाऊन भगवंताला बुद्धत्वाचा लाभ झाला, आणि दुसरी भिक्षा चुन्दाने दिलेली सूकर-मद्दवाची भिक्षा होय. ती खाऊन

भगवंतांनी संसारापासून नेहमीकरता मुक्त होऊन महापरिनिर्वाण प्राप्त केले. म्हणून ही भिक्षा सर्वात फलदायी व पुण्यदायी होत.

**प्रश्न ३८० : बुद्धधम्म 'ठोशास ठोसा' द्यावयाचे शिकवतो काय?**

**उत्तर** - धम्मपदामध्ये सांगितले आहे, 'जर एखाद्या मनुष्याने मूर्खपणाने माझ्यावर अन्याय केला तर मोबदल्यात मी त्याला माझ्या उदार प्रेमाचे संरक्षण देईल. तो जसजसा अधिकाधिक अन्याय करील तसतसे त्याचे मी अधिकाधिक मंगल करील'. अर्हताने याच मार्गाचे अवलंबन करावयाचे असते त्यांच्यासाठी 'ठोशास ठोसा' या नियमाला बुद्धधम्मात दृढपूर्वक मनाई आहे. परंतु गृहस्थाने अन्यायाचे परिमार्जन करायलाच पाहिजे आणि कुमार्गावर जाणाऱ्याला दंड दिलाच पाहिजे, अशी शिकवण सिंहसेनापतीला दिलेल्या उपदेशात आहे. अशा व्यक्तीला जो दंड दिला जातो त्याकरिता दंड देणारा जबाबदार नसून दंड भागी असणाऱ्याचे अकुशल (वाईट) कर्म जबाबदार असते.

**प्रश्न ३८१ : बुद्ध धम्म निष्ठुरतेला उत्तेजन देतो काय?**

**उत्तर** - मुळीच नाही. पंचशीलातून त्याप्रमाणे त्यांच्या पुष्कळशा प्रवचनातून भ. बुद्धांनी आम्हाला शिकवले आहे की, सर्वच प्राणिमात्रांवर दया करा, त्यांना सुखी करण्याचे प्रयत्न करा. त्यांच्यावर प्रेम करा, त्यांचे वध करण्याचे वर्ज्य करा किंवा वधास संमती देण्याचे टाळा किंवा वध न करण्याला उत्तेजन द्या.

धम्मिक सूत्रामध्ये सांगितले आहे, गृहस्थाने कोणत्याही उपद्रव न करणाऱ्या जीवाचा नाश करू नये किंवा नाशास कारणीभूत होऊ नये किंवा 'जे तसे करतात, त्यांच्या कृत्यास मंजुरी देऊ नये'. एवढेच नव्हे तर कोणत्याही प्राण्याची शिकार करण्यापासून त्याने स्वतःससुद्धा आवरावे.

'History of Culture' आपल्या पुस्तकात कोल्ब (Kolb) म्हणतात, 'पूर्वी ज्यांना ठार मारण्यात येत असे, अशा युद्धबंद्यांचे प्राण वाचविल्याबद्दल आणि त्याचप्रमाणे जिंकलेल्या देशातील रहिवाशांना गुलाम बनविण्याची प्रथा थांबविण्याबद्दल आपण बुद्धधम्माचे आभार मानायला पाहिजे'.

**प्रश्न ३८२ धम्मिक चर्चा करण्यास अयोग्य असणारी स्थाने कोणती?**

**उत्तर** - धाम्मिक चर्चा करण्यास अयोग्य असणारी आठ ठिकाणे आहेत - (१) ओबडधोबड जागा, (२) भीतिदायक, (३) नेहमीच फार जोराने वारा वाहत असलेली, (४) एकदम नजरेआड असलेली, (५) देऊळ नसलेली, (६) फार रहदारी असणारे रस्ते असलेली, (७) पूल असलेली, (८) उताराच्या घाटाची जागा असलेली कारण अशा स्थळी शांतचित्ताने धम्मचर्चा करता येत नाही.

**प्रश्न ३८३ : धाम्मिक चर्चा करण्यास अयोग्य अशा आठ व्यक्ती कोणत्या ?**

**उत्तर** -अशा आठ व्यक्ती येणेप्रमाणे - (१) रागीट-रागयुक्त, (२) द्वेषयुक्त, (३) मोहयुक्त, (४) अभिमानी, (५) लोभी, (६) आळशी, (७) हट्टी (कोणत्याही एकाच मताला चिकटून राहणारा), (८) मूर्ख.

**प्रश्न ३८३ (अ) : लिच्छवी समाजाला भगवंतांनी कोणत्या प्रजातंत्रिक गोष्टी शिकविल्या होत्या?**

**उत्तर** - राजा अजातशत्रूसोबत भगवंतांचे चांगले संबंध असूनदेखील त्यांनी त्याचे विरोधक जे वैशालीचे लिच्छवी लोक त्यांची प्रशंसा केली, त्यांनी लिच्छवी लोकांनी राष्ट्राचा पराभव होऊ नये याकरिता खालील सात गोष्टी शिकविल्या होत्या.

१. नेहमी एकत्रित येउन सामूहिक निर्णय घेणे.

२. निर्णयानुसार कर्तव्याला एकजुटीने करणे

३. व्यवस्थेचे (कायदे आणि नियमांचे) पालन करणे

४. वृद्धांचा सत्कार, सन्मान करणे

५. स्त्रियांवर जोर जबरदस्ती न करणे

६. सामाजिक धम्माचे पालन करणे व

७. धम्माचार्यांचा सन्मान करणे

## बौद्धधम्मीयांचे धम्मग्रंथ

**प्रश्न ३८४ : बुद्धधर्मातील सर्वात अत्युत्तम ज्ञान समाविष्ट असलेली पुस्तके कोणती?**

**उत्तर** - त्रिपिटक. तीन खंडांमध्ये विभागलेले ज्यांना 'तीन पेटारे' असे म्हटले आहे.

ती अशी, 'विनयपिटक', 'सुत्तपिटक' आणि 'अभिधम्मपिटक'. विनयपिटकात संघाच्या संचालनाकरिता घालून दिलेले सदाचार आणि शिस्तीचे नियम आहेत. आचार्यांच्या प्रती शिष्यांची कर्तव्ये, शिष्यांच्या प्रती आचार्यांची कर्तव्ये, गुरु बंधूप्रती भिक्षूंचे कर्तव्य, तसेच मठात राहावयाचे नियम, वगैरे विनयपिटकात दिलेले आहेत.

सुत्तपिटकात सर्वांना लागू होणारी नीतिशास्त्रावरील बोधपर व्याख्याने समाविष्ट आहेत. भगवंतांनी निरनिराळ्या ठिकाणी निरनिराळ्या लोकांना निरनिराळ्या परिस्थितीमध्ये जे उपदेश दिलेले होते, त्यांचा संग्रह सुत्तपिटकात आहे. अभिधम्मपिटकात निसर्गाचे चलन कसे होते, याचा उलगडा करणारे श्रेष्ठ चोवीस ग्रंथ असून त्यात भ. बुद्धांनी मानसशास्त्राविषयी दिलेला उपदेश स्पष्ट केलेला आहे. अभिधम्माचे ग्रंथ फार गहन व गंभीर आहेत. सूत्रात जे तत्त्व भगवंतानी सोप्या भाषेत सांगितले, त्याचे विश्लेषण करून पारिभाषिक शब्दात त्यांना स्पष्ट केले आहे. ते फारच महत्त्वाचे आहे. अभिधम्माचे वाचन व मनन केल्याशिवाय बुद्धधम्माचे निश्चित किंवा पक्के ज्ञान होऊच शकत नाही. यात चार धातूंचे वर्णन केलेले आहे - (१) चित्त, (२) चैतसिक, (३) रूप आणि (४) निर्वाण. चित्ताचे विश्लेषण अतिशय उत्तम

असून आधुनिक मनोविज्ञानाबरोबर त्याचे अध्ययन करणे फार उपयुक्त ठरेल.

**प्रश्न ३८५ : ही त्रिपिटकाची पुस्तके दैवी अवतारांना झालेला साक्षात्कार किंवा त्यांनी दिलेल्या प्रेरणेमुळे अस्तित्वात आलेली आहेत, असा बौद्धांचा विश्वास आहे काय?**

**उत्तर** – नाही. परंतु बौद्धजन या पुस्तकांना पूज्य मानतात. कारण त्यांच्यात अत्युत्कृष्ट अशा धम्माच्या संपूर्ण अंगांचा समावेश आहे. त्यांना जाणून घेतल्याने, ऐहिक बंधने तोडावयास मनुष्य सक्षम होतो.

**प्रश्न ३८६ : बुद्धवचन कोणकोणत्या ग्रंथांमध्ये संग्रहित केलेले आहे?**

**उत्तर** – थेरवादी मतानुसार बुद्धवचन तीन पिटकांमध्ये, पाच निकायांमध्ये, नऊ अंगांमध्ये आणि चौऱ्यांशी हजार स्कंधामध्ये संग्रहित आहे. तीन पिटके अशी - (१) विनयपिटक, (२) सुत्तपिटक (सूत्रन्त पिटक) आणि (३) अभिधम्मपिटक. पिटक याचा अर्थ पेटारी किंवा टोपली.

विनयपिटकात भिक्षूंकरिता त्यांच्या आचरणाचे विनय आहेत. सूत्तपिटकांत व्यवहाराविषयी उपदेश, अनेक सत्त्वांची चित्रप्रकृती आणि प्रकृतीनुसार शासन (नियम), बासष्ट अकुशल दृष्टीविषयी खंडन करण्याबद्दलच्या कथा आहेत. अधिधम्मपिटकांत-परमार्थ उपदेश (देशना), अहं मम यामधील गुंतागुंत करणाऱ्या जीवाच्या स्थानी धर्मपुंज तत्त्वांचे शासन आहे; आणि नामरूपाची विस्तृत व्याख्या केलेली आहे.

विनयपिटकाची शिकवण अधिशील सुत्तपिटकाची अधिचित्त आणि अभिधम्माची अधिप्रज्ञ आहे.

विनयपिटकाच्या परिशीलनाने व्यक्तिक्रम प्रहाण (प्रहाण, परित्याग, नाश), सुत्तपिटकाने पर्यवस्थान प्रहाण (आवागमनाचा परित्याग) आणि अभिधम्माने अनुशाय प्रहाण (घनिष्ट संबंधांचा परित्याग) होतो.

**प्रश्न ३८७ : त्रिपिटकांच्या संपूर्ण मूळ ग्रंथात किती शब्द आहेत?**

**उत्तर** – डॉ. ऱ्हीस डेव्हिड्स यांच्या हिशेबाप्रमाणे त्यांत १,७५२,८०० शब्दांचा समावेश आहे. पिटके इ.स. पूर्व ८८ ते ७६ ह्या कालावधीत वट्टगामिनी नावाच्या सिंहली राजाच्या अधिपत्याखाली म्हणजे, भ. बुद्धांच्या महापरिनिर्वाणानंतर ३३० वर्षांनी, श्रीलंकेच्या आलोकविहारात लिपिबद्ध करण्यात आलीत.

**प्रश्न ३८८ भ. बुद्धांची सर्व व्याख्याने आपणास उपलब्ध आहेत, असा विश्वास करण्यास आपल्याजवळ सबळ पुरावा आहे काय?**

**उत्तर** – बव्हंशी नाहीत. आणि ती उपलब्ध असणे म्हणजे एक चमत्कारच म्हणता येईल, त्यांच्या सार्वजनिक जीवनाच्या पंचेचाळीस वर्षांच्या कालावधीत त्यांनी हजारो व्याख्याने देऊन उपदेश केलेला असला पाहिजे. अनेक शतकानंतर लीपीबद्ध केलेले साहित्यदेखील भिक्खूंची छळणूक केल्यामुळे पुष्कळसे गहाळ झाले. पुष्कळसे भिक्खू दूरदूरच्या देशांत विखुरले गेले. तसेच बऱ्याचशा वाङमयात बदल होत जाऊन विपरीत रूप देण्यात आले.

इतिहास सांगतो की, बुद्धधम्माच्या द्वेषट्यांनी नारळांच्या वृक्षाइतका उंच झालेल्या पुस्तकांच्या ढिगाला जाळून टाकले.

**प्रश्न ३८९ : सूत्रपिटकाशिवाय बुद्धधम्माच्या उपदेशाचे आणखी ग्रंथ आहेत काय?**
**उत्तर -** होय. सुत्तपिटकांतील भगवंतांच्या उपदेशाशिवाय सारिपुत्र, आनंद, मोग्गल्लान या त्यांच्या प्रधान शिष्यांचेही उपदेश आहेत. ते खाली दिलेल्या पाच निकायांमध्ये वेगवेगळे दिलेले आहेत.
(१) दीघ-निकाय (-दीर्घ-निकाय) - ३४ सूत्र.
(२) मज्झिम-निकाय (-मध्यम-निकाय) - १५२ सूत्र.
(३) संयुक्त-निकाय (-संयुक्त-निकाय) - ५६ सूत्र.
(४) अंगुत्तर-निकाय (-अंगोत्तर ) - ११ निपात.
(५) खुद्दक-निकाय (-क्षुद्रक) - १५ ग्रंथ.
खुद्दक-निकायाचे १५ ग्रंथ येणेप्रमाणे :-
(१) खुद्दक पाठ
(२) धम्मपद
(३) उदान
(४) इतिवुत्तक
(५) सुत्तनिपात
(६) विभानवत्थु
(७) पेत वत्थु
(८) थेर गाथा
(९) थेरी गाथा
(१०) जातक (५५० कथा)
(११) निद्देस (चुल्लवग्ग, महावग्ग)
(१२) पटिसम्भिदा वग्ग
(१३) अपदान
(१४) बुद्ध वंस
(१५) चरियापिटक

**प्रश्न ३९० : विनयपिटकाचे भाग कोणते आहेत?**
**उत्तर -** विनयपिटकाचे भाग पुढीलप्रमाणे आहेत.

| | |
|---|---|
| (१) विभंग | (१) पाराजिक |
| | (२) पाचित्तीय |
| (२) खंधक | (१) महावग्ग |
| | (२) चुल्लवग्ग |
| | (३) परिवार |

**प्रश्न ३९१ : अभिधम्मपिटकाचे ग्रंथ कोणते?**

**उत्तर** - ते ग्रंथ येणेप्रमाणे -

(१) धम्मसंगणी,

(२) विभंग

(३) धातुकथा

(४) पुग्गलपञ्जत्ति

**प्रश्न ३९२ : बुद्धधम्मातील नऊ रत्ने काणती?**

**उत्तर** -बुद्धधम्मातील नऊ रत्न येणेप्रमाणे - (१) सूत्र, (२) गेय्य, (३) वैयाकरण, (४) गाथा (५) उदान (६) इतिवुत्तक, (७) जातक, (८) अभिधम्म, (९) वेदूल्ल.

**प्रश्न ३९३ : अभिधम्माची काय शिकवण आहे?**

**उत्तर** -अभिधम्मात 'नैतिक मनोविज्ञानाची' शिकवण आहे. अनुभवाचे कार्य आणि प्रक्रिया यांना नाना धम्मामध्ये विभाजित करून त्यांचा संयोग आणि वियोग यांतील कार्यकारण संबंधाचे विश्लेषण करणे, हे अभिधम्माचे मुख्य कार्य आहे.

मानसिक कार्याच्या अध्ययनासाठी दोनच सिद्धान्त मौलिक आहेत. अनुभवाला तत्त्वशः विभाजित करणे आणि त्यांना कार्यकारण नियमांवर आधारित मानणे अनुभवांना प्रतीत्यसमुत्पन्न धम्माचा समूह आणि संतती मानून बौद्धांनी वस्तुतः मनोविज्ञानाचा पाया तयार केला. आधुनिक मनोविज्ञान स्वतःला नीति निरपेक्ष मानते. परंतु प्राचीन मनोविश्लेषण नैतिक व आध्यात्मिक आवश्यकतांनी प्रेरित झालेले होते. याहून अधिक महत्त्वाची गोष्ट अशी की, बौद्ध लोक कुशल आणि 'अकुशल' (Good व Evil) यांतील फरक विज्ञानवत आणि शास्त्रनिरूपणीय मानीत असत. याशिवाय बौद्ध मनोविज्ञानात सामान्य मनुष्य लोकांच्या व्यतिरिक्त 'अन्य लोकांची' आणि 'लोकोत्तर' अनुभवांचीदेखील चर्चा आहे. येणेप्रमाणे बौद्ध मनोविज्ञान आधुनिक मनोविज्ञानापेक्षा अतिशय प्रगत अवस्थेमध्ये होते.

अभिधम्माची पूर्ण शिकवण मानसिक धम्माचे विभाजन आणि वर्गीकरण याबद्दल असून, उत्पन्न होणाऱ्या प्रत्येक मानसिक अवस्थेचे नाव आणि कार्य यांच्यातील अतीसूक्ष्म भेद, त्यांची भावना आणि त्यांचा परित्याग याची जाण बौद्ध साधकाला व्हावी हा अभिधम्माचा मुख्य उद्देश आहे.

**प्रश्न ३९४ : धम्मपदात काय सांगितले आहे?**

**उत्तर** - धम्मपदात धम्माचा मार्ग सांगितलेला आहे. त्यात माणसाच्या मनाला प्राधान्य दिलेले आहे. प्राणिमात्रांचे चारित्र्य मनापासूनच तयार होते व मनापासूनच सर्वोच्च सुखांची अनाचारांची उत्पत्ती होत असते. त्यात उद्योगीपणाची, दुसऱ्याचे भले इच्छण्याची 'मीपणावर' विजय मिळवण्याची, कुशल कर्मांची, दानशीलपणाची आणि विचार व संयम यांची स्तुती केलेली आहे. याउलट आळशीपणाची, गर्विष्ठपणाची, कृपणतेची, क्रोधाची, द्वेषाची व अकुशल कर्मांची निर्भर्त्सना केलेली आहे.

# बौद्धांची मूलभूत धम्मतत्त्वे

**प्रश्न ३९५ : कर्नल ऑलकॉट यांच्यानुसार बुद्धधम्माची १४ मूलभूत धर्मतत्त्वे कोणती?**

**उत्तर** -कर्नल ऑलकॉट यांनी इ.स. १८९१ मध्ये मद्रास येथे भरलेल्या बुद्धधम्माच्या जागतिक परिषदेत जगातील प्रमुख अधिकार मंडळांना भेटून त्यांच्या सर्वसंमतीने १४ मूलभूत धर्मतत्त्वे मांडली, ती अशी -

(१) बौद्धांनी सर्वांप्रती बंधुभाव ठेवावा.

(२) विश्वाचा विकास नैसर्गिकरित्या झालेला आहे, ईश्वरामुळे नव्हे.

(३) बौद्ध धम्म नैसर्गिक सत्यांवर आधारलेला आहे.

(४) सिद्धार्थ यांची धर्मगुरू म्हणून थोर व्यक्तींमध्ये गणना होते.

(५) अविज्ञेमुळे तृष्णा व तृष्णेमुळे पुनर्जन्म होतो. पुनर्जन्म दुःखाचे मूळ आहे.

(६) अविद्येमुळे पुनर्जन्म आवश्यक वाटतो आणि त्याच्या कर्मानुसार पुढच्या जन्मी सुख किंवा दुःख भोगावे लागेल, अशी धारणा होते.

(७) अविद्येचा नाश करावयास परोपकार बुद्धीचे दीर्घोद्योगी आचरण, विचारांचा सुज्ञपणा व तृष्णेचा नाश या गोष्टी आवश्यक आहेत.

(८) जगण्याची दुर्दम्य इच्छा, हेच पुनर्जन्माचे मूळ कारण होय.

(९) अविद्येचा नाश करावयास चार आर्यसत्यांचे ज्ञान आणि आर्यअष्टांगिक मार्गावर आचरण आवश्यक आहे.

(१०) सम्यक समाधी अलौकिक ज्ञान प्रकाशाप्रत नेते.

(११) बौद्धधम्माचा सारगर्भ येणेप्रमाणे - सर्व पापकर्मांपासून परावृत्त होणे, सद्‌गुणांची प्राप्ती करणे व अंतःकरणाला शुद्ध करणे.

(१२) हे संपूर्ण विश्व नैसर्गिक कार्यकारणभावाच्या अधीन आहे

(१३) कुशल कर्मांच्या प्राप्तीसाठी पंचशीलाचे पालन करावे.

(१४) बौद्धधम्म अंधश्रद्धेला निरुत्साहित करतो. आपल्या अपत्यांस विज्ञान आणि साहित्याचे शिक्षण देणें मातापित्यांचे कर्तव्य होय.

**प्रश्न ३९६ : बौद्धधर्म हा हिंदूधर्माचाच भाग आहे, हिंदूधर्माचाच एक पंथ आहे असे काही जण म्हणतात, ते खरे आहे काय?**

**उत्तर** - मुळीच नाही. बौद्धधम्माचे तत्त्वज्ञान हिंदू धर्माच्या तत्वज्ञानाहून मूळतः भिन्न आहे. त्यांतील ठळक भेद येणेप्रमाणे :

(१) हिंदू धर्म आत्म्याच्या अस्तित्वास मानतो, बौद्धधम्म मानीत नाही.

(२) हिंदू धर्म परमेश्वराच्या अस्तित्वास मानतो. त्यांच्या अगणित देवदेवता जसे श्रीब्रह्मा, श्रीविष्णु, श्रीशंकर, श्रीकृष्ण वगैरे आहेत. बौद्धजन भगवंतास महापुरुष मानतात.

(३) हिंदू धर्मात समाजव्यवस्था चातुर्वर्ण्यावर आधारलेली आहे. बौद्धधम्म सर्व मानवजातीला समान मानतो, त्यात जातिभेद नाही.

(४) हिंदू धर्मात आत्म्याला सनातन, अजर, अमर मानतात. बौद्धधम्मात प्रत्येक गोष्टीला अनित्य (impermanent) मानतात.

(५) हिंदू धर्मानुसार दुःख मिळण्यास दैववाद हे कारण आहे. बौद्धधम्मात दुःखाचे अस्तित्व असल्यामुळे (मान्य केले असून) त्याच्या निरसाची कारणें व त्याचा कार्यक्रम दिलेला आहे.

(६) हिंदू धर्मानुसार दैवगतीमध्ये सुख असल्यास सुख मिळते व दुःख असल्यास दुःख मिळते. त्यास कोणीही टाळू शकत नाही. बौद्धधम्मानुसार कुशल कर्मे केल्यास चांगली फळें व अकुशल कर्मे केल्यास वाईट फळे मिळतात.

(७) हिंदूंचा कर्मवाद दैववादावर आधारलेला आहे. बौद्धांचा कर्मवाद विज्ञानाशी (Science) सुसंगत आहे. जसे कराल तसे भराल.

(८) हिंदू धर्मातील धर्मग्रंथात त्यांच्या देविदेवतांनी अनेक अनैतिक कर्मे केल्याचे नमूद आहे. (इंद्रदेवाने छद्म वेषाने जाऊन एका ऋषी पत्नीवर (अहिल्येवर) बलात्कार केला, इ.) भगवान बुद्धांचे चारित्र्य निष्कलंक होते.

(९) हिंदू धर्मात यज्ञयागाचे स्वरूपाने पशुबळीस मान्यता होती. बौद्धधम्मात निरीह पशूंची हत्या करणे निषिद्ध आहे.

(१०) हिंदू धर्मात सुरापान करणे देवदेविकांना प्रिय होते. बुद्धधम्मात मज्जाव आहे.

(११) हिंदू धर्मात तर्कास स्थान नाही, केवळ त्याला ग्रहण केलेच पाहिजे असे म्हटलेले आहे. ''चातुर्वर्ण्य मया सृष्ट्यम् गुणकर्म विभागशः'' म्हणजे तुम्ही त्याला मानलेच पाहिजे. बौद्धधम्मात विचारांस स्वातंत्र्य आहे.

(१२) हिंदू धर्मात वेदग्रंथांना प्राधान्य असून ते ईश्वररचित असल्याचे सांगतात. बौद्धधम्मातील प्रत्येक गोष्ट तुम्ही अनुभवाच्या व प्रज्ञेच्या कसोटीवर तपासून पहा, अशी शिकवण आहे.

(१३) हिंदू धर्मात 'मोक्षाची' प्राप्ती मृत्यूनंतरच होऊ शकते जिवंतपणी नव्हे. आत्मा वैकुंठास जातो व देवमय होऊन जातो असे म्हणतात. बुद्धधम्मातील 'निर्वाण' 'याचि जन्मी याचि डोळा' प्राप्त होऊ शकते.

(१४) हिंदू धर्मातील भगवतगीतेतील शिकवण ''कर्मण्येऽवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन'' हिला अत्यंत उदात्त शिकवण समजण्यात येते. फळाची आशाच नसेल तर उत्तम कर्मे करावयास प्रेरणा कुठून मिळणार. बौद्धधम्मात कुशल कर्मावर भर दिलेला असून अकुशल कर्मे करू नयेत अशी ताकीद दिलेली आहे.

(१५) हिंदू धर्मात कर्मकांडास प्राधान्य आहे. गंगेत स्नान केल्याने सर्व पापे धुतली जातात, असे सांगण्यात येते. बौद्धधम्मानुसार पापांचे परिमार्जन होत नाही, त्याची फळे भोगावीच लागतात. यास्तव अकुशल कर्मे करूच नयेत.

(१६) हिंदूंनी भ. बुद्धाला आपल्या दशावतारात स्थान देऊन अशी दिशाभूल केलेली आहे. जणू काही भ. बुद्ध हिंदूंचे देवच आहेत. भ. बुद्ध महामानव होते. इ. अनेक गोष्टी मूलतः भिन्न आहेत. याकरिता सविस्तरपणे माहिती टीप क्र.८ मध्ये पाहावी.

* * * *

# तृतीय खंड

# बौद्ध संघ

## संघाचे संघटन

**प्रश्न ३९७ : बौद्ध कोणाला म्हणावे?**

**उत्तर -** जो बुद्ध, धम्म व संघाला शरण गेला असून भ. बुद्धांच्या उपदेशानुसार वागण्याचा प्रयत्न करतो त्याला बौद्ध म्हणावे. ज्याची भ. बुद्धांविषयी, ते सर्व गुरुवर्यांमध्ये अत्यंत थोर आहेत अशी धारणा आहे, त्यांनी शिकवलेल्या धम्माविषयी व अर्हतांच्या बौद्ध संघाविषयीही तशीच श्रद्धामय धारणा आहे; इतकेच नव्हे तर जो भगवंतांनी शिकवलेल्या धम्माचे दैनदिन जीवनात आचरण करतो, तोच बौद्ध होय. परंतु कायद्यानुसार बौद्ध मातापित्यांच्या अपत्यांना आणि बौद्धधम्माची दीक्षा घेणाऱ्यास बौद्ध म्हणावे लागेल.

**प्रश्न ३९८ : सामान्य जनतेपासून वेगळा असा हा भिक्खू संघ स्थापन करावयाची काय आवश्यकता होती?**

**उत्तर -** भिक्खू संघ निर्माण करण्याचा असा उद्देश होता की, जर एकट्यानेच सत्याचे अवलंबन करण्याचा निर्णय घेतला तर पुढेमागे तो निर्बल होऊन आपल्या जुन्याच मार्गावर जाऊ शकतो, म्हणून भिक्खूंनी संघटित व्हावे. सामाजिक वातावरणात वास करीत असताना गुणसंपन्न, निःस्वार्थी आणि विद्वान व्यक्तींच्या मनातदेखील स्वाभाविकपणेच कामवासना व इतर स्वार्थी इच्छा उद्‌भवतात. यास्तव अशा सामाजिक वातावरणापासून त्यांचे अंग काढून घ्यावे आणि त्या व्यक्तींनी आपले आयुष्य परमज्ञानाच्या लाभाकरिता अर्पण करावे, दुसऱ्यांना शिकवण्यास व मार्गदर्शन करण्यास त्यांचा उपयोग व्हावा या उद्देशाने भिक्खू संघ स्थापन करण्यात आला.

पुष्कळसे लोक गृहस्थजीवनाचा त्याग करून परिव्राजक होऊन इतरत्र फिरत असत. सत्याच्या शोधात आणि प्रवचने देत देत हे हिंडत असत. काही जण गुरुच्या अधीन राहत असत तर इतर एकटेच फिरत असत. त्यांचा संघ नव्हता किंवा निश्चित नियम, उपनियमही नव्हते. इतिहासात प्रथमतःच भगवंतांनी संघाचे आयोजन केले त्यासाठी नियम बनविले आणि संघाच्या सदस्यांकरिता एक निश्चित आदर्श उपस्थित केला. संघाची स्थापना करताना त्यांनी पंचवर्गीय भिक्खूंना उपदेश दिला; संघटित व्हा, एकमेकांना मदत करा व एकमेकांच्या प्रयत्नांना बळकट करा. बंधुभावाने, प्रेमाने व पावित्र्याच्या कळकळीने एकत्र राहा. जगाच्या कानाकोपऱ्यांत धम्माचा प्रसार करा, हाच तो पवित्र बंधुसमाज हीच ती धम्मसंघटना.

**प्रश्न ३९९ : संघात प्रवेश मिळविण्याकरिता कोणते नियम आहेत?**

**उत्तर** - दहा वर्षांखालील व्यक्तीस संघात घेतले जात नाही. संघाचा सदस्य होण्याकरिता मातापित्याची संमती असावयास पाहिजे. कुष्ठरोग, गळू, क्षयरोग आणि मिरगी ह्या रोगांपासून तो मुक्त पाहिजे. तो स्वतंत्र असावा किंवा सरकारी नोकर नसावा. संघात प्रवेश मिळावयास जातीचे बंधन नव्हते. उच्चनीच, समाजिक प्रतिष्ठा वगैरे वरून भेद केला जात नसे. स्त्रियांकरिता वेगळा भिक्खुणी संघ होता. संघात सर्वजण समान मानले जात असत. व्यक्तीचे महत्त्व अंगच्या गुणांवरून ठरविले जात असे. संघाला महासागराप्रमाणे मानून भिक्खूला त्यांत मिळणाऱ्या नदीच्या पाण्याप्रमाणे एकरूप मानले जाई.

**प्रश्न ४०० : प्रव्रज्या घेण्याचा परम उद्देश काय असावा?**

**उत्तर** - जगातील दुःख नष्ट व्हावे व पुनः दुःखाची निर्मिती न व्हावी आणि पुनर्जन्मापासून सुटका होऊन परमनिर्वाणाची प्राप्ती व्हावी हाच प्रव्रज्या घेण्याचा परम उद्देश होय. धुताङ्ग म्हणजेच चीवर धारण करून प्रव्रजित होणे.

**प्रश्न ४०१ : गृहत्याग करण्यास कारणीभूत होणाऱ्या गोष्टी कोणत्या?**

**उत्तर** - (१) संसार अनित्य असून निरंतर परिवर्तशील आहे.

(२) संसाराचा कोणी स्वामी किंवा संरक्षक नाही.

(३) जगात आमचे काहीच नाही; आम्हाला सर्वकाही सोडून जाणे आहे.

(४) तृष्णेच्या आहारी जाण्यानेच संसार दुःखी होतो.

रट्टपालाने हा उपदेश भ. बुद्धांकडून श्रवण केला, त्यावर मनन केले व तो परिव्राजक झाला.

**प्रश्न ४०१ (अ) : जीवनाचे ध्येय काय असावे?**

**उत्तर** - मानवी जीवनाचे शेवटचे लक्ष्य काय असावे? परिवाराचे भरणपोषण, उद्योग व्यवसाय, समाज आणि देशाची सेवा व सुरक्षा, इत्यादी केवळ कर्तव्ये आहेत. वास्तविक उद्दिष्टे नाहीत. सत्यधम्माला आत्मसात करणे हेच जीवनाचे खरे ध्येय होय.

१. नवीन संस्कार (म्हणजे मनाच्या अशा प्रतिक्रिया ज्यांच्यामुळे विकार निर्माण होतील) होऊ नयेत.
२. जुने (संचित) संस्कार समाप्त व्हावेत.
३. राग-द्वेष इत्यादी विकारांपासून मुक्ती मिळावी.
४. चित्त नितांत निर्मळ व्हावे.
५. चित्त अनंत मैत्री, करुणा, मुदिता आणि उपेक्षा म्हणजे (सुखद आणि दुखद स्थितीमध्ये समतेचा भाव) यांनी ओतप्रोत व्हावे.
६. निर्वाणाचा साक्षात्कार व्हावा.
७. जन्म-मरणाच्या फेऱ्यातून सुटका व्हावी, जेणेकरून सर्वच दुःखापासून मुक्ती मिळावी.

**प्रश्न ४०२ : संघाच्या नवीन सदस्याला काय म्हणतात?**

**उत्तर** - श्रमणेर. गुरूशी त्याचे नाते जणू मानलेल्या पित्याप्रमाणे असे. खरे म्हणजे गुरूच त्याचा मातापिता, परिवार आणि सर्व काही, अशा तऱ्हेचा त्यांचा नातेसंबंध कायम होत

असे. संघात प्रवेश मिळविणाऱ्यांचे दोन वर्ग पाडले जात. श्रामणेर आणि भिक्खू. वीस वर्षांखालील प्रत्येक जण श्रामणेर मानला जाई. त्रिशरण आणि दशशील ग्रहण केल्यावर मातापित्याची परवानगी असलेला कोणताही बालक श्रमण बनू शकत असे, आणि कोणत्याही वेळी संघ सोडून तो उपासक बनू शकत असे. तो भिक्खूंच्या अधीन राहून भिक्खूंच्या सेवेत धम्माची शिकवण घेत घेत आपला काळ व्यतीत करीत असे. त्याने परिव्रज्या (प्रव्रज्या) घेतलेली नसे. वयाची वीस वर्षे पूर्ण झाल्यावर आणि प्रव्रज्या उपसंपदा घेतल्यावरच त्याचा भिक्खू वर्गात समावेश होई.

**प्रश्न ४०३ : आईवडील खुशीने आपल्या पुत्रांना प्रव्रजित होण्याकरिता आज्ञा देत होते काय?**

**उत्तर** – पुष्कळसे आईवडिल आज्ञा देत नव्हते. कधीकधी तर आईवडिलांची अनुमती प्राप्त करण्याकरिता पुत्रांना 'सत्याग्रहसुद्धा' करावा लागत होता. एकदा तर असे घडले की, वैशालीमधील नातीद्वर कलंद गावी सुदिन्न कलंद पुत्त नावाचा श्रीमंत व्यापाऱ्याचा मुलगा राहात होता. तो आपल्या मित्रांसह वैशालीस गेला. तेथे भ. बुद्धांचा उपदेश श्रवण केल्यावर त्याने प्रव्रजित होण्याचा संकल्प केला. त्याने भगवंताजवळ प्रव्रज्या देण्याची याचना केली. पण भगवंतांनी त्याला सांगितले की, आईवडिलांची अनुमती असल्याशिवाय कोणत्याही कुलपुत्राला तथागत प्रव्रजित करीत नाहीत. तेव्हा सुदिन्नाने सत्याग्रह करून आईवडिलांची अनुमती प्राप्त केली. त्यानंतर भगवंतांनी त्याला प्रव्रजित केले.

**प्रश्न ४०४ : संघदीक्षेची तयारी कशा प्रकारे करतात?**

**उत्तर** – त्या श्रमणेराला त्याच्या सभासदत्वाचे नामांकन करणारा भिक्खू तो श्रमण व्हावयास योग्य आहे, अशी ग्वाही देऊन त्याला भिक्खू संघाच्या सभेत हजर करतो. दीक्षा घेणारा श्रामणेवर भिक्खूसंघास निवेदन करतो, पूज्य महानुभवांनो, मी संघाला माझ्या 'उपसंपदेकरिता' विनंती करतो इ. त्याचा परिचय करून देणारा भिक्खू त्याला संघात प्रवेश मिळावा म्हणून त्याची शिफारस करतो, त्यानंतर त्याच्या संघप्रवेशाला मान्यता दिली जाते.

त्यानंतर तो चीवर परिधान करतो आणि 'त्रिशरण' व 'दशशील' ग्रहण करतो. दीक्षेपूर्वी भिक्षूला आठ गोष्टींचा स्वीकार करायचा असतो. त्या येणेप्रमाणे - त्याची तीन चीवरें (अंतर-वासक म्हणजे आंतील वस्त्र, उत्तरासंग म्हणजे वरचे वस्त्र आणि संघाटी म्हणजे थंडीपासून बचावाकरिता जाडजूड चादर), त्याच्या कमरेला बांधायचे वस्त्र, भिक्षापात्र, पाणी गाळायचे वस्त्र, वस्तरा, सुईधागा आणि विनयपिटकामध्ये सांगितल्याप्रमाणे अगदीच मर्यादित अशा आणखी काही गोष्टी भिक्खूला आपल्या जवळ ठेवता येतात. परंतु आधुनिक जगात पुस्तके, चष्मा, लिखाणाच्या वस्तू, छत्री वगैरे आवश्यकतेनुसार जवळ बाळगाव्या लागतात.

**प्रश्न ४०५ : श्रामणेराला किंवा भिक्खूला कोणत्या दोन अत्यावश्यक गोष्टी पाळावयाच्या असतात?**

**उत्तर** – धनाचा निर्लोभीपणा आणि ब्रह्मचर्य.

**प्रश्न ४०६ : भ. बुद्धाच्या मतानुसार खऱ्या अर्थाने 'श्रमण' कोणाला म्हटले पाहिजे?**
**उत्तर** - खऱ्या अर्थाने 'श्रमण' अशा भिक्खूला म्हणावे की, ज्याचा लोभ नष्ट झाला ज्याला क्रोध येत नाही, जो खोटेपणाने लोकांची फसवणूक करीत नाही आणि जो द्वेष मत्सररहित आहे.

**प्रश्न ४०७ : श्रमणाचे गुण कोणते व कोणत्या चिन्हावरून ते ओळखले जातात?**
**उत्तर** -

(१) श्रमण अरण्य, वृक्षाचे मूळ तसेच शून्यागार या तीन श्रेष्ठ स्थळी निवास करतात. (परंतु ही प्राचीन गोष्ट आहे.) सध्याच्या काळी श्रमण भिक्खू निवासात, विश्रांतिगृहात किंवा बौद्ध विहारात निवास करतात.
(२) ते सर्व कुशल गोष्टीत अग्रेसर राहतात.
(३) चांगल्या नियमांचे पालन करतात.
(४) सदाचारी,
(५) शांत व
(६) दान्त - (विरक्त) राहून विहार करतात.
(७) संयमी,
(८) क्षमाशील
(९) सु-रत-(चांगल्या गोष्टीत रमणारे) असतात.
(१०) श्रेष्ठ आचार - विचाराचे असतात.
(११) श्रेष्ठ व पवित्र विचारांची इच्छा बाळगतात.
(१२) विवेक संपन्न,
(१३) पापकर्मांना भिणारे व पापकर्माने लज्जित होणारे,
(१४) वीर्यवान (म्हणजे उद्योगी)
(१५) अप्रमादी,
(१६) अभ्यासू वृत्तीचे व धम्माचा अभ्यास करण्यात सदैव उत्साहशील असतात.
(१७) धम्म जाणून घेण्यासाठी सदा उत्सुक असतात.
(१८) शीलांचे पालन करण्यात तत्पर असतात.
(१९) तृष्णेवर विजय मिळविणारे आणि
(२०) धम्माचा पूर्ण अभ्यास करणारे - श्रमणेरांचे असे एकूण वीस गुण असतात. त्यांना ओळखण्याची चिन्हे : म्हणजे - (१) काषाय-वस्त्र धारण करणारे व (२) डोक्यावरील केसांचे मुंडन केलेले, ही दोन आहेत.

**प्रश्न ४०८ : श्रमणेराला श्रमणांची किंवा भिक्खूची दीक्षा कोणत्या वर्षी घेता येते?**
**उत्तर** - त्याच्या वयाची वीस वर्षे पूर्ण झाल्यानंतरच.

**प्रश्न ४०९ : भिक्खूचा अत्यावश्यक असा दैनंदिन कार्यक्रम कोणता?**
**उत्तर** - त्याने सूर्योदयापूर्वी उठावे, प्रातःविधी आटोपून स्नान करावे, विहाराची झाडलोट करावी, प्रत्येक विहाराजवळ असलेल्या बोधिवृक्षाच्या सभोवतालची जागा झाडून काढावी,

दिवसभरासाठी लागणारे पिण्याचे पाणी आणावे व ते गाळून ठेवावे. नंतर ध्यान करावे. त्यानंतर 'डागोबा' समोर (किंवा स्मृतिचिन्हासमोर), किंवा बोधीवृक्ष असल्यास त्यासमोर फुले अर्पण करावीत. त्यानंतर आपले भिक्षापात्र घेऊन स्वखुशीने दिलेल्या भिक्षेचाच त्याने आपल्या भिक्षापात्रात स्वीकार करावा. तिकडून परत आल्यावर त्याने आपले हातपाय धुवावे व भिक्षेचे सेवन करावे. त्यानंतर त्याने पुनः ध्यानाला बसावे. परंतु आधुनिक परिस्थितीनुसार बौद्ध विहारातच भोजनाची सोय केलेली असते.

त्याने आपले अध्ययन करावे. सायंकाळी पुन्हा त्याने पवित्र स्थळांची झाडलोट करून ती स्वच्छ करावीत, दिवाबत्ती करावी. आपल्याहून थोर असलेल्या उपाध्यायांचा उपदेश श्रवण करावा आणि त्याच्याकडून काही प्रमाद घडला असल्यास तो प्रामाणिकपणे कबूल करावा.

**प्रश्न ४१० : भिक्खू मध्यान्हानंतर भोजन करीत नाहीत, याला काय कारण आहे ?**

**उत्तर** - त्याला दोन कारणे आहेत- (१) भिक्षा मागून उपजीविका करणाऱ्या भिक्खूंना रात्री भिक्षा मागण्यास जाणे सोईस्कर नसते. (२) अल्पाहार सुखकर असतो. एकदा भगवान काशी देशात विहार करीत असता भिक्खूंना उपदेशून म्हणाले :- 'भिक्खूंनो! मी रात्रीचे भोजन वर्ज्य मानतो. रात्री भोजन न केल्यामुळे आरोग्य, उत्साह, बल, सुखपूर्वक विहार यांचा मी अनुभव करतो म्हणून भिक्खूंनो, तुम्हीही रात्रीचे भोजन वर्ज्य करा म्हणजे तुम्हालाही असाच अनुभव येईल'.

भिक्खूला मध्यान्होत्तर पेय भिक्षा प्राप्त झाली असल्यास ते ग्रहण करू शकतात. एकदा केणीय जटील मध्यान्होत्तर पेयपदार्थ तयार करून भगवंतांकडे गेला आणि त्यास ग्रहण करण्याची त्यांना विनंती करू लागला. भगवंत म्हणाले, 'केणीय! भिक्खूंना दे. भिक्खू संकोचवश तो ग्रहण करावयास मागेपुढे पाहू लागले. तेव्हा भ. बुद्ध म्हणाले, 'भिक्खूंनो, आठ प्रकारचे पेयपदार्थ ग्रहण करण्याची अनुज्ञा देतोः- (१) आंब्याचा रस, (२) जांभळाचा रस, (३) चिंचेचा रस, (४) केळाचा रस, (५) मधुपेय, (६) अंगूर पेय (७) सालूक- (कोईच्या मुळ्या) आणि (८) फारूसक - (फालसा) पेय. भिक्खूंनो! धान्याच्या रसाला सोडून सर्व फळ रसांची अनुज्ञा देतो. मोहांच्या फुलांच्या रसाला सोडून बाकीच्या सर्व पुष्प-रसांची अनुज्ञा देतो'.

**प्रश्न ४११ : धम्मोपदेश करून भोजन करणे का बरे नाही ?**

**उत्तर** - धम्मोपदेश करण्याकरीता काही ग्रहण करणे भगवंतांना संमत नव्हते. कारण ते पारिश्रमिक घेतल्याप्रमाणे झाले असते म्हणून भ. बुद्ध भिक्षा ग्रहण केल्यानंतर दानाची प्रशंसा करून दात्याचे चित्त आकर्षित केल्यावर त्याला शीलपालनाचा उपदेश देत असत.

**प्रश्न ४१२ : कोणी भिक्खू एक खांदा उघडा ठेवून तर कोणी दोन्ही खादे झाकून गलाबंदाप्रमाणे चीवर परिधान करतात. ह्या दोन पद्धतीत फरक आहे काय?**

**उत्तर** - होय. भगवंतांनी भिक्खूंना चांगल्याप्रकारे शरीर झाकूनच नगरात जाण्यास सांगितले तथापि उन्हाळ्यात गर्मीच्या दिवसांत एक खांदा उघडा ठेवावा आणि हिवाळ्याच्या दिवसांत दोन्ही खांदे झाकावे, या उद्देशाने ह्या दोन पद्धती अस्तित्वात आल्या असाव्यात. कारण वस्त्र

केवळ मुख्यतः थंडी, गर्मीपासून सुरक्षा करण्याकरिताच असते. भगवंतांनी याकरिताच भिक्खूंना तीन चीवर वापरण्याची अनुज्ञा दिली. ते म्हणाले, 'भिक्खूंनो! तीन चीवरांची अनुज्ञा देत आहे - (१) दुहेरी संघाटी, (२) एकेरी उत्तरा - संघ, आणि (३) एकेरी अन्तरवासक (लुंगी). याशिवाय भिक्खू आणखी एक वस्त्र जवळ बाळगतात. त्याला (४) स्नान शाटिका (स्नान करताना वापरायचे वस्त्र) म्हणतात'.

**प्रश्न ४१३ : जेव्हा बुद्ध प्रमुख भिक्खू संघाविषयी श्रद्धा भक्ती फार वाढली तेव्हा भगवंतांनी घरोघर भिक्षा न मागता आपल्याकडेच भिक्षा ग्रहण करावी असे काही लोकांना वाटत नसेल का?**

**उत्तर** - होय. परंतु भिक्खू-संघाने कोणत्याही एका दात्याचा आर्थिक गुलाम बनून राहावे, अशी भगवंतांची इच्छा नव्हती.

**प्रश्न ४१४ : भिक्खूंची चार प्रमुख ध्याने कशाकशावर आधारित आहेत?**

**उत्तर** - (१) शरीराशी संबंधित म्हणजे शरीराचे सर्व विकार पाहावेत याला 'कायानुपश्यना' म्हणतात.

(२) अनुभूतीशी संबंधित म्हणजे सर्व प्रकारच्या अनुभवांना पाहाणे, याला 'वेदनानुपश्यना' म्हणतात.

(३) मनाशी संबंधित म्हणजे मनाच्या गतीला पाहणें, ह्याला 'चित्तानुपश्यना' म्हणतात.

(४) धर्माशी संबंधित म्हणजे काम, क्रोध, मोह आदी धर्मांना पाहणें, ह्याला 'धम्मानुपश्यना' म्हणतात.

प्रत्येक मानवातील पाशविक इच्छांना दडपून टाकून सद्गुणांचा विकास करणे, हा या चार प्रमुख ध्यानांचा उद्देश होय.

**प्रश्न ४१५ : बौद्ध भिक्खू आणि इतर धर्मांचे पुरोहित यांच्यात कोणता फरक आहे?**

**उत्तर** - इतर धर्मांचे पुरोहित पापांची क्षमा व्हावी म्हणून उपासकाला मदत करण्यास ईश्वर आणि मनुष्य यांच्यातील मध्यस्थ असल्याचा दावा करतात; बौद्ध-भिक्खू दैवी शक्तीच्या अस्तित्वासच कबूल करीत नाही. ते उपासकाला सदाचरणाची शिकवण देतात, जेणेकरून त्यांची दुःखे कमी होऊ सुख वाढावे.

**प्रश्न ४१६ : जातिभेदाविषयी (Caste system) भ. बुद्धांनी उपदेश केला का ?**

**उत्तर** - होय. कोणताही मनुष्य परिया (= अगदी हलक्या जातीचा) किंवा ब्राह्मण (= अति उच्च जातीचा) केवळ जन्मामुळे होत नाही, तर तो आपल्या कर्मामुळेच होतो. कर्मामुळेच मनुष्य बहिष्कृत बनतो अथवा ब्राह्मण बनतो, असे 'वस्सल-सूत्रांत' स्पष्टपणे सांगितले आहे.

'परिया' जातीच्या सोपाक नावाच्या गृहस्थाविषयी भ. बुद्धांनी काढलेले उद्गार 'वसल-सूत्रांमध्ये' दिलेले आहेत, ते असे - 'त्याच्या सद्गुणांमुळे' सोपाक परमोच्च कीर्तीला पोहोचला व पुष्कळसे क्षत्रिय आणि ब्राह्मण त्याची सेवा करायला तयार झाले. तथापि असेही अनेक ब्राह्मण आहेत की, आपल्या अकुशल कर्मांमुळे ज्यांना नरकयातना भोगाव्या लागत आहेत'. भगवंतांच्या भिक्षू संघात सर्व जातीचे लोक होते.

**प्रश्न ४१७ : भिक्खूंच्या चीवरांचा रंग कसा असावा ?**

**उत्तर** - भिक्खूंच्या चीवरांच्या रंगामध्ये थोडाफार बदल असू शकतो. पूर्वीच्या काळी चीवरे केवळ काषाय (= भगव्या) रंगाचीच असत. 'काषाय' रंगाला कोणी कोणी 'गेरूचा' रंग समजतात, हे बरोबर नाही. झाडाची साल शिजून काषाय रंग तयार केला जात असे. परंतु आजकाल आधुनिक मशिनींद्वारें तयार केलेली, बाजारांत विकत मिळणाऱ्या भगव्या रंगाच्या कापडांची चीवरें तयार करतात.

**प्रश्न ४१८ : संघाच्या सदस्यांपैकी काही जण बौद्धिकदृष्ट्या आणि नैतिकदृष्ट्या कमी दर्जाचे नाही काय?**

**उत्तर** - होय. परंतु भ. बुद्धांनी आपल्याला शिकविले आहे की, केवळ जे नीतिपर उपदेशांकडे प्रयत्नपूर्वक लक्ष देतात, आपल्या मनाला शिस्त लावतात, आणि पावित्र्याच्या व पूर्णावस्थेच्या आठ अवस्थांपैकी निदान एकीला सिद्धीस नेण्याचा नेटाने प्रयत्न करतात, त्यांचाच भगवंताच्या संघात समावेश होतो. त्यांनी असे स्पष्टपणे सांगितलेले आहे की, 'त्रिसरणा' मध्ये ज्या संघाचे वर्णन आलेले आहे, त्याचा अर्थ केवळ अट्ठ आर्य पुग्गली असाच आहे. म्हणजे ज्यांनी पूर्णावस्थेच्या आठ अवस्थांपैकी निदान एकीला सिद्धीस नेले आहे, अशा महामना किंवा थोर मनांच्या व्यक्ती होत. केवळ पीत वस्त्र किंवा काषाय वस्त्र धारण केल्याने किंवा केवळ धम्मदीक्षेने एखादा मनुष्य शुद्ध किंवा सुज्ञ किंवा आदरणीय होत नाही. आणि अयोग्य भिक्खूंना खरा बौद्ध आपला मार्गदर्शक म्हणून स्वीकारणार नाही. स्त्रोतापन्न, सकृदागामी, अनागामी आणि अर्हत अशा चार पुरु ष जोड्या आणि त्या प्रत्येकांचे मार्ग व फळ मिळून आठ पुद्गल (व्यक्ती) असतात.

**प्रश्न ४१८ (अ) : विहाराचे निर्माण करावयाचे असल्यास भिक्खूने देखील सक्रिय मदत करणे आवश्यक असते का?**

**उत्तर** - होय, एका विणकराच्या मनांत असा विचार आला की, मीसुद्धा आपल्या सामर्थ्यानुसार भिक्खूच्या राहण्याकरिता एक कुटी का बनवू नये? त्याने स्वतःच गाळा तयार केला व विटांच्या सहाय्याने एक भिंत उभारली. अनुभव नसल्यामुळे त्याने उभी केलेली भिंत पहिल्यांदा, दुसऱ्यांदा आणि तिसऱ्यांदादेखील पडली. त्याच्या कार्यात कुणीच मदत केली नाही. तेव्हा भगवंतांनी नियम केला, ''भिक्खूनों! विहार इत्यादी बांधायच्या कामाचे निरीक्षण करावयास नवकर्मिक (नवीन निर्माण कार्याचे निरीक्षण करावयास साहाय्यता) द्यावयाची मी अनुज्ञा देतो. नव कर्मिक भिक्खूला विहार लवकर तयार व्हावा याकरिता प्रयत्नशील राहावे लागेल. त्याला तुटफूट झालेल्याची डागडुजीदेखील करावी लागेल.''

## भिक्खूची प्रगती

**प्रश्न ४१९ प्रगतीच्या चार अवस्था किंवा मार्ग आणि दहा संयोजन बंधने कोणती?**

**उत्तर** - (१) श्रोतापन्न : 'चार आर्यसत्यांचे' स्पष्टपणे ज्ञान झाल्यानंतर 'आर्य अष्टांगिक मार्गाचा' अवलंब करणे, म्हणजेच श्रोतापन्न अवस्था होय. दहा संयोजने म्हणजेच चित्ताची दहा बंधने होत. ज्या मनुष्याच्या पहिल्या तीन संयोजनांचे म्हणजे सक्काय-दृष्टी, विचिकित्सा

आणि शीलव्रतपरामर्श-यांचा पूर्णपणे क्षय झालेला असेल त्याला श्रोतापन्न म्हणतात.
(२) सकृदगामी : श्रोतापन्न अवस्थेनंतर पुढच्या मार्गावर अग्रेसर असणाऱ्याला सकृतागामी असे म्हणतात. म्हणजे ज्याने तृष्णा, द्वेष आणि भ्रम यावर इतपत विजय मिळविला आहे की, त्याला पुढे निर्वाण प्राप्त होण्याची बरीच शक्यता असते. सकृतगामी अर्थात शुभकर्मांचे अनुसरण करणारा पहिल्या तीन संयोजनांसह आणखी दोन संयोजनांवर म्हणजे काम-राग व व्यापाद यांच्यावर ज्याने विजय मिळविला आहे, त्याला सकृदागामी म्हणतात.
(३) अनागामी : सकृदागामी व्यक्तीने आपल्या मार्गावर बरीच वाटचाल केल्यानंतर 'अहं' वर इतका विजय मिळविलेला असतो की तो पुढे अर्हत् होऊ शकेल, अशा व्यक्तीचा मार्ग तो ब्रह्म-लोकाची स्थिती प्राप्त करून निर्वाणाप्रत पोहचावयाच्या मार्गाने वाटचाल करीत असतो. चित्ताच्या उच्च अवस्थेलाच पर्यायी शब्दाने 'ब्रह्मलोक' म्हटलेले आहे. पुष्कळदा अशी गैरसमजूत होते की 'स्वर्गासारखेच' 'ब्रह्मलोक' देखील एखादे वसतिस्थान असावे.
(४) अर्हत : जो स्वतः सम्यक संबोधी आनंद उपभोगण्यास समर्थ म्हणजेच अज्ञानी आणि दुःखितांकरिता अपार करुणेने परिपूर्ण आणि संपूर्ण प्राणिमात्रांप्रती अमर्याद प्रेम बाळगण्यास समर्थ झालेला असतो, ती पवित्र आणि आदरणीय अवस्था होय. ज्याने सर्वच दहा संयोजनांवर विजय मिळविलेला आहे व सर्व चित्तमलांपासून जो मुक्त झाला आहे, त्याला 'अर्हत' असे म्हणतात.
सक्काय दृष्टी, विचिकित्सा, शीलव्रत परामर्श, काम-राग, व्यापाद, रूपराग, अरूपराग, मान, स्वार्थ आणि अविद्या ही दहा संयोजन बंधने होत. अर्हताला इच्छाही नसते व अनिच्छाही नसते. तो इच्छा व अनिच्छेपासून मुक्त झालेला असतो. अर्हत शरीरात उत्पन्न झालेली वेदना अनुभव करतो. पण चित्ताची वेदना अनुभव करीत नाही कारण चित्त वेदनेपासून मुक्त झालेले असते.

**प्रश्न ४२० : परमोच्च सत्याच्या ज्ञानाचे आकलन होण्याकरिता भिक्खूला कशाची आवश्यकता असते?**

**उत्तर** - परमोच्च सत्याच्या ज्ञानाचे आकलन होण्याकरिता भिक्खूला कुशाग्र बुद्धीची तर आवश्यकता असतेच, परंतु त्यासोबतच आंतरिक प्रेरणेचीही गरज असते. अंतःप्रेरणा म्हणजेच मनाची अशी व्यवस्था की, ज्या अवस्थेत असताना कोणतेही इच्छित सत्य तत्क्षणीच ग्रहण केले जाते. संबोधीचे ज्ञान प्राप्त करावयास सतत अभ्यास करीत असतांनाच त्या ज्ञानाची उकल होत होत विकासाच्या चौथ्या अवस्थेला येऊन पोहोचल्यानंतर अंतःप्रेरणेची अवस्था प्राप्त होते.

**प्रश्न ४२१ : श्रेष्ठ जीवन जगण्याकरिता भ. बुद्धांनी कोणते धम्म आवश्यक असल्याचे सांगितले आहे?**

**उत्तर** - ते धम्म असे :- (१) श्रोतापन्न होणे. (२) सकृदागामी होणे (३) अनागामी होणे (४) अर्हत होणे. दहा संयोजन बंधने म्हणजेच चित्ताची दहा बंधने होत. ज्या मनुष्याच्या पहिल्या तीन संयोजनाच्या म्हणजे सक्काय - दृष्टी, विचिकित्सा आणि शीलव्रत परामर्श - ह्यांचा पूर्णपणे क्षय झालेला असेल त्याला श्रोतापन्न म्हणतात.

सकृदागामी म्हणजे या जगात पुन्हा फक्त एकदाच जन्माला येणारा. सकृतगामी अर्थात शुभ कर्मांचे अनुसरण करणारा. पहिल्या तीन संयोजनांसह आणखी दोन संयोजनांवर म्हणजे काम, राग व व्यापाद यांच्यावर ज्याने विजय मिळवला आहे, त्याला सकृदागामी म्हणतात.
अनागामी म्हणजे या जगात पुन्हा जन्माला न येणारा, ब्रह्मलोकातूनच निर्वाणाप्रत पोहोचणारा योगी. योगाच्या चित्ताच्या अवस्थेलाच पर्यायी शब्दाने 'ब्रह्मलोक' म्हटलेले आहे.
अर्हत म्हणजे सर्वात श्रेष्ठ योगी, ज्याने सर्व दहा संयोजनांवर विजय मिळविलेला आहे. सर्व चित्तमलापासून विमुक्त तसेच जन्म मरणाच्या फेऱ्यांपासून मुक्त झालेल्यास 'अर्हत' म्हणतात.
भ. बुद्धांच्या उपदेशानुसार मनुष्य ह्याच जन्मी जिवंतपणीच अर्हत होऊ शकतो म्हणजेच जिवंतपणीच निर्वाण प्राप्त करू शकतो.

**प्रश्न ४२२ : अर्हत कोणाला म्हणतात?**

**उत्तर** - प्रतिमोक्षाच्या नियमांनुसार काटेकोरपणाने आचरण करून ज्याने आध्यात्मिक आणि बौद्धिक विकासाची परमोच्च अवस्था प्राप्त केलेली असते, अशा बौद्ध तपस्व्याला 'अर्हत' असे म्हणतात. (टीप ९ पहावी).

**प्रश्न ४२३ : ज्यांच्यामुळे भिक्खू निर्वाणाचा साक्षात्कार करतो, धुताङ्ग (शुद्धीकरणाचे नियम) कोणते आहेत?**

**उत्तर** - धुताङ्ग म्हणजे धुतगुण. धुतगुणांनी आत्मशुद्धी केल्याशिवाय धम्माचे मर्म समजत नाही. असे धुताङ तेरा आहेत - (१) पाँसुकूलिक, (२) तेचीवरिक, (३) पिण्डपातिक, (४) सपदानचारिक, (५) एकासनिक, (६) पात्र पिण्डिक, (७) पञ्ञाभक्तिक, (८) आरंजक, (९) रूखमुलिक, (१०) अब्थोकासिक, (११) सोसानिक, (१२) सथासन्यतिक, आणि (१३) नेअज्जिक.
ह्या धुताङ्ग-व्रतामुळे शुद्ध भिक्खू निर्वाणाचा साक्षात्कार करतो.
धुताङ्गामुळे भिक्खू आनंदविभोर होतो, रूप व अरूप आठ प्रकारच्या समाधींचा लाभ करतो, सर्व रिद्धी प्राप्त होतात, श्रवणशक्ति दिव्य होते, पूर्वजन्मातील (याच जन्माच्या भूतकाळातील) गोष्टींचे स्मरण होऊ लागते, चित्ताविषयी ज्ञान होते, दिव्यचक्षू प्राप्त होतात आणि सर्व आश्रव (- आसक्ति) क्षीण होतात. ह्या तेरा धुताङ्ग-व्रताचे पालन करून आर्य-श्रावक तीस गुणांनी युक्त होतो. (असे मिलिंद प्रश्नात सांगितलेले आहे - संकलिका)

**प्रश्न ४२४ : बुद्ध शरीर-पूजा भिक्खूंकरिता नाही, असे भगवंतांनी का म्हटले आहे?**

**उत्तर** - कारण सर्व संस्कारांची नश्वरता मनांत आणणे, ध्यानभावनेचा अभ्यास करणे, सर्व गोष्टींतील सत्य शोधून काढणे, क्लेश नाश करण्याचा प्रयत्न करणे आणि कामात मग्न राहणे, मुख्यत्वे हीच भिक्खूंची कर्तव्ये आहेत. म्हणून बुद्धाची शरीरपूजा करण्यात त्यांनी वेळ घालवू नये. उपासकांनी भगवंतांच्या गुणांची स्मृती करीत बुद्ध पूजा करणे अवश्य चांगले आहे.

**प्रश्न ४२५ : बौद्ध भिक्खू तपस्वी असतो काय?**

**उत्तर** - नाही. निग्रोध परिव्राजकाबरोबर झालेल्या संवादात स्वतः भगवंतांनी ह्या प्रश्नाचे उत्तर नकारात्मक दिले आहे. ते म्हणाले, 'निग्रोधा! तपस्वी नाना प्रकारची देह-क्लेशकारक

कठोर तपस्या करतो; परंतु त्या तपस्येत अनेक दोष आहेत. जेव्हा एखादा तपस्वी तपस्या करतो, तेव्हा त्यायोगेच संतुष्ट होऊन आपले ध्येय साधले आहे, असे तो मानू लागतो. हाच त्याला जडणारा एक दोष आहे. तो स्वतःला उच्च समजून, दुसऱ्यांचा तिरस्कार करू लागतो; तो त्या तपाच्या कल्पनेने उन्मत्त व मोहित होऊन निष्काळजी बनतो; यश, दान, कीर्ती, मानसन्मान मिळाल्यावर त्याची त्यांच्यात आसक्ती वाढते; रहस्यमय गुढता धारण करून तो बुद्धिपरस्पर असत्य भाषण करू लागतो. लोभाने आकर्षित होऊन त्यागभावना विसरू लागतो; निग्रोधा, ह्या सर्व गोष्टी तपस्या व आत्मक्लेश ह्यांच्या मार्गावर वाटचाल करणाऱ्यास जडणारे कलंक आहेत, असे तुला वाटत नाही काय?' निग्रोधाने भगवंतांचे म्हणणे मान्य केले. तेव्हा भगवंत पुढे म्हणाले, 'भिक्खूंनी ह्या दोषापासून मुक्त राहिले पाहिजे. त्यांनी हे कलंक आपल्याला जडू देता कामा नये'.

**प्रश्न ४२६ : भिक्खू व ब्राह्मण यांच्यात काय फरक आहे?**

**उत्तर –** ब्राह्मण 'पुरोहित' असतो. त्याचे मुख्य कार्य जन्म, विवाह, मरण इत्यादी प्रसंगी 'संस्कार' करावयाचे असते. आत्मा पापांमध्ये बुडलेला असून त्यास निर्मळ करावयास संस्कारांची आवश्यकता असल्याची ब्राह्मणी धर्माची शिकवण असल्यामुळे पुरोहितांची गरज निर्माण केलेली आहे. परंतु बौद्ध भिक्खूचा 'मूळचे पाप' आणि 'आत्मा-परमात्मा' यांवर विश्वासच नसतो. ब्राह्मण जन्मजात असतो, भिक्खू बनावे लागते. भिक्खू झाल्यावर त्याची कोणतीही 'जात' नसते. एकदा ब्राह्मणाच्या घरी जन्म घेतल्यावर त्याने कितीही पापकर्म किंवा दंडनीय कर्म केले, तरी तो ब्राह्मण राहतो, अब्राह्मण होत नाही. परंतु भिक्खूचे तसे नाही. ब्राह्मण बनावयास कसल्याही प्रकारचे मानसिक किंवा नैतिक शिक्षण अनिवार्य नाही. परंतु मानसिक आणि नैतिक शिक्षण हाच भिक्खूंचा जीवन-प्राण असतो. ब्राह्मण वाटेल तेवढी संपत्ती प्राप्त करू शकतो; परंतु भिक्खूचे तसे नाही. यामुळे ब्राह्मणवादाचा परिवर्तनास विरोध राहिलेला आहे. कारण त्यामुळे त्याची आर्थिक हानी व्हावयाची शक्यता असे. परंतु संपत्तिविहीन भिक्खू मानसिक आणि नैतिक दृष्ट्या स्वतंत्र असतो.

**प्रश्न ४२७ : धुताङ्ग पालन करण्यायोग्य व्यक्ती कोणत्या असतात?**

**उत्तर –** अशा दहा प्रकारच्या व्यक्ती असतात - (१) ज्या श्रद्धाळू असतात, (२) पापकर्म करण्यास भीतात, (३) धैर्यवान असतात, (४) खोटा देखावा करीत नाहीत, (५) आपल्या उद्देशात मग्न असतात. (६) निर्लोभी असतात, (७) चांगल्या गोष्टी शिकण्यास नेहमी तत्पर असतात. (८) दृढसंकल्पी असतात, (९) कोणत्याही गोष्टीवरून चिडत नाहीत आणि (१०) मैत्रीभाव ठेवणारे असतात, ह्या दहा प्रकारच्या व्यक्ती धुताग्ङ पालन करण्याजोग्या असतात.

धुताङ्ग म्हणजे धुतगुण. धुतगुणांनी चित्त शुद्धी केल्याशिवाय धर्मतत्त्वांमध्ये प्रवेश करता येत नाही. भिक्खूकरिता धुताङ्ग-व्रत फार उपयुक्त आहे. धुताङ्ग म्हणजे चीवर धारण करून प्रव्रजित होणे होय. धुताग्ङ साधन करून शांत परम निर्वाणाचा साक्षात्कार करावयाच्या उद्देशाने भिक्खू धुताङ्ग धारण करतात.

# संघाचे इतर नियम

**प्रश्न ४२८ : भिक्खू पुन्हा गृहस्थ होऊ शकतो काय?**

**उत्तर** - भिक्खू पुन्हा गृहस्थ होणे बरे नव्हे. कारण तसे झाल्यास लोकांना असे समजण्याची संधी मिळते की, 'श्रमण गौतमाचा धम्म अवश्य चांगला नसावा. म्हणूनच लोक भिक्खू बनून पुन्हा गृहस्थ होतात'. खरे तर बुद्धाचा मार्ग महान, सत्य, उत्तम, श्रेष्ठ, उच्च, अनुपमेय, परिशुद्ध, विमल आणि दोषरहित आहे. ह्या धम्मानुसार गृहस्थाला त्वरितच प्रव्रजित करणे चांगले नाही. तर गृहस्थ काळातच जोपर्यंत तो श्रोतापत्ति (प्रथम-फल) प्राप्त करीत नाही, तोपर्यंत त्याला धम्माचे शिक्षण द्यायला पाहिजे आणि मगच चीवर धारण करण्याची अनुमती द्यावी. असे झाल्यावर तो चीवर सोडून गृहस्थ होणार नाही. ह्यानंतरच त्याला खुषीने प्रव्रज्या द्यावी.

**प्रश्न ४२९ विहारांचे वाटप भिक्खूंमध्ये संपत्ती म्हणून होऊ शकते काय?**

**उत्तर** - नाही, कीटागिरीला पोहोचल्यावर भ. बुद्धांना समजले की, अश्वजित व पुनर्वसू ह्या भिक्खूंनी सांघिक संपत्ती आपसात वाटून घेतली आहे; तेव्हा भगवंतांनी त्यांचा धिक्कार केला व भिक्खूंना ते म्हणाले, "भिक्खूंनो, ह्या पाच वस्तू वाटल्या जाऊ शकत नाहीत - (१) विश्रांती गृह, (२) विहार, (३) मंच (= पलंग), गाद्यगिरद्या, (४) लोखंडाची भांडी आणि (५) बास, फाटे, मुंज वगैरे लाकडाची तसेच मातीची भांडी".

फक्त भिक्खूची त्रिचीवरे वगैरे आठ वस्तू वाटल्या जातात.

विहारांची वाटणी करण्यात आल्यास सैद्धान्तिक दृष्ट्या ती संघांची संपत्ती होत असे. थायलंड वगैरे काही देशात पुष्कळशे सरकारी विहार आहेत, त्यांना भिक्खूंची कायमची विश्रामगृहे म्हणता येईल.

ब्रह्मदेशात सिंहल - द्विपाप्रमाणेच विहारांची व्यवस्था भिक्खू तसेच गृहस्थ उपासक ह्यांच्या स्वाधीन राहात असावी, असे दिसते.

आज बांगलादेशातील चितगाव जिल्ह्यातील प्राचीन विहारांची व्यवस्था व त्यांची मिळकत गृहस्थ उपासकांच्या हातात असल्याचे दिसते.

जेव्हा विहार सरकारी संपत्ती किंवा व्यक्तिगत संपत्ती न बनता संघाची स्वतंत्र संपत्ती मानली जाऊ लागेल, तेव्हाच 'सांधिक भावना' सुरक्षित राहू शकेल.

**प्रश्न ४३० : परिनिवृत्त होण्यापूर्वी भगवंतांनी दिलेले महत्त्वपूर्ण आदेश कोणते?**

**उत्तर** -वडील भिक्खूने आपल्यापेक्षा लहान भिक्खूला 'आवुस' म्हणावे किंवा त्याच्या नावाने किंवा गोत्राने संबोधावे. लहान भिक्खूने आपल्यापेक्षा वडील भिक्खूला बोलताना 'भन्ते' म्हणावे, तसेच त्यांच्या परीनिर्वाणानंतर लहान-मोठ्या नियमात काही बदल करावयाची आवश्यकता पडल्यास संघाने तसा बदल करून घ्यावा. भगवंतानंतर धम्मालाच आपला शास्ता मानावे.

**प्रश्न ४३१ : भ. बुद्ध आता परिनिवृत्त झालेत. आता योग्य-अयोग्य याचा निर्णय करावयाचा, तो कसा करावा?**

**उत्तर** – ह्याविषयी भगवंतांनी शिकवण दिली, 'भिक्खूंनो, जी गोष्ट 'ही निषिद्ध आहे' असे सांगून मी तिला निषिद्ध केलेले असेल, तिला सोडून इतर कोणतीही गोष्ट अनुकूल असून निषिद्ध केलेल्या गोष्टीच्या विरोधी असेल तर ती तुमच्याकरिता योग्य आहे'.

**प्रश्न ४३२ : भगवंतांनी घालून दिलेल्या संघाच्या नियमात फेरबदल करता येतो काय?**
**उत्तर** – होय. भगवंतांनी महानिर्वाणापूर्वी संघाला उद्देशून आयु. आनंदास उपदेश दिला तो असा, 'ह्या शरीराचा लोप झाला तरी तथागत टिकून राहील. जे सत्य व संघाचे नियम मी तुम्हा सर्वांकरिता घालून दिलेले आहेत आणि स्पष्टपणे मांडलेले आहेत, त्यांना मी गेल्यावर तुम्ही गुरुस्थानी मानावे, मी गेल्यावर, आनंदा! भिक्खूसंघाला तशी आवश्यकता वाटल्यास, त्याने लहानसहान व क्षुल्लक नियम रद्द करावेत'.

**प्रश्न ४३३ : भगवंताच्या वेळीदेखील भिक्खूसंघात कलह निर्माण झाला होता काय?**
**उत्तर** – होय. भ. बुद्ध कोशाम्बिला राहत असतांना एका भिक्खूवर त्याच्या हातून दोष घडल्याचा आरोप करण्यात आला होता. आणि जेव्हा त्याने तो आरोप मान्य करण्याचे नाकारले, तेव्हा संघाने त्या भिक्खूला बहिष्कृत करण्याची शिक्षा जाहीर केली.

तो भिक्खू फार विद्वान होता, धम्माचा जाणकार होता. त्याने संघाच्या 'विनय' नियमांचा सखोल अभ्यास केलेला होता. तो सुज्ञ, पंडित, मेधावी, बहुश्रुत, सभ्य, सद्विचारी, शिस्तप्रिय व आस्थावान असून संघाच्या नियमांचे पालन करण्यास उत्सुक होता. तेव्हा आपल्या सहाध्यायी व मित्र असलेल्या भिक्खूकडे जाऊन तो म्हणाला, 'मित्रहो! माझा दोष नाही. बहिष्कृत करण्यासाठी हे कारण उचित नाही. मी दोषी नाही. हा निर्णय घटनाबाह्य व निराधार आहे. म्हणून अद्यापही मी स्वतःला संघाचा सभासद समजतो. आदरणीय भिक्खूंनी माझ्या अधिकाराचे समर्थन करावयास माझी मदत करावी, अशी माझी विनंती आहे'.

तेव्हा ते भिक्खू जाहीर करणाऱ्या भिक्खूकडे गेले. परंतु विरोधात असणारे भिक्खू म्हणाले, 'हा दोषी आहे' व येणेप्रमाणे वादविवाद व कलह सुरू झाला; आणि त्यांनी एकमेकांची निंदा केली.

भगवंतांना हा प्रकार कळविण्यात आला. तेव्हा दोन्ही पक्षांकडे जाऊन त्यांना त्यांच्या जबाबदारीची जाणीव दिली. कोणत्याही सुज्ञ व शिस्तप्रिय भिक्खूला मूर्खपणाने संघातून काढून दिल्यास संघात फूट पडू शकेल, अशी भीती बाळगावी. तसेच कोणत्याही भिक्खूने त्याच्याविषयी आकस धरून संघातील भिक्खू त्याला स्वार्थीपणाने दोषी ठरवतील, असा विचार करू नये व आपला दोष कबूल करावा. परंतु दोन्ही पक्ष आपापल्या निर्णयास चिकटून राहिले. त्यामुळे भगवंतांनी कोशांबिहून प्रस्थान केले व ते श्रावस्तीला गेले.

कोशांबिचे नागरिक त्या वादप्रिय भिक्खूंना कंटाळून गेले व त्यांना भिक्षा देण्याचे थांबविले. शेवटी ते भिक्खू भगवंतांकडे श्रावस्तीस गेले. तेव्हा भगवंतांनी त्यांना असा सल्ला दिला की, संघात ऐक्य घडवून आणावयाचे दोन प्रकार आहेत :- एकतर केवळ शाब्दिक ऐक्य आणि दुसरे शाब्दिक तसेच भावात्मक ऐक्य. यास्तव घडलेल्या गोष्टींची संघाने शहानिशा करून, त्या गोष्टीच्या मुळाशी पोहोचून, सविस्तर चौकशी करून मगच ऐक्य झाल्याचे जाहीर करावे. म्हणजे ते भावात्मक ऐक्य होईल. संघाने तसेच करून ऐक्य प्रस्थापित केले.

**प्रश्न ४३४ : संघाच्या कल्याणास कोणत्या गोष्टी आवश्यक आहेत?**

**उत्तर** – भगवंतांनी पुढील गोष्टी संघाच्या कल्याणासाठी आवश्यक असल्याचे सांगितले -

(१) भिक्खूसंघातील बंधुगणांनी परिपूर्ण अशा सभा वारंवार भरवाव्यात, एकत्र येऊन एकमताने विचार करावा आणि एकमताने निर्णय घेऊन संघाचे कार्य करावे.

(२) अनुभवाने 'चांगल्या' अशा सिद्ध झालेल्या गोष्टींची अवहेलना करू नये. काळजीपूर्वक जिचे परीक्षण केलेले नाही, अशा एखाद्या लहान गोष्टीची सुरुवात करू नये.

(३) वडीलधाऱ्या माणसांनी न्यायाचे आचरण करावे. भिक्खूगणांनी आपल्या वडीलधाऱ्यांवर श्रद्धा ठेवून, त्यांचा आदर करून त्यांना पाठिंबा द्यावा आणि त्यांचे शब्द काव्याप्रमाणे श्रवण करावे.

(४) भिक्खूगणांनी हावेच्या आहारी न जाता, सद्धम्म सुखातच आनंद मानावा, जेणेकरून सद्गुणी व पवित्र लोक त्यांच्याकडे येऊन त्यांच्यामध्ये शांतिपूर्वक राहतील.

(५) भिक्खूगणांनी सुस्तपणा व आळस यांच्या अधीन होऊ नये.

(६) भिक्खूगणांनी सत्यशोधनाचा सतत प्रयत्न, उत्साह, आनंद, विनयशीलता, आत्मसंयम, मनःपूर्वक सफल चिंतन आणि मनाची समतोल वृत्ती या सात उच्चस्तरीय संबोधिप्रत ज्ञान देणाऱ्या मानसिक क्रियांमध्येच स्वतःला रममाण करून घेण्याचे सतत प्रयत्न करावेत. यास्तव भिक्खूंनी श्रद्धावान व्हावे, मनाने विनयशील व्हावे, पापाविषयी भीती बाळगावी, शिकण्यासाठी उत्कंठित असावे, उद्योगी व्हावे, मनाला चैतन्यशील ठेवावे व ज्ञानाने परिपूर्ण व्हावे.

**प्रश्न ४३५ : भ. बुद्धांनी केवळ भिक्खूंनाच उपदेश दिला आहे काय?**

**उत्तर** – नाही. भ. बुद्धांच्या उपदेशातील पुष्कळशा गोष्टी भिक्खू आणि गृहस्थ - उपासक यांच्याकरीता सारख्याच उपयुक्त आहेत. अशा अनेक गोष्टी आहेत की, ज्या गृहस्थांना उद्देशूनच भगवंतांनी म्हटलेल्या आहेत. परंतु भगवंतांच्या सभोवती अधिकतर भिक्खूच राहत असत शिवाय भिक्खूंनीच त्यांच्या उपदेशांचे संकलन केलेले असल्यामुळे असा भ्रम निर्माण होतो की, जणूकाही त्यांनी भिक्खूंनाच उपदेश केला होता.

एकदा भगवंत मथुरा व वैरंजा यांच्यामधील रस्त्याने चालले होते. त्यावेळी पुष्कळशे गृहस्थ आपापल्या पत्नीसहित त्याच मार्गाने जात होते. भगवंत रस्ता सोडून बाजूलाच एका झाडाखाली बसले. त्यांना पाहून त्या सगळ्यांनी त्यांना नमस्कार केला. तेव्हा भगवंत त्यांना म्हणाले -

गृहस्थांनो! चार प्रकारचे सहवास असतात - (१) शव शवाबरोबर सहवास करतो. (२) शव देवीबरोबर सहवास करतो. (३) देव शवाबरोबर सहवास करतो. (४) देव देवीबरोबर सहवास करतो.

गृहस्थांनो जर पती-पत्नी दोघेही सदाचारी नसले, तर शव शवासह सहवास करतो. पती सदाचारी नसून पत्नी सदाचारिणी असेल, तर शव देवीसह सहवास करतो. पती सदाचारी असून पत्नी सदाचारिणी नसेल तर देव शवासह सहवास करतो. परंतु गृहस्थांनो! पती तसेच पत्नी दोघेही सदाचारी असल्यास देव देवीसह सहवास करतो.

भगवंतांच्या दृष्टीने दुराचारी लोक शवासमान असतात.

# आदर्श भिक्खू

**प्रश्न ४३६ : भिक्खूंची कर्तव्ये कोणती ?**

**उत्तर** - भिक्खूंची कर्तव्ये येणेप्रमाणे -

(१) इतरांना धम्मदीक्षा देणे.

(२) परापाकृतिक किंवा चमत्कार किंवा जादूच्या साहाय्याने कुणासही दीक्षित न करणे.

(३) जोर जबरदस्तीने धम्म-परिवर्तन न करणे.

(४) धम्म प्रचाराकरिता अथक प्रयत्न करणे.

भगवंतांनी भिक्खूंना सांगितले की, भिक्खू श्रेष्ठ शीलाकरिता युद्ध करतो, श्रेष्ठ अप्रमादाकरिता युद्ध करतो आणि प्रज्ञेकरिता युद्ध करतो. जेथे 'शील' संकटात सापडले असेल, तेथे संघर्ष करणे आवश्यक आहे.

**प्रश्न ४३७ : धम्मोपदेशकाची कर्तव्ये कोणती ?**

**उत्तर** - भगवंतानी धम्मोपदेशकाची पुढील प्रमुख कर्तव्ये सांगितलेली आहेत -

(१) धम्मोपदेशकाने मोकळ्या मनाने सत्य विचारार्थ पुढे मांडले पाहिजे.

(२) एखाद्याचे मन वळविण्यास लागणारा संयमशक्तीचा सद्गुण त्याच्या नसानसांत भिनलेला असावा.

(३) त्याने आपली योग्य ती मर्यादा राखावी व आपल्या वागणुकीत ठाम राहावे.

(४) थोरांची मैत्री संपादन करण्याच्या प्रयत्नात राहून आपल्या अहंपणाला चालना न देण्याचा त्याने प्रयत्न करावा.
अनैतिकपणे वागणाऱ्या व्यक्तीशी संगत करू नये.

(५) जे श्रवण करावयास येतात, त्यांचे त्याने सदिच्छापूर्वक स्वागत करावे. धम्मोपदेश द्वेषविरहित असला पाह्जिे.

(६) दुसऱ्यांचे बारीकसारीक दोष काढू नये. लोकापवादाची चर्चा करू नये. कटुशब्दांची पेरणी करू नये. दुसऱ्या शिष्यांची निर्भर्त्सना करू नये आणि त्यांच्या आचरणाची खरडपट्टी काढताना त्यांचे व्यक्तीगत नाव घेऊ नये.

(७) दोषरहित मनाने संपूर्ण जगाविषयी प्रेमभाव ठेवावे.

(८) भांडणाप्रत चाललेल्या विवादात भाग घेऊ नये अशा वेळी शांत व स्वस्थ राहावे.

(९) आपल्या कार्यात उत्कंठतेने मन घालावे. ते उत्साहाने व हर्षभरित आशेने परिपूर्ण असायला हवे.

(१०) पाण्याच्या शोधार्थ जो एखाद्या रूक्ष प्रदेशात विहीर खोदतो, त्या मनुष्यासारखेच राहावे. जोपर्यंत लोक त्याचे शब्द लक्षपूर्वक श्रवण करीत नाहीत तोपर्यंत त्याने जाणावे की, त्याला त्याच्या हृदयात खोल खणावे लागेल.

(११) ज्यांना समाधान देणारे व कल्याणकारी असे धम्मप्रवचन लक्षपूर्वक ऐकणे प्रिय वाटते अशा श्रोत्यांना त्यांनी आपल्या भोवती गोळा करावे. अविश्वास बाळगणाऱ्यांना वर उचलून धरावे व त्यांना सत्य स्वीकारावयास जागृत करावे. त्यांना हर्षभरित व आनंदित करून त्यांना प्रज्वलित करावे व नीतीचा बोध करावा.

(१२) त्याने स्वतःस तथागताचा सैनिक समजून दुष्ट माराला आपला शत्रू समजावे व त्यावर विजय मिळविण्याचा सदोदित प्रयत्न करावा.

**प्रश्न ४३८ भिक्खूला गृहत्यागी म्हणावे की संसारत्यागी? खरा गृहत्याग कोणता?**

**उत्तर** - जिवंतपणी कोणालाही संसारत्याग करणे शक्य नाही. भगवान बुद्धांनी भिक्खूना 'गृहत्याग करून विरागी व्हा' असेच सांगितले आहे शिवाय गृहत्यागाचे महत्त्व घरापासून दूर राहणे मात्र एवढेच नव्हे. गृहत्यागाचा खरा अर्थ आहे, वाईट गोष्टींचा त्याग, हिंसेचा त्याग, चोरीचा त्याग, मृषावादाचा त्याग, लोभाचा त्याग, क्रोधाचा त्याग तसेच अभिमानाचा त्याग यालाच व्यवहार - उच्छेद म्हणतात.

**प्रश्न ४३९ : एखादा भिक्खू स्वतःचा ज्ञानदीप स्वतः कशा प्रकारे होऊ शकतो?**

**उत्तर** - भगवंतांनी आपल्या शेवटच्या प्रवचनांत हा उपदेश केलेला आहे.

(१) कोणत्याही भिक्खूने आपल्या शरीराला असे समजावे की, जिवंत असेपर्यंत परिश्रमी, विचारशील व निग्रही होऊन शारीरिक तृष्णांपासून उद्भवणाऱ्या दुःखावर मात करायची आहे.

(२) त्याने संवेदनेला असे समजावे की, परिश्रमी, विवेकी व निग्रही होऊन, उद्भवणाऱ्या दुःखावर मात करायची आहे.

(३) जेव्हा तो विचार करतो किंवा ऊहापोह करतो तेव्हा त्याने आपल्या विचारांना असे समजावे की, परिश्रमी, विवेकी व निग्रही होऊन त्याला कल्पनांमुळे, तर्कामुळे किंवा भावनांमुळे तृष्णेपासून उद्भवणाऱ्या दुःखावर मात करायची आहे.

(४) जे कोणत्याही बाह्य मदतीवर विसंबून न राहता केवळ स्वतःवरच विसंबून राहून, स्वतःच्या दीपाप्रमाणे सत्यालाच बळकट धरून आणि केवळ सत्यामध्येच आपली मुक्ती शोधून व स्वतःशिवाय दुसऱ्या कोणाच्याही मदतीची अपेक्षा करणार नाहीत, तेच सर्वोच्च शिखरावर पोहोचतील! परंतु त्यांना शिकण्याची उत्कंठा असावयास पाहिजे. येणेप्रमाणे अत्त दीप भव ह्या उपदेशास भिक्खू आचरणात आणू शकतो.

**प्रश्न ४४० : गृहस्थवर्गाप्रती भिक्खूंची कर्तव्ये कोणती आहेत ?**

**उत्तर** - स्वतःच्या सदाचरणाने परमोच्च नैतिकतेचे उदाहरण गृहस्थांपुढे प्रस्तुत करणे; त्यांना धम्माचे शिक्षण देणे व मार्गदर्शन करणे; धम्माचा उपदेश करणे व त्याचे वेळोवेळी स्पष्टीकरण करणे; आजाऱ्यांजवळ तसेच लोकांच्या संकटाच्या वेळी त्यांना शांती मिळावी म्हणून परित्राणाचे पठण लोकांच्या आग्रहास्तव करणे; आणि लोकांना अव्याहतपणे सदाचरणाने वागावयास आग्रहाने सांगणे; लोकांना दुर्गुणांपासून परावृत्त करावयास झटणे; आणि त्यांच्याप्रती दयाशील व मृदू राहून संपूर्ण प्राणिमात्रांचे कल्याण साधण्यासाठी त्यांनी प्रयत्न करावयास हवेत.

**प्रश्न ४४१ : केवळ धम्मोपदेशच नव्हे तर भिक्खूंनी शारीरिक सेवासुद्धा करायला पाहिजे काय?**

**उत्तर** - होय. भिक्खूंनी केवळ वाणीने धम्मोपदेश करूनच नव्हे, तर जेथे आवश्यक असेल तेथे स्वतः शारीरिक कष्ट करूनही दुसऱ्याचे कल्याण साधले पाहिजे.

एकदा एका भिक्खूला पोटाचा आजार जडला. तो आपल्या मलमूत्रात पडून तळमळत होता. आयु. आनंदला घेऊन जेथे तो क्खू होता, तेथे भगवान येऊन पोहोचले. त्यांनी भिक्खूला विचारले - ''भिक्खू! तुला कोणता आजार झाला आहे?''

''भगवन्! पोटाचा आजार आहे''.

''भिक्खू! तुझा कोणी परिचारक आहे काय?''

''भगवन्! माझा कोणी परिचारक नाही''.

''भिक्खू! कोणीच तुझी सेवा करीत नाही?''

''भन्ते! मी भिक्खूंप्रति कोणत्याच प्रकारचा उपकार केलेला नाही, त्यामुळे तेसुद्धा माझी सेवा करीत नाहीत.''

तेव्हा भगवान आयु. आनंदला म्हणाले, ... ''आनंदा! जा, पाणी घेऊन ये, ह्या भिक्खूची आंघोळ करून देऊ या.'' आनंद पाणी घेऊन आले. भगवंतांनी पाणी टाकले व आयु. आनंदांनी धुऊन काढले. भगवंतांनी डोक्याकडून व आयु. आनंदांनी पायाकडून पकडून त्याला उचलून खाटेवर झोपविले. भगवंतांनी सर्व भिक्खूंना एकत्रित करून त्यांना उपदेश दिला, ... ''भिक्षुंनो! तुमची सेवा करायला तुमचे मातापिता नाहीत. तुम्ही जर एकमेकांची सेवा केली नाही, तर कोण करेल? जो आजाऱ्याची सेवा करतो, तो माझी सेवा करतो, जर उपाध्याय एखाद्या रोगाने पीडित असेल, तर जीवनभर त्याची सेवा करायला पाहिजे. आचार्य असो, शिष्य असो, गुरुबंधू असो, जर तो रोगी असेल तर त्याचीही सेवा करायला पाहिजे आणि जर उपाध्याय, आचार्य, शिष्य, गुरु बंधू ह्यांच्यापेक्षा कोणीही नसेल तर संघाची सेवा केली पाहिजे''.

### प्रश्न ४४२ : गुरुचा मान कसा राखावा?

**उत्तर –** भगवंतांनी आपल्या महानिर्वाणापूर्वी असा उपदेश दिला, ''भिक्खू किंवा भिक्खुणी, उपासक किंवा उपासिका, जे सातत्याने लहान मोठ्या कर्तव्यांची पूर्ती करून नियमांप्रमाणे आचरण करतात, तेच तथागतांचा सर्वात योग्य सन्मान करतात; त्यांना पवित्र मानतात व पूज्य मानतात; आणि अशा प्रकारे सर्वश्रेष्ठ श्रद्धांजली अर्पण करतात. यास्तव आनंदा! तू निरंतर लहान मोठ्या कर्तव्यांची पूर्ती करीत राहा आणि घालून दिलेल्या नियमांप्रमाणे वाग. अशा रीतीने आनंदा, तू गुरूचा मान राखशील.''

### प्रश्न ४४३ : 'आदर्श भिक्खू' कसा असावा?

**उत्तर –** जो कोणी चित्तमल धुवून टाकल्याशिवाय, तसेच सत्य आणि संयम न राखता काषायवस्त्रे धारण करतो, तो ती वस्त्रे परिधान करण्यास योग्य नाही. परंतु ज्याने सत्य आणि संयम ह्यांनी युक्त होऊन चित्तमलाचे परिमार्जन केले आहे, तोच खरोखर काषायवस्त्रे धारण करण्यास योग्य आहे.

प्रज्ञेशिवाय ध्यान शक्य नाही व ध्यानाशिवाय प्रज्ञा नाही. जो प्रज्ञावान आणि ज्ञानी आहे, असा पुरुष निर्वाणाच्या जवळ जातो. म्हणून भिक्खूंनी ध्यान करावे, अप्रमादी रहावे, आपले चित्त कामोपभोगात रमू देऊ नये. एका बुद्धिमान भिक्खूने इंद्रिय संयम, संतोष, प्रातिमोक्षाच्या नियमांचे पालन पवित्र अप्रमादी मित्रांची संगती यांचे आचरण करावे.

गौतमाच्या शिष्यांनी सदैव जागृत असावे आणि रात्रंदिवस धम्माचे ध्यान करावे. रात्रंदिवस स्वशरीराच्या सर्व क्रियांचे ध्यान करावे. करुणेच्या भावना करून त्यात आनंद मानावा. जो भिक्खू श्रद्धायुक्त असतो, शीलवान असतो, तो कुठेही गेला तरी सर्वत्र पूजनीय ठरतो.

**प्रश्न ४४४ : बौद्धांचा नेता कसा असावा?**

**उत्तर** - एकदा भगवंतांनी हस्तक परिव्राजकाला विचारले होते, ''हस्तका! तू एवढ्या मोठ्या परिषदेला कसे सांभाळतोस?''

हस्तकाने उत्तर दिले, ''भन्ते! काही लोक देण्याघेण्याने प्रसन्न राहतात, त्यांना काही देतघेत राहतो. काही खातीरदरीने प्रसन्न होतात, त्यांची खातीरदारी करतो. काही त्यांचे काम करून देण्याने प्रसन्न होतात, त्यांचे काम करून देतो. काही त्यांच्या बरोबरीचा व्यवहार केल्याने प्रसन्न राहतात, त्यांच्या बरोबरीचा व्यवहार करतो. भन्ते! माझे श्रीमंत कुळ आहे. दरिद्र्याचे तर कुणीच ऐकत नाही.''

त्यावर भगवंतांनी साधुकार देऊन म्हटले, ''मोठ्या परिषदेला सांभाळून आपल्या नेतृत्वाखाली ठेवण्याचा हाच उपाय आहे.''

**प्रश्न ४४४ (अ) : जर कुणी धम्माची गोष्ट मानायला तयार नसेल, तर त्याच्याकडून ती गोष्ट कबूल करवून घेऊन जबरदस्तीने त्याचे धम्मपरिवर्तन करावे का?**

**उत्तर** - अजिबात नाही. एकदा सुप्पीय परिव्राजक व त्याचा शिष्य ब्रह्मदत्त भगवतांच्या मागे राजगृहास जात होते ब्रह्मदत्त आपल्या गुरूजवळ भगवंतांची प्रशंसा करीत जात होता आणि त्याचा गुरू भगवंतांची निंदा करीत होता. दुसऱ्या दिवशी भिक्खूंनी ही गोष्ट भगवंतांना सांगितली. तेव्हा भगवंतांनी उपदेश केला, ''भिक्खूंनो! जर कुणी माझी निंदा करीत असेल, धम्माची निंदा करीत असेल, संघाची निंदा करीत असेल, तर त्याबद्दल तुम्ही वाईट वाटून घेऊ नका. त्यामुळे तुमचे मनात जळणूक व्हायला नको. त्यामुळे तुम्हाला क्रोध येऊ नये. त्याची जी गोष्ट अयोग्य असेल तिला तुम्ही अयोग्य म्हणावे. जर कोणी माझी किंवा धम्माची किंवा संघाची प्रशंसा करीत असेल तर तुम्ही त्याला विचारायला पाहिजे की, तो का प्रशंसा करीत आहे. परंतु त्यामुळे तुम्हाला विशेष हर्ष होऊ देऊ नका आणि तुम्ही आनंदाने फुलून जाऊ नका.''

कोणीही भगवंतांवर टीका केल्यास त्याला निरुत्साहित न करता, आणि तो धम्माची गोष्ट कबूल करीत नसेल तरीसुद्धा त्याचा द्वेष न बाळगता, भिक्खूंनी केवळ सत्य गोष्ट जाणून घ्यावयाचे प्रयत्न करावेत, हीच भगवंतांची शिकवण होती.

## बौद्ध उपासक

**प्रश्न ४४५ : बौद्ध गृहस्थाला आणि बौद्ध स्त्रीला काय म्हणतात?**

**उत्तर** - अनुक्रमे बौद्ध उपासक आणि बौद्ध उपासिका.

**प्रश्न ४४६ : दोन शरण ग्रहण केलेला उपासक व त्रिशरण ग्रहण केलेला सर्वप्रथम उपासक कोण होता?**

**उत्तर** – तपस्सु व भल्लिक हे दोघे व्यापारी केवळ द्विशरण उपासक होते. भगवंतांना संबोधी प्राप्त झाल्यावर त्यांनी सात दिवसापर्यंत बोधिवृक्षाखाली बसून सात वेळा पुनःपुन्हा श्रेष्ठ सुखाचा आस्वाद घेतला. ज्यावेळी तपस्सु व भल्लिक नावाचे दोन व्यापारी प्रवास करीत करीत जवळच्या रस्त्याने जाऊ लागले, त्यांनी त्या धीरगंभीर व उदात्त श्रमणाला पाहिले व त्यांच्याजवळ जाऊन आदरपूर्वक त्यांना पोळी व शहद अर्पण केले. तेच संबोधी प्राप्त झाल्यानंतरचे प्रथम अन्नदान होते. त्यानंतर भगवंतांनी त्यांना मुक्तीचा मार्ग समजावून सांगितला. भगवंतांच्या परमपावित्र्याची जाणीव झाल्याने ते दोघेही व्यापारी मोठ्या आदरयुक्त भावाने नतमस्तक झाले व म्हणाले, ''भगवन्, आम्ही आपल्याला व आपण सांगितलेल्या धम्माला शरण जातो''. त्यावेळी संघाची स्थापना झालेली नव्हती, म्हणून ते द्विवाचिक उपासक झाले.

वाराणशीमधील एका श्रीमंत व्यापाऱ्याचा 'यश' नावाचा मुलगा सर्वप्रथम त्रिशरण घेऊन प्रव्रजित झाला. त्यानंतर त्याचा पिता त्रिशरण ग्रहण करून 'उपासक' झाला. हाच पहिला त्रिशरणागत उपासक होय. त्यापुढे यशाचे चार मित्र, जे वाराणशीच्या धनिक लोकांचे पुत्र होते, त्यांनीही विचार केला की, जी गोष्ट यशाकरिता चांगली आहे तीच त्यांच्याकरिताही उत्तम असणार. म्हणून त्यांनीही भगवंतांकडे जाऊन दीक्षा ग्रहण केली. त्यांची नावे अशी - विमल, सुबाहु, पूर्णजित आणि गवाम्पति.

**प्रश्न ४४७ : प्रथम उपासिका कोणत्या?**

**उत्तर** – वाराणशीचा तरुण कुलपुत्र यश याची माता व पत्नी ह्या सर्वप्रथम उपासिका व शरणागत स्त्रिया होत.

**प्रश्न ४४८ : भिक्खू आणि उपासक ह्यांच्यात मुख्य भेद कोणता?**

**उत्तर** – पंचशीलाचे नियम भिक्खू व उपासक दोघांनाही पाळावयाचे असतात. परंतु भिक्खूला ते व्रतरूप असतात. ते मोडल्यास तो शिक्षेस पात्र होतो. उपासकाकरिता ते अनुकरणीय असतात. भिक्खू म्हणजे बुद्धांच्या आदर्श समाजाचा मार्ग दाखविणारा प्रकाश होय आणि भिक्खूच्या पावलावर पाऊल ठेवून जाणे, हे उपासकाचे ध्येय असते. भिक्खु स्वतःच चारित्र्यवान, धार्मिक ज्ञानसंपन्न अशी व्यक्ती असली पाहिजे आणि ह्यासाठी त्याने व्यक्तिगत साधना करण्याचा सतत प्रयत्न केला पाहिजे. त्याने लोकांना मार्गदर्शन करून त्यांची सेवा केली पाहिजे आणि उपासकाने त्याच्या उपदेशाप्रमाणे वागायचा आटोकाट प्रयत्न केला पाहिजे. तथागताने ज्या धम्माचा उपदेश दिला, संघ हा एक त्याचा साकार सामाजिक नमूना आहे.

**प्रश्न ४४९ : दोन तऱ्हेच्या दीक्षा कोणत्या?**

**उत्तर** – प्रथम दीक्षा भिक्खूची, त्यांना सामुहिक रूपाने संघ म्हणतात. दुसरी दीक्षा उपासकाची म्हणजे गृहस्थ बौद्धाची. भिक्खू व उपासक यांच्या जीवनांत प्रामुख्याने चार फरक आहेत - (१) उपासक गृहस्थच राहतो, परंतु भिक्खू गृहत्यागी परिव्राजक होतो.

(२) भिक्खूकरिता व्रत आहेत व त्यांचे पालन न केल्याने शिक्षा मिळू शकते. उपासकाकरिता केवळ शील आहेत, ज्यांचे तो आपल्या सामर्थ्यानुसार अधिकात अधिक पालन करायचे प्रयत्न करतो.

(३) उपासक संपत्ती ठेवू शकतो. परंतु भिक्खू संपत्तीचा मालक होऊ शकत नाही.

(४) उपासक बनावयास कोण्या संस्काराची आवश्यकता नाही. भिक्खूकरिता उपसंपन्न होणे आवश्यक असते. उपासकास जेव्हा वाटेल तेव्हा तो भिक्खू होऊ शकतो.

**प्रश्न ४५० : भगवंतांनी गृहस्थांना आणि भिक्खूंना दिलेले उपदेश भिन्नभिन्न आहेत काय?**

**उत्तर** - होय. एकदा भगवंत जेतवनारामामध्ये थांबले असताना धम्मिक नावाचा उपासक पाचशे इतर उपासकांसह भगवंताकडे आला व भिक्खूंचे आणि गृहस्थांचे शील काय आहे, असे विचारू लागला. भगवंतानी तेव्हा असे स्पष्ट केले की, भिक्खूंचे शील येणेप्रमाणे आहे-

(१) मध्यान्हानंतर भिक्षाटनास (पिण्डपाताकरिता) जाऊ नका, असमय भिक्षाटन करणाऱ्यासाठी जाळे पसरलेले असते.

(२) भिक्षाटनास निघण्यापूर्वी आपल्या मनास रूप, शब्द, गंध, रस आणि स्पर्श यांच्या आसक्तीपासून मुक्त करा.

(३) भिक्षाटनानंतर एकटेच परत येऊन एकांतात स्थिर चित्ताने चिंतन करा.

(४) सज्जनांशी बोलचाल करताना केवळ धम्माविषयीच बोला.

(५) भिक्षा, विहार, शयनासन व पाण्याने साफसफाई करणे इत्यादी गोष्टींना साधनापेक्षा अधिक महत्त्व देऊ नका.

(६) जर कोणी भिक्खू अनासक्त होऊन या सर्व गोष्टींचा उपयोग करील, तर तो पाण्यात राहूनही त्यापासून अलिप्त राहणाऱ्या कमळाप्रमाणे अलिप्त राहील.

त्यानंतर त्यांनी गृहस्थांसाठी उपदेशिलेल्या शीलांचे वर्णन केले, ते असे -

(१) प्राणिहिंसा करू नका, चोरी करू नका, खोटे बोलू नका, व्यभिचार करू नका आणि मादक पदार्थांचे सेवन करू नका.

(२) उपोसथांच्या दिवशी उपोसथव्रत ग्रहण करून अष्टशीलांचे पालन करा.

(३) प्रातःकाळच्या पवित्र समयी श्रद्धायुक्त चित्ताने अष्टशील ग्रहण करून त्यांचा बुद्धिपरस्पर व्यवहार करा.

(४) भिक्खूंना यथासामर्थ्य भोजन आणि पेय पदार्थांचे दान करा.

(५) आपल्या मातापित्याची सेवा करा, जीविकेचे चांगले साधन ठेवा.

(६) या प्रकारे जो गृहस्थ दृढतापूर्वक धम्माचे पालन करील त्यास दिव्य लोक प्राप्त होईल. यावरून हे स्पष्ट होते की, भिक्षु आणि गृहस्थांचा एकच धर्म आहे. भिक्खूंकरिता शील व्रतांप्रमाणे अनिवार्य आहेत, परंतु गृहस्थांकरिता ते स्वेच्छेने ग्रहण केलेले आहेत.

## गृहस्थांचे जीवन-नियम

**प्रश्न ४५१ : भगवंतांनी गृहस्थ जीवनाला अधिक सुखी बनविण्याकरिता कोणता उपदेश दिलेला आहे?**

**उत्तर** - भगवंतानी गृहस्थ जीवनाला अधिक सुखी बनविण्याकरिता अनेक उपदेश दिलेले आहेत. त्यापैकी सिगालोवाद असा आहे -

एकदा भगवान राजगृहातील वेणुवन कलन्द-निवासामध्ये विहार करीत असताना त्यांनी शृंगाल नावाच्या गृहपती-पुत्राला सकाळी उठून ओल्या वस्त्रांनिशी हात जोडून पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर, ऊर्ध्व आणि अधोदिशा ह्यांना नमस्कार करताना पाहिले. तेव्हा त्यांनी विचारले-

''गृहपती-पुत्र, सकाळी उठून रोज तू अशा प्रकारे नमस्कार करीत असतोस काय?'' तो म्हणाला, ''भन्ते! माझ्या पित्याने मरताना मला अशा प्रकारे सर्व दिशांना नमस्कार करायला सांगितले होते. मी माझ्या पित्याच्या आदेशाचे आदरपूर्वक पालन करतो.''

भगवान म्हणाले, ''गृहपती-पुत्र, तुला आपल्या पित्याचा आदेश बरोबर समजलेला नाही. मातापित्याला पूर्व दिशा मानावे. गुरूला दक्षिण दिशा मानावे. पुत्र, पत्नीला पश्चिम दिशा मानावे. मित्र अमात्यांना उत्तर दिशा, नोकरचाकरांना अधोदिशा आणि साधुसंतांना उर्ध्व दिशा मानावे.''

गृहपती-पुत्र! मातापित्याची सेवा पाच प्रकारे केली पाहिजे

(१) ह्यांनी माझे पालन-पोषण केले आहे, तेव्हा मलाही ह्यांचे पालन-पोषण केले पाहिजे.
(२) ह्यांनी माझ्यावर उपकार केले आहेत, तेव्हा मलाही त्यांच्यावर उपकार केले पाहिजेत.
(३) ह्यांनी कुलपरंपरेला जोपासून ठेवले आहेत, तेव्हा मलाही कुलपरंपरेला जोपासले पाहिजे.
(४) ह्यांनी मला आपल्या संपत्तीचा उत्तराधिकारी बनविले आहे, तेव्हा मलाही उत्तराधिकार (मुलाकडे) सोपविला पाहिजे.
(५) हे श्राद्ध (श्रद्धापूर्वक दान देणे) करीत राहिले आहेत, तेव्हा मलाही श्राद्ध करीत राहिले पाहिजे.

अशी पाच प्रकारे सेवा केल्याने मातापिता आपल्या संततीवर पाच प्रकारे अनुग्रह करतात -

(१) ते आपल्या संततीला पापकर्मापासून दूर ठेवतात.
(२) ते त्यांना पुण्यकर्मास लावतात.
(३) ते त्यांना विद्या (शिल्प) शिकवितात.
(४) ते त्यांचा विवाहयोग्य स्त्रीबरोबर करून देतात, आणि
(५) योग्य वेळ येताच आपला उत्तराधिकार संततीवर सोपवितात.

''गृहपती-पुत्र! शिष्याने पाच प्रकारे गुरुरूपी दक्षिण दिशेची सेवा करायला पाहिजे.''

(१) शिष्याने नेहमी तत्पर राहून सेवा करायला पाहिजे.
(२) सर्व प्रकारे सेवा करायला पाहिजे.
(३) सुश्रूषा
(४) परिचर्या करायला पाहिजे, आणि
(५) गुरूकडून आदरपूर्वक शिल्प (विद्या) शिकले पाहिजे.

''गृहपती-पुत्र! अशी पाच प्रकारे सेवा केल्याने गुरू पाच प्रकारे शिष्यांवर अनुग्रह करतो''-

(१) तो शिष्याला विनयशील बनवितो.
(२) चांगल्या प्रकारे उत्तम शिक्षा प्रदान करतो.
(३) 'माझी विद्या परिपूर्ण राहील' असा विचार करून सर्व तऱ्हेची विद्या सविस्तरपणे शिकवितो.
(४) मित्र-अमात्यांना उत्तम प्रतिपादन करतो आणि
(५) दिशांचे रक्षण करतो.

गृहपती-पुत्र! पाच प्रकारांनी पत्नीरूपी पश्चिम दिशेची सेवा करायला पाहिजे -

(१) सन्मान करून, (२) अपमान न करता, (३) मिथ्याचारापासून अलिप्त राहून, (४) ऐश्वर्य प्रदान करून, (५) अलंकारादी भूषणे देऊन पत्नीची सेवा करायला पाहिजे म्हणजे पत्नी पतीवर पाच प्रकारे अनुग्रह करते -
(१) घरकाम उत्तम प्रकारे करते, (२) नोकरचाकरांना ताब्यात ठेवते, (३) व्यभिचारापासून अलिप्त राहते, (४) पतीने मिळविलेल्या संपत्तीचे रक्षण करते, तसेच (५) सर्व कामे आळसरहित व दक्षतेने करते.

"गृहपती-पुत्र!" पाच प्रकारांनी मित्र-अमात्यस्वरूपी उत्तर दिशेची सेवा करायला पाहिजे"

(१) दानाने, (२) प्रिय-वाणीने, (३) कामकाजात साहाय्य करून, (४) समानतेचा व्यवहार करून व (५) विश्वासपात्र होऊन अशी पाच प्रकारे सेवा केल्याने मित्र-अमात्य पाच प्रत्युपकार करतात-
(१) काही चूक झाल्यास रक्षण करतात.
(२) चुकलेल्या मित्राच्या संपत्तीचे रक्षण करतात.
(३) भयभीत झाल्यास रक्षण करतात.
(४) संकटकाळीदेखील सोडून जात नाहीत आणि
(५) ज्याला असे मित्र आहेत, त्याचा लोकदेखील आदर करतात.

"गृहपती-पुत्र!" पाच प्रकारांनी गृहस्वामीने नोकरचाकर रूपी अधोदिशेची देखरेख करायला पाहिजे -

(१) त्यांच्या सामर्थ्यानुसार त्यांच्याकडून कामे घेऊन.
(२) खाणेपिणे व वेतन देऊन.
(३) आजारी पडल्यास त्यांची सुश्रूषा करून.
(४) फलादी उत्तम रस देऊन, आणि
(५) वेळेवर सुटी देऊन त्यांची काळजी घ्यायला पाहिजे.

"गृहपती-पुत्र!" अशा पाच प्रकारांनी काळजी घेतलेले नोकरचाकर पाच प्रकारे आपल्या घरधन्याची सेवा करतात -

(१) सकाळी घरधन्याच्या आधीच झोपून उठतात.
(२) धनी झोपल्यानंतर ते झोपतात.
(३) मालक जे देईल ते आनंदाने घेतात.
(४) आपआपले काम उत्तम प्रकारे करतात, आणि

(५) मालकाचे गुणगान करून त्याची कीर्ती पसरवितात.

"गृहपती-पुत्र!'' पाच प्रकारांनी श्रमण-ब्राह्मणरूपी ऊर्ध्वदिशेची सेवा करायला पाहिजे

(१) मैत्रीभावपूर्ण शारीरिक कर्म करून.
(२) मैत्रीभावपूर्ण वाचेने
(३) मैत्रीभावपूर्ण मनाने त्यांची सेवा करायला पाहिजे.
(४) भिक्खूंसाठी दार नेहमी खुले असावे. तसेच
(५) त्यांना गरजेच्या वस्तू दिल्या गेल्या पाहिजेत.

'गृहपती-पुत्र!'' अशा प्रकारे सेवा केलेले श्रमण-ब्राह्मण पाच प्रकारांनी अनुग्रह करतात-

(१) पापकर्मापासून रक्षण करतात.
(२) कल्याणकारी गोष्टी करण्यास प्रवृत्त करतात.
(३) श्रवण न केलेल्या गोष्टी सांगतात.
(४) विद्येला दृढ करतात, आणि
(५) सन्मार्ग दाखवितात.

**प्रश्न ४५२ : भगवंतांच्या उपदेशाचे पालन केल्याने जेव्हा गृहस्थही परम निर्वाणाचा साक्षात्कार करू शकतात, तेव्हा कठोर धुताग्ङ निरर्थक नव्हे काय?**

**उत्तर** - नाही. धुताग्ङ म्हणजे चीवर धारण करून प्रव्रजित होणे. हे जरी कठोर असले तरी निरर्थक नाही. धुताग्ङ पालन करण्याचे २८ गुण आहेत, त्यापैकी १२ येणेप्रमाणे

(१) धुताग्ङ पालन केल्याने जीविका शुद्ध होते.
(२) फल सुखद असते.
(३) पालन करणाऱ्यामध्ये कोणतेच अवगुण राहात नाहीत.
(४) तो इतरांना त्रास देत नाही.
(५) तो निर्भय असतो.
(६) धुताग्ङाचे साधन धम्माकडेच नेत जाते.
(७) धुताग्ङाचे पालन करणाऱ्याची रक्षा केली जाते.
(८) मनुष्य इच्छिलेले लाभ करू शकतो.
(९) मनुष्य पाहिजे त्याचा लाभ करू शकतो.
(१०) आत्मसंयम करणे शिकतो.
(११) स्वच्छंद व मोकळ्या विचारांचा असतो.
(१२) सांसरीक राग, द्वेष, अभिमान, अकुशल, कुशंका, अकर्मण्यता, असंतोष इ. वाईट गुणांचा त्याग करून सहनशक्ती येते.

अशा प्रकारे धुताग्ङाचे पुण्य अतुल्य असून अनंत आहेत. धुताग्ङ सर्व दुःखाचा अंत करून निर्वाणाप्रत पोहोचविते.

**प्रश्न ४५३ : उपासकाचे दहा गुण कोणते?**

**उत्तर** - उपासकाचे दहा गुण येणेप्रमाणे -

(१) आपल्या भिक्खूंच्याप्रती सहानुभूती असणारा.
(२) धम्माला सर्वात श्रेष्ठ समजणारा.

(३) यथाशक्ती दान देणारा.
(४) धम्माचा ऱ्हास होत आहे, असे पाहून त्याच्या भरभराटीकरिता पूर्णपणे प्रयत्नशील व दक्ष असणारा,
(५) सत्य धारण करणारा
(६) स्वतःचे कुतूहल जागवून दुसऱ्या धर्माच्या फंदात न पडणारा.
(७) शरीराने तसेच वाचेने पूर्णपणे संयमी असणारा.
(८) शांतिप्रिय
(९) एकताप्रिय
(१०) केवळ दाखविण्यासाठी धम्माचा उदो उदो न करता, यथार्थपणे बुद्ध, धम्म आणि संघाला शरण जाणारा.

**प्रश्न ४५४ : गृहस्थ राहणे चांगले की भिक्खू बनणे चांगले आहे ?**

**उत्तर** - भगवंत म्हणतात, "गृहस्थ असो किंवा भिक्खू असो तो जर चांगल्या मार्गाचा अवलंब करीत असेल तर समान रूपाने ज्ञान, धम्म व पुण्य ह्यांचा भागीदार होऊ शकतो. तरीपण प्रव्रज्येमध्ये अनेक गुण आहेत. ज्याप्रमाणे यथेच्छ वर देणाऱ्या मणिरत्नाच्या मूल्याचा अंदाज लावला जाऊ शकत नाही, त्याचप्रमाणेच प्रव्रज्येच्या अनेक गुणांचा अंदाज लावला जाऊ शकत नाही.

**प्रश्न ४५५ : बौद्धाने खऱ्या गुणांचे वर्णन कसे करावे?**

**उत्तर** - कोणत्याही बाह्य आचरणाला महत्त्व नाही; कर्म करावयाच्या मागे असलेला हेतू, हीच खरी महत्त्वाची गोष्ट होय. उदाहरणार्थ -

एखाद्या श्रीमंत मनुष्याने भव्य बुद्धमंदिरे किंवा विहार बांधण्यात, भ. बुद्धांचे पुतळे उभारण्यात, समारंभात व मिरवणुकीमध्ये, उपाध्यायांना भोजनदान करण्यात, गरिबांना दानधर्म करण्यात किंवा वृक्षारोपणात, पाणपोई बांधण्यात किंवा प्रवाशांकरिता रस्त्याच्या बाजूने विश्रांतिगृहे बांधण्यात जरी लाखो रुपये खर्च केलेले असतील, तथापि जर ते थाटमाट दाखविण्याकरिता किंवा लोकांनी त्याची स्तुती करावी किंवा तद्वत इतर कोणत्यातरी स्वार्थी हेतुस्तव केलेले असतील तर त्याला त्यामानाने फारच कमी पुण्य मिळेल. परंतु जो दयाभावनेने ह्या सर्व गोष्टींऐवजी लहानात लहान गोष्ट करतो उदा. - आपल्या मित्रांवर प्रेम करणे - तो अधिक पुण्य संपादन करतो. एखाद्याने वाईट हेतू मनात ठेवून जर एखादे कुशल कर्म केले, तर त्याचे पुण्य करणाऱ्यास मिळत नाही; पण दुसऱ्यांना मात्र त्याचा फायदा मिळतो. जो दुसऱ्याने केलेल्या चांगल्या कामाला मान्यता देतो व ज्याचा दयाभाव दिखाऊ नसून खरा असतो, त्याला पुण्याचा वाटा मिळतो. हाच नियम अकुशल कर्मांना लागू होतो.

**प्रश्न ४५६ : आयु. आनंद आणि मातंग कन्या यांची जातिभेदविरोधी कथा कोणती?**

**उत्तर** - एकदा आयुष्मान आनंदाला फार तहान लागली. तेव्हा विहिरीच्या बाजूने जात असता त्याने प्रकृती नावाच्या मातंग जातीच्या मुलीला पाणी काढताना पाहिले व तिला

पाणी द्यावयास सांगितले. तेव्हा तिने म्हटले की, 'ती अगदीच क्षूद्र जातीची असल्यामुळे तिच्या हातचे पाणी घेतल्यास तो बाटला जाईल'. परंतु आयुष्मान आनंदाने उत्तर दिले, मी तुझी जात विचारीत नसून पाणी मागत आहे. तेव्हा मातंग कन्येचे हृदय आनंदाने भरून आले व तिने त्यास पाणी पाजले. पुढे भ. बुद्धांचे दर्शन झाल्यावर त्यांनी तिला आशीर्वाद दिले. भगवंतांनी कसल्याही तऱ्हेचा जातिभेद न करता संघामध्ये सर्वांना सारखाच दर्जा दिला. त्यांच्या संघात अनेक जातीचे भिक्खू होते व नीच जातीचे भिक्खूदेखील नावारूपास चढले. उपाली नावाचा न्हावी 'विनयधर' म्हणून प्रसिद्ध झाला. सोपाक नावाचा चांडाळ, प्रकृती मातंग कन्या, अंगुलिमाल डाकू, इत्यादी पतित लोक होते. धम्मपदात पुढील गाथा आहे :

**न जच्चा वृषल होति न जच्चा होति ब्राह्मणो।**
**कम्मना वसलो होति कम्मना होति ब्राह्मणो ।।**

(जातीमुळे कोणी वृषल (शूद्र) होत नाही, किंवा कोणी ब्राह्मण होत नाही. कर्माने वृषल (शूद्र) होतो आणि कर्मानेच ब्राह्मण होतो.)

## स्त्रीचा धार्मिक दर्जा

**प्रश्न ४५७ : बौद्धजनांत स्त्रीचा धार्मिक दर्जा काय आहे?**

**उत्तर** – आपल्या धम्मानुसार स्त्रियांना पूर्णतः माणसांच्या बरोबरीचे स्थान आहे. भ. बुद्धांनी चुल्लवेदल्ल सुत्तांत म्हटले आहे, "अर्हत्वपदास नेणारा पावित्र्याचा परमोच्च मार्ग जसा माणसांकरिता मोकळा आहे, तसाच स्त्रियांसाठी मोकळा आहे."

**प्रश्न ४५८ : बौद्ध धम्मात स्त्रियांचे काय स्थान आहे?**

**उत्तर** – एकदा भगवान श्रावस्तीमधील जेतवनात विहार करीत असताना कोसल देशाचा राजा प्रसेनजित भगवंतांकडे गेला व भगवंतांना नमस्कार करून एका बाजूला बसला. काही वेळानंतर एका मनुष्याने राजाजवळ जाऊन त्यांच्या कानात सांगितले - "महाराज! मल्लिका देवीला कन्यारत्न झाले आहे." ते ऐकून राजा प्रसेनजित खिन्न झाला. भगवंतांनी राजाला खिन्नतेचे कारण विचारले व नंतर म्हटले -

"हे राजा! स्त्रीपण पुरुषांपेक्षा श्रेष्ठ होऊ शकते अशी स्त्री मधुरभाषीणी, शीलवती, सासऱ्याला देव मानणारी व पतिव्रता असते. ती ज्या बालकास जन्म देते, तो पुढे शूर, छत्रपती राजा होतो. अशा भाग्यशाली स्त्रीचा पुत्र राज्यावर शासन करतो."

अनेक बालकांना 'महापुरुष' बनविणाऱ्या त्यांच्याच माता असतात.

**प्रश्न ४५९ : स्त्रीजातीवर बौद्धधम्माचा जो प्रभाव पडला त्याविषयी आधुनिक टीकाकार काय म्हणतात?**

**उत्तर** – सर लेपेल ग्रिफिन म्हणतात, "इतर कोणत्याही संप्रदायापेक्षा बौद्धधम्माने स्त्रियांच्या सुखाकरिता आणि दास्यमुक्तीकरिता अधिक कार्य केलेले आहे."

**प्रश्न ४६० : बुद्धधम्मात स्त्रियांचे भिक्खुणी बनणे निषिद्ध मानले आहे काय? जर नसेल तर आजकालसुद्धा भिक्खुणी बनतात काय?**

**उत्तर** – सिद्धान्ततः भ. बुद्धांना स्त्रियांच्या भिक्खुणी बनण्यावर काहीच आपत्ती नव्हती. परंतु

त्यांनी ह्या गोष्टीचा व्यावहारिकदृष्ट्या विचार केला व ह्याविषयी उत्साह दाखविला नाही. जेव्हा त्यांची माता प्रजापती गौतमी अनेक इतर शाक्य स्त्रियांसहित भिक्षुणी बनण्याची अनुमती मिळावी म्हणून प्रार्थना करावयास भगवंतांजवळ गेली, तेव्हा ते म्हणाले,

"गौतमी! तू भिक्षुणी बनण्याचा विचार सोडून दे!"

परंतु प्रजापती गौतमी आपल्या निश्चयावर अढळ राहिली व भगवंतांना पुनःपुनः विनंती करू लागली. तेव्हा स्थविर आनंद ह्यांनी तिच्यातर्फे अतिशय विनवणी केली. तेव्हा भ. बुद्धांनी अनिच्छेनेच प्रजापती गौतमी व इतर शाक्य स्त्रियांना उपसंपन्न होण्याची अनुमती दिली. परंतु त्याबरोबरच त्यांनी अशी अट घातली की, भिक्खुणींना भिक्खूपेक्षा अधिक अटीचे पालन करावे लागेल; परंतु त्या अटींमध्ये खालील दोन अटींचाही समावेश झालेला दिसतो -

(१) शंभर वर्षां आधी उपसंपन्न झालेल्या भिक्खुणीलासुद्धा त्याच दिवशी उपसंपन्न झालेल्या भिक्खूला आपल्यापेक्षा ज्येष्ठ मानून यथायोग्य आदर द्यावा लागेल.
(२) भिक्खूने भिक्खुणींना काहीही म्हटले, तरी भिक्खुणी भिक्षुला त्याबद्दल काहीच म्हणू शकणार नाहीत.

ह्यावरून अशी शंका येते की, ह्या पक्षपातपूर्ण अटी भगवंतांनी घातल्या नसाव्यात व बऱ्याच वर्षांनंतर भिक्खुंनी त्यांचा समावेश केला असावा.

भिक्खु-शासनाप्रमाणे भिक्खुणी-शासन चिरस्थायी झाले नाही. सिंहल, सयाम, बर्मा वगैरे सर्व स्थविरवादी बौद्ध देशांतून ते लुप्त झाले.

अतिशय आश्चर्याची गोष्ट अशी की, एका सिंहल भिक्खुणीद्वारा चीन देशात नेलेली भिक्खुणी-परंपरा आजही तेथे विद्यमान आहे.

## पतिमोक्ख

**प्रश्न ४६१ : पारमिता म्हणजे काय व त्या किती आहेत?**

**उत्तर** - संघाच्या शिस्तीसाठी व मार्गदर्शनासाठी घालून दिलेल्या नियमांना 'पतिमोक्ख' असे म्हणतात.

एकंदर २२७ नियम आहेत. त्या सर्व पुढे दिलेल्या चार प्रमुख भागांच्या अंतर्गत येतात.

(अ) प्रमुख शिस्तीचे नियम म्हणजे पातिमोक्ख संवर शील. पतिमोक्ख संवर शील.
(ब) इंद्रियांचे नियमन करण्याचे नियम म्हणजे इंद्रिय संवरशील.
(क) अन्न, आहार, वस्त्र किंवा चीवरे इत्यादींना प्रामाणिकपणे मिळविण्याचे आणि त्यांचा योग्य उपयोग करण्याचे नियम म्हणजे पच्चय सन्निस्सित शील.
(ड) प्रमादविरहित जीवन जगावयास केलेले मार्गदर्शन म्हणजे आजीवपरी शुद्ध शील.

**प्रश्न ४६२ : आठ शीलाशिवाय (अष्टशील) आणखी कोणत्या दोन शील भिक्खूंकरिता कटाक्षाने बंधनकारक आहेत?**

**उत्तर** - (९) उच्च, मौलिक शयनायन यांच्यापासून परावृत्त राहण्याची मी शपथ घेतो.

(१०) चांदी किंवा सोने स्विकारण्यापासून परावृत्त राहण्याची मी शपथ घेतो.

सर्व पारमिता किंवा 'भिक्खू-शील' किंवा दहा पारमिता सर्वच भिक्खूंना, श्रमणेरांना किंवा नवशिक्या भिक्खूंना बंधनकारक आहेत, परंतु सामान्य उपासकांकरिता त्या ऐच्छिक आहेत.

**प्रश्न ४६३ : विनय-पिटक किंवा प्रातिमोक्षाचा उपदेश सर्वत्र उघडपणे न सांगण्याची प्रथा होती, त्यास कारणे कोणती?**

**उत्तर –** विनय पिटक म्हणजेच प्रातिमोक्षातील उपदेश, उघडपणे न सांगण्याची तीन कारणे आहेत -

(१) पूर्वीच्या भिक्खूंपासून अशी प्रथा चालत आलेली आहे की, प्रातिमोक्षाचा उपदेश भिक्खूंनी आपसांतच मर्यादित ठेवायला पाहिजे. दुसऱ्यांसमोर उघड करू नये.

(२) धम्माच्या गौरवाच्या विचाराकरिता प्रातिमोक्षाचा उपदेश भिक्खूंनी आपसांतच मर्यादित ठेवायला पाहिजे, आणि

(३) भिक्खू-पदाच्या गौरवाच्या विचाराने प्रातिमोक्षाचा उपदेश भिक्खूंनी आपसातच मर्यादित ठेवायला पाहिजे.

(४) धम्म अत्यंत गौरवपूर्ण व श्रेष्ठ आहे. तो सर्वांनाच पूर्णपणे लक्षात येतो असे नाही. तेव्हा इतका श्रेष्ठ धम्म निंदकाच्या हाती पडून निंदेचा व अपमानाचा वाटेकरी होऊ नये, यासाठी आपसातच मर्यादित ठेवावा.

(५) भिक्खूभाव अतुल्य, अत्यंत श्रेष्ठ व अमूल्य आहे. हा भिक्खूभाव जाणकार व योग्यच व्यक्तीच्या ठायी आदरभावाने राहू शकतो.

**प्रश्न ४६४ : भिक्खूंनी ज्यांना कटाक्षाने टाळावयास पाहिजेतच असे अपराध कोणते?**

**उत्तर –** स्वतःसाठी केलेल्या कोणत्याही व्रताचा भंग केल्यास त्याला भिक्खूने धम्माविरुद्ध केलेला अपराध समजण्यात येतो. म्हणून भिक्खूंनी पुढील गोष्टी कटाक्षाने टाळाव्यात -

* प्राणिहिंसा करणे
* चोरी करणे
* लैंगिक समागम
* खोटे बोलणे
* मादक पदार्थांचे सेवन आणि अवेळी जेवण
* नृत्य, गायन आणि अयोग्य खेळ किंवा प्रदर्शने
* हारतुरे, सुगंधी द्रव्ये, अत्तर इ. चा उपयोग करणे
* उंच व रुंद असे आरामदेही बिछाने, कोच किंवा बैठकी ह्यांचा उपयोग करणे
* सोने, चांदी, कच्चे धान्य आणि मांस, स्त्रिया आणि सेविका
* गुलाम, गुरेढोरे, हत्ती इत्यादींचा भेटीदाखल स्वीकार करणे
* रहस्यपूर्ण सामर्थ्याचे खोटे प्रदर्शन करून कोणालाही फसविणे
* दुसऱ्याची बदनामी करणे
* कठोर आणि लज्जास्पद भाषेचा उपयोग करणे
* निरर्थक बोलणे

* कपोलकल्पित अतिरंजित गोष्टी आणि कथा वाचणे किंवा ऐकणे
* सामान्य लोकांचे निरोप इकडून तिकडे वाहून नेणे
* मालमत्तेची खरेदी-विक्री करणे
* फसविणे, लाच देणे, कपट आणि लबाडी करणे
* दुसऱ्यांना कोंडून ठेवणे, लुबाडणे आणि धमकी देणे
* दैवाचे भाकीत सांगणे, फलज्योतिष आणि हस्तरेखा ह्यांनी भविष्य वर्तवणे आणि जी शास्त्रे जादूच्या संज्ञेखाली अंतर्भूत होतात अशा शास्त्रानुसार आचरण करणे

ह्यांपैकी कोणतीही गोष्ट केल्यास ती निर्वाणप्राप्तिचा संकल्प करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या प्रगतीला बाधक ठरेल.

**प्रश्न ४६५ : असे कोणते अपराध आहेत की, ज्यामुळे भिक्खूची संघातून हकालपट्टी करायलाच पाहिजे?**

**उत्तर** – होय, असे अपराधपण आहेत की, जे करणारा अपराधी भिक्खू संघाचा सभासद राहू शकत नाही. एवढेच नाही तर तो भिक्खूसुद्धा राहू शकत नाही. असे अपराध चार प्रकारचे आहेत. त्यांना पारजिका म्हणतात -

(१) भिक्खूंनी स्त्री-सहवास करणे
(२) एवढी मोठी चोरी करणे की, जिच्याकरिता राज्यशासन न्यायपूर्वक दंड देऊ शकेल
(३) मनुष्यवध करणे
(४) चमत्कार दाखवू शकतो, अशी खोटी प्रौढी मारणे.

यांपैकी कोणताही अपराध केल्यास त्या भिक्खूचे संघाचे सभासदत्व रद्द होते व त्याला भिक्खू म्हणून राहता येत नाही.

थायलंड वगैरे देशात जेथे भिक्खू-शासनाला राजाज्ञेचे समर्थन प्राप्त आहे, तेथे ह्या नियमांचे पालन होऊ शकते. परंतु इतर देशात जेथे विनयातील नियमांना सरकारी पाठबळ प्राप्त नाही, तेथे ह्या नियमांचे पालन होणे शक्य नाही.

अपराधी भिक्खूला पुढील दंड देण्यात येऊ शकतात -

(१) तर्जनीय कर्म, (२) नियस्स कर्म, (३) प्रवार्जनीय कर्म, (४) उत्क्षेपणीय कर्म, (५) प्रतिसारणीय कर्म, (६) परीवास कर्म.

परंतु संघाद्वारे क्षमा केल्यावर त्या भिक्खूला आवाहन कर्माद्वारे परत संघात प्रवेश मिळू शकतो.

**प्रश्न ४६६ : विवादाला** (Controversy) **प्रोत्साहन देणाऱ्या भिक्खूंविषयी भ. बुद्धांनी काय म्हटले आहे ?**

**उत्तर** – पुष्कळ प्रवचनांमधून त्यांनी ह्या सवयीला अतिशय अपायकारक असे घोषित करून तिचा निषेध केला. जे भिक्खू आपली उच्च प्रतिभा दाखविण्यात गूढ कल्पना व व्यर्थ ऊहापोह करण्यात आणि काथ्याकुट करून खटके उडविण्यात वेळ घालवीत होते, त्यांच्याकरिता त्यांनी प्रायश्चित्ताचे नियम घालून दिले.

**प्रश्न ४६७ : भिक्षुंकरिता बनवलेले नियम सर्व काळी, सर्व देशांना, सारख्याच प्रमाणात लागू पडणारे आहेत काय?**

**उत्तर** - नाही. पुष्कळ नियम केवळ समयोचित आहेत; तसेच अनेक नियम प्रदेशातील कालमानानुसार मर्यादित आहेत. ह्या नियमांत देशकालानुसार परिवर्तन करता येते.

**प्रश्न ४६८: आपल्या दोषांची सार्वजनिकरीत्या कबुली भिक्खूंनी कशा प्रकारे द्यावी?**

**उत्तर** - प्रत्येक पौर्णिमेला आणि अमावस्येला 'प्रातिमोक्ष' संस्कार विधी आयोजित केला जातो. ज्याच्या हातून प्रमाद घडला असेल, असा प्रत्येक भिक्खू प्रातिमोक्षाकरिता भरलेल्या परिषदेमध्ये आपल्या प्रमादाची कबुली देतो आणि त्यावर जसा दंड सांगितला जाईल, तसेच प्रायश्चित्त ग्रहण करतो.

भिक्खूकडून एखादा प्रमाद घडला तर त्याचे स्मरण ठेवून, त्याच्या कलंकापासून मुक्त होण्याकरिता, त्याने प्रमाद कबूल करावा. कोणताही प्रमाद कबूल केल्याने त्याचे गांभीर्य कमी होते. प्रातिमोक्षाचे पठण करण्याचा विधी असा - एक आदरणीय भिक्खू संघासमोर जाहीर करतो, 'आज उपोसथाचा दिवस आहे. मी प्रातिमोक्षाचे पठण करीन. ज्याच्या हातून प्रमाद घडला असेल, त्या भिक्खूने तो कबूल करावा. जर कुणाच्याही हातून प्रमाद घडला नसेल तर सर्वांनी गप्प राहावे. तुमच्या गप्प राहण्याने मी समजेन की, सर्वच भिक्खू प्रमादरहित, परिशुद्ध आहेत.'

तीन वेळा प्रश्न विचारल्यावरही एखाद्या भिक्खूने आपल्या स्मरणात असलेल्या एखाद्या प्रमादाची कबुली दिली नाही, तर तो बुद्धिपुरस्सर खोटे बोलल्याचे गृहीत धरले जाईल. यास्तव प्रमाद घडल्यावर जो भिक्खू त्याचे स्मरण ठेवतो व त्यापासून परिशुद्ध होण्याची इच्छा करतो, त्याने आपला प्रमाद कबूल करावयास पाहिजे. तसे केल्याने भिक्खू प्रमादापासून परिशुद्ध झाला, असे समजण्यात यावे.

**प्रश्न ४६९ : उपोसथाचे दिवस कोणते?**

**उत्तर** - उपोसथांच्या दिवशी उपासक आणि उपासिका अष्टशीलांचे पालन करतात. प्रत्येक शुक्ल पक्षातील अष्टमी, चतुर्दशी व पोर्णिमा हे उपोसथाचे दिवस होत. दर पंधरवड्यातील अष्टमी व चतुर्दशी किंवा पंचदिशी (पोर्णिमा किंवा अमावस्या) या दिवशी एकत्र येऊन धार्मिक प्रवचन करणे, यालाच उपोसथव्रत म्हणतात. आधीच नेमून दिलेल्या भिक्खूने परिषदेला उद्देशून धम्माचे प्रतिपादन करावे आणि सत्कर्मामुळे प्राप्त होणाऱ्या परमसुखाची महिमा सांगून त्यांना प्रसन्न करावे.

**प्रश्न ४७० : भिक्खूंनी स्त्रियांशी कसे वागावे ?**

**उत्तर** - अंगदी हाच प्रश्न भिक्खूंनी भगवंतांना विचारला होता, 'भन्ते! आम्ही स्त्रियांशी कसे वागाव ?' भगवंत म्हणाले, 'स्त्रियांकडे पाहूच नका. पाहावयाचा प्रसंग आलाच तर त्यांच्याशी संभाषण करू नका. संभाषण करण्याची वेळ आलीच तर संयम राखून शुद्ध अंतःकरणाने संभाषण करा.'

स्वतःशीच असा संकल्प करा की, ''मी एक श्रमण या नात्याने या पापी जगात अशा

तऱ्हेने राहीन, ज्याप्रमाणे चिखलात राहूनही कमळाचे पान चिखलरहित निष्कलंक राहते''.

'स्त्री वृद्ध असल्यास तिला मातेसमान माना. ती तरुण असल्यास आपल्या भगिनीसमान माना व ती फार लहान असल्यास तिला आपल्या कन्येसमान माना.'

'जो श्रमण कोण्या स्त्रीला 'स्त्री' म्हणून पाहतो तो प्रतिज्ञेचा भंग करतो व त्या क्षणापासूनच त्याचे तथागताचे शिष्यत्व नष्ट होते.'

'मनुष्याची कामतृष्णा फार बलवान आहे व तिला तितकेच भ्याले पाहिजे. यास्तव चिकाटीरूपी धनुष्य घेऊन प्रज्ञारूपी बाणांनी सज्ज राहा.'

'सद्विचारांच्या शिरस्त्राणाने डोके झाकून पंचतृष्णेशी (काम, क्रोध, मोह, मद, मत्सर) दृढ निश्चयाने लढा.'

'स्त्रीच्या लोभस हसण्याला, तसेच अश्रूंनाही आपल्या शत्रूसमान समजा. तिचे मोहक रूप, तिची हातांची हावभावपूर्ण हालचाल आणि तिचा मुक्त केशसंभार माणसाच्या हृदयाला पिंजऱ्यात अडकविण्याकरिता घडवलेले असतात.'

'म्हणून सांगतो की, आत्मसंयम करा, मनाला उच्छृंखल होण्यासाठी फाजील मोकळीक देऊ नका.'

**प्रश्न ४७१ भ. बुद्धांनी भिक्खू-नियम बनविताना कोणत्या गोष्टी लक्षात घेतल्या होत्या?**

**उत्तर** – भगवंतांनी सर्व भिक्खू-नियम त्यावेळच्या लोकांचे राहणीमान, देश व काल ह्याचा विचार करूनच त्यानुसार बनविले होते, आणि लोकांचे राहणीमान, देश व काल ह्यांच्यात जर बदल झाला तर त्यांच्यात रद्दबदल करण्याची संघाला आवश्यकता वाटल्यास तसे करण्याची संघाला मुभा दिली होती.

**प्रश्न ४७२ नवीन परिस्थितीमध्ये भिक्खू-संघाकरिता नवीन नियम बनविण्याची आवश्यकता पडली नाही काय?**

**उत्तर** – होय. तशी आवश्यकता पडली व नवीन नियम वेळोवेळी बनतच राहिले. एकदा भ. बुद्ध पूर्वान्हसमयी चीवर धारण करून, भिक्षापात्र व चीवर घेऊन मेण्डक गृहपतीकडे गेले आणि अंथरलेल्या बिछायतीवर भिक्खू-संघासहीत जाऊन बसले. मेण्डक गृहपतीने गवळ्यांना आज्ञा दिली की, प्रत्येकाने एकेका गायीसहित एकेका भिक्खूजवळ उभे राहावे व भिक्खूंना धारोष्ण दुधाचे भोजन करू द्यावे. परंतु संकोच वाटल्यामुळे धारोष्ण दूध पिण्याकरिता भिक्खू टाळाटाळ करू लागले. तेव्हा भ. बुद्धांनी आज्ञा दिली, भिक्खूंनो, दुधाचे सेवन करा, आस्वाद घ्या.

एका बाजूस बसलेल्या मेण्डक गृहपतीने भगवंतांना विनंती केली, 'भन्ते! अन्नपाण्याशिवाय असलेले ओसाड व दुष्कर मार्गसुद्धा आहेत. शिदोरीशिवाय तेथून प्रवास करणे कठीण आहे. भन्ते! आपण जर शिदोरीची अनुज्ञा द्याल तर फार बरे होईल.'

तेव्हा भगवंतांनी धार्मिक कथा सांगून भिक्खूंना आमंत्रित केले – 'भिक्खूंनो! पाच गोरसाची अनुज्ञा देता – दूध, दही, ताक, लोणी आणि तूप.'

'भिक्खूंनो! काही अन्नजलरहित ओसाड मार्ग आहेत. अशा मार्गाने बीना शिदोरीशिवाय

जाणे दुष्कर आहे. भिक्खूंनो! ह्यास्तव आज्ञा देतो की, ज्यांना तांदूळ न्यायची इच्छा आहे, ज्यांना मूग न्यायची इच्छा आहे, ज्यांना उडीद, मीठ, गूळ, तेल, तूप आदी जे-जे पदार्थ न्यायची इच्छा आहे, त्यांनी ते-ते पदार्थ बरोबर घेऊन जावेत.'

'भिक्खूंनो! कोणी श्रद्धाळू गृहस्थ भिक्खूंच्या हातात सोने किंवा सोन्याचे नाणे देतात. त्यांची अशी इच्छा असते की, भिक्खूला जे आवश्यक आणि योग्य असेल ते त्याने विकत घ्यावे. ह्यास्तव भिक्खूंनो! त्यांच्या इच्छेप्रमाणे योग्य असे पदार्थ घेऊन त्याचा उपयोग करण्याची मी अनुज्ञा देतो. परंतु भिक्खूंनो, सोने, चांदी ह्यांचा उपयोग करणे किंवा संग्रह करणे कोणत्याही परिस्थितीत योग्य नाही, असे मी निक्षून सांगतो.'

कालमानानुसार भिक्खूंनी त्याविषयी आपल्याच बुद्धीने निर्णय घेणे योग्य आहे.

**प्रश्न ४७३ : भिक्खू सोन्याचांदीला स्पर्श करू शकतो काय?**

**उत्तर** - आमचे प्रामाणिक मत आहे की, भगवंतांनी सोन्याचांदीला 'स्पर्श करण्याचा' निषेध केला नसून 'उपभोग' व 'संग्रह' करण्याचा निषेध केला आहे. एखादा भिक्खू पैशाला स्पर्श न करताही त्याचा पाहिजे तसा उपभोग व संग्रह करू शकतो. आणि एखादा रुपये पैशाला स्पर्श करूनही त्याचा 'उपभोग' व 'संग्रह' करण्यापासून दूर राहू शकतो. एखादा भिक्खू असेही करतो की, पैसे तर आपल्या कपाटात किंवा टेबलाच्या ड्रॉवरमध्ये ठेवतो; परंतु जेव्हा कोणालाही काही द्यावयाचे असते, तेव्हा तो एखाद्या गृहस्थ मुलाला बोलावून त्याच्याद्वारे पैशाचा देण्याघेण्याचा व्यवहार करतो. त्याला असे वाटते की, त्याने पैशाला स्पर्श केलाच नाही. परंतु खरे पाहिले असता त्यांच्या डोक्यात रुपयाशिवाय दुसरे काहीच राहत नाही.

परंतु इतर काही व्यवस्था नसल्यास, सहजभावाने रुपया-पैशांचा व्यवहार करणेच बुद्धिसंगत आहे.

# भिक्खू संघातील विशिष्ट व्यक्ती

**प्रश्न ४७४ : धम्मसेनापती आयुष्मान सारिपुत्तांनी धम्माची सेवा कशा प्रकारे केली?**

**उत्तर** - संजयमुनींच्या अडीचशे शिष्यांपैकी सारिपुत्त व मोद्गल्यायन हे दोन ब्राह्मण पट्टशिष्य होते. एकदा आयु. अश्वजित नावाचा भगवंतांचा अनुयायी फारच संयमाने एकेक पाऊल टाकीत जात असलेला सारिपुत्तांना दिसला. तेव्हा तो कोणाचा शिष्य आहे व त्याच्या धम्माचे मर्म काय आहे, असे त्याला विचारले. 'मी तथागताचा शिष्य आहे' असे सांगून त्याने एक गाथा म्हटली - **ये धम्मा हेतुप्पभवा तेसं हेतुं तथागतो आह ।**
**तेसञ्च यो निरोधो एवं वादि महासमणो'ति ॥**

(अर्थ - कारणापासून उत्पन्न झालेले जे पदार्थ म्हणजेच पंचस्कंधादिक दुःखद पदार्थ यांचे कारण तथागताने सांगितलेले आहे, व त्यांचा निरोध कसा होतो हेही सांगितले आहे, हेच महाश्रमणाचे मत होय.) व येणेप्रमाणे अश्वजिताने धम्माचे मर्म संक्षिप्तपणे सांगितले. ते ऐकून सारिपुत्राला तेथल्या तेथेच विमल, विरज, सत्यचक्षु प्राप्त झाला. त्यानंतर सारिपुत्त व मोद्गल्लायन यांनी भगवंतांकडे जाऊन दीक्षा घेतली.

सारिपुत्ताची धीरगंभीर प्रकृती व प्रज्ञावंत वाणी यामुळे ते सर्वांचे प्रिय झाले. भगवंतांनी त्यांच्याविषयी उद्गार काढलेले होते, 'जगज्जेत्या सम्राटाचा ज्येष्ठ पुत्र ज्याप्रमाणे सम्राटाच्या मुख्य सेनापतीप्रमाणे त्याला मदत करतो, त्याप्रमाणे धम्मचक्राचे प्रवर्तन करावयास माझा मुख्य अनुयायी होऊन सारिपुत्त मला मदत करील.'
सारिपुत्तांची धम्मसेवा प्रामुख्याने गणली जाते.

अनाथपिण्डिकाने दान केलेल्या जेतवन विहाराचे बांधकाम त्यांच्या मार्गदर्शनाखाली करण्यात आले. महाज्ञानी भिक्खूंमध्ये सारिपुत्त सर्वश्रेष्ठ होते. सेल ब्राह्मणाने भगवंताला, 'आपला सेनापती कोण? असा प्रश्न केला असता, त्यांनी म्हटले -

**मया पवत्तितं चक्कं धम्मचक्कं अनुत्तरं ।**
**सारिपुत्तो अनुवत्तेति अनजातो तथागतं ।।**

(मी प्रस्थापित केलेले धम्मचक्र सारिपुत्त चालवीत आहे. तथागताच्या मागोमाग जाणारा तो आहे.)

**प्रश्न ४७५ : आयुष्मान उपालीच्या प्रव्रज्येचे विशेष महत्त्व ते कोणते?**

**उत्तर** - भद्दीय, अनुरुद्ध, आनंद, भृगु, किम्बिल, देवदत्त आणि उपाली ह्यांची प्रव्रज्या बरोबरच झाली. ह्यांच्यापैकी पहिले सहा जण शाक्य (क्षत्रिय) होते. परंतु उपाली न्हावी होता. शाक्य-कुमार उपाली न्हाव्यासह जेव्हा भगवंताजवळ पोहोचले, तेव्हा ते म्हणाले - 'भन्ते! आम्ही शाक्य अहंकारी आहोत. हा उपाली न्हावी नेहमीच आमचा दास राहिला आहे. भगवंतांनी प्रथम ह्याला दीक्षा देऊन प्रव्रजित करावे, जेणेकरून आम्ही ह्याला आदरपूर्वक वंदन करू, ह्याला हात जोडून नमस्कार करू. ह्यामुळे आम्हा शाक्यांचा क्षत्रिय असल्याचा जातीयवादी अभिमान गळून पडेल.'

तेव्हा भगवंतांनी उपाली न्हाव्याला प्रथम प्रव्रजित करून शाक्यकुमारांना नंतर प्रव्रजित केले. भगवंतांच्या महापरिनिर्वाणानंतर जी प्रथम संगीती झाली होती, त्यावेळी महाकश्यप यांनी विनयासंबंधी प्रश्नांचे निरसन करण्याकरिता ह्याच महास्थविर विनयधर उपालीची निवड केली होती. विनयधर भिक्खूश्रावकांत उपाली सर्वश्रेष्ठ होते.

**प्रश्न ४७६ : आनंद महास्थविरांनी कोणती सेवा केली?**

**उत्तर** - शुद्धोदनाचा धाकटा भाऊ अमितोदन याचा आनंद हा मुलगा होता. त्याने पुण्णमन्तानिपुत्त याचे शिष्यत्व पत्करून सोतापत्ति पदास प्राप्त केले. भगवंतांच्या संबोधिप्राप्तीनंतर वीस वर्षांनी आनंदास आपल्यासोबत नेहमीसाठी राहावयास निवडले व पुढील पंचवीस वर्षे आ. आनंद भगवंतासोबत सावलीप्रमाणे राहिले; आणि परिचारकाप्रमाणे सेवा केली. महाप्रजापती गौतमी हिची स्वतः भिक्खुणी व्हावयाची फार इच्छा होती. तसेच स्त्रियांनादेखील धम्मलाभ व्हावा या उद्देशाने भिक्खूणी संघाची स्थापना व्हावयास पाहिजे, असे तिला मनःपूर्वक वाटत होते. त्याकरिता वारंवार विनंती करूनही भगवंतांनी तसे केले नाही, तेव्हा आ. आनंदांनी अनेकदा प्रयत्न करून भगवंतांचे मन वळवले व त्यामुळे भिक्खूणी संघाची स्थापना झाली व भिक्खूणी त्यांना अतिशय आदराचे स्थान देत असत.

भगवंतांच्या महापरिनिर्वाण समयी आ. आनंदांनी भगवंतांची फारच सेवा केली.

तथागतांचे महापरिनिर्वाण एखाद्या महानगराशेजारी व्हायला पाहिजे असे त्यांना (आनंदांना) वाटत होते, जेणेकरून भगवंतांच्या असंख्य अनुयायांना त्यांचे अंतिम दर्शन घेता यावे. जेव्हा प्रथम संगीती झाली, तेव्हा महास्थविर आनंदांना सूत्रपठन करावयास व त्यांची तपासणी करावयास प्रमुख नेमण्यात आले. कारण भगवंतासोबत सर्वांत अधिक वास्तव्य त्यांचेच होते. बहुतेक सुत्तांच्या आरंभी ''एवं मे सुतं'' (असे मी ऐकले आहे) हे वाक्य असते. प्रथम संगीतीमध्ये महाकाश्यपांनी, 'तुम्ही काय ऐकले आहे?' असा आ. आनंदाना प्रश्न विचारला असता त्यांनी ''एवं मे सुत'' असे म्हणून भगवंताकडून ऐकलेली सुत्रे सांगितली. बहुश्रुत भिक्खूश्रावकांत, स्मृतिमान भिक्खूश्रावकांत, गतिमान भिक्खूश्रावकांत, धृतिमान भिक्खूश्रावकांत आणि उपस्थायक भिक्खूश्रावकांत आनंद महास्थविर सर्वश्रेष्ठ होते.

### प्रश्न ४७७ : अंगुलिमाल बौद्ध भिक्खू कसा बनला?

**उत्तर** – तो कोशल राजाच्या पुरोहिताचा पुत्र होता. त्याचे नाव अहिंसक होते. तो अत्यंत आज्ञाधारक, उद्योगी आणि प्रियभाषी होता. त्यामुळे त्याच्याविषयी द्वेषभावना जागृत होऊन त्याच्या सहपाठी विद्यार्थ्यांनी त्याच्याविरुद्ध गुरु मातेला मध्ये गोवून खोटाच आरोप लावला. त्यावर त्याच्या आचार्यांनी त्याला शिक्षा करावयाच्या उद्देशाने गुरुदक्षिणा मागितली ती अशी की त्याने शेकडो लोकांचा वध करावा (जेणेकरून कोणीतरी त्याचाही वध करील.) त्यानुसार अहिंसकाने जंगलात राहून आडवाटेने येणाऱ्या-जाणाऱ्या प्रवाशांचा वध करून त्यांच्या करंगळ्यांची माळ करणे सुरू केले. त्यामुळे त्यास अंगुलिमाल म्हणू लागले. त्याची संपूर्ण राज्यांत मोठीच भीती निर्माण झाली होती.

भगवंतांनी त्याच वाटेने जाऊन त्यास उपदेश केला. त्यामुळे प्रभावित होऊन त्याने श्रमणाची दीक्षा घेतली. लोकांना जेव्हा समजले की, हा भिक्खूच अंगुलिमाल आहे, तेव्हा त्यांनी त्याला दगड मारून जखमी केले. परंतु ते सर्व दुःख सहन करीत अंगुलिमालाने धम्माचरणांत प्रगती केली व मोठे नाव कमाविले.

### प्रश्न ४७८ भ. बुद्धाचे अष्टिमहाश्रावक नावाचे प्रसिद्ध असलेले शिष्य त्यांच्या कोणत्या गुणांबद्दल प्रसिद्ध होते?

**उत्तर** – नावलौकिक संपादिलेले त्यांचे ऐंशी शिष्य असीती महासावक (अष्टिमहाश्रावक) नावाने ओळखले जात. त्यांची नावे अंगुत्तर निकायाच्या एकनिपात ग्रंथातील एकदग्ग प्रकरणांतील ऐंशी गाथांमध्ये सापडतात. त्यांची वैशिष्ट्ये थोडक्यात येणेप्रमाणे -

१. आज्ञात कौण्डिन्य - दीर्घकाल संघात राहणाऱ्या भिक्खूश्रावकांत सर्वप्रथम
२. सारिपुत्र - महाज्ञानी भिक्खूश्रावकांत श्रेष्ठ
३. महामोग्गल्लान - बुद्धिमान भिक्खूश्रावकांत श्रेष्ठ
४. महाकश्यप - अत्यंत साधेपणाने राहणाऱ्या भिक्खूश्रावकांत श्रेष्ठ
५. अनुरुद्ध - दिव्यचक्षू भिक्खूश्रावकांत श्रेष्ठ (भगवंतांचा चुलतभाऊ)
६. भद्दीय - उच्चकुलांत जन्मलेल्या भिक्खूश्रावकांत श्रेष्ठ
७. लघुकंटक भद्दीय - मंजुभाषी (लघुकंटक = अतिशय ठेंगणा)
८. पिंडोल भारद्वान - सिंहगर्जना करणाऱ्या भिक्खूश्रावकांत श्रेष्ठ

(मुद्याची गोष्ट सांगून ती प्रतिपादन करण्याचे सामर्थ्य असणे म्हणजे सिंहगर्जना)

९. पुण्ण मन्तानिपुत्र - सर्वश्रेष्ठ धम्मोपदेशक

१०. महाकात्यायन - संक्षिप्त उपदेशाला विस्ताराने अर्थ करणाऱ्यांत सर्वश्रेष्ठ

११. चुळ्ळपंथक - मनोमय देह उत्पन्न करणाऱ्यात आणि चेतो विवर्त कुशलांत सर्वश्रेष्ठ

१२. महापंथक - संज्ञाविवर्तकुशलांत सर्वश्रेष्ठ

१३. सुभूती - निक्लेशवृत्ती व दक्षिणार्ह (= मैत्रीपूर्ण चित्ताने भिक्षा ग्रहण करणे)

१४. खदिरवनियखेत - आरण्यक

१५. कांक्षारे वत - ध्यानावरत

१६. सोण कोळिविस - उत्साही

१७. सोण कुटिवर्ण - प्रेमळ भाषण

१८. सीवली - लाभ त्वरित मिळणाऱ्या भिक्खूश्रावकांत श्रेष्ठ

१९. वक्कलि - श्रद्धावान

२०. राहुल (पुत्र) - नियम शिकण्याची आस्था बाळगण्यात सर्वश्रेष्ठ

२१. राष्ट्रपाल - श्रद्धेने प्रव्रज्या घेतलेल्या भिक्खूश्रावकांत श्रेष्ठ

२२. कुण्डधान - सर्वप्रथम आमंत्रण मिळणारा.

२३. वंगीस - प्रतिभाशाली (त्वरित काव्य करणारा)

२४. उपसेन वंगतपुत्र - सर्वांना प्रसन्न करणाऱ्यांत श्रेष्ठ

२५. दब्ब मल्लपुत्र - शयनासनांची व्यवस्था लावणाऱ्यांत श्रेष्ठ

२६. पिलिंदेवच्छ - देवतांना प्रिय

२७. बाहिय दारूचीदिय - तत्काळ बोध करून घेणारा.

२८. कुमार काश्यप - उत्तम भाषण करणारा

२९. महाकोट्ठीत - प्रतिसंभिदा ज्ञान झालेल्यांत (त्रिपिटक - प्रतिसंभिदामग्ग)

३०. आनंद - बहुश्रुत, स्मृतिमान, गतिमान, धृतिमान, उपस्थायक
(गतिमान = उपदेश त्वरित लक्षात घेणारा)

३१. उरुवेल काश्यप - महापरिवार भिक्खूश्रावाकांत श्रेष्ठ

३२. काळुदायी - कुलप्रसादक (गृहस्थांच्या कुटुंबांना सर्वांना प्रिय होणारा)

३३. बक्कुल - निरोगी

३४. सोभित - पूर्वजन्म आठवणाऱ्यांत (ध्यानसमाधीमुळे)

३५. उपालि - विनयधर

३६. नंदक - भिक्खुणींना उपदेश करणाऱ्यांत

३७. नंद - इंद्रियांचे रक्षण करणाऱ्यांत (स्मृतिसंप्रजन्ययुक्त)

३८. महाकप्पिन - उपदेश करणाऱ्यांत

३९. सागत - तेजोधातुकुशल (= समाधि साधून दुसऱ्यांना दिपवून टाकणारा)

४०. राध - वक्त्या भिक्खूश्रावकांत श्रेष्ठ

४१. मोघराज - रूक्ष चीवर धारण करणाऱ्यांत

भिक्खूणींमध्ये सर्वश्रेष्ठ :

४२. महाप्रजापती गोतमी - चिरप्रव्रजित भिक्खूणीश्राविकांत श्रेष्ठ
४३. खेमा (= क्षेमा) - महाप्रज्ञ
४४. उप्पलवण्णा - ऋद्धिमती (उत्पलवणा)
४५. पटाचारा - विनयधरा
४६. धम्मदिन्ना - धम्मोपदेशक
४७. नंदा - ध्यानरत
४८. सोणा - उत्साही
४९. सकुला - दिव्यचक्षू प्राप्त
५०. भद्दा कुंडलकेसा - तत्काळ बोध प्राप्त झालेल्यात
५१. भद्दा कपिलानी - पूर्वजन्माची आठवण करणाऱ्यात
५२. भद्दा कच्चाना : (यशोधरा) - अभिज्ञालाभिनी (नानातऱ्हेच्या सिद्धि)
५३. किसा गोतमी - रूक्षचीवर धारण करणाऱ्यात
५४. सिगाल माता - श्रद्धाळू

उपासकांमध्ये सर्वश्रेष्ठ

५५. तपस्सु - प्रथम शरण गेलेल्या उपासकांत दोघेही एकदमच
५६. भल्लिक - प्रथम शरण गेलेल्या उपासकांत दोघेही एकदमच
५७. अनाथपिंडिक - दायक उपासकांत सर्वश्रेष्ठ
५८. चित्त (चित्त) गृहपति - धर्मोपदेश करणाऱ्या उपासक श्रावकांत
५९. हत्थक आळवक - चार संग्रहांनी लोकसंग्रह करणाऱ्यांत श्रेष्ठ (दानाने, प्रियवचनाने, अर्थचर्येने आणि समानात्मतेने)
६०. महानाम शाक्य - उत्तम दान देणाऱ्यांत
६१. उग्ग गृहपति वैशालिक - आवडते पदार्थ देणाऱ्यात
६२. उग्गत गृहपति हस्तिग्रामक - उपस्थायक उपासकांत
६३. शूर अंबट्ठ - ज्ञानयुक्त श्रद्धा ठेवणाऱ्या
६४. जीवक कौमारभृत्य - वैयक्तिक श्रद्धा ठेवणाऱ्यांत (वैद्य)
६५. नकुलापिता गृहपति - दुसऱ्याचे समाधान करणाऱ्यांत

उपासिकांमध्ये सर्वश्रेष्ठ

६६. सुजाता सेनानीदुहिता - प्रथम शरण गेलेल्या उपासकांत पहिली.
६७. विशाखा मिगारमाता - दायिका उपासिकांत श्रेष्ठ
६८. खुज्जत्तरा - बहुश्रुत उपासिकांत
६९. सामावती - मैत्रीध्यान करणाऱ्या उपासिकांत
७०. उत्तरा नंदमाता - ध्यानरत उपासिकांत
७१. सुप्पवासा कोलियदुहिता - उत्तम अन्न देणाऱ्या उपासिकांत
७२. सुप्पिया उपासिका - आजाऱ्यांची सुश्रूषा करणाऱ्या उपासिकांत
७३. कातियानी - ज्ञानयुक्त श्रद्धा ठेवणाऱ्या उपासिकांत

७४. नकुलमाता - दुसऱ्याचे समाधान करणाऱ्या उपासिकांत श्रेष्ठ

७५. काळी उपासिका - केवळ ऐकून (न भेटता) भक्त झालेल्यामध्ये कुररधरिका श्रेष्ठ यांशिवाय ५ गाथा यांमधील काहींच्या नावे अधिक जोडल्या आहे. येणेप्रमाणे ८० ऐवजी ७५ नावेच सापडतात.

नावास आलेले अंत्यज कुळांतील भिक्खू येणेप्रमाणे :

१) सुणीत २) सोपाक

**प्रश्न ४७९ : अज्ञात कौण्डिन्य कोण होते?**

**उत्तर** – ते द्रोणवस्तू या नगरातील श्रीमंत ब्राह्मण कुळातील होते व त्यांचे नाव सुदत्त होते. त्यांनी वेद आणि इतर ब्राह्मणशास्त्रांचे अध्ययन केलेले होते. शुद्धोदन राजाने ज्या आठ ब्राह्मणांना बोलावून सिद्धार्थाच्या बालपणी भविष्य सांगावयाची विनंती केली, त्यांच्यापैकी ते एक होते. भगवंतांना बुद्धत्व प्राप्त झाल्यावर सारनाथ येथे धम्मचक्र प्रवर्तनाचे जे प्रथम प्रवचन त्यांनी दिले, त्या पाच भिक्खूंमध्ये कौण्डिन्यांना धम्माचे मर्म सर्वप्रथम समजले. तेव्हा भगवान उद्गारले, ''अञ्ञासि वत भो कोण्डञ्ञो'' म्हणजे कौण्डिण्याने जाणले! तेव्हापासून त्यांचे नाव 'अज्ञात कोण्डिण्य' असे पडले. दीर्घकाळ संघात राहणाऱ्या भिक्खूश्रावकात कौडिण्य प्रथम होते.

**प्रश्न ४८० : महामोग्गलानाचे संघामध्ये कोणते स्थान होते?**

**उत्तर** – महामोद्गल्यायन (किंवा महामोग्गल्लान किंवा मोग्गल्लान) हे सारिपुत्ताचे (सारिपुत्राचे) खूपच पक्के मित्र होते. सारिपुत्रांना भगवंताविषयी संबोधीबद्दल बातमी कळल्यावर ते मोग्गल्लानाकडे गेले व ते दोघेही एकदम भगवंतांचे शिष्य झाले. त्यापूर्वी ते संजय वेलट्ठीपुत्राचे शिष्य होते. त्यानंतर संजयच्य अडीचशे शिष्यांनीही भगवंतांच्या धम्माची दीक्षा घेतली. सारिपुत्र व मोग्गल्लान यांना भगवंतांचे अग्रश्रावक म्हणत असत. बुद्धिमान भिक्खूश्रावकांत महामोग्गल्लान सर्वश्रेष्ठ होते.

**प्रश्न ४८१ :मोग्गलिपुत्त तिस्स या सम्राट अशोककालीन भिक्खूची कामगिरी कोणती?**

**उत्तर** – ते सम्राट अशोकाचे धर्मगुरू होते. ते अत्यंत निर्भिक असल्यामुळे सम्राट अशोकाच्या काळी त्यांनी सम्राटाचे अत्यंत योग्य प्रकारे मार्गदर्शन केले. त्यांनी केलेली प्रमुख कामगिरी अशी -

(१) भिक्खूसंघामध्ये सामील झालेल्या ऐतखाऊ वृत्तीच्या इतर मतवाद्यांची संघातून हकालपट्टी करण्यात आली त्यामुळे जी अबौद्ध मते बुद्धधम्माच्या नावावर खपविली जात होती त्यावर पायबंद बसला. अशा ६०,००० भिक्खूंची हकालपट्टी करण्यात आली.

(२) धम्मसंगीतीचे आयोजन झाले व धम्माच्या शुद्धीकरणास फारच मोठे साहाय्य झाले.

(३) सम्राट अशोकाने दिलेल्या राजाश्रयाचा जो आधार मिळाला, त्याचे योग्य चीज करावयास महाथेरो तिस्स यांची खूपच महत्त्वाची मदत मिळाली.

(४) सम्राट अशोकाने त्यांच्यामुळेच स्वतःच्या मुलास व मुलीस धम्मकार्यास वाहून टाकले. राजपुत्र महेन्द्र व राजकन्या संघमित्रा यांनी प्रव्रज्या ग्रहण करून, श्रीलंकेस जाऊन तेथे

धम्माचा प्रचार-प्रसार केला.

(५) इतर देशांमध्ये भिक्खूंना पाठवून धम्माचा प्रसार राजाश्रयाद्वारे करावयास महाथेरो तिस्स यांची मोठीच मदत मिळाली.

**प्रश्न ४८२ : नागसेन महास्थविरांनी बौद्ध साहित्याला कसे समृद्ध केले?**

**उत्तर -** हिमालयाच्या पायथ्याशी पंजाबमधील कजंगल गावी सोनुत्तर ब्राह्मणाच्या कुळात इ.स. पूर्व १५० मध्ये नागसेनाचा जन्म झाला. त्यांनी वेदाध्ययन घरीच केले. विद्वान भिक्खू रोहण यांच्याशी परिचय झाल्यावर त्यांचा कल बौद्धधम्माकडे झुकला. ते हिमालयांतील विजम्भवस्तूस व नंतर रक्षिततल येथे गेले. तेथे गुरूने त्यांना समग्र बौद्ध वाङ्मय कण्ठस्थ करावयाच्या पद्धतीने शिकवले.

मिनाण्डर (मिलिंद) या ग्रीक राजाचे राज्य यमुनेपासून समुद्रापर्यंत पसरलेले होते. व राजधानी (सियालकोट) सागल नगरी होती. तो न्यायी, विद्वान व जनप्रिय राजा होता. त्याच्या मृत्यूनंतर लोकांमध्ये त्याच्या अस्थीकरिता युद्ध झाले व लोकांनी त्यावर मोठमोठे स्तूप बांधले. राजा मिलिंद याला शास्त्रचर्चेत फारच रूचि होती. आणि साधारण पंडित त्यासमोर टिकू शकत नसत. त्यामुळे संघाने आदेश दिला की नागसेनांनी राजाचे दमन करावे.

त्यानुसार आचार्य नागसेन सागल नगरातील असंखेय्य नामक मठात थांबले. तेव्हा मिलिंदराजा पाचशे यवनांच्या सह तेथे गेला व प्रश्नोत्तरास सुरुवात झाली. प्रश्नोत्तराच्या पाली भाषेतील ग्रंथाला 'मिलिंद पञ्ह' (मिलिंद प्रश्न) असे नाव पडले. नागसेनांनी बौद्धतत्त्वज्ञानांत नवीन भर पाडली नाही, तथापि त्याला अतिशय सुलभ भाषेत सांगितल्यामुळे महास्थविर नागसेनाचे नाव बौद्ध साहित्यात अजरामर झालेले आहे.

**प्रश्न ४८३ महाकवी अश्वघोष यांनी बौद्ध साहित्याला काय योगदान दिले?**

**उत्तर -** अश्वघोषाचा जन्म अयोध्येत झाला. जीवनकाळ इ.स. पूर्व ५० ते इ.स. नंतर १०० पर्यंत मानला जातो. त्यांनी ब्राह्मण कुळात जन्म घेऊन वैदिक वाङ्मयाचे विधिवत अध्ययन केले. बौद्धांना शास्त्रार्थात पराजित करीत ते पेशावरला पोहोचले व तेथे पार्श्व नावाच्या वृद्ध बौद्ध भिक्षुकडून पराजित झाल्यावर त्यांनी बौद्ध धम्माची दीक्षा घेतली. अश्वघोष हे संस्कृतचे प्रकाण्ड विद्वान व महाकवी होते. वाल्मीकीच्या नंतर परंतु कालिदासाच्या पूर्वीचा त्यांचा काळ होता. ते इतके सुंदर शास्त्रीय गायन करीत की, त्यांच्या मधुर गायनाने घोडे मंत्रमुग्ध होत असत, त्यामुळे त्यांचे नाव अश्वघोष पडले. ते महाराज कनिष्क यांचे गुरू होते. कनिष्काने बोलाविलेल्या चतुर्थ बौद्ध संगीतीमध्ये ते उपसभापती होते. महाकवी अश्वघोष यांच्या अत्यंत प्रमाणमान्य अशा तीन रचना आहेत; बुद्धचरित, सौन्दरनन्द आणि शारिपुत्र-प्रकरण. बुद्धचरित एक महाकाव्य आहे. यांमध्ये भगवंताचे चरित्र आणि उपदेश यांचे वर्णन आहे. ह्या ग्रंथाचे २८ सर्ग असून त्या काळी त्याचे भारतभर पठण होत असे, ह्याचे वर्णन ई-त्सिंग ह्या चीनी प्रवाशाच्या (इ.स. सातवी शताब्दी) च्या वर्णनांत आहे. इ.स. ४१४ ते ४२१ मध्ये धम्मरक्षितांनी त्याचा चीनी भाषेत अनुवाद केला.

शारिपुत्र प्रकरण ९ सर्गांचे एक नाटक आहे. अश्वघोषांची संस्कृत नाटके प्राचीनतम

समजल्या जातात. सौन्दरनन्द हे खंडकाव्य आहे. त्यांनी गण्डिस्तोत्रगाथा नावाचे गीतकाव्यही लिहीले. अश्वघोषांनी बौद्ध साहित्याला येणेप्रमाणे समृद्ध केले. अश्वघोषांच्या काव्यात ऐतिहासिक आणि हिंदूंच्या पौराणिक ग्रंथांचा सुंदर मेळ दिसून येतो.

ते संगीतज्ञ भिक्खू होते. व आपल्या संगीतास त्यांनी बौद्ध धम्माच्या प्रचाराचे साधन बनविले. ते वीणेचे अत्यंत कुशल वादक होते. त्यांनी 'रास्तवर' नावाच्या वाद्ययंत्राचा अविष्कार केला. त्यानंतर अश्वगुप्ताकडे जाऊन शिक्षण घेतले. नंतर आचार्य धम्मरक्षितकडे पाटलिपुत्रास जाऊन बौद्ध तत्त्वज्ञान व संपूर्ण पिटकांचे अध्ययन केले व नंतर ते पंजाबला परतले.

**प्रश्न ४८४ : अनागारिक धम्मपालांनी आधुनिक जगात कोणते कार्य केले?**

**उत्तर** - अनागारिक धम्मपालांचे आणखी एक नाव देवमित्र धम्मपाल असेही होते. या श्रीलंकेच्या भिक्खूचा जन्म इ.स. १८६४ साली झाला. त्यांनी बुद्धधम्माला भारतात पुनरूज्जीवीत करावयाचे प्रयत्न केले. व महाबोधी सोसायटी ऑफ इंडिया या संस्थेची १८९१ मध्ये स्थापना केली. त्यांचा मुख्य उद्देश बोधगया मंदिराचे संरक्षण करावयाचा होता. त्यावेळी पाश्चात्य देशांमध्ये बुद्धधम्माचे विशेष ज्ञान नव्हते. त्यांनी जागतिक बौद्धांना एकत्रित आणण्याचे प्रयत्न केले व बौद्धांमधील पंथिक मार्ग (महायान, हीनयान इ.) न धरता सर्वांना एकसूत्रात बांधण्याचा प्रयत्न केला.

**प्रश्न ४८५ : भदन्त आनंद कौसल्यायन यांनी आधुनिक बौद्ध चळवळीमध्ये काय योगदान दिले?**

**उत्तर** - विसाव्या शतकांतील ते एक निष्ठावंत बौद्ध भिक्खू होते. अगदी तरुणपणी (१८ वर्षांचे असताना) त्यांनी प्रव्रज्या घेतली व हिंदी भाषेचा सखोल अभ्यास करून बौद्ध संस्कृतीचे माहेरघर असलेल्या श्रीलंकेमध्ये जाऊन तेथील विद्यापीठांत हिंदी प्रमुख म्हणून बरीच वर्षे कार्य केले. डॉ.बाबासाहेब (ऊर्फ भीमराव रामजी) आंबेडकर यांनी भ. बुद्धाच्या २५०० व्या जयंतीवर्षी नागपूर येथे १४ ऑक्टोबर १९५६ रोजी दीक्षाभूमीवर पाच लाख लोकांनी ऐतिहासिक सामूहिक दीक्षा दिली.

बाबासाहेबांचे परिनिर्वाण झाल्यावर मुंबईस झालेल्या ७ डिसेंबर, १९५६ च्या अंत्ययात्रेमध्ये ते प्रमुख भिक्खू होते. त्यानंतर भारतात परत येऊन नागपूरच्या दीक्षाभूमीवर स्थायिकपणे राहून बौद्धांचे मार्गदर्शन केले. त्यांनी धार्मिक विषयांवर विश्लेषणात्मक आणि चिंतनपर अनेक पुस्तके लिहिलीत. बाबासाहेब आंबेडकरांचे 'दि बुद्ध अँड हिज धम्म' या पुस्तकाचे हिन्दी भाषांतर करून बौद्ध वाङ्मयातून बाबासाहेबांनी घेतलेले स्रोत हुडकून काढून, त्यांचे टिप्पण केले. कुमार्गी गेलेल्या काही राजनैतिक लोकांनी त्यांना त्रास दिल्यामुळे दीक्षाभूमी सोडून बुद्धभूमी या नवीन केंद्राची रचना करून भिक्खूंकरिता शिक्षणाची सोय केली. आधुनिक वैज्ञानिक जगास बौद्धधम्माचा दृष्टिकोण कशा प्रकारे तंतोतंत लागू होतो, याबद्दल त्यांनी जनजागृतीचे महत्कार्य केले.

# भिक्खुणी संघातील विशिष्ट व्यक्ति

**प्रश्न ४८६ : महाप्रजापती गौतमीने भिक्खुणी संघाच्या स्थापनेसाठी कसे कार्य केले?**

**उत्तर** - कोलीय वंशाचा राजा महाप्रबुद्ध याची राजधानी देवदह येथे होती. त्याला दोन अत्यंत रूपवती कन्या होत्या, महामाया व महाप्रजापती. त्यांची लग्ने कपिलवस्तूच्या शुद्धोदन राजाशी लावण्यांत आली. ज्येष्ठ महामायापासून सिद्धार्थाचा जन्म झाला. द्वितीय राणी प्रजापतीपासून नंद नावाचा पुत्र झाला. गौतम वंशीय वधू झाल्यामुळे तिला 'महाप्रजापती गौतमी' असे संबोधू लागले.

महाप्रजापतीची आपल्या बहिणीवर फारच श्रद्धा होती. सिद्धार्थाच्या जन्मानंतर केवळ सातच दिवसात महामायाचे निधन झाले. तेव्हा सिद्धार्थाचे लालनपालन महाप्रजापतीने मोठ्या प्रेमाने केले. तिच्या ममतामयी मातृप्रेमाने सिद्धार्थाने दया, दान, कार्यकुशलता इत्यादी अनेक गुणांनी ओतप्रोत होऊन विद्याभ्यास केला. सिद्धार्थाच्या सर्वच कामांत उत्साहित राहणाऱ्या महाप्रजापतीला त्याच्या गृहत्यागामुळे अतिशय दुःख झाले. तथापि सून यशोधरा हिला झालेले दुःख कमी करावयाचा ती आटोकाट प्रयत्न करीत असे.

भगवंतांच्या कल्याणकारी उपदेशाचा तिच्या मनावर अतिशय खोलवर परिणाम झाला. तिलादेखील परिव्रजा देण्यात यावी अशी तिने भगवंतास विनंती केली. एकदा भ. बुद्ध वैशाली येथे वास्तव्य करीत असतांना पाचशे शाक्य कुमारिकांना व यशोधरेला सोबत घेऊन महाप्रजापतीने पायीच वैशालीपर्यंतची यात्रा केली. तिचे पाय सुजून गेले होते. तिने भिक्खुणी संघाच्या स्थापनेकरिता भगवंतांस कळकळीची विनंती केली. तरीदेखील भगवंतांनी तिची विनंती मान्य केली नाही.

तेव्हा आयु. आनंदांनी भगवंतांना विचारले, 'आपल्या पवित्र धम्मात स्त्रियांच्या कल्याणासाठी सोय नाही काय?' त्यावर भगवंतांनी स्पष्ट केले, ''श्रौतापत्तिफल, सकृदागामी फल, अनागामी फल आणि अर्हतपद प्राप्त करून घेण्यास स्त्रिया सक्षम आहेत, परंतु स्त्रियांच्या भिक्खुणी होण्याबद्दल व्यावहारिक अडचणी आहेत. हा सद्धम्म जो निदान सहस्त्र वर्षे नक्कीच राहील याची खात्री आहे, तो स्त्रियांच्या प्रवेशानंतर केवळ पाचशे वर्षांतच ऱ्हास पावू लागेल.'' तथापी महाप्रजापतीने वारंवार केलेल्या अनुनयामुळे व स्त्रियांची धम्माविषयीची निष्ठा पाहून स्त्रियांना भिक्खुणी होण्यास भगवंतांनी स्वीकृती दिली. स्त्री जातीकरिता तो अत्यंत गौरवशाली दिवस होता. त्या दिवशी पाचशे कुमारिकांनी काषाय वस्त्रे परिधान करून भिक्खुणीा संघाची स्थापना केली. महाप्रजापती गौतमी संघप्रमुख होती.

महाप्रजापतीने एकाग्रचित्ताद्वारे आणि अलौकिक ज्ञानसाधनेद्वारे अर्हपद प्राप्त केले. थेरोगाथेमध्ये तिची अपूर्व भक्तीने ओतप्रोत उदाहरणे विद्यमान आहेत. येणेप्रमाणे स्त्रियांना पुरु षांच्या समकक्ष पोचविण्याचे जे महत्कार्य महाप्रजापती गौतमीने केले त्यामुळे तिचे नाव अजरामर झालेले आहे. चिरप्रव्रजित भिक्खुणी श्राविकांमध्ये महाप्रजापती गौतमी पहिली आहे.

**प्रश्न ४८७ : यशोधरेला महाअभिज्ञेची उपाधी कशी मिळाली ?**

**उत्तर** - कोलीय देशाच्या दंण्डपाणी सुप्रबुद्ध नावाच्या राजाची यशोधरा ही अत्यंत लावण्यसंपन्न व गुणवती कन्या होती. तिचे माहेरचे नाव गोपा असे होते. स्वयंवरानुसार तिने सिद्धार्थाच्या गळ्यात माळ घातली. त्यावेळी ती सोळा वर्षांची होती.

सिद्धार्थाने गृहत्याग केल्यामुळे तिला अत्यंत दुःख होणे स्वाभविकच होते. परंतु सिद्धार्थाच्या तपश्चर्येबद्दल आणि देहदंडनेबद्दल जसजशी बातमी तिला मिळत असे, तसतशी तीदेखील स्वतःचे केशवपन करून उपासतापास करीत असे. व अत्यंत साधेपणाने राहून बाळ राहुल आणि सासूसासरे यांची सेवा करीत असे.

जेव्हा भगवंतांनी कपिलवस्तूस आगमन केले तेव्हा तिने आपला पुत्र राहुल यास त्यांच्याकडे पाठवून वारसा हक्काची मागणी करविली व सातच वर्षे वय असलेल्या राहुलास श्रमणत्वाची दीक्षा देण्यात आली. येणेप्रमाणे आपल्या एकमात्र पुत्रास यशोधरेने धम्मकार्यास समर्पित केले. भिक्खुणी संघाची स्थापना करावयास पाचशे कुमारिकांना घेऊन महाप्रजापती भगवंतांकडे गेली त्यावेळी यशोधरेने देखील प्रव्रज्या ग्रहण केली. कठीण साधना आणि शीलपालन करीत करीत तिने महाभिज्ञा प्राप्त केली. आणि भिक्खुणी संघात महाथेरी भद्रा कात्यायनी, (भद्दा कच्चाना) या नावाने विख्यात झाली.

येणेप्रमाणे आपल्या पतीची ती खरी अनुगामिनी झाली. धन्य ती यशोधरा!

**प्रश्न ४८८ : खेमा कोण होती व तिने कोणते कार्य केले?**

**उत्तर** – खेमा (क्षेमा) हिचा जन्म सागल राजवंशात झाला. ती अतिशय सुंदर असून तिची कांती सुवर्णासारखी होती. तिचे बिंबिसार राजाबरोबर लग्न झाले. एके दिवशी तिने असे ऐकले की, भ. बुद्ध सुंदरतेची निंदा करतात. राजा बिंबिसार भगवंताचा प्रशंसक असून त्याची भगवंतांवर अगाध श्रद्धा होती. त्याने आपल्या राजकवीला वेळूवनाच्या सौंदर्याविषयी काव्य रचून महालात त्याचे मोठमोठ्याने गायन करावयास सांगितले जेणेकरून ते राणीच्या कानी पडावे. क्षेमाने हे ऐकले व वेळूवनाची उत्सुकता लागून राजाची परवानगी घेऊन ती वेळूवनास गेली.

जेव्हा ती भगवंतांसमोर गेली तेव्हा भगवंतांनी तिच्या मनातील सौंदर्याबद्दलचे स्वाभिमानाचे भाव ओळखून आपल्या रिद्धीबलाने एक सुंदर अप्सरा पंख्याने वारा घालीत असल्याचा भास निर्माण केला. त्या अप्सरेचे स्वतःहून अधिक असलेले रूपलावण्य पाहून राणीला आपल्या रूपाची लाज वाटू लागली. पाहता पाहता ती अप्सरा तारुण्यांतून प्रौढावस्थेत व नंतर जराजर्जर म्हातारपणांत पोहचलेली तिला दिसली. तिचे दात पडलेले, केस पांढरे झालेले, सुरकुत्यांचा चेहरा असलेली आणि शेवटी ती आपल्या पंख्यासहितच जमिनीवर पडली, असे तिला दिसले. ते पाहून क्षेमाला वाटू लागले की, तिच्या नशीबीदेखील अशीच विपन्नावस्था लिहिलेली असणार.

तिचे मन येणेप्रमाणे नरम झालेले पाहून आणि धम्मोपदेश ऐकण्यास तयार झालेले जाणून भगवंतांनी उपदेश केला व क्षेमाला तिथल्यातिथेच विमल विरज चक्षू उत्पन्न झाला. त्यानंतर राजाच्या परवानगीने क्षेमाने भिक्खुणीची दीक्षा घेतली.

खेमाने अंर्तमनाच्या सर्व अवस्थांवर प्रभुत्व मिळविले व भिक्षुणी संघामध्ये 'महाप्रज्ञावती' अशी तिची ख्याती झाली.

**प्रश्न ४८९ : थेरी उप्पलवण्णा हिला रिद्धी कशी प्राप्त झाली?**

**उत्तर** – उप्पलवण्णा (उत्पलवर्णा) ही श्रावस्तीच्या कोषाध्यक्षाची मुलगी होती. तिचा वर्ण

निळ्या कमळाच्या गर्भासारखा सुंदर असल्यामुळे तिला उत्पलवर्णा म्हणू लागले. पुष्कळसे सामंतपुत्र आणि श्रेष्ठीपुत्र तिच्याशी लग्न करावयास उत्सुक होते. परंतु तिने गृहत्याग करून प्रव्रज्या ग्रहण केली. एके दिवशी तिने दिवा पेटविला व सतत त्याकडे पाहनू चिंतन करू लागली. हळुहळु तिने अभिज्ञा आणि पटिसंभिदेच्या योगाने अर्हत्वपद प्राप्त केले. ज्या भिक्खुणींना रिद्धी प्राप्त झाली, त्यांच्यामध्ये तिला प्रमुख गणले जात असे.

**प्रश्न ४९० : भद्दा कुण्डलकेसा हिचे विश्लेषणात्मक सामर्थ्य कसे होते?**

उत्तर - भद्दा कुण्डलकेसा (भद्रा कुण्डलकेशा) ही राजगृहाच्या सामंताची कन्या होती. ती वयांत आली तेव्हा तिने सात्थुक नावाच्या ब्राह्मण पुरोहिताच्या मुलास चोरीच्या आरोपावरून वधस्तंभाकडे नेतांना पाहिले. त्याच्या शरीरसौष्ठवामुळे तिचे प्रथमदर्शनीच त्याच्यावर प्रेम जडले. त्याची प्राप्ती न झाल्यास आपला जीव द्यायचा तिने निर्धार केला. हे ऐकून तिच्या बापाने शिपायांना खूप मोठ्या रकमेची लाच देऊन सात्थुकाला सोडविले. त्यानंतर त्याला भद्रा कुण्डलकेशांकडे नेण्यात आले. त्यावेळी ती अत्यंत मूल्यवान दागिन्यांनी नटूनथटून होती. तिच्या दागिन्यांकडे पाहून तो मोहित झाला व तिला त्वरितच देवीच्या देवळात घेऊन गेला. देवळात गेल्यावर तिला तिचे सर्व दागिने उतरावयास लावले. तिने पुष्कळ विनवणी करून सांगितले की दागिनेच नव्हे तर ती स्वतः देखील त्याचीच आहे. परंतु त्याने आपलाच हेका धरला. ह्याचा तिला राग येऊन, जिकडे मोठी खोल दरी होती, तिकडे त्याला ढकलून दिले व तो तत्क्षणीच मेला.

त्यानंतर भद्रा घरी न येता तेथूनच निगण्ठांच्याकडे गेली व भिक्खुणी झाली. त्यांचे धम्मज्ञान आत्मसात केल्यावर तिने त्यांना सोडले व वादविवाद करीत विद्वानांना हरवीत ती भ्रमण करू लागली. नंतर तिचा आयु. सारिपुत्राशी सामना झाला. त्यांत ती हरली व तिला भगवंतांकडे जावयास सांगण्यात आले. भगवंतांनी एका गाथेद्वारे तिला धम्मोपदेश केला. त्यामुळे तिला अर्हत्व प्राप्त झाले. तिच्या विश्लेषणात्मक विचार सामर्थ्यामुळे तत्काळ बोध प्राप्त झालेल्या हजरजबाबी भिक्खुणींमध्ये सर्वश्रेष्ठ असल्याचे सांगून भगवंतांनी तिची प्रशंसा केली.

**प्रश्न ४९१ : किसागोतमी ही बौद्धधम्मात कशी प्रसिद्ध झाली?**

**उत्तर -** किसागोतमी (कृशा गौतमी) ही श्रावस्तीमधील गरीब घराण्यातून आलेली असली जरी तिचे लग्न अत्यंत श्रीमंत श्रेष्ठीच्या मुलाशी झाले. एकदा जेव्हा सिद्धार्थ राजकुमार प्रासादाकडे परत येत होता, तेव्हा कृशागौतमीने त्याला आपल्या महालातून पाहिले. तो प्रासादाच्या खिडकीजवळून जात असतांना तिने म्हटले, ज्या मातेला असा पुत्र लाभला, ज्या पित्याला असा पुत्र लाभला, ज्या स्त्रीला असा पती लाभला ते सर्वच फार आनंदी (निब्बुत) असतील. सिद्धार्थाने निब्बुत या शब्दाचा अर्थ निर्वाण असा घेतला व त्यामुळे आनंदित होऊन तो आपल्या गळ्यातील बहुमूल्य रत्नजडित हार काढून त्याने तिच्या हातावर ठेवला.

पुढे कृशागौतमीला एक मुलगा झाला परंतु बाळपणीच सर्पदंशाने तो मरण पावला त्यामुळे ती वेडीपिसी झाली व भगवंतांकडे आपल्या बाळाचे शव घेऊन त्याला जिवंत

करण्याबद्दल विनवणी करू लागली, भगवंतांनी तिची समजूत घालायचा प्रयत्न केला, परंतु ती ऐकेना. म्हणून तिला 'ज्या घरी कुणाचेही निधन झाले नसेल अशा घरून मोहरीचे थोडेसे दाणे घेऊन ये.' असे सांगितले. कृशागौतमी खूप हिंडली परंतु तिला एकही घर असे सापडले नाही, ज्या घरी कुणाचेही निधन झालेले नव्हते. तेव्हा कृशागौतमीला उपरती झाली व तिने प्रव्रज्या घेतली.

तिची अंतर्मनाच्या अभ्यासाची स्थिती इतकी गंभीर झाली की तिला अर्हतपद प्राप्त झाले. भगवंतांनी तिला जाडेभरडे वस्त्रे वापरणाऱ्या व अत्यंत साधेपणाने राहणाऱ्या भिक्खुणीमध्ये अग्रस्थानी मानले.

**प्रश्न ४९२ : धम्मदिन्ना धम्मदेशनेमध्ये कशी प्रवीण झाली?**

**उत्तर –** ती उच्चकुळातील असून तिचे विशाख नावाच्या धनाढ्य श्रेष्ठींशी लग्न झाले. तिचा पतीदेखील भगवंतांचा गृहस्थ उपासक होता. पुढे त्याने परिव्रज्या घेतल्यामुळे हिनेदेखील परिव्रज्या घेतली. तिने शब्द, विचार आणि कर्म यांवर सखोल चिंतन केले त्यामुळे तिला लवकरच अर्हत्व प्राप्त झाले. धम्माचे मर्म जाणणे, व समजावून सांगणे यावर तिने प्रभुत्व मिळविले. धम्मदेशना समजावून सांगणाऱ्या सर्व भिक्खुणींमध्ये तिला अग्रस्थान मिळाले.

**प्रश्न ४९३ : पटाचारेला 'विनयधरा' उपाधी कशी मिळाली?**

**उत्तर –** पटाचारा हिचे मूळ नाव कुणासही ठाऊक नाही. परंतु श्रावस्तीच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याची ती मुलगी होती. तिचे लग्न एका श्रीमंत वणिकपुत्राशी व्हायचे ठरले. परंतु पटाचारेचे प्रेम एका नोकरावर जडलेले होते. त्यामुळे ती त्याच्यासोबत पळून गेली व दूरदेशात जाऊन त्याच्याशी लग्न केले. तिला एक मुलगा झाला. दुसऱ्या प्रसवाचे वेळी तिच्या निर्धन पतीजवळ पुरेसे पैसे नसल्यामुळे ती पितृगृही जाण्यास निघाली. वाटेत तिच्या पतीचा सर्पदंशाने मृत्यू झाला. तिचा मुलगा नदीच्या पुराने वाहून गेला व नुकत्याच प्रसवलेल्या बाळाला गिधाडाने उचलून नेले. मोठ्या कष्टाने ती पितृगृही पोहोचली. तेव्हा तिथे समजले की तिचे मातापिता इत्यादी संपूर्ण कुटुंब घराला आग लागून नुकतेच मृत्यू पावले. ते ऐकून तिला मूर्च्छा आली व तिला स्वतःच्या वस्त्रांचे भान राहिले नाही व ती नग्नपणेच फिरू लागली. येणेप्रमाणे तिचे नाव पटाचारा (नग्नपणेच फिरणारी) असे पडले.

ती तशाच स्थितीमध्ये भगवंतांच्या चरणांवर येऊन पडली. त्यांनी तिला भिक्खुणीसंघात सामील केले. साधना करून हळूहळू तिने अर्हत्व प्राप्त केले. तिची विनयशीलतेबद्दल प्रसिद्धी होती त्यामुळे विनयधर भिक्खुणींमध्ये तिला अग्रस्थान मिळाले.

**प्रश्न ४९४ : नन्दा, भद्रा कपिलानी, श्रृगालमाता कोण होत्या?**

**उत्तर –** नन्दा ही शाक्यवंशीय असून अत्यंत सुंदर होती. तिला जनपद कल्याणी म्हणत. तिच्या बऱ्याच आप्तगणांनी धम्मदिक्षा घेतल्यामुळे तिनेही प्रव्रज्या घेतली. परंतु अजूनही तिला आपल्या रूपाबद्दल गर्व होता. एकदा भगवंताचे प्रवचन ऐकत असताना, तिच्या मनांतील रूपगर्वितेचा भाव भगवंतांनी ओळखला व आपल्या रिद्धीबलाने तिला तेथेच अतिसुंदर स्वर्गीय अप्सरेचे दर्शन घडविले. जिचे तारुण्य हळूहळू नष्ट झाले, प्रौढावस्था आली. नंतर म्हातारपणाची लक्षणे दिसू लागली. त्यामुळे नंदेला रूपाच्या अनित्यतेचे व

जीवनाच्या नश्वरतेचे ज्ञान झाले, व ती पूर्णतः विरक्त झाली. थेरीगाथेमध्ये तिच्या ज्ञानसंपदेची महिमा आहे. ती ध्यानरत भिक्खुणींमध्ये श्रेष्ठ होती.

भद्रा कपिलानीः ही सागल (सियालकोट) मधील कपिल गोत्रीय ब्राह्मणाची मुलगी होती. तिचे मगध देशाच्या समृद्धशाली पिपल माणबकाशी लग्न झाले आणि ती सुखमय जीवन व्यतीत करू लागली. परंतु तिच्या पतीने भगवंताचा उपदेश ऐकून प्रव्रज्या घेतली व तो पुढे भिक्खु काश्यप या नावाने प्रसिद्ध झाला. ते पाहून कपिलानी हिनेही गृहत्याग करून प्रव्रज्या घेतली. त्याग, साधना व धम्मज्ञानामुळे स्मृती धारण करणाऱ्या प्रमुख भिक्खुणींमध्ये तिची गणना होत असे.

श्रुगालमाताः हिचा जन्म राजगृहातील एका कुलीन परिवारांत झाला. तिचा मुलगा श्रुगाल नित्यप्रती भगवंताचा उपदेश श्रवण करावयास जात असे आणि परत येऊन आपल्या मातेस त्याचा मतितार्थ सांगत असे. त्यामुळे तिच्या श्रद्धामय हृदयात विरक्त भावना जागृत होऊन तिने प्रव्रज्या ग्रहण केली व पुढे अर्हत्व प्राप्त केले. तिच्या अगाध श्रद्धेमुळे तिला श्रद्धामयी भिक्खुणींमध्ये प्रमुख स्थान मिळाले, व श्रद्धामयी जननी 'श्रुगालमाता' या नावाने ती प्रसिद्ध झाली.

**प्रश्न ४९५ : संघमित्रेने केलेले धम्मप्रचाराचे महत्कार्य कोणते?**

**उत्तर** – संघमित्रा स. अशोकाची कन्या अत्यंत धर्मशील होती. स. अशोकाचे गुरू महास्थविर मोग्गलीपुत्र तिस्स यांना सम्राटाने एकदा प्रश्न केला, "भन्ते, धम्माचा उत्तराधिकारी व्हावयासाठी मी काय करावयास पाहिजे?" त्यावर फार गंभीरपणे स्थविरांनी उत्तर दिले, "केवळ एकच उपाय आहे. तो म्हणजे स्वतःच्या संततिला त्रिरत्न सरणास समर्पित करणे." षोडशी सुकुमारी राजनन्दिनी संघमित्रेने त्याचा सहर्ष स्वीकार केला व भिक्खुणीची प्रव्रज्या ग्रहण केली. तिचा अग्रज महामहेन्द्र याने सिंहल देशास प्रस्थान केले. तेथे धर्मध्वजाची स्थापना केल्यावर सिंहल देशाच्या स्त्रियांनी प्रव्रज्या घ्यावयाची तीव्र इच्छा प्रकट केली. महाराणी अनुला हिने थेरी संघमित्रेला बोलावून घ्यावयाची महेंद्रास विनंती केली. त्यानुसार संघमित्रेने बोधिवृक्षाची शाखा घेऊन सिंहल द्वीपासाठी प्रयाण केले. विदेशाला जाणारी ती प्रथम धम्मप्रचारिका होय. ऐक्याऐंशी वर्षांची होईस्तोवर तेथेच राहून धम्मप्रचार करीत करीत तिचे परिनिर्वाण झाले.

**प्रश्न ४९६ : चारुमतीने नेपाळमध्ये धम्मप्रचार कसा केला?**

**उत्तर** – सम्राट अशोकाच्या लहान मुलीचे नाव चारु मती होते. तिची धम्मावर फारच श्रद्धा होती. वयात आल्यावर तिचे लग्न देवपालाशी झाले. तोदेखिल धार्मिक प्रवृत्तीचा होता. वृद्धसमयी स.अशोकाने बौद्ध तीर्थस्थानांची यात्रा करावयाची तयारी केली, तेव्हा चारुमतिदेखील पित्यासोबत सेवा करावयास जाण्यासाठी अनुनय करू लागली. ती पती देवपालासोबत निघाली व लुम्बिनी इ.स्थळांना भेटी देत देत ते नेपाळला ललितपुरास पोहोचले. मुलीच्या इच्छेप्रमाणे स. अशोकाने तेथे सुंदर नगराचे निर्माण केले. त्यास अशोक पट्टन असे नाव मिळाले. सम्राटाने तेथे पाच स्तूपांचे निर्माण केले त्याला थूर म्हणतात. चारुमती तेथेच राहिली. पुढे देवालयाच्या नावावर देवपट्टन नांवाचे नवीन नगर बसविले. चारुमतीने

तेथे संघाराम आणि भिक्खु भिक्खुणींसाठी निवासाची सोय केली.

त्यानंतर चारुमतीने संघमित्रेप्रमाणेच प्रव्रज्या ग्रहण केली आणि शेष जीवन धम्मप्रसारांत व्यतीत केले. ज्याप्रमाणे संघमित्रेने सुदूर दक्षिणेस (श्रीलंकेस) धम्मप्रचार केला तद्वतच चारु मतीने उत्तरेस नेपाळला बौद्धमय बनविले.

**प्रश्न ४९७ : श्रीलंकेची राणी अनुला हिने धम्माची सेवा कशी केली?**

**उत्तर** –अनुला ही श्रीलंकेची राणी होती. तिला महाथेरो महेन्द्र यांनी धर्माची शिकवण दिली. आपल्या पाचशे दासींसोबत ती भिक्खूंच्या दर्शनास जात असे व अत्यंत श्रद्धाभावाने धम्मश्रवण करीत असे. त्यांना विमानवत्थू आणि सच्चसंयुक्त यांतील मर्म समजले तेव्हा त्यांना श्रोतापत्ति अवस्था प्राप्त झाली. महाथेरो संघमित्रेकडून प्रव्रज्या ग्रहण करून अनुलेने धम्माची बरीच सेवा केली.

**प्रश्न ४९८ : राज्यश्रीने धम्मासाठी कोणते कार्य केले?**

**उत्तर** – राज्यश्री सम्राट हर्षवर्धनाची बहीण होती. तिचे लग्न राजा अवन्तिवर्मा याचा पुत्र गृहवर्मा यांचेशी झाले. हर्षवर्धनाचा कल शिवभक्तीकडे असूनही राजश्रीला भगवंताच्या धम्माची ओढ होती. माळव्याच्या राजाने गृहवर्म्याचा खून केला व राज्यश्रीला प्रणयाची याचना केली. व तिने झिडकारल्यामुळे तिला बंदीगृहात टाकले. पुढे हर्षवर्धनाने त्याचा बिमोड करून तिची सुटका केली. श्रेष्ठ दानशीला राज्यश्रीने राजमहाल सोडून काषाय वस्त्र ग्रहण केले व धर्माच्या प्रचारास स्वतःस वाहून घेतले.तिच्यामुळे हर्षवर्धनाने देखील बौद्धधम्माचा स्वीकार केला.

## बुद्धधम्माचे विशिष्ट उपासक-उपासिका

**प्रश्न ४९९ : राजा बिंबिसाराने धम्माची सेवा कशा प्रकारे केली?**

**उत्तर** – सिद्धार्थाने नुकतीच प्रव्रज्या घेतल्यानंतर मगध साम्राजाचा राजा श्रेणीय बिंबिसार याने सिद्धार्थाला आपले अर्धे राज्य देऊ केले होते आणि प्रव्रज्येचा त्याग करून राजपद स्वीकारण्याची विनंती केली होती. परंतु सिद्धार्थाने दुःखमुक्तीच्या कारणांचा शोध लावण्याचा जो प्रण केला होता, त्यास सोडले नाही. तेव्हा राजा बिंबिसाराने सिद्धार्थास अशी विनंती केली की सद्धम्माची प्राप्ती झाल्यावर राजगृहास येऊन आपला शिष्य स्वीकारावे. त्यानुसार संबोधी प्राप्त झाल्यावर भगवान राजगृहास गेले व राजाला व जनतेला धम्माचा उपदेश केला.

भगवंताच्या निवासासाठी राजाने वेणुवन वेळूंचे उपवन भिक्खूसंघास दान केले. ते स्थान शहरापासून फार जवळ अथवा फार दूर नव्हते. आणि दर्शनास उत्सुक असलेल्या लोकांना जायला सुलभ होते. तेथे दिवसा फार गर्दी नसे व रात्री आवाजाचा त्रास होत नसे. आरोग्य आणि एकांतवासासाठी ते योग्य होते.

राजगृहास भगवंतानी चोवीस वेळा भेटी दिल्या व वेळूवनांत वास्तव्य केले. त्यामुळे राजा बिंबिसार व त्याच्या प्रजेस मोठाच लाभ झाला.

**प्रश्न ५०० : कोसलनरेश प्रसेनजिताने धम्मकार्यास कशी मदत केली.**

**उत्तर** – राजा प्रसेनजिताला भगवंताविषयी नितांत आदर होता. श्रावस्ती ह्या राजधानीच्या

नगरास भगवंतानी पंच्याहत्तर वेळा भेटी दिल्या. त्यांनी राजाला वेळोवेळी उपदेश केला. ''राजेशाही बडेजावास अवास्तव महत्त्व देऊ नये. तोंडपूजा करणाऱ्यांच्या गोडगोड स्तुतीला भाळून जाऊ नये. धम्माचे चिंतन करून सदाचरणाचे महत्त्व ओळखावे. सर्वात अधिक आवश्यकता प्रेमळ अंतःकरणाची आहे. ज्याप्रमाणे लोक आपल्या एकुलत्या एक पुत्रास जपतात, त्याप्रमाणे आपण प्रजेला जपावे.'' इ. राजा प्रसेन्नजित जेतवनांत जाऊन उपदेश ग्रहण करीत असे.

### प्रश्न ५०१ : अनाथपिण्डिकाचा जेतवनाराम कसा होता?

**उत्तर** – अनाथपिण्डिक हा श्रावस्तीचा अत्यंत धनाढ्य व दानशूर श्रेष्ठी होता. त्याच्या उदार स्वभावामुळे त्यांचे नाव ''अनाथ बालकाचा सहाय्यकर्ता व दीनदुबळ्यांचा मित्र'' म्हणजेच अनाथपिण्डिक असे पडले. त्याच्या राजगृहास नेहमीच जावे लागे. तेव्हा तो भगवंताच्या दर्शनार्थ वेळूवनात गेला. भगवंतांनी त्याच्या अत्युतम हृदयाला ताबडतोब ओळखले आणि संतोषपर धार्मिक संभाषणाने त्याचे अभिनंदन केले व त्यास सत्यधम्माचा उपदेश केला. त्यानंतर त्याने संघाकरिता धार्मिक प्रार्थनेचे ठिकाण व्हावे या उद्देशाने एका विहाराची स्थापना करावयाची आपली इच्छा व्यक्त केली व त्या विहाराचा स्वीकार करावयाची भगवंतांना विनंती केली. भगवंतांनी त्याच्या अंतःकरणात डोकावून पाहिले व जाणले की, त्याची निःस्वार्थी परोपकारबुद्धी हाच त्याचा देणगीचा उद्देश आहे, त्यांस संमती दिली. विहारासाठी आल्हाददायी अशा ठिकाणाची निवड करावयास मदत व्हावी म्हणून आयु. सारिपुत्रास कोशल देशास येण्याची अनाथपिण्डिकाने विनंती केली. त्याने श्रावस्तीजवळ हिरव्यागार लतांनी बहरलेले युवराज जेत याचे उद्यान पाहिले. त्याकाठी स्वच्छ पाण्याचा ओढाही होता. युवराजाची आवडती बाग असल्यामुळे तिला विकण्यास तो तयार नव्हता. परंतु शेवटी म्हणाला, ''सुर्वणाची नाणी जमीनीवर आच्छादित केलीत तर तेवढीच जागा तुम्हास देईन अन्यथा नाही.'' अनाथपिण्डिकाला फार हर्ष झाला. त्याने आपली अगणित संपत्ति गाड्यांनी भरभरून आणली व सुवर्णांची नाणी जमिनीवर पसरविण्यास सुरुवात केली. ते पाहून व जागा खरेदी करावयाचा उद्देश जाणून जेतकुमाराने अर्धी जागा आणि सर्व वृक्ष विहारासाठी दान केले ती जागा भगवंतांना अर्पण करून आयु. सारिपुत्रांच्या स्वाधीन करण्यात आली. त्यावर भव्य आणि सुंदर अशी इमारत उभी करण्यात आली व सुंदर नक्षीकामाने सुशोभित करण्यात आले.

श्रावस्ती येथील जेतवन नांवाच्या या विहाराला भगवंतांनी पंचाहत्तर वेळा भेटी दिल्या व त्यांत सर्वाधिक काळ वास्तव्य केले. अनाथपिण्डिक धम्माची व भिक्खूसंघांची सेवा करण्यास नेहमीच तत्पर असे. येणेप्रमाणे बौद्धधर्म्मायांत सर्वोत्तम दायक बौद्ध उपासक म्हणून त्याचे नाव अजरामर झाले.

### प्रश्न ५०२ : विशाखेची प्रसिद्धी मिगारमाता अशी का झाली?

**उत्तर** – साकेत नगरचा करोडपती श्रेष्ठी धनंजय याची रूपवती कन्या विशाखा हिचा विवाह श्रावस्तीचा श्रेष्ठी मिगार याचा पुत्र पूर्णवर्धन यांच्याशी झाला. तिची लहानपणापासूनच भगवंतावर आणि भिक्खूसंघावर श्रद्धा होती. परंतु सासरा मिगारश्रेष्ठी ह्याची निर्ग्रंथ साधूंवर

(नग्न राहण्याच्या भ. महावीरांच्या शिष्यांवर) श्रद्धा होती. ते नग्न साधू त्याच्या घरी आले व सासऱ्याने तिला त्यांचे दर्शन घ्यावयास बोलाविले. त्या नग्न साधूंना पाहून ती त्वरितच परतली. त्यावर तिने उत्तर दिले की, निर्वस्त्र लोकांमध्ये ती निर्लज्जपणे जाऊ शकत नाही. निर्ग्रंथ साधूंनी ते ऐकले तेव्हा तीव्र संताप व्यक्त करून त्यांनी विशाखेची माहेरी रवानगी करण्याची मागणी केली. मिगारश्रेष्ठीने त्यांची क्षमा मागून कशीबशी समजूत काढली. एके दिवशी सासरा जेवणास बसला असताना, विशाखा त्यास पंख्याने वारा घालीत सेवा करू लागली. तेवढ्यात एक बौद्ध श्रमण भिक्षाटनासाठी दारात आला. परंतु मिगारश्रेष्ठीने त्याला पाहूनदेखील न पाहिल्यासारखे केले. त्यावर विशाखेने श्रमणास उद्देशून म्हटले, "भन्ते, माझे श्वशुर शिळे खात आहेत. तुम्ही अन्यत्र जावे." त्यामुळे मिगारश्रेष्ठीचा पारा अत्यंत चढला व त्याने विशाखेला "आत्ताच चालती हो" असे रागावून म्हटले. परंतु विशाखेने शांतपणे सांगितले की, तिच्या पित्याने नेमलेल्या अष्ट मंडळीस बोलवावे. ते आल्यावर तिने स्पष्टिकरण दिले. "माझे सासरे जुन्या पुण्यावरच संतोष करीत आहेत. नवीन पुण्य अर्जन करू इच्छित नाहीत व त्यामुळेच ते शिळे खात आहेत, असे मी म्हटले." त्यावर अष्टमंडळी संतुष्ट झाली. परंतु मिगारश्रेष्ठी म्हणाला, "हिच्या वडिलांनी माहेराहून रवानगी करताना हिला भलतीसलती शिकवण दिलेली आहे व ती तिचा स्वेच्छेने वाटेल तो अर्थ काढून तशीच वागते." त्यावर विशाखेने पित्याने तिला दिलेल्या दहा शिकवणींचा उलगडा येणेप्रमाणे केला-

१. घरातील अग्नी बाहेर घेऊन जाऊ नकोस, म्हणजे सासू-सासरे, नणंद, जेठ वगैरे कोणी निंदा केल्यास ते घराबाहेर सांगू नये.
२. बाहेरील अग्नी घरात आणू नकोस- बाहेरची भांडणे घरात सांगू नये.
३. ज्या व्यक्तीकडून जी गोष्ट घेतली ती निश्चित वेळी परत केलीच पाहिजे.
४. ज्या व्यक्तीपासून वस्तू घेतली ती इतर कुणास न देता त्याच व्यक्तीला परत करावी.
५. प्रियजन निर्धन असल्यास यथासामर्थ्य मदत करावी.
६. गृहिणीचे कर्तव्य आहे की, सर्वांचे जेवण झाल्यावरच स्वतः जेवावे.
७. सर्वजण झोपावयास गेल्यावर गृहिणीने विश्राम करावा.
८. वारंवार उठावे लागणार नाही अशाच स्थानी बसावे
९. ज्याप्रमाणे ब्राह्मण अग्नीची परिचर्या करतात त्याप्रमाणे पूर्ण निष्ठेने पतीची सेवा करावी.
१०. सासू सासरे इत्यादी वडील मंडळींची गृहदेवतेप्रमाणे सेवा करावी.

याप्रमाणे विशाखेची उत्तरे ऐकून अष्टमंडळी प्रसन्न झाली व मिगारश्रेष्ठी खजील झाला. त्यावेळी बौद्ध श्रमणांना दानधर्म करावयाची तिला मुभा देण्यांत यावी याविषयी तिने सासऱ्याला विनंती केली व ती त्याने मान्य केली. तदनुसार विशाखेने भगवंतांना व भिक्षुसंघाला जेवणाचे निमंत्रण दिले. भोजनानंतर धर्माच्या उपदेशाची तयारी झाली. त्यावेळी श्रावस्तीमधील अनेक श्रेष्ठीगणांना निमंत्रित केलेले होते. निर्ग्रंथांनी मिगारश्रेष्ठीला भगवंताचा उपदेश श्रवण न करण्याची ताकीद केली होती. परंतु विशाखेच्या अनुनयामुळे भगवंतांचा उपदेश पडद्याआडून ऐकावयास त्याने संमती दिली.

तथागतांचा उपदेश ऐकून मिगारश्रेष्ठी आनंदविभोर झाला. त्याच्या बुद्धीवरील अंधकाराचे आवरण दूर झाले. त्याने पडदा दूर सारला व भगवंताच्या चरणांवर त्याने डोके ठेवले. व तो बौद्ध उपासक झाला. हा सुअवसर त्याला विशाखेमुळेच प्राप्त झाल्यामुळे "आजपासून ही माझी धर्मिक माताच होय" असे सर्वांसमक्ष सांगितले. तेव्हापासून विशाखेस मिगारमाता असे संबोधन मिळाले.

संघाची सेवा करावयास विशाखेने जे आठ वर भगवंतांना मागून घेतले. त्यामुळे तिची खूपच प्रसिद्धी झाली (प्रश्न ६० व १४२ पाहावेत) बौद्ध जगतात सर्वाधिक दानशूर विशाखा अजरामर झाली आहे.

**प्रश्न ५०३ : आम्रपाली गणिकेचे उपासकांमध्ये काय स्थान होते?**

**उत्तर** - भ.बुद्ध वैशालीस पोहोचल्यावर आम्रपाली गणिकेच्या उपवनांत थांबले. ते ऐकून ती खूप आनंदित झाली तेथे जाऊन तिने भगवंतास प्रणाम केला. ती अगदी साध्या वेषात होती. भगवंतानी विचार केला, "ही स्त्री सांसारिक वातावरणात राहते. राजांची व राजपुत्रांची ती आवडती आहे, तथापि तिचे अंतःकरण शांत व मन संतुष्ट आहे. वयाने तरुण, विलासाने वेढलेली तरीपण ती विवेकी व निश्चयी आहे." नंतर भगवंतांनी धार्मिक प्रवचनाने तिला मार्गदर्शन केले व तिच्या मनास जागृत करून प्रफुल्लित केले. आम्रपालीने त्यांना भिक्खूसंघासहित भोजनाचे निमंत्रण दिले व त्यांनी मौन राहूनच ते स्वीकारले.

राजतुल्य असा श्रीमंत लिच्छवी परिवारदेखील भगवंतांच्या दर्शनास निघाला. वाटेत त्यांना आम्रपाली भेटली, परंतु त्यांच्यापुढून ती मोठ्या स्वाभिमानाने जाऊ लागली. त्याचे कारण त्यांनी विचारताच, भगवंतांनी तिचे भोजनाचे निमंत्रण स्वीकारलेले असल्याचे तिने सांगितले. भगवंतांच्या या निमंत्रणाचा मान आम्हास घेऊ दे, अशी विनवणी करून त्याबद्दल लिच्छवींनी तिला अनेक लक्ष मोहरा देऊ केल्या, परंतु तिने भगवंतांच्या जेवणाचा मान स्वतःकडेच राखला. दुसऱ्या दिवशी मोठ्या मेहनतीने तिने जेवणाची सिद्धता केली.

दुसऱ्या दिवशी भगवंतांनी संघासमवेत तिच्याकडे पाचारण केले. जेवण संपल्यावर आम्रपालिने आपला वाडा भिक्षुसंघास दान केला. त्यानंतर भगवंतांनी धाम्मिक प्रवचनाने तिचे मार्गदर्शन केले. आम्रपाली ही गणिका असूनही तिच्या शुद्ध अंतःकरणामुळे भगवंतांनी तिला श्रेष्ठ उपासिकेचे स्थान दिले.

**प्रश्न ५०४ : सुजातेने सिद्धार्थाला बुद्धत्वप्राप्तीस कशा प्रकारे मदत केली ?**

**उत्तर** - सुजाता सेनानी ग्राम येथील धनगरांच्या सरदारांची कन्या होती. ते ग्राम फल्गू नदीच्या काठी बोधगयेच्या विरुद्ध दिशेस होते. पूर्वी त्या नदीस नेरंजरा म्हणत. सुजातेचे लग्न एका कुलपुत्राशी झाले. परंतु बरीच वर्षे तिला मूलबाळ नव्हते. त्यामुळे ती दुःखी होती. तिने वटवृक्षास देवता समजून नवस केला की तिला मूल झाल्यास ती वृक्षदेवतेची पूजा करील. त्या श्रद्धामय तरुणीस जेव्हा मूल झाले तेव्हा तिने आपल्या दासीला वटवृक्षाखाली झाडपूस करावयास पाठविले. तेथे अत्यंत कृश शरीराच्या सिद्धार्थाला पाहून दासीला वाटले की, वृक्षदेवता स्वतःच सशरीर तिची पूजा ग्रहण करावयास अवतरली आहे.

सुजातेने अत्यंत रुचकर खीर तयार करून सुवर्णपात्रामध्ये ती घेऊन गेली. सिद्धार्थाने देहदंडनाच्या तपश्चर्येचा त्याग करून, चिंतनाच्या मार्गाने जावयाचा काही वेळापूर्वीच निश्चय केलेला होता. म्हणून त्याने ती खीर ग्रहण केली. सुजातेस आशीर्वाद देऊन नंतर त्या पात्रास नेरंजरा नदीमध्ये फेकून दिले. खीर ग्रहण केल्याने त्याच्या अंगास शक्ती मिळून मन ताजेतवाने झाले. त्याने उरुवेला सोडली व तो बोधगयेस आला. त्यांनतर शेहेचाळीस दिवस पुरेल एवढे अन्न त्याने जमा केले व बोधिप्राप्तीचा संकल्प करून बोधिवृक्षाखाली वज्रासन लावले. सिद्धार्थाला ज्ञानप्राप्ती होऊन तो सम्यक संबुद्ध झाला. येणेप्रमाणे सुजातेने दिलेली खीर खाऊन सिद्धार्थाने आपल्या देहदंडनाच्या तपश्चर्येचा भंग करून चिंतनमय मार्गाचा अवलंब केला व पुढे त्यास संबोधी प्राप्त झाली. यास्तव सुजातेच्या दानाला सर्वाधिक महत्त्वाचे दान मानण्यात येते.

**प्रश्न ५०५ : जीवक वैद्याने संघाची कशा प्रकारे सेवा केली?**

**उत्तर -** जीवक राजगृहाचा राजवैद्य होता. त्याची भगवंतावर असीम निष्ठा होती. तो भगवंतांची तसेच संघातील भिक्खूंचीही सुश्रूषा करीत असे. उज्जैनीचा राजा प्रद्योत याला कावीळ झाला व जीवकाने त्याला बरे केले. तेव्हा राजाने त्याला अत्यंत मूल्यवान शालजोडी अर्पण केली. जीवकाने ती स्वीकारावयाची भगवंतांना विनंती केली आणि सोबतच सर्व भिक्खूंनीदेखील उकिरड्यावरील वस्त्रांऐवजी चीवरे वापरावयाची अनुमती देण्याची विनंती केली. ज्यामुळे रोगरोईचे प्रमाण कमी व्हावे. भगवंतांनी विनंती मान्य केली. तेव्हापासून भिक्खूंनी चीवरांचे दान स्वीकारणे सुरू केले व त्यांची रोगराईची समस्या बरीच कमी झाली (प्रश्न क्र. ७६ पहा)

**प्रश्न ५०६ : सेनापती सिंह कशामुळे प्रसिद्ध झाला?**

**उत्तर -** लिच्छवी गणराज्याच्या सेनापतीचे नाव सिंह असे होते. तो नाथपुत्तांचा उपासक होता. ते त्याला नेहमी सांगत की, श्रमण गौतम अक्रियावादी असल्यामुळे त्याने त्यांच्याकडे जाऊ नये सिंह सेनापतीला भगवंताबद्दल नेहमीच चांगल्या बातम्या मिळत. ते नक्कीच सम्यकसंबुद्ध असले पाहिजेत, असे त्यास वाटत असे. त्याने दोनतीनदा नाथपुत्ताची परवानगी मागितली व ती न मिळाल्यामुळे स्वतःच निर्णय घेऊन तो भगवंताना भेटायला गेला. सेनापती सिंहाने भगवंतांना विचारले ''हे स्वामी!, असे म्हणतात की, श्रमण गौतम अक्रियावादी तत्त्वांचा उपदेश देतात. सचेतन प्राणिमात्राच्या कर्माची फलप्राप्ती होत नाही असे सांगतात. सर्वच वस्तू नाशवंत असल्याने व त्यांचा तिरस्कार करण्याचे सांगतात. भगवन मी एक सैनिक आहे आणि आपल्या कायद्याची अंमलबजावणी करण्यासाठी राजाने माझी नेमणूक केलेली आहे तेव्हा मी अक्रिय होऊन कसे चालेल?''

तेव्हा भगवंतांनी उपदेश केला, ''अनाचारी कर्मे करू नयेत अशी शिकवण मी देतो. मग ती वाचेद्वारे, कृतिद्वारे वा वैचारिक असो. ज्या चांगल्या नसून अकुशल आहेत अशा मनाच्या सर्व अवस्था तसेच कृतीने, वाचेने विचाराने पापचारी असणाऱ्या क्रिया नष्ट व्हायलाच पाहिजेत असा मी उपदेश करतो. सिंहा! स्वार्थाचा, लालसेचा, दुष्ट इच्छेचा आणि भ्रमाचा विध्वंस केलाच पाहिजे असे मी जाहीर करतो. याला अक्रियावादी म्हणशील का? परंतु संयम, प्रेम, परोपकार बुद्धी आणि सत्य यांचा सर्वनाश व्हावा असे मी कदापि म्हणत

नसतो.'' ''जो शिक्षेस पात्र आहे त्याला शिक्षा व्हायलाच पाहिजे. तथापि सर्वांप्रती पूर्णपणे प्रेम आणि करुणेने ओतप्रेत राहावे. जो दंड शासनकर्ता फर्मावितो, तो दंड दुष्टांवर ओढवून आणण्यास त्याची दुष्कृत्ये कारणीभूत असतात. न्याय्यपणाच्या कारणास्तव जे लढाईवर जातात, ते दोषाला पात्र नसतात. जो युद्धाला कारणीभूत होतो त्यालाच दोष द्यायला पाहिजे. सिंहा ! विजयी सेनापती तर श्रेष्ठ असतोच, परंतु जो अहंकाराला जिंकतो तो त्याहून श्रेष्ठ जेता होय.'' येणेप्रमाणे सिंह सेनापतीच्या प्रश्नामुळे अहिंसेच्या सिद्धान्ताला भगवंतांनी पूर्ण प्रकाशित केले. सिंहसेनापतीमुळे धम्माला बरेच साहाय्य मिळाले.

**प्रश्न ५०७ : सम्राट अशोकाने धम्मास कसे साहाय्य केले ?**

**उत्तर** – सम्राटाने स्वतःच्या राज्यात ८४००० स्तूप उभारले. बौद्धधम्मीय पंचशीलें राजाज्ञा रूपाने देशोदेशी शिलाखंडावर कोरले. धर्मसंगीतीचे आयोजन केले. स्वपुत्रास व स्वकन्येस श्रीलंकेस धम्मप्रचारास पाठविले.महामोगगलितिस्स यांच्याकडून संघात छद्मवेषाने घुसलेल्या इतरधम्मीय श्रमणांची संघातून हकालपट्टी केली कारण ते इतरधर्मीयांच्या मते भगवंताच्या नांवाने खपवीत असत. परदेशांत बौद्धधम्माच्या प्रचारार्थ भिक्खूंना पाठविले. संपूर्ण भारतभर काश्मीर ते कन्याकुमारीपर्यंत धम्माचा प्रचार करून धम्मराज्य स्थापित केले. (प्र. ४६० ते ४७१ पाहावेत.)

**प्रश्न ५०८ : सम्राट कनिष्काने धम्मासाठी काय कामगिरी केली?**

**उत्तर** – स. कनिष्काने धम्माची सेवा तनमनधनाने केली. तो साहित्य आणि कलेचा आश्रयदाता आणि महाविजेता होता. त्याच्या दोन राजधान्या होत्या.

१) कपिशा (काबूलच्या उत्तरेस) अणि पूर्षपूर (पेशावर)

त्याने पुढील कार्य केले -

१. बौद्ध भिक्खूंना सहाय्य
२. बौद्धांसाठी विहार बांधून दिले.
३. भ.बुद्धांच्या मूर्तीचा प्रथम निर्माता. तो महायानाचा प्रथम संरक्षक होता.त्यामुळे त्याने भगवंतांना देवता मानून त्यांच्या मूर्तिपूजेचा प्रघात पाडला.पालीभाषेऐवजी संस्कृत भाषेत बौद्ध साहित्य निर्माण करावयास चालना दिली.
४. चीन, जापान, कोरिया, तिबेट देशांत प्रसारक पाठविले
५. बुद्धवचनांना क्रमबद्ध करविले. ताम्रलेख लिहिविला
६. त्याने राजदरबारांत महाकवी अश्वघोष, वसुमित्र आणि मातृचेर यांचा सन्मान केला
७. वैद्यकी शास्त्रास प्रोत्साहन देण्यास चरक वैद्याचा सन्मान केला

**प्र. ५०९ : सम्राट हर्षवर्धनाने कोणती कामगिरी केली?**

**उत्तर** – तो कला व विद्येचा पारखी होता. त्याच्या दरबारी बाणभट्ट महाकवी होता.ज्याने हर्षचरित काव्य लिहिले.स.हर्षवर्धनाने बौद्ध संघाची नव्याने स्थापना केली. विहार, विश्रामगृह आणि स्तूप बांधले.

बौद्धधम्माच्या प्रचारार्थ कार्य केले ते असे-

१.पशुवध बंद केला. मांस खाणे अपराध घोषित केले

२. दरवर्षी बौद्ध भिक्खूंची महान परिषद बोलावीत असे व वाईट भिक्खूंची हकालपट्टी करण्यात येत असे.

३. विहार, स्तूप बांधले व जुन्या विहारांची डागडुजी केली

४. बौद्धभिक्खूंच्या आर्थिक गरजा व अन्नधान्य पुरवीत असे.

**प्रश्न. ५१० : श्यामावती, सुप्रिया व कात्यायनी कशाबद्दल प्रसिद्ध होत्या?**

**उत्तर** - इतर बौद्धधम्मीय उपासिकांमध्ये श्यामावती, सुप्रिया आणि कात्यायनी यांची नावे प्रमुख आहेत

**श्यामावती** - ती एका श्रेष्ठीची सुंदर कन्या होती. तिचे लग्न कोशांबीच्या उदयन राजाबरोबर झाले. भगवंताच्या धम्मावर तिची अतीव श्रद्धा होती, व संघाला दानधर्म करण्याबद्दल तिची बरीच ख्याती होती. आपला द्वेष करणाऱ्याबद्दल देखील ती मैत्रीभाव दाखवीत असे. त्यामुळे मैत्रिविहारिणी उपासिकांमध्ये ती सर्वश्रेष्ठ मानली जाई.

**सुप्रिया** - हिचा जन्म वाराणसीला झाला. तिची त्रिरत्नांवर अतीव श्रद्धा होती. ती स्वतः भिक्खूविहारात जाऊन औषधपाणी देऊन सुश्रूषा करीत असे. त्यामुळे रोग्यांची सुश्रूषा करणाऱ्यांमध्ये तिला अग्रस्थान मिळाले.

**कात्यायनी** - अवन्तिजनपदांत कुरटघर नावाच्या लोकांची सेवा करण्यात तिला फार प्रसन्नता वाटत असे. आपल्या प्रसन्न व्यवहाराने तिने बऱ्याचशा चोरांना देखील भिक्खू बनावयाची प्रेरणा दिली व ते पुढे शीलमय जीवन जगू लागले. त्यामुळे तिला अतिप्रसन्न राहणाऱ्या उपासिकांमध्ये अग्रस्थान मिळाले.

**प्रश्न ५११ : मेरी फॉस्टरने बौद्धधम्मीयांसाठी कोणती मदत केली?**

**उत्तर** - मेरी रॉबिन्सचा जन्म इ.स. १८४४ मध्ये होनोलूलू येथे झाला. तिचा विवाह अमेरिकन धनाढ्य बॅंकर टी.आर.फॉस्टरशी होऊन तिचे नाव मेरी ऐलिझाबेथ फॉस्टर पडले. एकदा ती जहाजाने जपानला जात असतांना तिची गाठ श्रीलंकेचा तरुण भिक्खू अनागारीक धम्मपालाशी पडली. त्याने केलेला मैत्रीभावनेचा उपदेश ऐकून ती फार प्रभावित झाली. १९०२ मध्ये तिने ५०० डॉलर व पुढील वर्षी २००० डॉलरचे दान केले. त्या धनराशीचा उपयोग अनागारिक धम्मपालाने सारनाथच्या ऋषिपतन मृगदाव येथील मूलगंधकुटी विहाराचा जीर्णोद्धार करावयासाठी केला. त्यानंतर वर्षानुवर्षे मेरी फास्टरने दिलेल्या दानामुळे सारनाथ आणि इतर बौद्ध धम्मक्षेत्रांचा पुनरुद्धार सुरू झाला. इ.स. १९१८ व १९२३ मध्ये अनुक्रमे ५०,००० व १०,००,०० डॉलर दान करून मेरी फॉस्टरने आधुनिक विशाखेचे काम केले. तिने इ.स. १९१३ मध्ये दान दिलेल्या ६०,००० डॉलर्सने श्रीलंकेमध्ये फॉस्टर रॉबिनसन हॉस्पिटल उघडण्यात आले.

**प्रश्न ५११ (अ) : अनागारिक धम्मपालांनी बौद्धधम्माची सेवा कशाप्रकारे केली?**

**उत्तर** - अनागारिक म्हणजे ज्यांनी आपले घर (आगार) सोडून दिले, म्हणजे चीवर धारण न करता, ब्रह्मचर्य व्रत राखून आयुष्यभर ते भटकंती करीत धम्मसेवा करीत राहिले. त्यांचा जन्म १७.९.१८६४ रोजी श्रीलंकेच्या एका खेड्यात झाला. मूळचे नाव डेव्हिड कोरोलिस

हेवावितरणे होते. इंग्रंजांचे राज्य होते तरी त्यांच्या मातापित्यांची बुद्धधम्मावर अत्यंत श्रद्धा होती. १४ वर्षाचा असतांना डेव्हीडने घर सोडले व भटकंती करीत अध्ययन केले. १८८४ मध्ये थिऑसॉफिकल सोसायटीचे सदस्य झाले. जानेवारी १८९१ मध्ये सारनाथ व बौद्धगयेस भेट देऊन बौद्ध वास्तुंचे जीर्णावस्थेतुन पुननिर्माण केले. मे १८९१ मध्ये ''महाबोधि सोसायटी'' ची कलकत्यात स्थापना केली. मे १८९२ मध्ये ''दी महाबोधि'' हे बौद्धजनांचे पत्रक आणि सारनाथ वरून ''धर्मदूत'' सुरू केले. या सर्व कामासाठी मेरी फॉस्टर या अमेरिकन महिलेने त्यांची खूपच आर्थिक मदत केली. १० सप्टेंबर १८९३ ला शिकागो येथे भरलेल्या आंतरराष्ट्रीय धर्मसभेत बौद्धधम्माचे प्रतिनिधित्व केले. विदेशी बौद्धांचे लक्ष भारताकडे वेधून, बौद्ध धम्माची पुनर्रचना करण्यास प्रथम प्रयास त्यांनीच केला, त्यामुळे बौद्धधम्माला भारतात पुनर्जिवित करावयास प्रथम प्रयत्न करण्याचे श्रेय अनागारिक धम्मपाल यांच्याकडे जाते.

**प्रश्न ५१२ : डॉ. आंबेडकरांनी भारतात बौद्धधम्माचे पुनरुज्जीवन कसे केले?**

**उत्तर -** डॉ. भीमराव रामजी ऊर्फ बाबासाहेब आंबेडकर यांचा जन्म १४ एप्रिल, १८९१ रोजी झाला. लहानपणापासूनच त्यांना धार्मिक शिक्षण मिळाले. भ.बुद्ध , संत कबीर आणि भ.ज्योतिबा फुले यांना ते गुरू मानीत. हिंदू धर्मामध्ये शूद्र व नीच गणल्या जाणाऱ्या महार जातीत त्यांचा जन्म झाल्यामुळे त्यांना बऱ्याच सामाजिक अडचणींना तोंड द्यावे लागले व जाच सहन करावा लागला. तथापि, मोठ्या धैर्याने व चिकाटीने त्यांनी आपले उच्च शिक्षण इंग्लंड, अमेरिका, जर्मनी इ. स्थळी घेतले व एम.ए, पीएच.डी, डी.एससी., एलएलडी, डी.लिट, व बॅरिस्टर या पदव्यांनी विभूषित झाले. समाजशास्त्र, न्यायशास्त्र आणि धर्मशास्त्र यांचा अत्यंत सखोल अभ्यास करून पददलित बाधंवाना व स्त्रियांना जागृत करण्याचे कार्य त्यांनी आयुष्यभर केले.त्यांनी भारतीय राज्यघटनेची निर्मिती करून स्त्रियांना व पददलितांना समानतेचे हक्क मिळवून दिले.

भगवान बुद्धांच्या समता, न्याय, करुणा आणि बंधुत्व या तत्त्वांवर आधारलेल्या धम्माचा, त्यांच्यावर जबरदस्त पगडा होता. त्यामुळे हिंदू धर्मातील चातुर्वर्ण्यावर हल्ला करून, शेवटी त्यांनी १४ ऑक्टोबर, १९५६ रोजी अशोक विजयादशमीच्या दिवशी महाथेरो चंद्रमणी यांच्या हस्ते बौद्ध धम्माची दीक्षा घेतली दीनदुबळ्या व पददलित समाजाला त्याच दिवशी सामूहिक रीतीने पाच लक्ष लोकांना बौद्धधम्माची दीक्षा दिली. हा नागपुरातील समारंभ जगाच्या इतिहासात अजरामर राहील. तो भारतातील बौद्धधम्माच्या पुनरुत्थानाचा सुवर्ण दिवस भगवंतांच्या २५०० व्या जयंतीच्या वर्षी आला ही मोठीच भाग्याची गोष्ट आहे. डॉ. आंबेडकरांनी 'संपूर्ण भारत बौद्धमय करीन' अशी प्रतिज्ञा केली होती. परंतु दोन महिन्यांच्या आतच सहा डिसेंबर, १९५६ रोजी त्यांचे महापरिनिर्वाण झाले. त्या थोड्याशा काळातदेखील त्यांनी आग्रा, चंद्रपूर इ. ठिकाणी लक्षावधी लोकांना धम्मदीक्षा दिली.

भगवंतांच्या धम्माचा अत्यंत सांगोपांग आणि विज्ञानवत अभ्यास करून त्यांनी 'दि बुध्द अॅण्ड हिज धम्म' हे पुस्तक इंग्रजीत लिहिले. त्याची अनेक भाषांतरे उपलब्ध आहेत. स.अशोकाप्रमाणे बाबासाहेब आंबेडकरांचे नाव बौद्धधम्माच्या उत्थानाच्या इतिहासात अजरामर राहील.

# बौद्धधम्मातील पंथभेद

**प्रश्न ५१३ : बौद्धधम्मात कोणते पंथभेद आहेत व ते कसे निर्माण झाले?**

**उत्तर** – बौद्धधम्मात प्रामुख्याने दोन संप्रदाय आहेत. १. महायान २. हीनयान. वैशालीमध्ये भरलेल्या संगीतीमध्ये (भगवंताच्या महापरिनिर्वाणानंतर शंभर वर्षांनी) विनयाच्या काही गोष्टींबद्दल जे मतभेद झाले, तेव्हापासून संघभेदास प्रारंभ झाला. जे तरुण भिक्खू विनयाच्या नियमांना शिथिल करून नवीन नियम करावयास उत्सुक होते, ते संख्येने अधिक होते. ते स्वतःस आर्यमहासंघिक म्हणजे महायानी म्हणवू लागले. जे वयस्क असून ज्यांत स्थविरांची संख्या अधिक होती. परंतु एकूण संख्येच्या मानाने त्यांना अल्पमत होते त्यांना आर्य स्थविरवादी किंवा हीनयानी म्हणू लागले.

ज्या नियमावरून मतभेद झाले, ते नवीन नियम येणेप्रमाणे

१. आत भोजन शिजविणे (विहारात)
२. स्वेच्छेने शिजविणे
३. भोजन आंत (विहारांत) खाणे
४. स्वेच्छेने खाणे
५. प्रातःकाळी उठल्याबरोबर अन्नाचा स्वीकार करणे
६. दानकर्त्याच्या इच्छेनुसार अन्न घरी घेऊन जाणे
७. विविध फळे खाणे
८. जलाशयात उत्पन्न वस्तूंना खाणे इत्यादी

जरी सुरुवातीस विनयाच्या नियमांवरून मतभेद झाले तरी पुढे विचारसरणीमध्ये बदल होऊ लागला. महायानी भिक्खू भगवंताच्या कायेस मनुष्य काया न मानता तिला लोकोत्तर व भगवंताला ईश्वरस्वरूप मानू लागले. त्यानुसार त्यांनी बरेच साहित्य निर्माण केले व भगवंतांच्या मूर्तीची पूजा सुरू झाली दीपवंशानुसार पंथभेद (निकाय भेद)येणेप्रमाणे. ते १८ आहेत.



स. अशोकाच्या वेळी (इ.स.पूर्व २६९ ) वरील पंथभेद होते.

**प्रश्न ५१४ : महायान म्हणजे काय ?**

**उत्तर** – महायान म्हणजे मोठे यान. यान म्हणजे रथ किंवा मार्ग. त्यांचे म्हणणे असे की भगवंतांच्या शिकवणीचे उद्दिष्ट केवळ स्थविरांनाच धम्मलाभ व्हावा व विनयाचे काटेकोरपणे पालन केलेच पाहिजे असा नव्हता. नियमांना शिथिल करून त्यात सर्वांना समाविष्ट केले पाहिजे, असा ज्यांनी हेका धरला ते स्वतःच 'अधिक लोकांच्या उद्धाराकरिता' म्हणजे मोठे यान असे म्हणून स्वतःस ते महायानी म्हणवू लागले. त्यावेळी धम्माबद्दल कसलेही मतभेद नव्हते. महायानी पंथाने हळूहळू भगवंताच्या कायेस 'लोकोत्तर' म्हणावयास सुरुवात केली व भगवंताला ईश्वराचे स्वरूप दिले. भगवंताच्या अवशेषांची, फुलांची पूजा करणे, चैत्य किंवा स्तूपाची पूजा करणे, भगवंतांच्या मूर्तीची पूजा करणे, बोधिवृक्षाची पिंपळाची पूजा करणे सुरू केले.

त्यांनी भगवंतांना अनेक प्रकारची नावे दिलीत व ईश्वरस्वरूप पूजा केली, अमिताभ, मैत्रेय, अवलोकितेश्वर, वैरोचन, अक्षोभ्य, रत्नसंभव, अमोघसिद्धी, मंजुश्रीबुद्ध, वज्रपाणी, सामंतभद्र, आकाशगर्भ, महास्थानप्राप्त, भैषज्यराजा, इत्यादी नावे दिली. त्यामुळे सामान्य जनांस महायान फार आवडू लागला.

ते बोधिसत्त्वालाही लोकोत्तर मानतात. भगवंताच्या भौतिक देहाला ते अनाश्रव म्हणजे विशुद्ध मानतात. सर्वज्ञता इत्यादी गुण अर्हतांमध्ये दिसत नाहीत. म्हणून त्यांच्यात दोष असतातच. परंतु भगवंतांमध्ये कसलेही दोष नव्हते असे ते मानतात. ते बहुसंख्यीक असल्यामुळे त्यांना महायानी म्हणतात. स्थविरवादी भिक्खू भगवंताच्या कायेस मनुष्यकाया मानतात.

**प्रश्न ५१४ (अ) : महायानाचा काय अर्थ आहे?**

**उत्तर** – भ.बुद्धाच्या महापरिनिर्वाणानंतर (इ. सनापूर्वी ४८३) जवळजवळ शंभर वर्षांनी (इ.सनापूर्वी ३८०) स्थविरवाद (बुद्धाच्या मार्गाने जाणारे) आणि महासंघिक हे जे दोन निकाय (संप्रदाय) स्थापन झाले होते, ते पुढील सव्वाशे वर्षांमध्ये विभाजित होत होत महासांघिकांचे सहा आणि स्थविरवाद्यांचे बारा येणेप्रमाणे एकूण अठरा निकाय निर्माण झाले
इ. सनापूर्वी ३री शताब्दी- सम्मितीय-चैत्यवाद (महासांघिक) अन्धक आध्राचे
इ.सनापूर्वी १ ली शताब्दी - वैपुल्य, पूर्वशैलीय, अपर शैलीय, राजगिरिक, सिद्धार्थक
इ. सवी प्रथम शताब्दी-महायान

**प्रश्न ५१५ : महायानाचे मुख्य ग्रंथ कोणते?**

**उत्तर** – महायान ग्रंथात हजारो सूत्रे आहेत. त्यांचे ९ ग्रंथ प्रमुख आहेत. ते येणेप्रमाणे १. प्रज्ञापारमिता २. अष्टसाहस्रिका ३. सद्धर्मपुण्डरिक ४.ललितविस्तार ५. लंकावतार ६. सुवर्णप्रभास गंडव्यूह ७. तथागतगुह्यक ८. समाधिराज आणि ९. दशभूमिश्वर

**प्रश्न ५१६ : महायानी ग्रंथांचा सारांश काय आहे?**

**उत्तर** – त्यांच्या नऊ प्रमुख ग्रंथांचा अत्यल्प सारांश येणेप्रमाणे

१. **प्रज्ञापारमिता**- हा सर्वात प्राचीन आहे. यात शून्यतेचे अनेकविध प्रतिपादन केलेले आहे. कोणत्याही पदार्थाचा आपला स्वतःचा स्वभाव नाही असे मत असून, त्यांत नैरात्म्य (आत्मा नसणे) ही धारणा प्रमुख आहे.

२. **अष्टसाहस्रिका**- सर्वसंहारी मायावाद आणि अद्वयवाद म्हणजे परमार्थतः चित्त स्वयं अचित्त आहे. स्वभावदेखील निःस्वभाव आहे. अविद्यमान धम्माची विद्यमानतया प्रतीती (ज्ञान) हीच अविद्या होय.

३. **सद्धर्मपुंडरिक**- यांत बुद्धाची म्हणजे अवलोकितेश्वराची महिमा वर्णिली आहे. त्यात म्हटले आहे की भगवान बुद्ध नाना रूपांनी वेळोवेळी प्रकट होऊन लोकहितासाठी उपदेश करतात. ते अमर आहेत. त्यांना ईश्वरस्वरूप मानलेले आहे.

४. **ललितविस्तार**- ही सर्वास्तिवाद्यांनी लिहिलेली बुद्धसंजीवनी आहे. यात सिद्धार्थाला तो पुढे धार्मीक चक्रवर्ती होईल असे अनुलक्षित केलेले आहे. मातेच्या गर्भात असतानादेखील बोधिसत्त्वरूपाने त्यांनी उपदेश केला होता असे वर्णन आहे.

५. **लंकावतार सूत्र**- ही सूत्रे योगाचारासाठी अत्यंत महत्त्वपूर्ण अशी मानलेली आहेत. इ.स. नंतर दुसऱ्या ते पाचव्या शताब्दीमध्ये यांची रचना झाली. यांत योगावचार व विज्ञानवाद आहे . यांत असे म्हटले आहे की सर्वच जग भ्रांतिमय आहे. केवळ निराभास व निर्विकल्प चित्त हेच सत्य होय.

६. **सुवर्णप्रभास सूत्र**-यांत बुद्ध धातूला असंभवनीय असे म्हटले असून तथागताची धम्मकाया अमर असल्याचे सांगितले आहे. जगात त्यांच्या फक्त निर्मित कायेचे (देहाचे) महापरिनिर्वाण पाहिल्या जाऊ शकते असे म्हटले आहे.

७. **तथागतगुह्यक**-महायानी पंथाचे म्हणणे असे की, भगवंतांनी स्वोपलब्ध धम्माला अत्यंत गंभीर आणि दुर्बोध असल्याने जाणून सर्वसाधारण जनतेला तो समजू शकणार नाही असे वाटले म्हणून त्यांनी त्या गंभीरतम धम्माची देशना केवळ विशिष्ट भिक्खूनांच दिली.

८. **समाधिराज**-यालाच चंद्रप्रदीपसूत्रदेखील म्हणतात. याचा आशय असा आहे की सर्वच धर्म (Religion नव्हे) समान आहेत. धर्म म्हणजे उत्पत्ती व नाशाची कारणे किंवा वस्तूंचे गुणधर्म.

९. **दशभूमिश्वर**- बोधिसत्त्वाला बुद्धत्वप्राप्तीसाठी ज्या दहा अवस्थांमधून जावे लागते त्यांचे वर्णन केलेले आहे.

**प्रश्न ५१७ : हीनयान म्हणजे काय?**

**उत्तर** - हीनयान म्हणजे लहान यान(किंवा रथ, मार्ग) विनयाचे नियम पूर्णतः पाळणारे स्थविर अल्पसंख्याक होते व नवीन शिथिल नियमास उत्तेजन देणारे तरु ण भिक्खू बहुसंख्यक, यामुळे अल्पसंख्यकांना हीनयानी म्हणून ते संबोधू लागले. भगवंतांनी स्वशरीरास मनुष्यमात्राचे शरीर मानूनच सर्वांस उपदेश केला त्यानुसार स्थविरदेखील भगवंतांच्या शरीरास नैसर्गिक मानीत. हीनयानामध्ये स्वतः केलेल्या कर्मावरच प्रगतीचा भर दिलेला आहे. महायानामध्ये भगवंतास व बोधिसत्त्वास देवतूल्य मानून केवळ नामस्मरणाने संकटे दूर होतात, असे मानू लागले. हीनयान म्हणजे पूर्वीचा स्थविरवाद. आधुनिक विज्ञानाशी हीनयानाचे धर्मतत्त्व

तंतोतंत जुळते. निर्वाणाची व्याख्या, तसेच दुःख , अनित्य व अनात्म ही मूलतत्त्वे दोन्ही यानांत सारखीच आहेत.

**प्रश्न ५१८ : हीनयानी ग्रंथ म्हणजे काय ?**

**उत्तर –** बौद्धधम्माचे सर्वच मूल ग्रंथ हीनयान व महायानात सारखेच आहेत. परंतु प्र. ५१६ मध्ये दिलेलेच ग्रंथ भिन्न आहेत. महायानात शून्यवाद आणि भगवंताच्या कायेबद्दल लोकोत्तरवाद एवढाच काय तो दोन यानांतील फरक आहे.

**प्रश्न ५१९ : वज्रयान म्हणजे काय?**

**उत्तर –** वज्रयान किंवा मंत्रयानाची उत्पत्ती इ. सनाच्या आठव्या शतकामध्ये झाली. त्यामुळे तांत्रिक बौद्धधम्मास चालना मिळाली वज्रयानाने यौनसंबंधी गूढशास्त्र, जादूटोणा, संस्कार रहस्यवाद इत्यादी गूढ तंत्रमंत्रांना चालना दिली. त्यामुळे धम्माचे जुने शुद्ध रूप जाऊन त्यास लवकरच ग्लानी आली. 'ओम मणिपद्मे ह' वगैरे मंत्र वज्रयानात आहेत. ते हिंदू धर्माच्या धर्तीवर असल्यामुळे धर्माच्या मूळ सात्त्विक स्वरूपास बाधा निर्माण झाली. अशा प्रकारच्या विचारसरणीस भगवान बुद्धांचा सक्त विरोध असल्यामुळे मूळ बुद्धधम्मात वज्रयानास काहीच स्थान नाही.

**प्रश्न ५२० : इत्सिंग या चिनी प्रवाशानुसार व हीनयानाचा प्रसार व कार्यक्षेत्र कोठकोठे होते?**

**उत्तर –** इत्सिंग हा चिनी प्रवासी इ.स. ६७१ ते ६७५ मध्यें भारतात होता. त्याने बौद्धधम्माचे पंथ आणि त्यांचे ग्रंथ यांचे केलेले संक्षिप्त वर्णन येणेप्रमाणे-

१. आर्य महासंघिक निकाय (महायानी)

अ.) सात उपपंथ
ब) त्रिपिटक : ३ लक्ष श्लोकांमध्ये (गाथांमध्ये)
क) मगध राज्यात विशेषेकरून काहींजण लाटप्रदेश, सिंधप्रदेश व उत्तर-दक्षिणेसही.

२. आर्यस्थविर निकाय (हीनयानी)
अ) तीन उपपंथ
ब) त्रिपिटक : ३ लक्ष श्लोकांमध्ये (गाथांमधे)
क) दक्षिण भारतात आणि मगध साम्राज्यांत, काही जण लाटप्रदेश, सिंधप्रदेश, पूर्वभारत, परंतु उत्तर प्रदेशात नव्हते.

३. आर्यमूल सर्वस्तिवाद निकाय (हीनयानी)
अ)चार उपपंथ-मूलसर्वस्तिवाद, धर्मगुप्त, महिशासक व काश्यपीय
ब) त्रिपिटक : ३ लक्ष श्लोकांमध्ये (गाथांमधे)
क) मुख्यतः मगध साम्राज्यात, उत्तर आणि पूर्व भारतात,
ड) धर्मगुप्त, महिशासक आणि काश्यपीय फारच कमी, काही जण चंपामध्ये

४. आर्य सम्मितीय निकाय- (हीनयानी)
अ) चार उपपंथ

ब) त्रिपिटकाचे फक्त २ लाख श्लोक (गाथा), विनयपिटकाचे ३०००० श्लोक
क) मुख्यतः लाटप्रदेश, सिंधप्रदेश, दक्षिण भारत, उत्तरप्रदेशात अजिबात नव्हते

**प्रश्न ५२१ : सध्याचा बुद्धधम्म महायानी की हीनयानी ?**

**उत्तर** – हीनयान किंवा थेरवाद हाच मूळचा बुद्धधम्म होय. तोच सध्याचा बुद्धधम्म होय. त्यात महायानामुळे बुद्धपूजा, बोधिसत्त्वपूजा, चैत्यपूजा, बोधिपूजा इत्यादी काळमानानुसार सर्वच ठिकाणी अंतर्भूत झाली. ती सर्वसामान्य जनतेस आवडू लागल्यामुळे हीनयानी लोकांनीही तिला आत्मसात केले. मूळ धम्मग्रंथ जसे त्रिपटक, महावस्तू इ. सारखेच आहेत. (डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी पूर्वीच्या हीनयानाचाच पुरस्कार केलेला आहे : संकलिका).

**प्रश्न ५२२ : महायान आणि हीनयान यांत काय भेद आह ?**

**उत्तर** – महायान पंथाच्या खालील गोष्टी प्रमुख आहेत

१. बोधिसत्त्वाची संकल्पना
२. पारमितांना पाळावयाची प्रथा
३. बोधिचित्ताच्या संकल्पनेचा विकास
४. दशभूमीद्वारे आध्यात्मिक उन्नती
५. बुद्धत्वाची प्राप्ती हेच ध्येय
६. त्रिकायची संकल्पना
७. धम्मशून्यतेची संकल्पना किवा धम्मसमता किंवा तथता महायानी यांनी वेगळीच दाखविली ती अशी

अ. क्लेशावरणाला काढून टाकणे
ब. ज्ञेयावरणाला काढून टाकणे. जे परमार्थ सत्याला झाकून टाकीत असते. त्या आवरणाला ते काढून टाकतात व त्यामुळे पुद्गलशून्यता (म्ह. आत्मा नसणे) आणि धर्मशून्यता (म्ह. सर्व वस्तू आणि सर्व प्राणी यांचे अस्तित्व नसणें) याची प्रचिती येते.

हीनयानी फक्त क्लेशावरणाला दूर सारतात, परंतु ते ज्ञेयावरणाला काढून टाकीत नसल्यामुळे त्यांना पूर्ण ज्ञान होत नाही असे महायान्यांचे म्हणणे आहे. परंतु हीनयानी म्हणतात की अविद्येचा नाश हाच निर्वाणाचा मार्ग होय. ते म्हणतात की अर्हताला संबोधी प्राप्त होते, परंतु बुद्धत्वाची प्राप्ती होत नाही कारण त्यासाठी बराच काळ कुशल कर्मे करावी लागतात व जिच्यामुळे बुद्धांना सर्वज्ञता प्राप्त होते जी अर्हतांना होत नाही.

हीनयानामध्ये वरील १ ते ५ गोष्टी क्रमाक्रमाने सामील झाल्या. परंतु धम्मकायेची व धर्मशून्यतेची कल्पना वेगळी राहिली.

* * * *

# चतुर्थ खंड

# बौद्धधम्माचा अभ्युदय व प्रसार

## धम्मसंगीती व बौद्ध साहित्य

**प्रश्न ५२३ : धम्माचे संगायन करावयास संगीती कधी भरल्या?**

**उत्तर** -भ.बुद्धाच्या महापरिनिर्वाणानंतर लगेच (इ.स.पूर्वी ४८३) राजगृहाजवळील सप्तर्णी गुफांमध्ये प्रथम संगीती भरली होती. दुसरी शंभर वर्षांनंतर (इ.स.पूर्व ३८३ मध्ये) वैशालीमध्ये वेळूकारामामध्ये काळाशोकाच्या राज्यांत, आणि तिसरी पाटलिपुत्रामधील अशोकरामात (स. अशोक इ.स.पूर्वी २४७ मध्ये) भगवान बुद्धाच्या महापरिनिर्वाणानंतर २३४ वर्षांनी भरली होती. इ.स.पूर्वी १०० मध्ये कनिष्क राजाने चौथी संगीती भरविली होती.

**प्रश्न ५२४ : भगवंताच्या महापरिनिर्वाणानंतर भिक्खूंना प्रथम संगीती भरविण्याची आवश्यकता का भासली?**

**उत्तर** - भगवंताचे महापरिनिर्वाण झाल्यावर सुभद्र नावाचा एक वृद्ध प्रव्रजित असे म्हणू लागल्याचे ऐकिवात आले-

'भिक्खूनों! श्रमण गौतमाच्या शासनापासून आता आपण मुक्त झालो आहोत. नेहमी ते आज्ञा देत असत की, असे करा व तसे करू नका. आता मनाला जे वाटेल ते आपण करू या, जे करावेसे वाटणार नाही ते न करू या.' आयुष्मान महाकाश्यप हे ऐकताच सतर्क झाले. त्यांनी भिक्खूंना एकत्रित करून म्हटले, 'भिक्खूंनों! अधम्म वाढू लागला आहे. धम्माचा ऱ्हास होऊ लागला आहे. आपण 'धम्म आणि विनय' यांचे संगायन करू या.'

महास्थविर महाकाश्यपाच्या उपाध्यायत्वाखाली भिक्खू संघाने राजगृहामधील सप्तपर्णी गुफेत धम्म (सूत्र) आणि विनय यांचे संगायन केले. 'सुत्तपिटकाकरिता' आनंद महास्थविरांना प्रमुख नेमण्यात आले. आणि 'विनयपिटकाकरिता' उपाली महास्थविर यांना प्रमुख मानले गेले. महाकाश्यपांनी आनंद महास्थविरांना 'सूत्राविषयी' प्रश्न विचारले आणि आयुष्मान उपालिंना विनयासंबंधी प्रश्न विचारले. दोघांनीही दोन्ही विषयांत सत्य माहिती दिली. अशा रीतीने प्रथम संगीती यशस्वी झाली. त्यात सुत्त पिटकांतील पाचही निकायांचा आणि विनय पिटकांतील महावग्ग व चुल्लवग्ग यांसारख्या मौलिक ग्रंथांचे मौखिक संपादन केले. या संगीतीमध्ये पाचशें भिक्खू उपस्थित होते. म्हणून या संगीतीला 'पंच शतिका' म्हटले आहे.

**प्रश्न ५२५ : सूत्र पिटक व विनय पिटक यात कोणकोणत्या ग्रंथांचा समावेश होतो आणि ते मूळ कोणत्या भाषेत लिहिलेले आहेत?**

**उत्तर** - सुत्त पिटकांत -

१. दीघ-निकाय २. मज्झिम-निकाय ३. संयुक्त-निकाय ४. अंगुत्तर-निकाय आणि ५. खुद्दक निकाय यांचा समावेश होतो

विनय पिटकात- १.महावग्ग २. चुल्लवग्ग ३.पाराजिका ४. पाचित्तिय आणि ५. परिवार. प्रथम संगीतीमध्ये यातील एकही ग्रंथ लिपिबद्ध झालेला नव्हता. केवळ मौखिक पद्धतीने संपादन करून स्थिर केलेला होता. या मौखिक संपादन कार्यालाच संगीती म्हणतात. हे कार्य त्यावेळची बोलभाषा 'मागधीमध्येच' झाले होते असे मानले जाते.

**प्रश्न ५२६ 'दुसरी संगीती' करण्याची आवश्यकता का भासली? ती केव्हा व कोठे झाली?**

**उत्तर** - भगवंतांच्या महापरिनिर्वाणानंतर शंभर वर्षांनी (काळाशोकाच्या राज्यांत इ.स. पूर्व ३८३ मध्ये) वैशाली निवासी, वज्जि-पुत्र भिक्खू दहा गोष्टींचा प्रचार करू लागले होते. ते आपल्या दृष्टीने 'प्रगतीशील' असतीलही परंतु कट्टर पंथीय त्यांना 'दुःशील' म्हणू लागले. त्या दहा गोष्टी अशा प्रकारच्या होत्या जसे

१. शिंगांच्या बनविलेल्या वाटीमध्ये मीठ ठेवले जाऊ शकते.
२. मध्यान्हानंतर भूमध्य रेखेपासून दोन बोटे सूर्य सरकेपर्यंत मध्यान्ह भोजन समाप्त केले जाऊ शकते.
३. चांदी-सोने ग्रहण केले जाऊ शकते, इत्यादी

या गोष्टीबद्दल मतभेद झाल्यामुळे वैशालीमध्ये दुसरी संगीती झाली. ही दुसरी संगीती केवळ भिक्खू नियमाच्याकरिता झाली होती. म्हणून हिला 'विनय संगीती' म्हटले आहे. या संगीतीमध्ये सातशे भिक्खू सम्मिलित झाले असल्यामुळे हिला 'सप्त-शतिका' म्हटलेले आहे. ती आठ महिने चालली. त्यावेळी विनय आणि धम्माचे पारायण झाले आणि पिटक, निकाय अंग आणि धम्मस्कंध यांची पुनरावृत्ती झाली.

**प्रश्न ५२७ : तिसरी संगीती केव्हा, कोठे व का झाली ?**

**उत्तर** - सम्राट अशोकाच्या वेळी भिक्खूंचा आदर-सत्कार फार वाढला होता. दुसऱ्या पंथाचे काही लोक 'भिक्खू-वेश' धारण करून आपआपल्या मतांचा प्रचार करू लागले होते व येणेप्रमाणे बुद्ध-शासनाकरिता हे एक फार मोठे अरिष्ट उत्पन्न झाले होते. ह्या संगीतीचा उद्देश 'संघशुद्धी' हा होता; म्हणजे जे भिक्खू भगवान बुद्धांच्या यथार्थ धम्माला मानणारे नव्हते, त्यांना संघातून बाहेर काढून टाकणे, महास्थवीर मोग्गलिपुत्त तिस्स यांच्या अध्यक्षतेखाली ही संगीती पाटलीपुत्र येथे (इ.स. पूर्वी २४८ मध्ये) झाली आणि आपल्या उद्देशात यशस्वी झाली.

या वेळेपर्यंत स्थविरवादी यांचे १२ व महासंघिकांचे ६ असे एकूण अठरा पंथ निर्माण झालेले होते. त्यावेळी ६०,००० अधर्मी भिक्खूंची संघातून हकापट्टी करण्यात आली. त्यांनी पुढे नालंदा येथे वेगळी सभा भरविली व स्वतःस महायानी म्हणवू लागले.

ह्या संगीतीमध्येही 'धम्म' आणि 'विनय' ह्यांचे संगायन झाले. परंतु असे म्हणतात की, जवळ जवळ ह्या वेळेसच धम्माचा एक अंश 'अभिधम्म' नावाने वेगळाच संगृहीत करण्यात आला व तो 'अभिधम्म-पिटक' ह्या नावाने प्रसिद्ध झाला.

ह्या संगीतीमध्ये एक हजार भिक्खूंनी भाग घेता होता आणि नऊ महिने ही चालू होती. ही महापरिनिर्वाणानंतर २३५ वर्षांनी भरली होती.

**प्रश्न ५२८ : चौथी संगीती कोठे झाली ?**

**उत्तर** - सम्राट कनिष्काच्या संरक्षणाखाली काश्मीरच्या कुंडवन विहारात चौथी संगीती झाली. 'बुद्धचरितम्' ह्या संस्कृत काव्याचे रचयीता महाकवी बुद्धघोष ह्यांचे गुरू पार्श्व हे संगीतीचे अध्यक्ष होते. ह्या संगीतीमध्ये त्रिपिटकाचा ताम्रलेख स्तूपामध्ये बंद करण्यात आला व तो काश्मीर घाटीच्या भग्नावशेषांच्या उत्खननाच्या वेळी जशाचा तसा मिळाला. याच वेळी श्रीलंकेमध्ये वट्टगामिणी अभय ह्या राजाच्या संरक्षणात आलोक विहारात इ.स. पूर्व १०६ मध्ये चौथी संगीती झाली व त्रिपिटकास लिपिबद्ध करण्यात आले.

**प्रश्न ५२९ : पाचवी धम्मसभा कोठे झाली ?**

**उत्तर** - इ.सन १८५७ मध्ये ब्रह्मदेशांत राजा मिन्टो यांच्या काळी झाली. या सभेप्रीत्यर्थ 'कुयाडोव' स्तुपांत संपूर्ण त्रिपिटक जे संगमरमरी ७२९ दगडांवर लिहिले होते, ते आजही सुरक्षित आहे.

**प्रश्न ५३० : सहावी धम्मसभा कोठे झाली ?**

**उत्तर** - इ.स. १८९१ मध्ये श्रीलंकेमध्ये झाली. त्यांत देशोदेशीचे भिक्खू एकत्र आले. जपान, ब्रह्मदेश, भारत आणि श्रीलंकेतील भिक्खूंनी एकत्र विचारविमर्श केला.

**प्रश्न ५३१ : सातवी सभा कोठे झाली ?**

**उत्तर** - इ.स. १९५४ साली ब्रह्मदेशांत झाली त्यावेळी भगवंतांच्या महापरिनिर्वाणानंतर २५०० व्या जयंतीप्रीत्यर्थ, धम्मप्रचार कशा प्रकारे करावयाचा, याविषयी देशोदेशीच्या बौद्धभिक्खूंची सभा झाली. त्यामध्ये डॉ. भदन्त आनंद कौसल्यायन आणि बाबासाहेब आंबेडकरांनाही निमंत्रित केले होते.

**प्रश्न ५३२ : त्रिपिटक पहिल्यांदा लिपिबद्ध कोठे आणि केव्हा करण्यांत आले ?**

**उत्तर** - राजा वट्टगामिणींच्या वेळी इ.स. पूर्वीच्या प्रथम शताब्दीमध्येच श्रीलंकेच्या आलोक-विहारात भिक्खूंनी त्रिपिटकांना लिपिबद्ध केले. त्रिपिटकांत १) विनयपिटक २) सुत्तपिटक आणि ३) अभिधम्म पिटकाचा समावेश होतो. विनयपिटकांत भिक्खूंच्या अनुशासनाचे नियम सांगितले आहेत. ते पांच ग्रंथांत आहेत. अ) महावग्ग ब) चुल्लवग्ग क) पाराजिका ड) पाचितीय आणि इ) परिवार. सुत्तपिटकाच्या अंतर्गत समाविष्ट पाच निकाय आहेत. (१) दीघ-निकायात ब्रह्म जाल वगैरे ३७ सूत्रे आहेत. (२) मज्झिम - निकायात मध्यम-पण्णासचे पंधरा-वर्ग आणि मूल-पर्याय आदी १५३ सूत्रे आहेत. (३) संयुक्त-निकायात वेदना-संयुक्त आदी ५४ सूत्रे आणि ओघ-तरण आदी सात हजार सातशे बासष्ट (७७६२) सूत्रे आहेत. (४) अंगुत्तर - निकायात अकरा निपात आणि चित्त- परियादान आदि नव हजार पांचशे सत्तावन (९५५७) सूत्र आहेत. ५) खुद्दक-निकायात पंधरा ग्रंथ आहेत. त्यांत बुद्धवचन आहे ते ग्रंथ येणेप्रमाणे : १) खुद्दकपाठ २) धम्मपद ३) उदान ४) इतिवुत्तक ५) सुत्तनिपात

६) विमानवत्थु ७) पेतवत्थु ८) थेरगाथा ९) थेरीगाथा १०) जातक ११) निद्देस १२) पटिसंभीदामग्ग १३) अपदान १४) बुद्धवंस १५) चरियापिटक. अधिधम्म पिटकांत चार-परमार्थ विश्लेषण आहे. १) चित्त २) चैतसिक ३) रूप आणि ४) निर्वाण ह्यांचे सात ग्रंथ आहेत :

१) धम्मसंगणि २) विभंग ३) पुग्गलपञ्ञति ४) धातुकथा ५) पट्ठान ६) यमन ७) कथावत्थुप्पकरण

बुद्धवचन अठ्ठकथांपासून वेगळे दर्शविण्याकरिता त्यांना पाली (पंक्ति-ओळी) म्हणण्याची प्रथा होती. नंतर हा शब्द एक प्रकारे मागधीचाच पर्याय बनला.

**प्रश्न ५३३ : मुसलमानांच्या भारतावरील आक्रमणाने बौद्धांचे साहित्य पूर्णपणे नष्ट झाले काय ?**

**उत्तर** – नाही. पुष्कळसे बौद्ध भिक्खू आपली पुस्तके आपल्याबरोबर घेऊन भारताची सरहद्द ओलांडून तिबेटमध्ये आणि दुसऱ्या सुरक्षित आश्रयस्थानी पळून गेले.

**प्रश्न ५३४ : हल्लीच्या काळात तिबेटमधील पुस्तकांचा शोध लागला काय ?**

**उत्तर** – शरच्चंद्र दास ह्या प्रसिद्ध बंगाली विद्वानाने तिबेटमधील विहारांच्या ग्रंथालयांत शेंकडो पुस्तके पाहिली आणि त्यांतील काही अतिशय महत्त्वाच्या ग्रंथांच्या प्रती सोबत आणल्या. त्यांचे संपादन करून त्यांना प्रकाशित करण्याचे कार्य भारत सरकारने त्यांच्या हाती दिलेले होते.

**प्रश्न ५३५ : ज्या देशांत बौद्धधम्माचे जुने पवित्र ग्रंथ मूळ लिखाणात विशेष फेरफार न करता जपून ठेवले आहेत, तो देश कोणता ?**

**उत्तर** – श्रीलंका ब्रिटिश विश्वकोषात असे सांगितले आहे की, बेट असलेल्या ह्या देशांत बौद्धधम्म बहुतांशी मूळ पवित्र स्वरूपांतच अजूनही राखून ठेवलेला आहे, व त्यास तशीच कारणे आहेत.

**प्रश्न ५३६ : पिटकांच्या मूळ ग्रंथांची उजळणी अर्वाचीन काळात कधी करण्यात आली?**

**उत्तर** – प्रधान स्थविर भन्ते सुमंगल यांच्या अध्यक्षतेखाली अतिशय विद्वान भिक्खूंचे संमेलन इ.स. १८७५ मध्ये श्रीलंकेत भरविण्यात आले होते व विनयपिटकाची उजळणी अतिशय काळजीपूर्वक केली होती.

**प्रश्न ५३७ : दक्षिणेकडील व उत्तरेकडील बौद्ध देशांत बौद्धधम्माच्या उत्कर्षासाठी मित्रत्वाचे आदान-प्रदान झालेले आहे काय ?**

**उत्तर** – होय. इ.स. १८९१ साली ह्या दोन्ही महाप्रदेशांच्या प्रधान नायकांनी एकत्रित येऊन चौदा धम्ममते एकमताने स्वीकारून एकसूत्रता स्थापण्याचा यशस्वी प्रयत्न केला होता. त्यावेळी बौद्धधम्मातील मुख्य सिद्धान्तांना समाविष्ट करण्याचे मान्य करण्यात आले आणि दोन्ही महाप्रदेशांनी त्यांना मान्य केले. धम्ममतांचा मसुदा कर्नल ऑल्कॉट (Col. Olcot) यांच्याकडून तयार करवून त्याचे बर्मी, सिंहली व जपानी भाषेत काळजीपूर्वक भाषांतर

करण्यात आले. त्यानंतर लागोपाठ चर्चासत्रे भरवून सर्वानुमते त्यांचा स्वीकार करण्यात आला. आणि प्रमुख भिक्खूंनी त्यांना मान्य करून व स्वाक्षऱ्या देऊन, जानेवारी १८९२ साली त्या मसुद्यास प्रसिद्ध करण्यात आले.

त्याचा सुपरिणाम असा झाला की, जपानी भिक्खू व श्रामणेर समुदायाने श्रीलंकेत आणि भारतामध्ये पाली व संस्कृत भाषेचा अभ्यास करण्यासाठी येऊ लागले.

**प्रश्न ५३८ : बुद्धधम्माचे मौलिक ग्रंथ कोणते आहेत ?**

**उत्तर -** बुद्धधम्माचे मौलिक ग्रंथ त्रिपिटक ह्या नावांनी प्रसिद्ध आहेत. ह्या ग्रंथात भ. बुद्धांच्या उपदेशांचा संग्रह आहे. भ. बुद्धांनी आपला उपदेश मागधी भाषेत दिला होता. कारण त्यावेळी हीच लोकांची बोलण्याची भाषा होती. त्यामुळे हे ग्रंथ त्याच भाषेमध्ये लिहिलेले आहेत.

'पिटक', म्हणजे 'पेटारा' अर्थात 'त्रिपिटक' म्हणजे 'तीन पेटारे' ते पिटक येणेप्रमाणे (१) सूत्तपिटक, (२) विनयपिटक आणि (३) अभिधम्मपिटक.

सुत्तपिटक - भगवंतांनी निरनिराळ्या ठिकाणी, निरनिराळ्या लोकांना निरनिराळ्या परिस्थितीमध्ये जे उपदेश दिले होते, त्यांचा संग्रह 'सूत्रपिटकात' केला आहे.

(२) विनय पिटक - विनय पिटकात भिक्खूंच्या राहणीच्या व वागण्याच्या नियमांचा संग्रह केलेला आहे. आचार्यांप्रति शिष्यांची कर्तव्ये, शिष्यांप्रति आचार्याची कर्तव्ये, गुरुबंधुप्रति भिक्खूंची कर्तव्ये, तसेच मठात राहण्याचे नियम इ. विनय पिटकात दिली आहेत.

(३) अभिधम्म पिटक - अभिधम्माचे ग्रंथ फार गहन व गंभीर आहेत. सूत्रात जे तत्त्व भगवंतांनी सोप्यात सोपे करून सांगितले आहे, त्यालाच विश्लेषणात्मक प्रकारे, पारिभाषिक शब्दात स्पष्ट केले आहे. त्यांचे महत्त्व फार मोठे आहे.अभिधम्माचे वाचन व मनन केल्याशिवाय बुद्धधम्माचे निश्चित किंवा पक्के ज्ञान होऊ शकत नाही. ह्यात चार धातूंचे वर्णन केले आहे. - (१) चित्त, (२) चैतसिक, (३) रूप आणि (४) निर्वाण

चित्ताचे विश्लेषण फारच उत्तम आहे. आधुनिक मनोविज्ञानाबरोबर त्याचे अध्ययन करणे फार उपयुक्त ठरेल. धम्मसंगणीवर अट्ठ सालिनी नांवाचे भाष्य लिहिताना आचार्य बुद्ध घोष लिहितात की, "अभिधम्मात कोणतीच नवीन गोष्ट सांगितली गेली नाही की, जी सूत्रांत वर्णन केलेली नाही."

**प्रश्न ५३८ (अ) : बौद्धधम्माच्या कोणकोणत्या महाश्रमणांनी प्राचीन साहित्याची सृष्टी केली?**

**उत्तर -** बौद्धधम्माच्या साहित्य सृजनामध्ये हातभार लावणाऱ्या महाश्रमणांची नावे येणेप्रमाणे

१. नागसेन (इ. स.१५०) - मिलिंद प्रश्न (बघा प्रश्न क्र. ४२२)

२. नागार्जुन (इ.स. १७५) ते विदर्भातील होते. नागार्जुनाची शून्यवाद साहित्यकृती-

१. आध्यात्मिक कारिका

२. युक्तिषष्ठिका

३. प्रमाणविध्वंस

४.उपायकौशल्य

५. विग्रह व्यर्तनी

३. असंग आणि वसुबंधु (इ.स. ३५०) त्यांचा जन्म पेशावरमध्ये ब्राह्मण कुळात झाला. त्याचे प्रमुख ग्रंथ येणेप्रमाणे -

१. महायानीत्तर तंत्र

२. सूत्रालंकार

३. योगाचार भूमी

४. वस्तुसंग्रहणी

५. बोधीसत्त्व पिटकाववाद

यामधील योगाचारभूमी हा विशाल ग्रंथ सतरा भूमीमध्ये विभागलेला आहे.

भारतीय तत्त्वज्ञानास आपल्या सर्वोच्च विकासाच्या शिखरावर पोहोचविण्यासाठी प्रथम जोरदार प्रयत्न असंग आणि वसुबंधू या पठाण बंधूंनी केला. ज्येष्ठ बंधू असंग याने योगाचार भूमी उत्तर तन्यसारख्या ग्रंथाना रचून विज्ञानवादाचे समर्थन केले. कनिष्ठ बंधू वसुबंधूची प्रतिभा आणखीच बहुमुखी होती. त्यांनी एकीकडे अभिधम्मकोष आणि त्यावर एक मोठे भाष्य लिहिले आणि दुसरीकडे 'विज्ञप्तिमात्रता सिद्धिकी' ची रचना करून आपल्या जेष्ठ बंधूचे उत्तम समर्थन केले.तिसरे कार्य 'वाद विधान' नावाचा न्याय ग्रंथ लिहिला. त्यांनी ज्याला 'भारतीय मध्ययुगीन न्यायाचा पिता' म्हणविल्या जाणाऱ्या दिग्नाला शिकविले. आद्य शंकराचार्य नव्हे तर त्यांचे आजोबा गुरू गौडपाद यांची मांडुक्य कारिका, 'अलात शांती प्रकरण', प्रकट रूपाने एक बौद्धविज्ञानवादी ग्रंथ आहे. विज्ञानवाद स्वतःच्या नावाने अधिक प्रसिद्ध नसून 'योगाचार दर्शन' या नावाने अधिक प्रसिद्ध आहे.

४. दिग्नाग (इ.स. ४२५)-ते वसुबंधूचे विद्यार्थी होते. त्यांचे प्रमुख ग्रंथ- न्यायमुख, प्रमाण समुचय. ते तामीळ देशाचे होते.

५. धम्मकीर्ती -(इ.स. ६००) त्यांचा जन्म उत्तर तामिळ देशात तिरुमलै गावी झाला. त्यांचे ग्रंथ येणेप्रमाणे :-

१) प्रमाणवार्त्तिव २) प्रमाण विनिश्चय ३) न्यायबिंदू ४) हेतूबिंदू ५) संबंध परीक्षा ६) वाद-न्याय ७) सन्तान्तर-सिद्धी ८) टीकावृत्ती

प्रमाणवर्त्तिक १४५५ श्लोकांचे पद्य आहे. त्यांनी उद्योतकर (इ.स.५५०) च्या 'न्यायवर्तिक' ला छिन्नभिन्न केले. वाचस्पतीने (इ.स. ८४१) एक कीर्ती टीका लिहून धम्मकीर्तीच्या सुनिपुण बुधीची प्रशंसा केली व त्यांना 'जगद्‌भीभवधीर' अशी पदवी दिली आणि उद्योतकरांच्या अत्यंत म्हाताऱ्या गाईचा धम्मकीर्तीनी उद्धार केला असा शेरा दिला.

श्रीहर्ष (इ.स. ११९२) यांनी धम्मकीर्तीच्या तर्कपथास 'दुराबाध' म्हणून त्याची प्रशंसा केली.

६. अश्वघोष -(ई.स.५०) यांचे कर्मक्षेत्र गंधार (पेशावर) होते. त्यांचे ग्रंथ येणेप्रमाणे - १) महायान श्रद्धोत्पाद २) बुद्धचरित्र ३) सौन्दरानन्द ४) सारिपुत्त प्रकरण (बघावा प्रश्न ४८३)

७. योगाचार आणि इतर बौद्ध तत्त्वज्ञान

| | वाद | संप्रदायनाम | आचार्य |
|---|---|---|---|
| १. | शून्यवाद | माध्यमिक | नागार्जुन, आर्यदेव, चंद्रकीर्ती, भाष्य, बुद्धपाठी |
| २. | विज्ञानवाद | योगाचार | असंग, वसुबंधू, दिग्नाग, धर्मकीर्ती, शान्तरक्षित |
| ३. | ब्राह्म अर्थवाद | सौत्रान्तिक | |
| ४. | ब्राह्म आभ्यंतर अर्थवाद | सर्वास्तिवाद | संघभद्रा, वसुबंधू (अभिधम्मकोष) |

**प्रश्न ५३८ (ब) : महाश्रवण बुद्धघोषांचे बौद्ध साहित्यामध्ये कोणते योगदान आहे?**
**उत्तर** – महावंश या सिंहली ग्रंथाच्या १०० व्या अध्यायामधील ३७ व्या अध्यायात बुद्धघोषांच्या चरित्रांचे वर्णन आहे. बौद्धधम्माच्या अग्रगण्य प्रचारकांत बुद्धघोषांचे नाव घेतले जाते.

मगध देशात गयेजवळ ब्राह्मणकुळात त्यांचा जन्म ५ व्या शताब्दीमध्ये झाला. ते वेद आणि शास्त्रात पारंगत झाले. रेवत नावाच्या बौद्ध भिक्खूंसोबत झालेल्या वादविवादात हरल्यानंतर त्यांनी बौद्धधर्माची दीक्षा घेतली.त्यांचा स्वर भ. बुद्धाप्रमाणे धीरगंभीर, स्निग्ध आणि बुलंद असल्यामुळे त्यांना लोक 'बुद्धघोष'. म्हणू लागले. त्यांनी 'ज्ञानोदयची' रचना केली. भिक्खू रेवत यांच्या आग्रहावरून ते श्रीलंकेस गेले आणि सिंहली भाषेतून अठ्ठकथा आणि जातक कथांचे पाली भाषेत भाषांतर केले. त्यांनी विशुद्धिमार्गाची देखील रचना केली.

## बौद्धांची प्राचीन विद्यापीठे

**प्रश्न ५३९ : बौद्धांची प्राचीन विद्यापीठे कुठे होती ?**
**उत्तर** – स. अशोकाच्या काळापासून इ.स. च्या बाराव्या शताब्दीपर्यंत कार्यरत असलेली बौद्धांची विद्यापीठे अत्यंत प्रसिद्ध आणि प्रभावशाली होती. ती येणेप्रमाणे - १) तक्षशीला २) नालंदा ३) विक्रमशीला ४) उदन्तपुरी ५) वल्लभी ६) नादीया ७) मिथिला ८) गुणशीला ९) कुंदनपूर १०) मदुरा त्यातील पहिली चार प्रमुख होती.

**प्रश्न ५४० : तक्षशीला विद्यापीठ कोठे होते ?**
**उत्तर** – सध्याच्या पाकिस्तानातील रावळपिंडीपासून उत्तर-पश्चिमेस ३० किमी. सरायकला रेल्वे स्टेशनाजवळ तक्षशीलेचे सर्वांत प्राचीन आणि सर्वांत मोठे विद्यापीठ होते. तेथे बुद्धकालीन जीवक वैद्य, अंगुलिमाल (पूर्वीचा राजपुरोहिताचा पुत्र अहिंसक), महाली लिच्छिवी, राजा प्रसेनजित, बंधुमल्ल, इत्यादींचे शिक्षण झाल्याचे सांगतात. सम्राट चंद्रगुप्त मौर्याचे राजनीतिक गुरु चाणक्य याच विद्यापीठात आचार्य होते, असे सांगतात. सम्राट अशोकाने तेथे महान धर्मराजीक स्तूप बांधला.

इ.स. ३३६ मध्ये आंभिक राजाने सिकंदराबरोबर तह केला व परकीयांना तक्षशीलेचे द्वार मोकळे करून दिले म्हणून राजाने त्यानंतर बाराव्या शतकाच्या पूर्वार्धात आणि उत्तरार्धात महंमद गजनवी आणि महंमद घोरी यांनी ते स्थान बरेच नष्ट केलेल्या त्या भग्नावशेषाला सध्या 'शाहजीकी ढेरी' असे म्हणतात.

इ.स. ७८ मध्ये भगवंतांचे अवशेष तेथे स्थापन करण्यात आले होते, ते नंतर ब्रिटिशांनी इ.स. १९२१ मध्ये सारनाथ येथील मूलगंध कुटी विहारात प्रतिष्ठित केले.

**प्रश्न ५४१ : नालंदा विद्यापीठ कोठे होते ?**

**उत्तर** - राजगृहापासून १३ किमी आणि पाटण्यापासून ५५ कि.मी. वर नालंदा विद्यापीठाचे भग्नावशेष, अतिशय चांगल्या प्रकारे अजूनही पाहावयास मिळतात. ५०० श्रेष्ठींनी दहा कोटी स्वर्णमुद्रा खर्च करून तेथे एक भव्यदिव्य विहार बांधला, असे सांगतात. शंकरादित्य म्हणजे कुमारगुप्त प्रथम व त्याच्या उत्तराधिकाऱ्यांनी नालंदाचा विकास केला. गुप्त राजा बालादित्य यानेही मोठा विहार बांधला व भगवंताची मोठी कांस्यप्रतिमा स्थापित केली. स. हर्षवर्धनानेदेखील मोठा विहार बांधला व २०० गावांचे उत्पन्न विद्यापीठ चालविण्यास अर्पण केले. या विद्यापीठात शीलभद्र, धम्मपाल, शान्तरक्षित, पद्मसंभव, कमलशील यांच्यासारखे उत्तम ग्रंथकार होऊन गेले. या विद्यापीठातून आचार्य कमलशील, पद्मसंभव व दीपंकर तिबेटला गेले. नागार्जुन या विद्यापीठात आचार्य होते, असे सांगतात. हे विद्यापीठ सहा मजली असल्याचे सांगतात.

येथे बौद्ध तत्त्वज्ञानासोबतच, वेद-वेदांग आणि जैन दर्शनही शिकविले जाई. येथे चीन, सयाम, मंगोलिया, श्रीलंका, ब्रह्मदेश आणि कोरिया येथील विद्यार्थी शिकावयास येत. या विद्यापीठात १५०० अध्यापक आणि २०,००० विद्यार्थी अध्ययन करीत असे सांगतात. चिनी प्रवासी ह्युएनत्संग इ. सनाच्या सातव्या शतकाच्या आरंभी येथे आला व शिक्षण घेतले. तेथे ताडपत्रे व भोजपत्रे यावर लिहिलेली सुमारे दोन लक्ष पुस्तके होती.
मुसलमान तुर्कांनी बाराव्या शतकामध्ये त्यांना जाळले, ती आग सहा महिने धगधगत होती असे सांगतात.

**प्रश्न ५४२ : विक्रमशिला विद्यापीठ कोठे होते ?**

**उत्तर** - बिहार राज्यातील भागलपूर जवळ आजही या विद्यापीठाचे भग्नावशेष पाहावयास मिळतात. ते नालंदा विद्यापीठासारखे समृद्ध होते, इ.स. नवव्या ते बाराव्या शतकापर्यंत होते. चार द्वारांवर चार महापंडित आणि मध्यभागी दोन महान आचार्य राहत. ते -

१) शांती, न्याय, व्याकरण, काव्य शिकवीत
२) धम्म व दर्शन शिकवीत
३) महायान व तंत्र शिकवीत
४) बुद्धदर्शन व धम्मपंथ शिकवीत

चार द्वारपंडित म्हणजे विभागप्रमुख होते. १०८ मंदिर व १०८ महाविद्वान होते. ८००० माणसे एकत्र बसू शकतील एवढा सभामंडप होता.

महंमद बीन बखतियार या तुर्काने बाराव्या शताब्दीच्या सुमारास जाळपोळ केल्यावर तेथील बौद्ध पंडित तिबेटास निघून गेले.

**प्रश्न ५४३ : उदन्तपुरी विद्यापीठ कोठे होते ?**

**उत्तर** - या विद्यापीठाची स्थापना इ.स. च्या आठव्या शतकामध्ये पालराज वंशाचा संस्थापक गोपाळ याने केली. बौद्ध धम्मातील वज्रयान संप्रदायाचे हे महत्त्वाचे केंद्र असल्याचे सांगतात.

इतिहासकार तारानाथलामा यांनी लिहिले आहे की, येथे १००० भिक्खू स्थायी रूपाने राहत असत. महायान व हीनयान या दोन्ही संप्रदायास समान प्रवेश होता. गुरुशिष्यांचा संपर्क हे याचे वैशिष्ट्य होते.

बाराव्या शतकामध्ये खिलजी तुर्कांनी त्याला उद्ध्वस्त केले.

## धम्मप्रसार

**प्रश्न ५४४ : ह्या धम्माचा प्रथम उपदेश केव्हा करण्यात आला ?**

**उत्तर** - ह्याच्या निश्चित दिवसाविषयी थोडा मतभेद असला तरी सिंहली लोकांच्या धम्मग्रंथानुसार सध्याच्या इ.स. पूर्व ५२८ साली तो करण्यात आला.

**प्रश्न ५४५ : धम्माचा प्रसार कसा झाला ?**

**उत्तर** - भ बुद्धांनी स्वतः ज्ञानप्राप्तीनंतर पंचेचाळीस वर्षापर्यंत भारतामध्ये दूरदूरपर्यंत प्रवास करून धम्माचा उपदेश केला. त्याचप्रमाणे त्यांनी आपल्या विद्वान शिष्यांना आश्विन पौर्णिमेच्या दिवशी धम्माचा उपदेश करण्याकरिता भारतभर पाठविले.

त्यांनी आपल्या शिष्यांना आदेश दिला तो असा -

**चरथ भिक्खवे चारिकं**
**बहुजन हिताय बहुजन सुखाय, लोकानुकंपाय**
**अत्थाय हिताय सुखाय देवमनुस्सानं ।**
**देसेत्थ भिक्खवे धम्मं आदि कल्याणं मज्जेकल्यांण परियोसानकल्याणं**
**सात्थं सव्यंजनं केवळ परिपुण्णं ब्रह्मचरियं पकासेथ ।**

"भिक्खूंनो! बहुजनांच्या हिताकरिता, बहुजनांच्या सुखाकरिता,लोकांवर अनुकंपा करावयाच्या भावनेने, स्वतःच्या तसेच देव आणि मनुष्यांच्या हितासाठी आणि सुखासाठी भिक्षाटन करीत विचरण करा! हा धम्म सुरूवातीस कल्याणकारी, मध्य कल्याणकारी आणि अंत्य कल्याणकारी असून अर्थ आणि भावाने परिपूर्ण आहे. अशा या धम्माचा ब्रह्मचर्यव्रत राखून प्रसार करा आणि त्याला पूर्णतः प्रकाशित करा."

**प्रश्न ५४६ :धम्म प्रचारार्थ फिरणारे भिक्खू प्रतिकूल परिस्थितिमध्ये काय करीत असत ?**

**उत्तर** - भ. बुद्ध भिन्न-भिन्न जनपदांमध्ये भ्रमण करणाऱ्या भिक्खूंच्या परिस्थितिशी अपरिचित नव्हते. ते सर्व जाणत होते. एकदा भिक्खू पुण्ण भगवंतांना वंदन करून चारिका करण्यास निघाला असतांना भगवंतांनी पुण्णाला विचारले -

"पुण्ण ! तू कोणत्या जनपदात भ्रमण करणार आहेस ?"

"भन्त! मी सुनापरान्त जनपदांत विहार करणार आहे."

"पुण्ण ! सुनापरान्तातील लोक उदंड आहेत, कठोर स्वभावाचे आहेत. ते तुला शिव्याशाप देतीत तर तू काय करशील ?"

"भन्ते ! मी असा विचार करीन की, सुनापरान्तातील लोक सभ्य आहेत, सुसभ्य आहेत! कारण ते मला आपल्या हातांनी मारीत नाही."

"पुण्ण ! जर सुनापरान्तातील लोकांनी तुला आपल्या हातांनी मारले, तेव्हा तुला काय

वाटेल ?"
"भन्त! मी असा विचार करीन की, सुनापरान्तातील लोक सभ्य आहेत, सुसभ्य आहेत, कारण ते माझ्यावर काठीने प्रहार करीत नाहीत."
"पुण्ण ! सुनापरान्तातील लोकांनी तुला काठीने मारले, तेव्हा तुला काय वाटेल ?"
"भन्ते ! मी असा विचार करीन की, सुनापरान्तातील लोक सभ्य आहेत, सुसभ्य आहेत, कारण ते माझ्यावर शस्त्राने प्रहार करून मला ठार करीत नाहीत."
"पुण्ण ! जर सुनापरान्तातील लोक शस्त्राचा प्रहार करून तुला ठार करू लागले, तर तुला काय वाटेल ?"

"भन्ते! मी असा विचार करीन की, कोणाकोणाला आत्महत्या करण्यासाठी शस्त्र शोधावे लागते; पण मला तर अनायासेच माझ्यावर शस्त्र चालविणारा मिळाला."
भगवंतांनी "साधु ! साधु !" म्हणून पुण्णाला आशीर्वाद दिला व म्हणाले - "अशा प्रकारच्या शांत भावनेने युक्त होऊन तू निश्चितच सुनापरान्त जनपदांमध्ये वास करू शकशील."
आयुष्मान पुण्ण सुनापरान्ताला जाऊन पोहोचले. एका महिन्याच्या आतच त्यांनी पाचशे उपासकांना धम्मामृताचा उपदेश करून धम्माचा प्रचार केला. कोणत्याही देशात असो वा कोणत्याही युगात असो, असेच धम्मप्रचारक असाधारण यश प्राप्त करतात.

**प्रश्न ५४७ : बौद्धधम्माचा प्रसार करण्यासाठी रक्तपात झाला काय ?**

**उत्तर** - मुळीच नाही. बौद्धधम्माचा प्रसार करण्याकरिता क्रूरता आणि दुष्ट कृत्ये केली गेल्याची जागतिक इतिहासामध्ये एकही नोंद नाही. परंतु इसाई धम्माच्या प्रसाराकरिता इन्क्वीझिशन (Inquisition) द्वारे हजारो लोकांची कत्तल करण्यात आली होती. तसेच इस्लाम धर्माचा प्रसार तर तलवारीच्या जोरावरच करण्यात आला व हिंदू, जैन आणि बौद्ध धर्मीयांची कत्तल करुन हजारो मंदिरे नष्ट करण्यात येऊन मूर्तिभंग करण्यात आला, अशी इतिहासात नोंद आहे आणि भंग झालेल्या मूर्ती अजूनही पाहावयास मिळतात.

**प्रश्न ५४८ : बौद्धधम्माच्या अद्‌भुत प्रसाराचे रहस्य ते काय ?**

**उत्तर** - बौद्धधम्माची जात्याच असलेली उत्कृष्टता, सत्याचा स्वयंसिद्ध पाया, अत्युत्कृष्ट नैतिक शिक्षण आणि संपूर्ण सामाजिक गरजांची पूर्ती करण्याचे सामर्थ्य, हेच बौद्ध-धम्माच्या प्रसाराचे रहस्य होय.

**प्रश्न ५४९ : धम्म प्रचाराची केंद्रे कोणती होती ?**

**उत्तर** - भ. बुद्ध स्वतःच धम्मदूताप्रमाणे सगळीकडे विचरण करीत असत. तथापि श्रावस्ती आणि राजगृह ही धम्मप्रचाराची प्रमुख केंद्रे होती. त्यांनी सुमारे ७५ वेळा श्रावस्ती व २४ वेळा राजगृहास भेटी दिल्यात. अन्य लहान केन्द्रे कपिलवस्तू येथे ते ६ वेळा गेले आणि वैशालीस ६ वेळा आणि कम्मासदम्म येथे ४ वेळा गेले.

**प्रश्न ५५० : भगवंतांनी कोणकोणत्या ठिकाणी भ्रमण केले ?**

**उत्तर** - चारिका करीत करीत ते श्रावस्ती, राजगृह, कपिलवस्तू, वैशाली आणि कम्मासदम्म या प्रमुख स्थानांव्यतिरिक्त अनेक स्थळी धम्माचा उपदेश करीत करीत फिरले, ती स्थाने

अशी-

(१) त्यांनी उकट्टा, नादिका, साला, अस्सपूर, घोषिताराम, नालंदा, आपण आणि एतुमा यांना भेटी दिल्यात.

(२) ते ओपसाद, इच्छानंगल, चण्डाल-कप्प आणि कुसीनारा येथे गेले.

(३) ते देवदह, पावा, अम्बसंडा, सेतव्या, अनुपिया आणि उजुज्या येथे गेले.

(४) येणेप्रमाणे त्यांनी शाक्यजनपद, कुरुजनपद आणि अंगजपदांना भेटी दिल्या व येणेप्रमाणे संपूर्ण उत्तर भारताची यात्रा केली. लुम्बिनी ते राजगृह चारशे किलोमीटर आहे, यावरून अनेक स्थानांचा प्रवास करतांना त्यांनी किती पदयात्रा केली याची कल्पना येते. त्यांच्याजवळ तीन चीवरांपेक्षा अधिक नसत. दिवसातून एकदाच भोजन करीत. घरोघरी भिक्षाटन करीत. बहुधा सडकेच्या काठी असलेल्या वृक्षांखालीच रात्रीचा विश्राम करीत. त्यांच्या उपासकांनी बांधून दिलेल्या विहारात वर्षावास करीत. ज्यांच्या मनात संशय होते, त्यांचे निरसन करीत. विरोधकांच्या तर्काचे उत्तर देत. जे त्यांच्यावर लहान बालकांप्रमाणे विश्वास ठेवीत त्यांना सुमार्ग दाखवीत, एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी, येणेप्रमाणे ते गावोगावी प्रवास करीत असत.

**प्रश्न ५५१ : धम्माचा प्रसार होण्यास कोणकोणत्या उपासकांनी महत्वपूर्ण मदत केली ?**

**उत्तर** - (१) **राजा बिंबिसार** - तथागतांचा परमभक्त होता आणि त्यांच्या धम्माचा एक प्रमुख आधारस्तंभ होता. त्याने वेळूवन उद्यान बुद्धप्रमुख भिक्खूसंघाला दान दिले.

(२) **अनाथपिण्डिक**-नावाच्या श्रीमंत व्यापाऱ्याने जेतवन-विहार भिक्खूसंघाच्या उपयोगासाठी तथागतांना दान दिला. देणाऱ्यांमध्ये तो प्रमुख असल्यामुळे प्रमुख धम्मदाता अशी त्याची कीर्ती पसरली.

(३) **राजवैद्य जीवक** - राजा बिंबिसाराचा राजवैद्य जीवक ह्याची तथागतांवर नितांत श्रद्धा होती. त्याने राजगृहात असलेला आपला 'आम्रवन' नावाचा बगीचा तथागतांना समर्पित केला. त्याने आजारी भिक्खूंकरिता औषधोपचार करण्याची व्यवस्था केली.

(४) **आम्रपाली** - एकदा भगवंत महान भिक्खूसंघासह वैशालीस गेले असताना आम्रपाली नांवाच्या गणिकेने त्यांना भिक्खूसंघासमवेत भोजनाचे निमंत्रण दिले व त्यांना आपल्या आम्रवनाचा स्वीकार करण्याची नम्रतापूर्वक विनंती केली. भगवंतांनी ती मान्य केली.

(५) **विशाखा** - श्रावस्तीमध्ये विशाखा नांवाची एक अतिशय श्रीमंत गृहिणी होती. भगवंतांचा श्रावस्ती निवास असताना तिने त्यांना भोजनाचे निमंत्रण दिले. त्यांनी ते स्वीकारले. त्या रात्री व दुसऱ्या दिवशीही खूप जोराचा पाऊस पडला. भिक्खूंनी आपली चीवरे कोरडी राहावी म्हणून अंगातून चीवरे काढून टाकलीत व उघड्या शरीरावर पाऊस पडू दिला. दुसऱ्या दिवशी भिक्खूसंघ व तथागतांचे भोजन समाप्त झाल्यावर तिने मोठ्या नम्रतापूर्वक भगवंताजवळ पुढील आठ वरांची याचना केली. तथागत म्हणाले, "विशाखा वर कोणते आहेत हे माहीत असल्याशिवाय तथागत कोणालाच वर देत नाही." वर योग्य व आपत्तिरहित आहेत, ह्याची तिने ग्वाही दिल्यावर भगवंतांनी तिला अनुमती दिली. तिने भिक्खूसंघाच्या हिताचे - भिक्खूंनी तिच्याकडून चीवरांचे दान स्वीकारावे, भिक्षेचे दान स्विकारावे, इत्यादी आठ वर मागितले व ते आपण कोणत्या उद्देशाने मागितले, तेसुद्धा तिने स्पष्टपणे सांगितले.

भगवंतांनी त्यांचा स्वीकार केला व तिला धर्मोपदेशाने प्रसन्न व आनंदित केले. त्यानंतर विशाखेने 'पूर्वाराम-विहार' संघास दान दिले. दानशी गृहस्थ-उपासिकांमध्ये ती प्रथम असून व्यवस्थापिका होण्याचा बहुमान तिला लाभला. तिला 'मिगारमाता' असेही म्हणत. (प्र. ५०२ पाहावा) मोठमोठे सम्राट आणि राजेमहाराजे ह्यांनी बौद्ध धम्माची दीक्षा घेऊन आपे तन, मन आणि धन वेचले व धम्माचा प्रचार केला.

**प्रश्न ५५२ : धम्म प्रसाराचे कार्य यात्रेकरूंनी कसे केले ?**

**उत्तर** – विद्वान प्रवासी निरनिराळ्या शतकांमध्ये भारतात आले आणि त्यांनी परत जाताना धम्मग्रंथ व धम्माची शिकवण आपापल्या जन्मभूमीला नेली. म्हणून हळूहळू पुष्कळ देशांनी आपआपला मूळ धम्म सोडून दिला व ते सर्व बौद्ध झाले.

**प्र. ५५२ (अ) : महास्थविर मोग्गलिपुत्त तिस्स यांनी बौद्धधम्माच्या प्रचाराकरिता भिक्खूंची नियुक्ती कशा प्रकारे केली?**

**उत्तर** – त्यांनी तृतीय संगीतीचे आयोजन सम्राट अशोकाच्या राजाश्रयामध्ये केले. त्यानंतर भविष्याचा विचार करून, मध्यदेशाच्याही बाहेर धम्म प्रस्थापित होईल या गोष्टीचे भान ठेवून कार्तिक महिन्यात स्थविरांना विशिष्ट प्रदेशात पाठविण्याचे कार्य केले. त्याकाळी पूर्वेस भागलपूर, पश्चिमेस गांधार, उत्तरेस हिमालय तथा दक्षिणेस विंध्यपर्वत यामधील प्रदेशाला मध्यदेश म्हणत असत.

**थेरं कस्मीरगंधार मज्झन्तिक मपेसयि।**
**अपेसेसि महादेवत्थेरं महिसमंडल॥**

अर्थ : काश्मीर आणि गांधार देशांत (त्यांनी) मज्झन्तिक नांवाच्या स्थविराला पाठविले. महादेव स्थविराला महिषमंडळास पाठविले.

**वनवासिं अपेसेसि थेरं रक्खतनामकं।**
**तथा परन्तकं योनधम्मरक्खितनामकं॥**

अर्थ : वनवासी प्रदेशाला (त्यांनी) रक्खित नावाच्या स्थविराला पाठविले त्याचप्रमाणे योनधम्मरक्खित नावाच्या स्थविराला उपरन्तिल प्रदेशाला पाठविले

**महारट्ठं महाधम्म रक्खितथेरनामकं।**
**मदारक्खित त्थेरं तु योनलोकपेसपि॥**

अर्थ : महाराष्ट्र देशात (त्यांनी) महाधम्मरक्खित स्थविराला पाठविले आणि महारक्खित स्थविराला यवन लोक प्रदेशाला रवाना केले.

**पेससि माझ्मिमं थेरं हिमवंतपदेसकं।**
**सुवर्णभूमिं थेरे द्वे सोणमुत्तरमेवच॥**

अर्थ : मझ्झिम स्थविराला (त्यांनी) हिमालय प्रदेशात पाठविले. सुवर्णभूमी (ब्रह्मदेशाला) सोण आणि उत्तर या दोन स्थविरांना पाठविले

**महामहिन्दथेरं तं थेरं इट्टियमुत्तियं।**
**संबलं भद्दसालं च सके सद्धि विहारिके॥**
**लंकादीपे मनुच्चम्हि मनुच्चं जिनसासनं।**

**पतित्थपेथ तुल्हेति पंचधेरे अपेसयि ।।**

अर्थ : (त्यांनी) महामहिन्द (= सम्राट अशोकाचा पुत्र), इद्विय, उत्तीय, संबल आणि भवसाल या आपल्या पाच स्थविर शिष्यांना ''तुम्ही सुंदर लंकाद्वीपामध्ये मनोरम बुद्धधम्माची स्थापना करा'' असा आदेश देऊन त्यांना (त्या द्वीपास) पाठविले.

नेपाळ, तिबेट इत्यादी देशांमध्ये सम्राट अशोकाच्या वेळेपासून बौद्धधम्माची परंपरा टिकून राहू शकली नाही. मध्यंतरी तेथे अशोकाचा लोप झाला आणि काही काळानंतर तेथे 'महायानाचा' प्रसार झाला. बुद्धधम्माच्या सर्वच ग्रंथांचे संस्कृत भाषेमध्ये भाषांतर झाले. प्राचीन बौद्धधम्म आणि संघाच्या माहितीकरिता पाली भाषेच्या ग्रंथांमधूनच ज्ञान संपादन केले पाहिजे. (प्रश्न ५६३ बघावा)

**प्रश्न ५५३ : पाली भाषा कशा प्रकारे उत्पन्न झाली ?**

**उत्तर** - बौद्धधम्माचे मूळ साहित्य पाली भाषेत आहे. ही भाषा मध्य भारतात उदयास आलेली प्राचीन 'प्राकृत' किंवा मागधी भाषा होय. तिचा विकास होत होत तिला सध्याच्या पाली भाषेचे स्वरूप प्राप्त झाले. त्रिपिटकातील पाली भाषा एकरस नसून त्यात विभिन्न काळ आदी प्रदेश यांची छाप दिसून येते. (बुद्धघोषानुसार पालिवास्तविकतः मागधी होय. परंतु ही गोष्ट पूर्णतः स्वीकरण्यासारखी नाही कारण त्यांत 'र' ऐवजी 'ल' आणि 'स' ऐवजी 'श' चा उपयोग केला आहे. त्याचप्रमाणे अकारान्तपुल्लिंग आणि पुसकलिंगाच्या एकवचनाच्या प्रथमा विभक्तिमध्ये 'ए' चा उपयोग आहे.) पाली ही विदीशा आणि अवंती प्रदेशातील बोलीभाषा असली पाहिजे (संस्कृत ही त्यावेळच्या आर्यांच्या धर्मग्रंथातील भाषा व पाली ही लोकांची बोलीभाषा किंवा जनभाषा असावीः संकलिका)

**प्रश्न ५५३ (अ) : पाली आणि संस्कृत यांच्या वर्णावलीमध्ये काय फरक आहे ?**

**उत्तर** - भ. बुद्धांचे उपदेश पाली भाषेमध्ये आहेत. त्यावेळी ही सर्वच जनतेची भाषा होती. भगवंतांची वाणी त्रिपिटकामध्ये संग्रहित केलेली आहे. तिचा वर्ण-परिचय येणेप्रमाणे -

**स्वर -**

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ओ.

**सरळ व्यंजन -**

क, ख, ग, घ, ङ, च, छ, ज, झ, ञ, ट, ठ, ड, ढ, ण,

त, थ, द, ध, न, प, फ, ब, भ, म, य, र, ल, व, स, ह, ळ, अं

संस्कृतचे चार स्वर ऋ, लृ, ऐ आणि औ पाली भाषेत नाहीत. 'ऋ' ऐवजी 'अ' किंवा 'इ' किंवा 'उ' यांचा प्रयोग होतो.' लृ' ऐवजी 'उ' चा प्रयोग होतो.' ऐ' ऐवजी 'इ' किंवा 'ए' चा उपयोग होतो. 'औ' ऐवजी 'उ' किंवा 'ओ' चा उपयोग होतो.

संस्कृतमधील श, ष, क्ष, ज्ञ पाली भाषेत नाहीत.

'ष', 'श' उवेजी 'छ' किंवा स चा प्रयोग होतो.

'ड' ऐवजी 'ळ' चा प्रयोग होतो.

'ढ' ऐवजी 'ळ्ह' चा किंवा 'ल्ह' चा उपयोग होतो.

'क्ष' ऐवजी 'ख' किंवा 'क्ख' चा प्रयोग होतो.

'ज्ञ' ऐवजी 'ञ्ञ' चा प्रयोग होतो.

संस्कृतमध्ये विसर्ग 'अः' आहे, तो पाली भाषेत नाही. संस्कृतमध्ये 'म्' आहे, त्याऐवजी पालीमध्ये अनुस्वार असतो; जसे- मंगलम् ऐवजी मंगलं.

संस्कृतमध्ये शब्दाच्या शेवटी 'न' असतो त्याचा पालिमध्ये लोप होतो; जसे 'भगवान' ऐवजी 'भगवा'

पालीमध्ये द्विवचन नाही.

पालीमध्ये तृतीया आणि पंचमी विभक्तीमध्ये समानता आहे.

त्याचप्रमाणे चतुर्थी आणि षष्ठी विभक्तीमध्ये देखील समानता आहे.

वैदिक संस्कृतमध्ये जो 'ळ' होता त्याला आधुनिक संस्कृतने सोडून दिले आहे.

काही लोकांची अशी चुकीची समजूत आहे की, संपूर्ण संस्कृत वाङ्मय पाली वाङ्मयाहून अधिक प्राचीन आहे. असे फारच कमी ग्रंथ आहेत ज्यांना बुद्धाच्या पूर्वीचे असल्याचे आपण म्हणू शकतो. अबौद्ध परंपरेच्या सहा शास्त्रांतील एकही शास्त्र बुद्धापूर्वीचे असल्याचे कोणीही सिद्ध करू शकत नाही. वाल्मीकी रामायणदेखील बुद्धानंतरचे आहे. व्यासाचे महाभारत देखील बुद्धोत्तर काळाचे आहे आणि अज्ञात लेखन श्रीमद् भगवद्गीता देखील बुद्धोत्तर काळाची आहे. (भन्ते : 'पाली' पृष्ठ १)

**प्रश्न ५५:धम्माचा प्रचार स्वभाषेतून करावयाचा आदेश भगवंतांनी दिला होता काय ?**
**उत्तर** - होय. भगवंतांनी आपल्या शिष्यांना असा आदेश दिला की, त्यांच्या उपदेशांची आठवण त्यांनी स्वभाषेत ठेवावी व त्याचा प्रचारही स्वभाषेत करावा. त्यामुळे मूळ उपदेश मागधी (पाली) भाषेत केला गेला. तथापि त्या भाषेच्या संरक्षणाचे विशेष प्रयास केले गेले नाही, याबद्दल आश्चर्य नाही.

# प्रियदर्शी अशोकाचे महत्कार्य

**प्रश्न ५५५ बुद्धधम्माचे मूळ स्थायिकपणे रुजू होण्याकरिता सर्वात अधिक हातभार कोणी लावला ?**
**उत्तर** - सम्राट अशोकाने. त्याला कधी महान अशोक, कधी प्रियदर्शी अशोक, तर कधी धम्माशोक ह्या विशेषणांनी संबोधिले जाते. सम्राट अशोक मगधराज बिंदुसार ह्याचा पुत्र आणि चंद्रगुप्त मौर्याचा नातू होय. चंद्रगुप्ताने आपल्या शौर्याने अनेकांना भारताबाहेर हुसकून लावले होते.

भ. बुद्धांच्या महापरिनिर्वाणानंतर सुमारे दोनशे वर्षांनी, साधारणपणे इ.स. पूर्वी तिसऱ्या शतकामध्ये सम्राट अशोकाची कारकीर्द झाली. अशोकाने ८४,००० स्तूप निर्माण केले.(बौधविई पृ.२०७)

**प्रश्न ५५६:सम्राट अशोकाला कोणत्या कार्यामुळे 'महान' अशोक, असे संबोधितात ?**
**उत्तर** - सम्राट अशोक भारताच्या इतिहासातील सर्वात सामर्थ्यशाली सम्राट, अतिशय पराक्रमी योद्धा आणि थोर मुत्सद्दी म्हणून प्रसिद्ध आहे. तथापि त्याचे सत्यावरील प्रेम, त्याची न्यायप्रियता, धार्मिक मतभेदाबद्दल सहिष्णुता, राज्यकाभारातील निःपक्षपात,

आजाऱ्यांविषयी, गरिबांविषयी व प्राणिमात्रांविषयी दया, ही त्याच्या स्वभावाची महान वैशिष्ट्ये होती. त्याने केलेल्या लोकोपयोगी कार्यांमुळे त्याचे नाव सैबेरियापासून ते श्रीलंकेपर्यंत मोठ्या आदराने घेतले जाते.

**प्रश्न ५५७ : सम्राट अशोकाने बौद्धधम्माची दीक्षा कधी घेतली ?**

**उत्तर** – त्याचा राज्याभिषेक झाल्यानंतर दहा वर्षांनी त्याला महाश्रमण निग्रोधांनी बौद्धधम्माची दीक्षा दिली. तो प्रसंग असा :- सम्राट अशोकाने कलिंग देशावर स्वारी केली. त्या लढाईत एक लक्ष सैनिक रणांगणात ठार झाले. दीड लक्ष सैनिकांना बंदी बनविण्यात आले. गावांची नासधूस आणि जाळपोळ झाली व येणेप्रमाणे भयंकर नरसंहार झाला व संपूर्ण प्रदेशाला बीभत्स स्वरूप आले. ते पाहून पाषाणहृदयी अशोकाचे मन लोण्याहूनही मऊ झाले व त्याने बुद्धधम्माचा स्वीकार केला.

**प्रश्न ५५८ : धम्मप्रसारासाठी अशोकाने कोणती कामगिरी केली ?**

**उत्तर** – अशोकाने दुर्वर्तनी भिक्खूंची संघातून हकालपट्टी केली आणि सदाचारी भिक्खूंना प्रोत्साहन दिले. सर्वत्र प्रार्थनामंदिरे आणि ८४,००० विहार बांधले, उद्याने तयार केली, लोकांसाठी व प्राण्यांसाठी रुग्णालये उघडली, धम्माच्या नावाखाली शिरकाव झालेल्या अशुद्ध तत्त्वांना धम्मातून काढून टाकून धम्माची पुनर्स्थापना करण्याकरिता पाटण्याला धम्मपरिषद (संगीती) भरविली, स्त्रियांच्या धार्मिक शिक्षणाला चालना दिली, भगवंतांच्या धम्माची शिकवण द्यावयास आपल्या मित्रदेशांना व भारतातील सर्व राज्यांत आणि पांच ग्रीक राजांकडे शिष्टमंडळे पाठविली. त्याने कपिलवस्तू, बुद्धगया, ऋषिपतन मृगदाव (म्हणजे सारनाथ) आणि कुसीनगर ह्या बौद्धांच्या चार प्रमुख तीर्थक्षेत्री आणि त्याशिवाय इतर हजारो ठिकाणी स्मरणचिन्हे उभारली.

**प्रश्न ५५९ : सम्राट अशोकाच्या उदात्त स्वभावाचे परिपूर्ण दाखले अद्यापीही अस्तित्वात आहे काय व ते कोणते ?**

**उत्तर** – काही वर्षांपूर्वीच भारताच्या निरनिराळ्या प्रदेशांत खडकांवर खोदलेल्या त्याच्या चौदा राजाज्ञांचा उत्खननाद्वारे शोध लागलेला आहे. त्याच्या आज्ञेने उभारलेल्या आठ स्तंभाचा शोध लागलेला आहे. हे शिलालेख आणि स्तंभ अशोकाच्या अतिसुज्ञ मनोवृत्तीची आणि आजवर झालेल्या सर्व राजांमध्ये तो सर्वश्रेष्ठ होऊन गेल्याची अमर साक्ष आहे.

**प्रश्न ५६० : अशोकाचे शिलालेख कशाचे दिग्दर्शन करतात ?**

**उत्तर** – अशोकाच्या शिलालेखावरून असे दिसून येते की, बौद्धधम्म सहिष्णुतेवर, विश्वबंधुत्वावर, सदाचरणावर आणि न्यायावर अधिष्ठित आहे. स्वार्थबुद्धी, संप्रदायाभिमान किंवा असहिष्णुतेचा त्यात मागमूस नाही. पाश्चिमात्य देशांतील मोठमोठ्या पंडितांची बौद्धधम्मावर श्रद्धा जडण्यास ह्या शिलालेखांची फार मदत झाली आहे.

**प्रश्न ५६१ : धम्माशोकाने बौद्धधम्माला दिलेली सर्वात मूल्यवान देणगी कोणती ?**

**उत्तर** – अशोकाने आपला प्रिय पुत्र महिन्द्र आणि कन्या संघमित्रा यांना धम्मकार्याला अर्पण केले आणि धम्माचा प्रसार करण्यासाठी त्यांना श्रीलंकेला पाठविले, ही त्याची सर्वात मुल्यवान देणगी होय.

श्रीलंकेच्या राजपरिवारांच्या इतिहासाची नोंद ठेवणाऱ्या ज्या लोकांनी ह्या घटनेस प्रत्यक्ष पाहिले, त्यांनी तिची नोंद महावंशामध्ये करून ठेवली आहे.

**प्रश्न ५६२ :संघमित्रेने केल्या धम्मप्रसाराच्या कार्याचा प्रमाण दाखला कोठे आहे ?**

**उत्तर** – सम्बोधी प्राप्त करण्यासाठी भ.बुद्ध ज्या पिंपळाच्या वृक्षाखाली ध्यानस्थ बसले होते, त्यास बोधिवृक्ष म्हणतात. त्या बोधिवृक्षाची एक शाखा संघमित्रेने आपल्यासोबत इ.स. पूर्व २०६ मध्ये श्रीलंकेला नेली होती व तिचा वृक्ष अनुराधापूराला अद्यापी वाढत आहे. तो जगातील सर्वात जुना वृक्ष असल्याची इतिहासात नोंद आहे.

त्यावेळी देवनामपियतिस्स राजा श्रीलंकेत राज्य करीत होता. त्याची पत्नी महाराणी अनुलेने संघमित्रेला संघाची भिक्खूणी-शाखा स्थापन करण्यासाठी हे निमंत्रण दिले होते.

**प्रश्न ५६३ : भारताची सीमा ओलांडून परदेशात बौद्धधम्माचा प्रचार कधीपासून सुरू झाला ?**

**उत्तर** – महास्थविर मोग्गलिपुत्त तिस्सांच्या महाराज अशोकाच्या वेळी परदेशात धम्म प्रचाराचे कार्य आरंभ झाले. एकदा महाराज अशोकांनी बौद्धधम्माकरिता स्वतः केल्या उपकारांचे स्मरण करून, महास्थविर मोग्गलिपुित्त तिस्स (अशोकाचे गुरू) ह्यांना विचारले-

''भन्ते ! माझ्यासारख्या व्यक्तीला धर्माचा उत्तराधिकारी म्हणू शकता काय ?''

स्पष्ट-वक्ता मोग्गलिपुित्त तिस्स म्हणाले - 'राजन! भ. बुद्धांच्या जीवनकाळांतही तुझ्यासारखा धम्माचा साहाय्यक कोणी झाला नाही; तरीपण तुला धम्माचा उत्तराधिकारी म्हणू शकत नाही.'

''भन्ते! काय केले म्हणजे मी धम्माचा उत्तराधिकारी म्हटला जाऊ शकेन ?''

''जर तुझा पुत्र महिन्द्र आणि कन्या संघमित्रा प्रव्रज्या ग्रहण करतील तर तुला धर्माचा उत्तराधिकारी अवश्य म्हटले जाईल.''

राजाने धम्माचा उत्तराधिकारी बनण्याच्या इच्छेने महिन्द्र आणि संघमित्रा ह्यांना प्रव्रज्जित होण्याची अनुमती दिली.

सम्राट अशोकाच्या वेळी महास्थविर मोग्गलिपुत्त तिस्सांच्या प्रेरणेने सम्राट अशोकाने गंधारराष्ट्र व काश्मीरमध्ये मध्यांतिक स्थविरांना पाठविले; महिंसक-मण्डलमध्ये महादेव स्थविर, वनवासी (मुंबई प्रांत) मध्ये रक्षित स्थविर, अपरान्तमध्ये यवनक धर्मरक्षित, महाराष्ट्रात महाधम्म-रक्षित, योनक (यवन-देशा) मध्ये महारक्षित, हिमालय प्रदशोत मज्झिम स्थविर, सुवर्ण-भूमी (पेगु-बर्मा) मध्ये सोणक आणि उत्तरेला वलका-द्वीपात स्वतः अशोक-पुत्र महामहिन्द्र ह्यांना पाठविले.

हे महास्थविर-गण एकएकटे कोठेच गेले नाही तर कमीतकमी चार अन्य भिक्खूंना आपल्याबरोबर घेऊन गेले. कारण मध्यमंडलाच्या बाहेर कोणलाही उपसंपन्न करण्याकरिता कमीतकमी पाच भिक्खू असणे आवश्यक होते.

**प्रश्न ५६३ (अ) : ऐशियातील महान बौद्ध सम्राट कोणते व त्यांनी काय कामगिरी केली?**

**उत्तर** – ऐशियातील बौद्ध सम्राट व त्यांनी केलेली कामगिरी थोडक्यात येणेप्रमाणे -

१) **प्रियदर्शी अशोक** - (इ.स. पूर्वी ३ री व ४ थी शताब्दी) सम्राट अशोक जगातील महानतम शासकांपैकी होते. त्यांच्या कार्याचे सविस्तर वर्णन प्रश्न ५५५ ते ५६६ मधे आलेले आहे.

२) **धर्मराज मिलिंद** - (इ.स. पूर्व २ री व ३ री शताब्दी) त्यांनी उत्तर भारतात विशाल साम्राज्य स्थापित केले आणि सिकंदराहूनही अधिक प्रदेश जिंकला. स. मिलिंद (मिनाण्डर) अतिशय विद्याव्यासंगी होता. तो कोणत्याही विद्वानासोबत शास्त्रार्थ करून त्यास हरवीत असे. परंतु बौद्ध भिक्खू नागसेन यांनी त्याला शास्त्रार्थात हरवून बौद्ध धर्माची तत्वे अत्यंत कुशल तऱ्हेने पटवून दिलीत. त्यांच्या शास्त्रार्थाचा ग्रंथ मिलिंद पञ्ह (मिलिंद प्रश्न) या नावाने प्रसिद्ध आहे. ह्या ग्रीक राजाचा जन्म अलेक्झांड्रियामध्ये झालेला होता.

३) **कनिष्क** - सम्राट कनिष्क कुषाण वंशाचा असून इ. सनाच्या प्रथम शताब्दी मधे इ.स. ७८ ते १२० पर्यंत राज्यकारभार केला. या ग्रीक राजाने बौद्धधम्माचा स्वीकार केला व चतुर्थ संगीतीचे आयोजन केले. आचार्य वसुमित्र संगीतीचे अध्यक्ष आणि महाकवी अश्वघोष उपाध्यक्ष होते. सुत्तपिटक, विनयपिटक आणि अभिधम्मपिटक यांना लिपिबद्ध करण्यांत आले. स. अशोकानंतर स. कनिष्क सर्वात श्रेष्ठ बौद्ध नरेश आणि बौद्धधम्माचे संरक्षक गणले जातात. स. कनिष्काच्या काळापासूनच सर्वप्रथम बुद्ध प्रतिमा बनवायची प्रथा सुरू झाली. त्याचा मुलगा हुविष्क यानेदेखील बौद्धधम्मास चालना दिली.

४) **हर्षवर्धन** - (इ.स. ६ वी आणि ७ वी शताब्दी) बौद्धधम्माची बरीच सेवा केली. नालंदा विश्वविद्यालयासाठी पुष्कळ दानपुण्य केले. त्याच्या काळी ४५०० संघाराम होते व त्यांत ३ लक्ष भिक्खू निवास करीत असत. त्याच्या ५० वर्षांच्या राज्यकाळात बौद्धधम्माचा खूप प्रचार-प्रसार झाला.

५) **अंसुवर्मा** - नेपाळच्या सातव्या शताब्दीचा राजा, प्रथम बौद्ध नरेश होता.

६) **स्प्रोंग-त्संग-गम् पो** - (इ. स. ६१७) तिबेटचा प्रथम सम्राट. त्याने तिबेटमधील भटक्या जमातींना सुसंस्कृत करून बौद्धधमाचा प्रसार केला.

७) **लिआंग सम्राट ऊ-ती** - (इ. स. ५०० ते ५५०) चिनी बौद्ध धर्माच्या इतिहासातील उत्कृष्ठ युग. त्याने बौद्धधर्मास राजधर्माचा दर्जा दिला.

८) **वांग किएन्** - कोरियाचा स. वांग किएन् (इ. स. ९३५) ह्याने बौद्ध धम्मास राजाश्रय दिला. त्याने विशाल आणि अद्‌भुत बौद्ध विहारांची स्थापना केली. त्याने स्थापलेल्या विहारांपैकी एक चतुष्कोण पाषाण स्तूप अजूनही बघावयास मिळतो.

९) **शोतोकू** - (इ. स. ५९२) सम्राट शोतोकू यास जपानचा धर्म-अशोक म्हणतात. त्याने कोरियाच्या भिक्खू ह्ये-चे कडून बौद्धधम्माचे शिक्षण घेतले. बौद्धधम्मास राज्यधर्म घोषित केले. एक विहार, एक आश्रम आणि एक चिकित्सालय याप्रमाणे सर्व राज्यभर विद्येचा आणि आरोग्याचा प्रसार केला. आठ विश्वविद्यालयांची स्थापना केली.

१०) **धम्मचेती** - (इ. स. १४५०) भिक्षु धम्मचेती ह्याने भिक्खू जीवनाचा त्याग करून

राज्यकारभार सांभाळला आणि ब्रह्मदेशात बौद्धधम्माच्या इतिहासात एक नवीन अध्याय जोडला त्याने ब्रह्मदेशाच्या भिक्खूंना श्रीलंकेला पाठवून तेथून उपसंपदा घ्यावयास मदत केली व त्यानंतर १६,००० भिक्खूंनी त्यांच्याद्वारे उपसंपदा घेतली.

११) **दुट्ठगामणी -** सिंहल सम्राट दुट्ठगामणी (इ.स. पूर्व १०१-७७) त्याने प्रदेश काबीज करावयास अनेक लढाया केल्या. परंतु शेवटी धम्माच्या उन्नतिकरिता विहार, चैत्य आणि विशाल भवनांचे निर्माण केले. त्यास राष्ट्रीय वीर म्हणतात.

१२) **पराक्रमबाहू -** (इ. स. ११२०-४०) चूलवंश या ग्रंथामध्ये त्याच्या पराक्रमाचे वर्णन आहे. त्याने चार महान कार्ये केलीत. बौद्धधम्माची पुनर्स्थापना, सामंतांच्या सुरक्षेची व्यवस्था, शरणागतांचे रक्षण आणि जनतेस सुखी करणे. त्याच्या काळात गृहनिर्माण कलेची खूप प्रगती झाली.

१३) **कुबिले खान -** सम्राट कुबिले खान (इ. स. १२५०-९०) तो हूण वंशाचा मंगोलिया चा वीर सम्राट होता. दोलोन नदीच्या उत्तरेस पश्चिम शांगतोन प्रांतात ३००० बौद्ध भिक्खू आणि २०१ तावो आणि २०० कन्फ्यूशयी भिक्खूंद्वारे बौद्ध संमेलन आयोजित केले. तेव्हा तावो भिक्खू बौद्ध भिक्खू झाले. चीनमध्ये आधीपासून बौद्धधम्माचा प्रसार होता, परंतु कुबिले खानाने तिबेटच्या भिक्खूंना आमंत्रित करून प्रसार केला. त्याने मंगोल भाषेत बौद्ध ग्रंथांचे भाषांतर करविले, तसेच चिनी अनुवाद करविले. त्याच्या साम्राज्यात पंजाबमधील बराच प्रदेश सामील होता.

१४) **सूर्यवंशराम -** (इ. स. १३५०) सयाम देशामधे बौद्धधम्माची खूप प्रगती झाली. सयाम (= थायलंड) मध्ये बौद्धधम्म इ. सनाच्या प्रथम शताब्दीमधेच पोहोचला होता. त्याने सयामी लिपी तयार केली. त्याने अनेक विहार बनविले. मुख्य विहारात अठरा हात उंचीची भ. बुद्धांची उभी मूर्ती बसविली. त्याने स्वतः प्रव्रज्यादेखील घेतली. राजधानी सुखोजईस जाण्यास सडकांचे निर्माण केले.

१५) **जयवर्मा सप्तम -** (इ. स. ११८०-१२२०) कम्बोजचा राजा अत्यंत श्रद्धाळू बौद्ध होता. त्याला कम्बोजचा अशोक म्हणतात. ज्याप्रमाणे हर्षवर्धनाच्या काळात वार्षिक आणि त्रैवार्षिक बौद्ध उत्सव करीत असत, तसेच उत्सव तो भरवीत असे.

१६) **फान्यून -** (इ. स. १३५०-१३७५) लाओस देशात बौद्धधम्माची स्थापना केली.

१७) **इन्द्रवर्मा द्वितीय -** (इ. स. ८६०-८९०) चंपा प्रदेशात बौद्धनरेश म्हणून प्रसिद्धी मिळाली.

१८) **श्री विजयनाग -** (ई. स. ३८०-६००) सुमात्रा द्वीपसमूहांचा राजा.

**प्रश्न ५६४ श्रीलंकेमध्ये भिक्खूणी-संघाची शाखा कोणी स्थापन केली ?**

**उत्तर** - श्रीलंकेचा राजा देवनामपियतिस्स व त्याची पत्नी महाराणी अनुला यांच्या निमंत्रणावरून संघमित्रा इ.स. पूर्वी २०६ मध्ये बोधिवृक्षाची एक शाखा घेऊन आणि सोबत अनेक भिक्खूणी घेऊन श्रीलंकेमध्ये गेली व तेथे भिक्खूणी-संघाच्या शाखेची स्थापना केली. हळूहळू तिने महाराणी व तिच्या सोबतच्या अनेक कुलीन स्त्रियांना, तसेच पाचशे कुमारिकांनाही भिक्खूणी-संघात सामील करून घेतले.

**प्रश्न ५६४ (अ) : सम्राट अशोकाने कोणकोणत्या भिक्खूंना धर्मप्रचारासाठी परदेशाला पाठविले होते ?**

**उत्तर** – त्या सर्वांची माहिती 'महावंश' नावाच्या ग्रंथामध्ये नमूद केलेली आहे.

| **धम्मोपदेशक** | **देश** |
|---|---|
| **मज्झन्तिक** | काश्मीर, गांधार |
| **महादेव** | महिष्ममंडल (म्हैसूर) |
| **रक्खित** | वनवासी (उत्तर कर्नाटक) |
| **थोन-धम्मरक्खित** | अपरान्तक (उत्तर कोकण) |
| **सोन, उत्तर** | सोवनभूमी (पेगू) |
| **महाधम्मरक्खित** | महाराष्ट्र (सध्याचे सयाम) |

**प्रश्न ५६५ : सम्राट अशोकाने विदेशी पाठविलेल्या धम्मप्रचारकांनी केल्या कार्याचे दाखले अजूनही शिल्लक आहेत काय ?**

**उत्तर** – होय. सम्राट अशोकाच्या पुत्राने व कन्येने सिलोनमध्ये बौद्धधम्माचा पाया रचला. त्याने पाठविलेल्या भिक्खूंनी संपूर्ण उत्तर भारतातच नव्हे तर त्याच्या सरहद्दीवर असेल्या चौदा भारतीय राज्यांना बौद्धमय केले. त्याचप्रमाणे त्याची दोस्तराष्ट्रे असलेल्या पांच ग्रीक राजांबरोबर आपल्या धार्मीक उपदेशकांना प्रवेश मिळावा ह्यासाठी तह करून धर्माच्या प्रसारासाठी भिक्खूंना तेथे पाठविले त्या राजांची नावे अशो -

सिरियाचा राजा अँटिओचुस, इजिप्तचा टॉलेनी, मॅसडोनचा अँटिगोनुस, सिरीनचा मार्गस आणि इपिरोसचा राजा अलेक्झांडर.

सम्राट अशोकाने जे शिलालेख उभारलेत आणि ज्या राजाज्ञा मोठमोठ्या स्तंभांवर कोरून ठेवल्या होत्या, त्या आजपावेतो तशा उपलब्ध असून त्या स्थळांना भेटी देणारा कोणीही त्यांना पाहू शकतो व त्यावरूनच आपल्याला ही माहिती मिळते.

**प्रश्न ५६६ : बौद्धधम्माची पुस्तके चीनमध्ये प्रथमच केव्हा प्रचलित झाली ?**

**उत्तर** – इ.स. पूर्व दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकाच्या सुमारास धम्माशोकाने पाठविलेले पाच भिक्खू चीनच्या पाच प्रदेशात पाठविण्यात आल्याचे विवरण ''समेन्त पासादिक'' आणि ''सारठ्ठन दीपानी'' या बौद्धांच्या जुन्या दोन पाली ग्रंथांमध्ये आलेले आहे.

## परदेशात प्रसार

**प्रश्न ५६७ : भारताबाहेर बौद्धधम्माचा प्रचार-प्रसार केव्हा आणि कसा झाला ?**

**उत्तर** – परदेशात सर्वप्रथम बौद्धधम्म श्रीलंकेमध्ये पोहचला, ते इसवी सनापूर्वीचे २०६ वे वर्ष होते. केवळ ब्रह्मदेशच सुवर्णभूमी आहे असे नाही, तर जावा, सुमात्रा आदी देशांचा सर्व भूभागच प्राचीन ''सुवर्ण-दीप'' आहे. असे वाटते की, भारतीयांनी ह्या प्रदेशाला सुवर्णभूमी किंवा सुवर्णद्वीप नाव ह्यासाठी दिले की, तेथील व्यापाराने त्यांना सर्वांत जास्त लाभ होत असे. ते तेथे इतक्या जास्त संख्येने पोहोचले की, ह्या सर्व प्रदेशाला दुसरे नावच हिंद-चीन पडले ते जेथे तेथे स्वाभाविकपणे आपला धम्म आपल्याबरोबर घेऊन गेले. ६८४ इ. मध्ये

बौद्ध राजा जयनाग विजय हा सुमात्राचा शासक होता.

सुमात्रापासून पुढे यव द्वीप म्हणजे आजचे जावा होय इ.स. ४१४-१५ मध्ये भारतातून सिलोनमध्ये जाऊन तेथून परतताना फाहियान पाच महिने यव द्वीपामध्ये राहिला होता. त्यावेळी जावामध्ये बौद्धधम्म अत्यंत ओजपूर्ण अवस्थेत अस्तित्वात होता.

यवद्वीपापुढे बाली द्वीप आहे. सातव्या शताब्दीच्या उत्तरार्धात जेव्हा ईचिङने बाली-द्वीपाची यात्रा केली होती, तेव्हा त्याच्या लिखाणाच्या अनुसार बालीमध्ये बौद्धधम्माच्या 'मूळ सर्वस्तिवाद निकाय' ह्याचा प्रचार होता. यव द्वीपाच्या पुढील प्रदेश बोर्नियोसुद्धा बौद्धधम्मापासून अलिप्त राहू शकला नाही. ह्याचे प्रमाण तेथील प्राचीन वास्तुशिल्प आहे.

हिंद-चीनचा एक प्रदेश 'चंपा' नावाने प्रसिद्ध होता. सातव्या शतकाच्या उत्तरार्धात प्रवासी ईचिङ चंपाविषयी लिहितो - ह्या देशात अधिकांश बौद्ध आर्य-सम्मितीय निकायाचे आहेत. पण काही लोक सर्वस्तिवादी-निकायाचेही आहेत.''असे वाटते की, नवव्या शतकापूर्वीपासूनच तेथे स्थविरवादाचा प्रचार होता.

चंपा प्रदेशाच्या पश्चिमेकडे एक दुसरा प्रदेश होता. त्याला चिनी लोक 'फुनान' म्हणत असत. फूनानच्या समृद्धीच्या काळात सयामदेखील त्यात समाविष्ट झालेला होता. तेथील चवथ्या शतकांतील शिलालेखावरून स्पष्ट होते की, समुद्रकिनाऱ्यावरही कित्येक बौद्ध केंद्रे होती.

कम्बोज (कंबोडिया) ह्या बौद्धधम्म आणि ब्राह्मण धर्म ह्यांचे जणूकाही विवादस्थळच होते. वर्णाश्रमधर्माची विजयपताका फडकविल्यानंतर बौद्धधम्म टिकू शकला नाही आणि जातिवाद नष्ट झाला तर मग ब्राह्मण-धर्म उभाच (अस्तित्वात) राहू शकत नाही. कम्बोजमधील जगप्रसिद्ध अंगोर वट हा पूर्वीचा बौद्धविहार होता. कम्बोजमध्ये बौद्धधम्माला पुष्कळच बरे-वाईट दिवस पाहावे लागले. त्यावेळी तेथे स्थविरवाद स्थापन झाला होता.

ब्रह्मदेशाच्या पूर्व भागाला आणि माया द्वीपाच्या उत्तरेला सध्याचे थायलँड आहे, ज्याचे नांव पूर्वी सयाम असे होते. हे सांगणे कठीण आहे की, तेथै बौद्धधम्माचा प्रवेश कधी झाला मागील दोन हजार वर्षांत काही काळ थायंडमध्ये महायान पंथ प्रामुख्याने होता, तर काही काळ स्थविरवाद प्रमुख राहिला. सध्या स्थविरवादी बौद्धधम्म तेथील राजकीय-धम्म आहे.

बौद्धधम्माचा प्रचार पश्चिम एशियामध्येही झाला. स्वेन-चाङच्या वेळी समरकन्दमध्ये बौद्धविहार होते. बाख्तरचा बौद्ध-विहार अतिशय विशाल आणि प्रसिद्ध होता.

भारताच्या उत्तर-पूर्वेला काशगर, कुचा, खोतन, तुफीन वगैरे नगर आणि प्रदेशांतही बौद्धधम्म अजूनही अस्तित्वात आहे. इ.स. च्या तिसऱ्या शतकांमध्ये कुचा हे बौद्ध धम्माचे फार मोठे केन्द्र होते. तेथे एक हजार मंदिरे आणि विहार होते. विहार तर फारच सुंदर कलेचे माहेरघर होते. विद्येचा फार आदर केला जात असे. विद्याध्ययन करण्याकरिता परदेशातील विद्यार्थी भारतात येत असत.

सम्राट मिनान्डरच्या निमंत्रणावरून आलेले तेथील प्रथम बौद्धधम्म प्रचारक, भिक्खू मातङ व भिक्खू धम्मरत्न हे होते. सम्राट मिनान्डरचा काळ प्रथम शताब्दीचा मानला जातो. अशा प्रकारे चीनमध्ये मागील दोन हजार वर्षांपासून बौद्धधम्माचा प्रचार-प्रसार चालत आलेला आहे.

**प्रश्न ५६८ :युरोपमधील काही देशांतही बौद्धधम्माचा प्रचार-प्रसार झाला काय ?**

**उत्तर -** होय. सोव्हियत-रशियातील कित्येक गणतंत्र राज्ये अशी आहेत की, जेथे बौद्ध धम्माची प्राचीन परंपरा आपापल्या स्वरूपांत कमी-अधिकपणे अजूनही विद्यमान आहेत. हल्ली इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स इ. सर्व देशांत बौद्धधम्माच्या प्रचाराचे कार्य चालू आहे.

**प्रश्न ५६९ : कोरिया व जपानमध्ये बौद्धधम्म केव्हा व कसा पोहोचला ?**

**उत्तर -** चीनमधून इ.स. ३७२ व्या साली बौद्धधम्म कोरियात पोहोचला. कोरियामधून इ.स. ५५२ मध्ये तो जपानमध्ये पोहोचला. ह्या देशामध्ये बौद्धधम्माचे महायानी रूपच अस्तित्वात आहे. कित्येक जपानी भिक्खू धम्मप्रचाराचे कार्य अतिशय आवडीने करतात. भारतात व अमेरिकेत बौद्धधम्माच्या प्रसारास त्यांचा बराच हातभार लाभलेला आहे.

**प्रश्न ५७० : बौद्धधम्म पूर्व एशिया आणि एशियातील मध्यवर्ती देशांमध्ये केव्हा आणि कसा पोहोचला ?**

उत्तर - इ.स. नंतर चवथ्या आणि पाचव्या शतकात तो इंडोचीन, चीन, फारमोसा, जावा, मंगोलिया, यार्कन्द, बॉक, बोखारा, अफगानिस्तान पसरला. पुढे श्रीलंकेमधून इ.स. नंतर ४५० साली ब्रह्मदेशात पोहोचला. त्यानंतर क्रमाक्रमाने आराकान, कम्बोडिया व पेगूमध्ये तो पोहोचला. इ.स. नंतर ६३८ साली म्हणजे सातव्या शतकात तो सयाममध्ये पोहोचला. अजूनही तो तेथे प्रचलित असून तेव्हापासूनच तो तेथील राष्ट्रधर्म झालेला आहे.

**प्रश्न ५७१ : तिबेटमध्ये बौद्धधम्माचा सर्वप्रथम प्रवेश केव्हा झाला ?**

**उत्तर -** तिबेटमध्ये बौद्धधम्माचा प्रचार सातव्या शताब्दीमध्ये झाला. तिबेट चीनपेक्षा भारताच्या अधिक जवळ असूनही तेथे बौद्धधम्माचा प्रचार उशिरा होण्याचे कारण मुख्यतः तेथील जातींची भटकीवृत्ती असावी, असे म्हटले जाते. तिबेटी भाषेमध्ये बुद्ध-वचनाला 'कंजूर' म्हटले जाते. 'कं' चा अर्थ 'बुद्ध' आणि 'जूर' चा अर्थ 'शास्त्र'. बौद्धधम्माचा प्रवेश झाल्यावर सुमारे शंभर वर्षांनंतर तिबेटचा प्रसिद्ध विहार 'समये' निर्माण झाला. शाक्य महापंडित आनंदध्वजांनी तेराव्या शतकात मंगोलियामध्ये जाऊन धम्मप्रचार केला त्यावेळी भारतात बौद्धधम्माचा दीप केवळ टिमटिमत होता.

**प्रश्न ५७१ (अ) : यूनानी (ग्रीक) नीतिशास्त्र आणि भारतीय नीतिशास्त्र यांचा संगम करावयास बौद्धधम्माने कोणते सहाय्य केले?**

**उत्तर -** ग्रीक संस्कृती भारतीय संस्कृतीप्रमाणेच एक मोठी संस्कृती होती. नीतिशास्त्र, कला, व्यापार, राजनीती, या सर्व क्षेत्रांमध्ये ती भारतीयांच्या मागे तर नव्हेच, परंतु मूर्तिकला, नाट्यकला यांसारख्या काही क्षेत्रांमध्ये त्यांची संस्कृती भारतीयांपेक्षाही सरस होती. नीतिशास्त्राच्या आणि तत्त्वज्ञानाच्या निम्नलिखित सिद्धान्ताना त्यांच्या तत्त्वज्ञांनी अविष्कृत केलेले होते आणि प्राचीन काळातील भारतीयांनी त्यांचा ऋणनिर्देश न करता, स्वतःच्या तत्त्वज्ञानांत त्यांचा समावेश करून घेतला होता.

| | | | |
|---|---|---|---|
| १.आकृतिवाद | - | पायथ्यागोरस | इ.पू.- ५७०-५०० |
| २.क्षणिकवाद | - | हेराक्लिटिस (हेराक्लीड) | इ.पू.५३५-४७५ |
| ३. बीजवाद | - | अनखागोरे | इ.पू. ५००-४२८ |

| | | | |
|---|---|---|---|
| ४.परमाणुवाद | - | डेमोक्रेटिस | ई.पू.-४६०-३७० |
| ५.विज्ञान (आकृती), विशेष सामान्य, मूळस्वरूप, उपादान-कारण, सृष्टिकर्ता | - | अफलातून | इ.पू.४२७-३४७ |
| ६. निमित्त कारण, तर्कशास्त्र, द्रव्य गुण, कर्म, दिशा, काल, परिमाण, आसन, स्थिती | - | ॲरिस्टॉटल | इ.पू. ३८४, ३२२ |

नंद राजांच्या शेवटच्या राज्यकाळात सिकंदरने पंजाबवर चढाई केली. त्यावेळी जरी ग्रीक लोकांचे राज्यशासन सुदृढ झालेले नव्हते, तरीदेखील भारतामध्ये ग्रीक व्यापारी आणि सैनिक लाखोंच्या संख्येने वास्तव्य करू लागले होते. त्या अभिमानी 'म्लेंछ' लोकांना भारतीय बनविण्या करिता बौद्धांनीच पुढाकार घेतला होता. परकीय (यवन) मिलिंद (Minandor) आणि शक कनिष्क यांच्यासारख्या प्रतापी राजांनी बौद्धधम्माचा स्वीकार केला त्या घटनेला आकस्मिक घटना म्हणता येणार नाही. एवढेच नव्हे तर जनपद आणि एकसत्ताक राज्य तसेच आर्य आणि म्लेंछ यांच्यातील अंतर नाहीसे करावयास बौद्धधम्माची खूपच मदत झाली.

**प्रश्न ५७१ (ब) : मेक्सिको आणि अमेरिका या देशांमध्ये बौद्धधम्माचे आगमन कसे झाले?**

**उत्तर –** इसवी सनाच्या पाचव्या शताब्दीमध्ये पाच बौद्ध भिक्खू रशियाच्या उत्तर सीमेकडून कालक्रमणा करीत कामश्चाटका व्दीपसमूहाकडून जात, पॅसिफिक महासागरातून प्रवास करीत अलास्कामार्गे अमेरिकेस पोहोचले आणि दक्षिणेस मेक्सिकोपर्यंत गेले. मेक्सिकोमधील मूळ रहिवाशांचे आचार-विचार बौद्धांशी मिळतेजुळते आहेत. मेक्सिकोमधील 'आगवे' नावाच्या वृक्षापासून तयार केलेले कापड, तेथील राहण्याच्या चालीरीती, वस्त्र विणण्याच्या पद्धती, कागद तयार करावयाच्या पद्धति, इत्यादीचे वर्णन चिनी प्रवासी हयु एन कडून चीनमधील पाचव्या शताब्दीमधील याना युआनच्या कारकिर्दीतील वर्णनावरून माहिती मिळते. मेक्सिकोमध्ये अजूनही एक दंतकथा प्रचलित आहे की, एक श्वेतकाय परदेशी पुरुष तेथे आला होता व त्याने तेथील लोकांना न्याय आणि सदाचाराची शिकवण दिली होती आणि मैगज लिना गावी त्याच्या मूर्तीची स्थापना करण्यात आली होती.

**प्र.५७१ (क) : ग्वाटेमाला देशात बुद्धधम्माच्या अस्तित्वाची कोणती चिन्हे दिसून येतात ?**

**उत्तर –** येथे गौतम आणि शाक्य ही दोन्ही नावे अनेक नावांशी मिळतीजुळती आहेत. ग्वातिमाला हा ''गौतमालय'' शब्दाचा अपभ्रंश आहे. त्यांच्या पुरोहितास 'ग्वाटेमोट-विज' म्हणतात. तो शब्द गौतम शब्दाशी संलग्न आहे. यास्काका, शाकाटापेक, जाकाटलाम, शाकापुलास हे शब्द 'शाल्क' शब्दाशी संबंधित आहेत. पालेस्के मध्ये बुद्धमूर्ती आहे जिला

'शाकमोल' म्हणजे शाक्य मुनी म्हणतात. कोलोराडो नदीच्या पात्रात एक द्वीप आहे ज्याच्या एका पुरोहिताचे नाव गौतुशाका (गौतम शाक्य) असे आहे. येथे पुष्कळ बुद्धमूर्ती, भिक्खूमूर्ती, हत्तींचे पुतळे चीनच्या पॅगोडा सारखी मंदिरे, स्तूप, विहार इत्यादी पाहावयास मिळतात खरे म्हणजे तेथे हत्ती कधीच नव्हते, तरीपण हत्तीचे पुतळे बघावयास मिळतात. (बघावे- Buddhist Discovery of America, Harper's Magazine for July 1901)या सर्व गोष्टीमुळे हे सिद्ध होते की १४०० वर्षांपूर्वी बौद्धभिक्खू अमेरिकेस गेले होते आणि त्यांनी तेथे धम्माचा प्रसार केला म्हणजे कोलंबसापूर्वी १००० वर्षापूर्वीच बौद्ध भिक्खू तेथे पोहचले होते.

**प्रश्न ५७२ : ज्या देशात बौद्ध नाहीत तेथे आता बौद्धधम्मास अनुकुल वातावरणाची लक्षणे दिसत आहेत काय ?**

**उत्तर** - होय. बौद्धधम्माच्या प्रमुख ग्रंथांची भाषांतरे प्रसिद्ध होत आहेत. अनेक लेख समालोचनांत, मासिकांत व वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाले आहेत आणि प्रतिष्ठित लेखकांद्वारे उत्कृष्ट प्रकारे संपादित पुस्तके नावाजलेल्या छापखान्यामधून छापून निघत आहे. यांशिवाय बौद्धधम्मीयच नव्हे तर इतर प्राध्यापकांनीही जनतेसमोर वेळोवेळी बौद्धधम्मावर व्याख्याने देण्याचे कार्यक्रम पाश्चिमात्य देशांत सुरू केले आहेत. जपानी भिक्खूंच्या 'शीन श्यु' ह्या संप्रदायाने होनोलुलु, सानफ्रान्सिस्को, सॅक्रॅमेन्टो आणि अमेरिकेतील इतर ठिकाणी धम्मप्रसारांच्या कार्यांमध्ये धम्मप्रसारक मंडळे स्थापित केलेली आहेत.

**प्रश्न ५७३ : बौद्ध-धम्माचा कोणत्या मुख्य कल्पना पाश्चिमात्य मनाची पकड घेत आहेत ?**

**उत्तर** - एक तर कर्माची कल्पना आणि दुसरी पुनर्जन्माची. मानवाच्या न्यायाविषयीच्या नैसर्गिक प्रवृत्तीला ही तत्त्वे सहजपणे पटणारी असल्यामुळे आणि ती अगदी योग्य असल्याचे त्वरित दृष्टीस येते, त्यामुळे त्यांचा झपाट्याने प्रसार व स्वीकार होत आहे.

## बौद्धधम्म भारतातून लुप्त झाला

**प्रश्न ५७४ : जो बौद्धधम्म एकेकाळी भारतभर प्रचलित होता तो येथून जवळ जवळ नष्टप्राय झाला, असे का ?**

**उत्तर** -बौद्धधम्म सुरूवातीस भ. तथागतांच्या तंतोतंत शिकवणीप्रमाणे शुद्ध आणि उदात्त होता. त्याचा संघ सदाचारी असून विनयांतील नियम काटेकोरपणाने पाळीत असे. त्याने सर्वांची मने जिंकली होती आणि ज्याप्रमाणे प्रातःकालीन प्रकाशामुळे फुलांना नवजीवन मिळते, त्याचप्रमाणे ज्या ज्या देशांमध्ये बौद्धधम्माची लाट पसरली, त्या त्या देशांत सुखशांती स्थापित झाली. परंतु काही शतकानंतर दुराचारी लोकांनी भिक्खू होऊन धम्माधिकार मिळविले; त्यामुळे संघ सधन, आळशी आणि विषयासक्त बनला. धम्माच्या नावावर बुवाबाजीचा शिरकाव झाला आणि भारतामधून त्याचा नायनाट झाला. परंतु भ. बुद्धांच्या २५०० व्या जयंतीच्या वर्षी १४ आक्टोबर, १९५६ ह्या रोजी केलेल्या डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या धर्मांतरानंतर भारतातील लाखो लोकांनी बौद्धधम्माची दीक्षा घेतली.

जर आम्ही बौद्धधम्माला तीन भागात विभागून विचार केला, तर ही गोष्ट अधिक स्पष्ट होईल-

१) बौद्ध तत्त्वज्ञान २) बौद्ध सदाचार आणि ३) बौद्ध समाज.

१) तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने विचार केल्यास असे दिसते की, अस्तित्वात असलेले संपूर्ण भारतीय तत्त्वज्ञान बौद्ध तत्त्वज्ञानाने प्रभावित झालेले आहे. खरी गोष्ट तर ही आहे की, भ. बुद्धांच्या पूर्वी भारतात तत्त्वज्ञान असे नव्हतेच; केवळ कर्मकांड होते. आजच्या सुप्रसिद्ध सहा तत्त्वाज्ञांपैकी एकहि तत्त्वज्ञान बुद्धपूर्व नाही. अद्वैतवादी वेदान्त तत्त्वज्ञान, ज्याचा आज एवढा बोलबाला आहे, ते अद्वयवादी बौद्ध तत्त्वज्ञानाचे केवळ प्रतिबिंबच होय.

२) बौद्ध सदाचारापासूनसुद्धा बुद्धोत्तरकालीन भारतीय समाज कमी प्रभावित झालेला नाही. आज एक पशू बलि प्रधान यज्ञभाग कोठे पाहायला मिळतात? स्मृतीसंबंधी धम्माची दहा लक्षणे बुद्धोत्तर कालीनच आहेत.

३) बाकी आता राहिला बौद्ध समाज. तो अवश्य भारतातून लुप्त झाला खरा. बौद्ध समाजाचे दोन भाग होते एक भिक्खू समाज आणि दुसरा उपासक समाज. पावित्र्याचा ऱ्हास व संघामध्ये शिरलेला अप्रामाणिकपणा. ह्याखेरीज मुसलमानांच्या भारतावरील आक्रमणाने बौद्धभिक्खूंची कत्तल करण्यात आली. इतर भिक्खू भारताबाहेर पळून गेले. भिक्खूंच्या अभावामुळे उपासक समाजास मार्गदर्शन करावयास कोणीही नसल्यामुळे बौद्ध समाज हळूहळू इतर समाजात परिणीत झाला.

**प्रश्न ५७५ : बुद्धधम्माचा ऱ्हास भारतामध्ये कधीपासून सुरू झाला ?**

**उत्तर** - बुद्धधम्माचा ऱ्हास भारतामध्ये इ. सनाच्या दहाव्या शतकापासून सुरू झाला. तो मुसलमानांच्या भारतावर केलेल्या स्वाऱ्यांचा काळ होता. भिक्खूंची कत्तल झाल्याने इतर भिक्खू पळून जाऊ लागले. त्यांच्या पुस्तकांची नासधूस झाली. तथापि तिबेट आणि इतर जवळील देशांत पळून गेलेल्याा भिक्खूंनी आपली पुस्तके समवेत नेली. एकोणिसाव्या शतकात रायबहादूर शरत्‌चंद्र दास यांनी अशी हजारो पुस्तके तिबेटमध्ये बघितली.

**प्रश्न ५७६ : बुद्धधम्माच्या ऱ्हासाची कारणे कोणती ?**

**उत्तर** - शंकराचार्य आणि कुमारील भट्टाच्या काळी पुष्कळशा बौद्धधम्मीय तत्त्वांचा हिंदूधर्माने स्वीकार केला. अनेक बौद्ध भिक्खूंमध्ये आणि त्यांच्या विहारांमध्ये हिंदू भिक्षूंचा शिरकाव झाला. भ्रष्टाचाराचा शिरकाव झाला. याचा राष्ट्रपाल परिपृच्छा मध्ये उल्लेख आहे. तांत्रिक आचार आणि त्यासंबंधी काही विकृत्या यांचा उदय झालेला होता. बौद्धधम्म प्रधानतः भिक्षूंचा धम्म झाला आणि त्या भिक्खूंचे जीवन विहारात केंद्रित झालेले होते. उपासकांसाठी बौद्धधम्मात वेगळ्या संस्था टिकून राहिल्या नसल्यामुळे व उपासकांचा धम्म मुख्यतः विहारांना व चैत्यांना दान देणें व तारा, अवलोकितेश्वर इ. देवतांची पूजा करणे एवढेच राहिलेले होते. दक्षिण आणि पश्चिम भारतात हिंदू शासकांनी समर्थन किंवा प्रोत्साहन न दाखविता केलेली उपेक्षा आणि तुर्की राजांनी बौद्ध विहारांची केलेली नासधूस, यामुळे भिक्खूंच्या रहावयाची स्थाने ओसाड पडू लागली. विहारांचा लोप झाल्याने उपासकांचे बौद्धधम्माबद्दलचे आकर्षण हळूहळू कमी होणे साहजिकच होते. त्यामुळे जनता हळूहळू हिंदू धर्माचे अवलंबन करू लागली.

**प्रश्न ५७७ : बौद्धांवर कोणती क्रूर कृत्ये केल्याचा मुसलमानांवर आरोप आहे ?**

उत्तर - मुसलमानांनी बौद्धांचे विहार जाळून भस्म केले, उद्ध्वस्त केले आणि निरनिराळ्या प्रकारे नष्ट केले; त्यांच्या भिक्खूंची कत्तल केली आणि त्यांच्या धम्मिक ग्रंथांना जाळून टाकले.

**प्रश्न ५७७ (अ) : बौद्धांना यातना देण्यामध्ये काही हिंदू राजांनीदेखील पुढाकार घेतला होता काय?**

**उत्तर** - होय. ह्यूएनत्संग या चिनी प्रवाशाने वर्णन केलेला वृतांत असा- मिहिरकूल हा काश्मीरचा राजा होता. त्याने गांधार देशावर आक्रमण करतेवेळी वाटेवर जेवढे बौद्ध स्तूप आणि विहार दिसले त्या सर्वांना त्याने पेटवून दिले. बऱ्याच स्तूपांना खोदून नष्ट केले आणि बौद्ध भिक्खू आणि भिक्खुणींचा वध केला. वोंग-पू नावाच्या प्रवाशाने लिहिले आहे की मिहिरकूल राजाने एवढ्या बौद्धांच कत्तल केली की, त्यामुळे रक्ताच्या नद्या वाहू लागल्या. त्याचा स्वतःचा प्रधान बौद्ध असल्यामुळे त्याने त्याचाही वध केला. राजतरंगिणी या इतिहास ग्रंथामध्ये मिहिरकुलाचे नाव 'राक्षस राजा' असे नोंदलेले आहे.

**प्रश्न ५७८ : शंकराचार्यामुळे बौद्धधम्माचा ह्या देशातून नायनाट झाला, असे म्हणणे कितपत बरोबर आहे ?**

**उत्तर** - शंकराचार्यांचे स्वतःचे जीवन अपेक्षेपेक्षा अल्पकालीन होते. तो सातव्या आठव्या शतकाचा काळ असल्याचे म्हटले जाते. शंकराचार्यांनंतरही भारतात दीर्घकाळपर्यंत बौद्ध-धम्माची ज्योत प्रज्वलित होती. ज्यांनी शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाची चर्चा केली आहे, त्यांनी स्वतः शंकराचार्यांना 'प्रच्छन्न बौद्ध' म्हणजे लपून बसलेला बौद्धसुद्धा म्हटलेले आहे. यावरून स्पष्ट होते की, शंकराचार्यांनी बौद्ध भिक्खूचे आवरण घेऊन हिंदुत्वाचा प्रसार केला. तथापि बौद्धधम्माचा या देशातून नायनाट होण्यास खालील कारणे प्रमुख होती-

१. संघामध्ये इतर धर्मीय भिक्खूंचा शिरकाव झाल्याने मिथ्याधम्माचा झालेला प्रचार

२. संघामध्यें शिरलेला अप्रामाणिकपणा, आलस्य व अपवित्रता.

३. मुसलमानांच्या भारतावरील आक्रमणाने बौद्ध भिक्खूंची करण्यात आलेली कत्तल व बौद्ध भिक्खूंचे भारताबाहेर पलायन.

४. बौद्धभिक्खूंच्या अभावी बौद्ध उपासकांचे हळूहळू होत गेलेले मतपरिवर्तन व बौद्ध मंदिरांची नासधूस व तसेच तलवारीच्या जोरावर मुसलमानांनी केलेले धर्मपरिवर्तन.

**प्रश्न ५७९ : भारतीय अस्पृश्यांचे पूर्वज बौद्ध होते काय ?**

**उत्तर** - होय. भारतामधील राजांचा आश्रय निघून गेल्यानंतर व मुसलमानांच्या आक्रमणानंतर, आत्मसंरक्षणाच्या भावनेने काही लोक जे कट्टरपंथी नव्हते ते वर्णाश्रमी धर्मांत सामील झाले. परंतु ज्यांना वर्णाश्रमधर्म अजिबात मान्य नव्हता असे लोक हिंदु धर्माऐवजी मुसलमानी धर्मात सामील झाले. शेष बहुसंख्यक बौद्ध समाज जो हिंदू व्हायला किंवा मुसलमान व्हायला तयार नव्हता त्याला अछूत (अस्पृश्य), अंत्यज बनविण्यात आले.

**प्रश्न ५८० : आदिवासी लोकांचे पूर्वज बौद्ध होते काय ?**

**उत्तर –** होय. भ. बुद्धांनी वनवासी जनतेलाही बौद्ध धम्माची दीक्षा देऊन बौद्धमय करून टाकलेले होते. ते चारिका करावयास एका गावाहून दुसऱ्या गावास जात, तेव्हा त्यांना रानावनांतून जावे लागे. त्यांच्या श्रमणांनाही तसेच करावे लागे. तेव्हा वनवासी लोकांच्या सान्निध्यात येऊन त्यांनाही धम्मलाभ झाला. त्यांच्या देवतेस अजूनही 'सरणादेवता' असे म्हणतात. बिहारमधील रांची प्रदेशात आदिवासी लोकांचे बाहुल्य आहे. ते 'शाल' वृक्षाची पूजा करतात कारण त्या वृक्षाखालीच सिद्धार्थाचा जन्म झाला होता. बोधिवृक्षाची (पिंपळाची) पूजा करतात. 'सरणादेवतेची' पूजा-स्रोत्रे बौद्धप्रार्थनेसारखी बुद्धस्तुतिपर आहेत.

भगवंतांची महापरिनिर्वाणसमयी लेटलेली जशी अवस्था (मुद्रा) होती, त्याच अवस्थेमध्ये आपल्या देवतेस दोन शाल वृक्षांच्यामध्ये ठेवून, आदिवासी लोक आपल्या 'सरणादेवतेची' पूजा करतात व सरणागाथेचे गायन करतात.

## भारतात धम्माची पुनर्स्थापना

**प्रश्न ५८१ : भारतात बौद्ध धम्माची पुनर्स्थापना कशी झाली?**

**उत्तर –** भारतातून बौद्धधम्म पूर्णतः कधीच लुप्त झाला नाही. उत्तरेला काश्मीर व लाहुल प्रदेशांत आणि पूर्वेला चितगाव वगैरे जिल्ह्यात परंपरागत बौद्ध समाज बरोबर टिकून राहिला. एकोणविसाव्या शताब्दीमध्ये महास्थविर बोधानंदजी व महावीर स्वामी सदृश भारतीय भिक्खू, महास्थविर चंद्रमणी व महास्थविर कित्तिमाजीसारखे बर्मी भिक्खू, तसेच सिलोनमधील प्रसिद्ध धर्म प्रचारक अनागारिक धम्मपाल ह्या सर्वांच्या कठीण परिश्रमामुळे आधुनिक भारताने पुन्हा नव्याने अभ्युदय करून बौद्धधम्म स्वीकारला आहे. डॉ. भीमराव रामजी आंबेडकर ह्यांचे बहुसंख्य अनुयायी बौद्ध झाल्यानंतर तर महापंडित राहुल सांकृत्यायन ह्यांच्या शब्दात सांगायचे झाल्यास, ''भारतांत बौद्ध धम्माचा असा स्तंभ रोवला गेला आहे की, ज्याला आता कोणीच हलवू शकणार नाही''.

**प्रश्न ५८२ : हल्ली भारतात बौद्धांची संख्या किती असावी ?**

**उत्तर –** भारतात दोन प्रकारचे बुद्ध भक्त आहेत. भ. बुद्धांवर अगाध श्रद्धा असूनही काही कारणास्तव बौद्ध म्हणवून घेण्यास संकोच करणारे, आणि दुसरे बौद्ध म्हणवून घेण्यात अत्यंत स्वाभिमानाचा अनुभव करणारे ज्यांनी त्रिशरण व पंचशील ग्रहण करून बौद्धधम्माचा स्वीकार केला, असे (इ.स. १९९६ मध्ये) भारतात दोन कोटींच्या जवळपास बौद्ध लोक असावेत. परंतु १९८१ च्या जनगणनेमध्ये त्यांची संख्या केवळ सदतीस लाख दाखविली गेली होती.

ज्यांची जन्मभूमी व कर्मभूमी केवळ भारतच आहे, अशा 'भारतीय विद्वान भिक्खूंची' संख्या ह्या वेळी (१९९६ मध्ये) सुमारे पंचवीस असावी.

**प्रश्न ५८३ : भारतात कोणकोणत्या संस्था बौद्धधम्माच्या प्रचाराचे कार्य करीत आहेत ?**

**उत्तर –** त्या फारच कमी आहेत. त्यात बाबासाहेब आंबेडकरांनी स्थापलेली भारतीय बौद्ध महासभा आणि अनागारिक धम्मपाल यांनी कलकत्त्यास स्थापन केलेली भारतीय महाबोधिसभा प्रमुख आहेत.

**प्रश्न ५८४ : बौद्धांसमोर ह्या वेळी कोणकोणती मुख्य कामे आहेत ?**

**उत्तर** - कामांची काही कमी नाही -

१) आपली अतिशय पवित्र स्थळे - बौद्धगया विहार - वगैरेची व्यवस्था बौद्धांच्या हाती असायला पाहिजे.

२) हिंदूपासून वेगळा असा बौद्धांचा आपला स्वतःचा कायदा असायला पाहिजे.

३) वेगवेगळ्या राज्यांतील विश्वविद्यालये, महाविद्यालये आणि शाळांमध्ये सुद्धा संस्कृत भाषेबरोबरच पाली भाषेच्या अध्यापनाची स्वतंत्र व्यवस्था असायला पाहिजे.

४) भारतीय भाषांमध्ये बौद्धसाहित्याचे लेखन, मुद्रण, प्रकाशन आणि विक्रीची सुसंघटित व्यवस्था असायला पाहिजे.

५) भारतीय भिक्खूंचे अध्ययन कार्य आणि त्यांच्याद्वारे केले जाणारे प्रचारकार्य सुव्यवस्थित असायला पाहिजे.

६) भारतीय बौद्धांचे आपल्या शेजारी देशांतील बौद्धबांधवांशी दृढ संपर्क स्थापित व्हायला पाहिजे.

कामे पुष्कळ आहेत, करणाऱ्यांचीच उणीव आहे.

**प्रश्न ५८५ : बौद्धांची प्रमुख तीर्थस्थाने कोणती ?**

**उत्तर** - बौद्धांची प्रमुख तीर्थस्थाने पाच आहेत -

१. लुम्बिनी जेथे सिद्धार्थ कुमाराचा जन्म झाला.

२. बुद्धगया जेथे सिद्धार्थ कुमाराला बुद्धत्व प्राप्त झाले.

३. सारनाथ (= ऋषिपतन) जेथे तथागतांनी धर्मचक्र प्रवर्तन केले.

४. कुसीनगर जेथे तथागतांचे महापरिनिर्वाण झाले.

५. नागपूर जेथे धम्मचक्राचे इ.स. १९५६ मध्ये पुन्हा प्रवर्तन झाले.

* * * *

# पंचम खंड

# बौद्धधम्म आणि विज्ञान

## वैज्ञानिक दृष्टिकोण

**प्रश्न ५८६ बौद्धधम्मास 'वैज्ञानिक धम्म' म्हणावयास हवे की, 'साक्षात्कारी धम्म' म्हणावयास हवे ?**

**उत्तर** - बौद्धधम्म हा पूर्णतः विज्ञानावर आधारलेला आहे. तो दैवीशक्तीद्वारे साक्षात्कार घडून मिळालेला नाही, असे अगदी ठामपणे म्हणता येते. साक्षात्कार घडून हा धम्म मिळाल्याचे भ. बुद्धांनी कधीही म्हटले नाही आणि लोकांची तशी समजूतही नाही. उलटपक्षी भ. बुद्धांनी या धम्माद्वारे शाश्वत सत्याचे रूप लोकांसमोर मांडले.

**प्रश्न ५८७ : कालामसुत्र विज्ञानानुसार आहे काय ?**

**उत्तर** - होय. अंगुत्तरनिकायमधील कालामसूत्रांत भगवंतांनी सांगितलेले आहे की, एखाद्याने चमत्कार घडल्याचे किंवा दैवीशक्तीचा साक्षात्कार झाल्याचे सांगितल्यास, त्यावर विश्वास ठेवू नका आणि जोपर्यंत कोणतीही गोष्ट आपल्या स्वतःच्या बुद्धीच्या आणि अनुभवाच्या कसोटीवर खरी ठरत नाही, तोवर तिच्यावर विश्वास करू नका. ही गोष्ट विज्ञानसंमत आहे.

**प्रश्न ५८८ : आपल्या पृथ्वीपेक्षा अधिक विकसित झालेली आणि इतर कमी विकसित झालेली भूमंडळे आहेत काय ?**

**उत्तर** - होय. बौद्धधम्म शिकवतो की सूर्यमंडलातील पृथ्वीशिवाय इतर पुष्कळशी शक्वले (Sakvalas) म्हणजे भूमंडळांच्या रचना आहेत. त्या कमी-अधिक प्रमाणात विकसित झालेल्या विविध प्रकारच्या आहेत आणि प्रत्येक भूमंडळाच्या रहिवाशांचा विकासही त्या भूमंडळाच्या विकासानुसारच झालेला आहे.

**प्रश्न ५८९ : मंत्र, तंत्र, जादूटोणा, सुदैवी काळवेळ व भूतप्रेतावरील विश्वास वगैरे गोष्टी बौद्धधम्मात अंतर्भूत आहेत काय ?**

**उत्तर** - नाही. त्या निश्चितच बौद्धधम्माच्या मुख्य सिद्धान्ताशी पूर्णतः विसंगत आहेत. त्यांना अंधश्रद्धायुक्त तत्त्वांची, अद्वैतमताची आणि इतर धर्मांची अद्यापि अस्तित्वात असलेली स्मारके, असेच म्हणावयास पाहिजे. 'ब्रह्मजाल सूत्रामध्ये' तसे भ. बुद्धांनी स्पष्टपणे म्हटले आहे. बौद्धधम्माशी असल्या गोष्टींचा व आचरणांचा संबंध जोडणे ह्याला धम्माच्या ऱ्हासाचे कारणच म्हटले पाहिजे. बौद्धधम्मात विशद केलेली सत्ये आणि अद्भुत वाटणाऱ्या सत्य गोष्टी विज्ञानाच्या कसोटीवर तपासून पाहावयास योग्य आणि खऱ्या आहेत. त्यापैकी काहीतर 'जादू ' सारख्या वाटतात. परंतु जर कोणी स्वार्थी हेतूने त्यांचा वापर केला तर त्यांचे वाईट परिणाम भोगावे लागतात आणि ते आध्यात्मिक प्रगतीस बाधा आणतात. परंतु

कोणाला उपद्रव न होता, परोपकारी हेतूने-उदाहरणार्थ आजाऱ्याला निरोगी करणे, प्राण वाचविणे वगैरे सारख्या कारणास्तव त्यांचा उपयोग करण्यास भ. बुद्धांनी परवानगी दिलेली आहे.

**प्रश्न ५९० : विज्ञानाच्या अभ्यासाला आणि शिक्षणाच्या कल्पनेला बौद्धधम्माचा विरोध आहे काय ?**

**उत्तर** - नाही. याउलट बौद्धधम्माचा त्यास पाठिंबा आहे. 'सिगालोवाद सुत्तामध्ये' भ. बुद्धांनी शिक्षणावर भर दिलेला आहे. सत्याचा शोध घ्यावयासाठी प्रयत्न करा, असे भगवंतांनी आवर्जून सांगितलेले आहे.

**प्रश्न ५९१ : बौद्धधम्माच्या तत्त्वांचे विज्ञानाद्वारे समर्थन कसे केलेले आहे ?**

**उत्तर** - धम्माची शिकवण अशी आहे की, मानवी वंशाचे पूर्वज अनेक असून ते निरनिराळ्या प्रदेशांत होते; मनुष्यामनुष्यामध्ये जात्याच म्हणजे नैसर्गिकतःच थोडा फरक असतो. काही लोक लवकरच ज्ञान प्राप्त करावयास समर्थ असतात तर काहींना त्याचे लवकर आकलन होत नाही, हे भगवंतांनी प्रवचनांत सांगितलेले आहे.

**प्रश्न ५९२ : बौद्धधम्माला विज्ञानाचे माहितीपत्रक समजावे की, नीतिमत्तेचा धम्मग्रंथ म्हणावे ?**

**उत्तर** - खरे सांगायचे झाल्यास बौद्धधम्मास शुद्ध नैतिक तत्त्वज्ञान किंवा नीतिशास्त्राची प्रणाली व अलौकिक आध्यात्मविद्या म्हणायला पाहिजे. तो इतका व्यवहार्य आहे की, भ. बुद्धांना मालुंक्यपुत्राने जेव्हा वस्तूंच्या उत्पत्तीविषयी व्यवहाराशी निगडित नसलेले प्रश्न विचारले, तेव्हा त्यांनी मौन धारण केले.

कारण त्यांची अशी धारणा होती की, आपल्यासभोवती असलेल्या वस्तू ज्या स्वरूपात अस्तित्वात आहेत, त्यांचे वास्तविक मूल्यमापन करून त्यांना सुधारण्याचा प्रयत्न करणे, हा आपला मुख्य उद्देश असावा; आणि केवळ बौद्धिक तर्क व काथ्याकूट करण्यात वेळ घालविणे व्यर्थ आणि अयोग्य आहे.

**प्रश्न ५९२ (अ) : परमाणूपेक्षाही सूक्ष्मतर वस्तूचे अस्तित्व असल्याचे बुद्धांनी आपल्या उपदेशाद्वारे अडीच हजार वर्षांपूर्वीच सांगितले होते काय, ज्याबद्दल आजचे आधुनिक विज्ञान साक्ष देत आहे ?**

**उत्तर** - होय, भ.बुद्धांनी आपल्या समाधी अवस्थेत प्रकृतीच्या वास्तविकतेचे परीक्षण केले आणि अवलोकन केले. त्यांना असे स्पष्टपणे दिसू लागले की, त्यांचे घन दिसणारे हे शरीर वस्तुतः असंख्य असंख्य परमाणूंचा आणि कलापांचा पुंजमात्र आहे. त्यांनी आपल्या समाधीमध्ये परमाणूंचे तुकडे होताना पाहिले इतके सूक्ष्म तुकडे की त्यापुढे त्याचे तुकडे होणे शक्य नव्हते. त्या अतिसूक्ष्म तुकड्यांना त्यांनी 'कलाप' असे नाव दिले. एकेक कलाप एवढा सूक्ष्म होता की, ग्रीष्म ऋतूमधील रथाच्या चाकांनी उडणाऱ्या धुळीच्या सूक्ष्मतम कणापेक्षाही कलाप ५०,००० पटीने लहान होता. त्यांना असे दिसून आले की, हा कलाप आठ गोष्टींशी जुळलेला असतो, त्यापासून तो विलग होत नाही. ज्याला त्यांनी 'अष्टकलाप'

म्हटले त्यामध्ये पृथ्वीधातू, अग्निधातू, वायुधातू आणि जलधातू तथा या चारही धातूंचे गुणधर्म याप्रमाणे आठ गोष्टी एकत्रित होऊन 'अष्टकलाप' होतो. हीच या भौतिक सृष्टीची सर्वात सूक्ष्मतम गोष्ट आहे.

त्यांना असे दिसले की, ही सूक्ष्मतम गोष्ट म्हणजे केवळ तरंग होय. तिच्यामध्ये नेहमी उत्पाद-व्यय होत राहतो. ही तरंग अविरत परीवर्तनशील आहे, अनित्य आहे. या अष्टकलापांमध्ये परस्परांमध्ये बरीच पोकळी आहे आणि त्यांच्यामध्ये बरेच आकर्षण-विकर्षण निरंतर असते. ते कलाप वेगळे होत नाहीत. ही सर्व भौतिक सृष्टी या तरंगांचे केवळ जाळेच होय. हे अभेद्य असे जाळे आहे. भ.बुद्धांना असे दिसून आले की, यामध्ये सतत एक नृत्यच जणू चालत राहते, जणुकाही एक छंद नाद बनलेला आहे. आणि येणेप्रमाणे ही सर्वसृष्टी ऊर्जेचा प्रवाहच आहे. धनभूत दिसणारे लोखंड आणि दगडदेखील तरंगांचे पुंजच आहे. प्राण्यांचे शरीर देखील केवळ तरंगाने बनलेले आहे. हीच दशा मनाचीदेखील आहे. मनदेखील अत्यंत अस्थिर आहे, परिवर्तनशील आहे. त्यामध्य्ये सतत उदय-व्यय होत असतो. मन हे संपूर्ण मानसिक शक्तींचे प्रतीकच असते, आणि या मनाच्या प्रवृत्त्या आणि शक्ती ज्या उत्पादक आहेत, त्या आमच्या आत आहेत, आणि या ज्या बाहेर उत्पन्न होतात त्या बाहेरून आत प्रवाहमान होतात. आणि हा प्रवाह क्रम कधीही विच्छन्न न होता सतत सुरूच राहतो. मनात जे विचार येतात तेदेखील तरंग असतात ते प्रवाहमान असतात. कर्मसंस्कारदेखील तरंगच असतात. हे केवळ प्रवाह असतात. आपले जीवनसुद्धा शरीरधारा आणि चित्तधारा यांनी घडविलेला प्रवाहच आहे. शरीरधारा चित्तधारेमध्ये आणि चित्तधारा शरीरधारेमध्ये नेहमीच निरंतरपणे प्रवाहित होत असते. अत्यंत सखोल विचारांती या मूळ सिद्धान्ताचा त्यांना साक्षात्कार झाला आणि त्यामुळेच त्यांनी दुःखाच्या मुक्तीच्या मार्गाचा शोध लावला. तेव्हा त्यांना त्यांचे ज्ञानचक्षू उघडल्याचा बोध झाला. जेव्हा या ज्ञानचक्षूंनी त्यांनी स्वतःचे आत्मनिरीक्षण केले तेव्हा त्यांना असे दिसून आले सर्वच काही सारहीन आहे. तीक्ष्ण समाधीद्वारे त्यांनी कलापांचे पुन्हा परीक्षण केले, तेव्हा त्यांना असे दिसून आले की ते शून्यवत होत जात आहेत, कलाप स्वतःचे वेगळे अस्तित्व नसून ते केवळ स्वभावमात्र आहेत, ते केवळ 'पञ्ञाति' म्हणजे प्रज्ञा आहेत.

आपल्या स्वतःच्या शरीराच्या आतील घडामोडी बघावयास अंर्तमुखी होऊन, या शरीरास चित्त आणि चित्तवृत्ती आणि चार महाभूतांना त्यांचे गुणधर्म-स्वभावांच्या स्तरावर त्यांना जाणून घेणे आणि त्यांची अनुभूती घेणे आणि त्यांच्या खऱ्या प्रवृत्तींना जाणीत असता त्यांच्या बंधनापासून मुक्त राहणे हेच विपश्यनेचे लक्ष्य होय आणि हाच मंगल पथ होय.

**प्रश्न ५९३ : जर बौद्ध लोक 'शब्दाला' प्रमाण मानीत नाहीत, तर मग ते कशाला प्रमाण मानतात ?**

**उत्तर** - बौद्ध लोक 'प्रत्यक्ष' प्रमाण आणि 'अनुमान' प्रमाण दोन्हीस मानतात. परंतु ते आपल्या विवेकबुद्धीला अधिक प्रामाण्य देतात. एकदा भगवंत कोसल-जनपदात चारिका करीत असतांना जेथे कालामाचे केसपुत्त नांवाचे नगर होते, तेथे जाऊन पोहोचले. केसपुत्तातील कालामांनी भगवंतांना विचारले-

"भन्ते! काही श्रमण-ब्राह्मण केसपुत्तांत येतात आणि आपल्याच मतांचे प्रतिपादन करून दुसऱ्यांच्या मतांचे खंडन करतात. भन्ते! दुसरेही काही श्रमण-ब्राह्मण केसपुत्तांत येतात, तेसुद्धा आपल्याच मतांचे प्रतिपादन करतात व दुसऱ्यांच्या मतांचे खंडन करतात. भन्ते! आमच्या मनात शंका निर्माण होते; आम्ही निर्णय घेऊ शकत नाही की, कोणाचे म्हणणे बरोबर आहे आणि कोणाचे म्हणणे चूक? कोण खरे सांगतो व कोण खोटे?"

भगवंतांनी त्यांचे समाधान केले - "कालामांनो! तुमची शंका तुमच्यापरीने योग्यच आहे. शंकाच ज्ञानाची जनक आहे. परंतु कालामांनो! कोणत्याही गोष्टीला तुम्ही ह्याकरिता सत्य मानू नका की, ती तुम्ही ऐकलेली आहे. ह्याकरिताही सत्य मानू नका की, तसे तुम्ही परंपरेने करीत आलेले आहात; ह्याकरिता पण सत्य मानू नका की, तुम्हाला वाटते की, ही तर अशीच आहे; ह्याकरिताही सत्य मानू नका की, ती तुमच्या धर्मशास्त्राने अनुमोदित केलेली आहे. ह्याकरिताही सत्य मानू नका की, ती गोष्ट तर्कसंगत आहे. ह्याकरिताही सत्य मानू नका की, ती न्याय संगत आहे. ह्याकरिताही सत्य मानू नका की, सांगणाऱ्याचे व्यक्तिमत्त्व आकर्षक आहे, ह्याकरिताही सत्य मानू नका की, तुमच्या नेहमीच्या विचारांशी ती अनुकूल आहे; ह्याकरिताहि सत्य मानू नका की, ती गोष्ट सांगणाऱ्याचे रूप सुंदर आहे; ह्याकरिताही सत्य मानू नका की, ती सांगणारा तुमची श्रद्धा असलेला गुरू आहे; कालामांनो! जेव्हा तुमचा स्वतःचा विवेक, तुमची स्वतःची बुद्धी सांगेल की, ही गोष्ट सदोष आहे, तेव्हा तिला तुम्ही सदोष समजा व माना. जेव्हा तुमचा स्वतःचा विवेक सांगेल की, ही गोष्ट निर्दोष आहे, तर तिला तुम्ही निर्दोष समजा व तसे माना." ही शिकवण अंगुत्तर निकायातील कालामसुत्तामध्ये दिलेली आहे. अशा तऱ्हेची निर्भिक आणि न्याय्य शिकवण कोणत्याही धम्मसंस्थापकाने दिलेली नाही.

**प्र.५९३ (अ) : बौद्धधम्मामध्ये कोणत्याही ग्रंथास स्वतःच प्रमाण मानले नाही यास काय कारण आहे?**

**उत्तर** – ब्राह्मण वेदांना ते स्वतःच प्रमाण असल्याने मानीत असत. भ. बुद्धांनी वेदाचे अध्ययन केले होते आणि त्यांना वेदांमध्ये सत्यावर आधारित नसलेल्या अनेक गोष्टी दिसून आल्या. वेदांमध्ये अशा बऱ्याच गोष्टी सांगितलेल्या होत्या ज्या इतरांच्या मतांहून विपरीत होत्या. तर मग अशा ग्रंथाना आपण 'प्रमाण' म्हणून कसे मानू शकतो ? जर असे म्हटले की वेद इतरांच्या सिद्धान्ताच्या विरुद्ध नाहीत तर प्रश्न असा आहे की हे कसे माहीत होणार? ते ठरविण्याकरिता शेवटी बुद्धीचाच उपयोग करावा लागेल. यावरून हे सिद्ध होत नाही काय, की वेदांची प्रामाणिकता सिद्ध करावयास बुद्धीवरच निर्भर राहावे लागत ? तर मग वेदांऐवजी बुद्धिप्रामाण्यच श्रेष्ठ झाले की नाहो ?

ग्रंथप्रामाण्यामुळे दुनियेत कितीतरी भयंकर अत्याचार झालेत. बायबलला स्वतःच प्रमाण असल्याचे मान्य केले गेले नसते, तर गॅलिलीओची जी दुर्गती करण्यात आली, ती झाली नसती आणि अनेक वैज्ञानिकांना जीवास मुकावे लागले नसते. यवन तत्त्ववेत्यांच्या सहस्रावधी वर्षांच्या परिश्रमांनी स्थापित केलेले सिद्धान्त जे सिकंदरीया येथील ग्रंथालयात जपून ठेवलेले होते, त्यांची जाळून राखरांगोळी केली गेली नसती, जर मुसलमान विजेत्यांनी कुराण ग्रंथास प्रमाण मानले नसते. कोणत्याही ग्रंथास प्रमाण मानावयास भाग पाडणे हा असहिष्णुतेचाच

भाग नाही काय?

कोणत्याही ग्रंथास स्वतः प्रमाण मानणे, त्यात सांगितलेल्या विषयांवर कसलीही शंका उत्पन्न न करणे म्हणजेच पुढील जिज्ञासेला रोखून धरणे होय. जिज्ञासा हीच जगातील मोठमोठे शोध लागण्यास कारणीभूत झालेली आहे. गॅलिलीओला पृथ्वी गोल आहे या प्रमाणाचा भास झालाच नसता. न्यूटनला गुरु त्वाकर्षणाच्या तत्त्वाची ओळख झाली नसती आणि आईनस्टाइनला सापेक्षतेच्या महासिद्धान्ताचा शोध लागला नसता. खरे म्हणजे जगात विद्या आणि संस्कृती यासंबंधी जेवढी प्रगती झालेली आहे, ती ज्या ग्रंथांना स्वतःप्रमाण मानावयाची पद्धत होती तिच्याविरु द्ध बंड उभारल्यामुळेच झालेली आहे.

कोणतेही ग्रंथ त्यांच्या वेळेच्या चालीरीती, अंधविश्वास आणि अज्ञानाने जकडलेले असतात. ते त्यांच्यावेळी रूढ असलेल्या धार्मिक, सामाजिक आणि राजनैतिक व्यवहारांशी पोषक असतात. एखाद्या ग्रंथाला जर प्रमाण मानायचेच झाले तर त्या ग्रंथाचा रचयिता सर्वज्ञ असावयालाच पाहिजे आणि असा सर्वज्ञ की सर्व देशांचे, सर्वच काळाचे, आणि सर्वच वस्तूंचे अचूक ज्ञान असणारा हवा आणि असा कोणी सर्वज्ञ असेल तर मनुष्य त्याच्या हातातील केवळ बाहुले होऊन जाईल. परिशुद्ध आणि मुक्त व्हावयास जे कर्म करावयाचे असते त्यासाठी मनुष्याची स्वतंत्रपणे विचार करावयाची तयारी हवी असते. वास्तविक पाहू जाता कोणताही ग्रंथ स्वतःप्रामाणिक आहे किंवा नाही ही गोष्ट तो कितपत बुद्धिसदृश आहे यावर निर्भर असते. ग्रंथावर बुद्धीची प्रामाणिकता निर्भर असूच शकत नाही. (बौद्धदर्शन : पृ. ११)

**प्रश्न ५९४ : पवित्र मानल्या जाणाऱ्या 'गंगा-यमुना' वगैरे नद्यांमध्ये स्नान केल्याने पाप नाहिसे होते काय ?**

**उत्तर** - नाही. स्नान केल्याने शरीराचा मळ नाहीसा होतो व मनही ताजेतवाने होते. परंतु नदीमध्ये स्नान केल्याने पापाचा क्षय होते, ह्या गोष्टीला काहीच आधार नाही. ती निव्वळ कल्पना आहे. भगवंतांनी पुष्कळशा जटिलांना पाप नष्ट होते म्हणून प्रातःकाळी थंड पाण्यात स्नान करताना पाहिले. तेव्हा त्यांच्या मुखातून उद्गार निघाले -

"येथे पुष्कळजण स्नान करीत आहेत, असे समजून की, पाण्याने शुद्धी होईल, पाण्याने मनाची शुद्धी होत नाही. ज्या ठिकाणी सत्य व धम्माचे वास्तव्य असते, त्यालाच 'पवित्र' म्हणावे."

माती किंवा पाणी 'पवित्र' नसते. तर माती किंवा पाण्याला पवित्र मानण्याच्या मुळाशी आपली भावनाच असते.

**प्रश्न ५९५ : विवेक आणि ज्ञान दोन्ही एकच आहेत काय ?**

**उत्तर** - नाही.' विवेक' म्हणजे बोध होणे व बोध झाल्यावर त्याप्रमाणे कृती करणे म्हणजे 'ज्ञान' होय. योगी विवेकाने मनाला अंकित करून ज्ञानाने क्लेश नष्ट करतो.

प्रत्यक्ष दाखवून देणे ज्ञानाची ओळख आहे. ज्ञानाने अविद्यारूपी अंधकार दूर होतो व विद्यारूपी प्रकाश निर्माण होतो, ज्यामुळे चार आर्यसत्यांचे दर्शन होते आणि अनित्य, दुःख व अनात्म ह्यांचे आकलन होते. म्हणून ज्ञान म्हणजे प्रत्यक्ष दाखवून देणे होय. अशा रीतीने शील, श्रद्धा, वीर्य, स्मृती, समाधी, ज्ञान इत्यादी पुण्यधर्मामुळे तृष्णा-समूहांचा नाश होतो.

**प्रश्न ५९६ : आत्मा व मन यांत फरक कोणता ?**

**उत्तर -** तथागतांनी आत्मा नसल्याचा उपदेश केलेला आहे. यास्तव जे असे म्हणतात की, आत्मा विचारांचा चिंतक असून आमच्या कर्मांचा कर्ता आहे, तसे म्हणणे चूक आहे. आत्म्याला अस्तित्व नाही, परंतु मनाला अस्तित्व आहे. इंद्रियांद्वारे अनुभूती होते. परंतु आध्यात्मिक ज्ञान मनामुळेच होते. मानसिक ज्ञान इंद्रियांमुळे होत नाही. बोधि शाश्वत असून संपूर्ण प्राणिमात्रांवर सत्यशोधनाच्या कार्यात मार्गदर्शक असते. ती मनांमधील पाशवी वृत्ती बदलते व प्रत्येक प्राण्यास सत्यशोधनास मदत करते. आत्म्याची कल्पना अशी की, तो मृत्यूनंतर ते शरीर सोडून जातो व दुसऱ्या शरीरात प्रवेश करतो. तो सदैव अविनाशी आहे, चिरंतन टिकणारा आहे. शरीराची आयुमर्यादा सीमित असते; ते हजारो, लाखो, कोट्यावधी वर्षे जिवंत राहूच शकत नाही. अशा मर्त्य शरीरात अमर्त्य आत्मा निवास करतो, ही कल्पनाच चुकीची आहे. आत्मा शाश्वत असल्यामुळे त्यात बदल मुळीच होत नाही; बदल होतो तो शरीरात असे इतर धर्मीय मानतात. मृत्यूनंतर आत्म्याला मोक्ष मिळाल्यास तो स्वर्गास जातो, असे ते मानतात. मोक्ष मिळाल्यास आत्म्याचा परमात्म्याशी संयोग होतो, असेही ते म्हणतात.

बौद्धधम्माचा संपूर्ण भर माणसाच्या मनावर आहे. कोणतेही कर्म करावयास त्याची कल्पना मनातच उत्पन्न होते. मन हेच प्रधान आहे, असे धम्मपदांतील प्रथम गाथेमध्ये सांगितलेले आहे. मन क्षणोक्षणी बदलत असते. मनातील वाईट (म्हणजे अकुशल) विचार काढून टाकावेत व त्यांत चांगल्या (म्हणजे कुशल) विचारांचा उदय होऊ द्यावा, व त्यांना मनात चिकटून ठेवावे व येणेप्रमाणे हळूहळू मनास परिशुद्ध करीत राहावे, हीच भगवंतांची शिकवण आहे. **(सब्ब पापस्स अकरणं, कुसलस्स उपसंपदा, सचित्त परियोदपनं, एतं बुद्धानं सासनं।)** मनातील तृष्णेचा पूर्णतः नाश झाला म्हणजे मन परिशुद्ध होते, 'निर्वाणाची' प्राप्ती होते. ती ह्या देहातच होते, मृत्यूनंतर होत नाही. अशा प्रकारे आत्मा व मन यांत मूलतः फरक आहे.

**प्रश्न ५९७ : भ. बुद्ध मोक्षदाता होते की मार्गदाता ?**

**उत्तर -** सर्व पैगंबरांनी (संदेशवाहकांनी) मुक्तिदाता किंवा मोक्षदाता होण्याचा दावा (अधिकारपूर्वक कथन) केला आहे. परंतु केवळ भ. बुद्ध हे एकच धम्मसंस्थापक महापुरुष असे होऊन गेलेत की, ज्यांनी स्वतःला 'मोक्षदाता' न म्हणता 'मार्गदाता' म्हटले आहे. आपल्या मुक्तीकरिता प्रत्येकाने स्वतः आपणहून प्रयास करावा लागतो. भगवान केवळ पथप्रदर्शक आहेत. त्यांचा मार्ग मुक्तीचा सत्यमार्ग आहे. कारण तो जगातील सर्व मानव जीवनाच्या व्यापक अनुभवावर आधारित आहे. तो सन्मार्ग आहे किंवा नाही, याबाबत प्रत्येकाला प्रश्न विचारण्याची, परीक्षण करण्याची व प्रत्यक्ष पाहण्याची भगवंतांनी स्वतंत्रता दिली होती. इतर कोणत्याही धर्म-संस्थापकाने अशा प्रकारचे स्वतःच्या धर्माला परीक्षणाच्या कसोटीवर तोलण्याचे आव्हान दिले नाही.

**प्रश्न ५९७ (अ) : बौद्धधम्माचे मूळ सिद्धान्त कोणते?**

**उत्तर -** ते चार आहेत. तीन अस्वीकारात्मक आणि एक स्वीकारात्मक

१. ईश्वराचे अस्तित्व नाहीच असे मानणे, नाही तर ''मनुष्य स्वतःला आपला स्वामी आहे'' या सिद्धान्ताचा विरोध होईल.

२. आत्म्यास अनित्य मानणे, नाहीतर नित्य एकरस मानल्यास त्याच्या शुद्धीसाठी आणि मुक्तीसाठी वावच उरणार नाही

३. कोणत्याही ग्रंथास स्वतः प्रमाण न मानणे, नाहीतर बुद्धी आणि अनुभव यांच्या प्रामाणिकतेवरच प्रश्नचिन्ह लागेल.

४. जीवनाच्या प्रवाहाचे शरीराच्या पूर्वी अस्तित्व होते आणि पुढेही अस्तित्व राहील असे मानणे, नाहीतर जीवन आणि त्याची विचित्रता ह्या कार्यकारण नियमानुसार न उत्पन्न होता, केवळ आकस्मिक घडलेल्या घटनाच होत असे मानावे लागेल. बौद्धधम्मामध्ये या चार गोष्टी सर्वमान्य आहेत.

**प्रश्न ५९८ : सामाजिक बाबींसंबंधी भ. बुद्धांचा दृष्टिकोण क्रांतिकारी होता काय ?**

**उत्तर** - होय. एकदा ब्राह्मणांच्या आग्रहास्तव आश्वलायन-माणवक भगवंतांशी ह्या विषयासंबंधी चर्चा करण्याकरिता त्यांच्याजवळ गेला होता. तेव्हा भगवंतांनी आपल्या मताच्या समर्थनार्थ आणि ब्राह्मणवादाच्या पक्षाचे खंडन करताना दहा सडेतोड तर्क दिले होते. त्यांनी म्हटले-

१. ज्याअर्थी ब्राह्मणांच्या भार्या ऋतुमती, गर्भिणी, बाळंतिणी होताना दिसतात आणि आपल्या बालकांना दूध पाजताना दिसतात, त्याअर्थी असे कसे म्हणावे की, ब्राह्मण ब्रह्माचे औरस-पुत्र आहेत, मुखातून उत्पन्न झालेले आहेत ?

२. यवन आणि कम्बोज तसेच इतर सीमांत देशांत दोनच वर्ण असतात. आर्य म्हणजे स्वतंत्र आणि दास म्हणजे गुलाम. आर्य दास होऊ शकतो, तसेच दास आर्य. ह्यावरून सिद्ध होते की, कोठेही 'ब्राह्मण वर्ण' नसतोच.

३. जर ब्राह्मणसुद्धा हिंसक, चोर, दुराचारी असल्यामुळे अन्य वर्णांच्या लोकांप्रमाणेच दुर्गतीला प्राप्त होतो, तर असे कसे म्हणावे की, अन्य वर्णापेक्षा त्याची स्वतःची काही विशेष योग्यता असते?

४. जेव्हा ब्राह्मणही हिंसा, चोरी व दुराचारापासून अलिप्त असल्यावरच अन्य वर्णांच्या लोकांप्रमाणे सद्गतीला प्राप्त होतो, तर मग असे कसे म्हणू शकतो की, अन्य वर्णापेक्षा ब्राह्मणाची स्वतःची काही विशेषता असते?

५. ब्राम्हणाप्रमाणेच इतर वर्णाचे लोकहो मैत्रीचित्ताची भावना करू शकतात, तर मग असे कसे म्हणू शकतो की, ब्राह्मण वर्णाची काही विशेष योग्यता असते ?

६. जर ब्राह्मणाप्रमाणेच इतर वर्णाचे लोकही उबटण घेऊन नदीवर जाऊन आपल्या शरीराचा मळ काढून शरीर स्वच्छ करू शकतात, तर मग असे कसे म्हणू शकतो की, ब्राम्हणांची काही स्वतःची विशेषता आहे?

७. जर ब्राह्मणादी द्विज वर्णांद्वारे दोन लाकडांच्या रगडण्याने तशीच उपयोगी आग निर्माण होत, जशी चांडाल, पारधी, वसोर, रथकार ह्यांच्या लोकांद्वारेंही निर्माण होते व दोन्ही अग्नीत काहीच फरक नसतो, तर मग असे कसे म्हणू शकतो की, ब्राह्मणांची स्वतःची काही विशेष योग्यता असते.

८. जेव्हा क्षत्रिय कन्येबरोबर ब्राह्मणाने सहवास करून अथवा ब्राह्मण कन्येबरोबर क्षत्रियाने सहवास करून जी संतान पैदा होते, तिला अनुक्रमें ब्राम्हण व क्षत्रियच म्हटले जाते. त्यांच्या संकर वर्णास वेगळे असे नाव नाही. परंतु गधा व घोडीच्या मिलाफाने 'गधा' किंवा 'घोडा' पैदा न होता 'खेचर' जन्म ग्रहण करतो. तेव्हा असे कसे म्हणू शकतो की, ब्राह्मणाची स्वतःची काही विशेषता असते?

९. ब्राह्मणही दोन जुळ्या भावांमध्ये जो मंत्रधर व शीलवान असतो त्याचाच आदर सत्कार करतात, आणि जो ह्याउलट असतो त्याचा आदर करीत नाहीत. तर मगे असे कसे म्हणू शकतो की, जो जन्माने ब्राह्मण आहे, त्याची काही विशेषता आहे?

१०. जर ब्राह्मणही दोन ब्राह्मण तरुणामध्ये जो मंत्रधर असून शीलवानही आहे, त्याचा अधिक आदरसत्कार करतात. पण जो केवळ मंत्रधर आहे पण शीलवान नाही, त्याचा आदरसत्कार ब्राह्मण करीत नाहीत. तर मग असे कसे म्हणू शकतो की, जन्माने ब्राह्मण असल्याची काही विशेषता आहे?

आश्वलायन माणवकाला काही लक्षात येण्यापूर्वीच तो भगवंतांचे तर्कपूर्ण बोलणे स्वीकारीत गेला व त्याला हे मानावेच लागले की, सर्व वर्ण सारखेच 'शुद्ध' अथवा 'अशुद्ध' असतात. ब्राह्मण वर्णाची कोणतीच विशेषता नसते.

**प्रश्न ५९९ : सामाजिक आणि राजनितिक प्रश्नासंबंधी भगवंतांनी काय उपदेश केलेला आहे ?**

**उत्तर -**

**१. राजेलोकांच्या कृपेवर विसंबून राहू नका**

राजकुमार अजातशत्रू देवदत्ताला साहाय्य करीत असे. त्यामुळे देवदत्त भगवंतांचा उघडपणे विरोध करू लागला. अजातशत्रू देवदत्तासाठी व त्याच्या अनुयायांसाठी दररोज अनेक गाड्या अन्नसामग्री पाठवू लागला. त्याविषयी भगवंतांनी म्हटले की, ज्याप्रमाणे कुत्र्याच्या नाकासमोर मांसाचा तुकडा धरल्याने तो कुत्रा अधिकच उन्मत्त होतो, त्याप्रमाणे राजेलोकांनी दिलेले उपहार किंवा लाभ-सत्कार-खुशामद स्वीकार केल्यामुळे भिक्खूंचे नुकसानच होत असते. त्यामुळे भिक्खू राजेलोकांचे मिंधे होऊ शकतात आणि असत्याचा स्वीकार करू शकतात. म्हणून अशा तऱ्हेच्या कृपेचा अस्वीकार करावयास हवा; जेणेकरून आपल्या हृदयात त्या कृपेला काहीच स्थान राहणार नाही.

**२. राजा धार्मिक असेल, तर प्रजाही धार्मिक होईल**

भगवंतांनी एकदा उपदेश केला की, राजा अधार्मिक असेल तर मंत्रिगण आणि अधिकारीही अधार्मिक होतात. त्यामुळे ब्राम्हण आणि गृहपतीसुद्धा अधार्मिक होतात. ब्राह्मण व गृहपती अधार्मिक झाले म्हणजे नगरातील नागरिक आणि गावातील ग्रामीणदेखील अधार्मिक होतात. याउलट राजा धार्मिक असला म्हणजे सर्व प्रजादेखील धार्मिक होते.

**३. राजनैतिक आणि लढाऊ शक्ती सामाजिक व्यवस्थेवर अवलंबून असते**

एकदा मगध नरेश अजातशत्रू वज्जी लोकांच्या राज्यावर आक्रमण करू इच्छित होता. तेव्हा त्याने आपला प्रधानमंत्री वर्षकार यास भगवंतांकडे, त्याचे मत जाणून घ्यावयास पाठविले. भगवंतांनी त्यावेळी वर्षाकारास या गोष्टींची जाणीव करून दिली की, वज्जी लोक

जोपर्यंत त्यांनी सांगितलेल्या सुमार्गावर चालत राहतील, तोवर कोणीही त्यांचा पराभव करू शकणार नाही. भगवंतांनी वज्जींना शिकविलेल्या गोष्टी येणेप्रमाणे -

अ. वज्जीगणांच्या सार्वजनिक समित्या होत्या व त्यांच्या बैठकी नियमितपणे होत असत.

ब. ते मिळून मिसळून बैठकी करीत आणि आपल्या निश्चित केलेल्या गोष्टींना कार्यरूपामध्ये परिणत करीत असत.

क. कोणतीही कारवाई नियम केल्याशिवाय करीत नसत आणि केलेल्या नियमांचे काटेकोरपणे पालन करीत असत.

इ. कोणत्याही परक्या स्त्रीला ते जबरदस्तीने आपल्या घरी नेत नसत.

फ. ते सर्वजण धर्माचे काटेकोरपणे पालन करीत.

### ४. युद्ध निषिद्ध आहे

भगवंतांनी वैराने वैर निर्माण होते, म्हणून वैर करू नका, अशी शिकवण दिली. युद्ध करून कुणास हरविल्यास, हारलेला माणूस मनात वैर ठेवतो व पुढे संधी मिळताच पुन्हा युद्धास प्रवृत्त होतो. म्हणून वैराने वैर शांत होत नाही. जोपर्यंत पापकर्म फळ देणे सुरू करीत नाही, तोवर मूर्ख माणूस आनंद मानतो; परंतु पापाचे फळ मिळणें सुरू झाले म्हणजे त्यास दुःख होते.

### ५. युद्ध - विजेत्याचे कर्तव्य

भगवंतांनी म्हटले आहे की, शांती स्थापित झाल्यावर विजेत्याने अभिमानी होऊ नये. योग्य, सरळ आणि मृदुभाषी व्हावे. कोमल स्वभाव धारण करावा. संतुष्ट व्हावे, हलक्याफुलक्या रम्य वातावरणात राहावे. इंद्रियविजयी व्हावे.

## प्रश्न ६०० : वज्जी लोकांच्या कोणत्या सात विशेष गुणांची भ. बुद्धांनी प्रशंसा केली होती ?

**उत्तर** - १. वज्जीगण वेळोवेळी आपल्या सभांमध्ये सहभागी होत असत.

२. वज्जीगण वेळेवर सभेत उपस्थित होत असत.

३. वज्जीगण स्वतः बनविलेल्या नियमांची केवळ तोंडी बढाई न करता त्यांचे पालन करीत असत.

४. वज्जीगण आपल्या वडीलधाऱ्या व वृद्ध मंडळींचा आदरसत्कार करीत असत.

५. वज्जीगण कोणत्याही स्त्रीचे किंवा कुमारिकेचे जबरदस्तीने अपहरण करीत नसत.

६. वज्जीगण लोकांच्या नगरात किंवा नगराबाहेब जी धार्मिक स्थळे होती त्या सर्वांचा ते आदर करीत असत आणि त्या स्थळांना दिलेल्या दानाचा नाश करीत नसत.

७. वज्जीगण त्यांच्या जनपदांत आलेल्या अर्हतांचा व सन्मान्य व्यक्तीचा आदर सत्कार करीत असत. जेणेकरून अर्हत आणि सामान्य व्यक्ती जनपदात सुखाने राहावेत आणि इतर अर्हतदेखील यावेत.

या सात गोष्टींचा उपदेश वज्जी लोकांना भगवंतांनीच दिला होता व ते त्यांचे कटाक्षाने पालन करीत असत.

**प्रश्न ६०१ : भ. बुद्धांचा धम्म आधुनिक युगाशी सुसंगत आहे काय ?**
**उत्तर** – होय. भ. बुद्धांचा जन्म दोन हजार पांचशे (२५००) वर्षांपूर्वी झाला. पण आजही आधुनिक विचारवंत आणि वैज्ञानिक त्यांच्या धम्माची प्रशंसा करीत आहेत. त्यांच्या विचारांचा संग्रह मननीय आहे. (टीप १० पहावी)

**प्रश्न ६०२ सध्या प्रचलित असलेल्या बौद्धधम्मात दुसरे तिसरे काही नसून केवळ जे सत्य आणि विज्ञानसंमत आहे, असेच सांगितले आहे काय ?**
**उत्तर** – नाही. अनेक शतकांपासून चालत आलेल्या इतर प्रत्येक धर्माप्रमाणेच बौद्धधम्मातही सत्यासत्याचे संमिश्रण झालेले आहे. ज्याप्रमाणे सोन्यामध्ये देखील मळ साचतो, त्याप्रमाणे कविकल्पना, अत्युत्साह किंवा बौद्ध उपासकांची रेंगाळणारी अंधश्रद्धा यामुळे देशोदेशी आणि निरनिराळ्या कालावधीत बौद्धधम्मात काही असत्य व अवैज्ञानिक गोष्टींचा अंतर्भाव झाला व भ. बुद्धांनी विशद केलेल्या तत्त्वांचा उच्चतम सिद्धान्ताशी या गोष्टी जोडल्या गेल्या. यास्तव यातील असत्य गोष्टींना काढून टाकणेच इष्टप्रद आहे. प्राचीन काळीदेखील धम्माच्या शिकवणुकीमध्ये असत्य धम्ममतांचा शिरकाव झालेला पाहून त्यास दोषमुक्त करण्याच्या हेतूने, संघाच्या तीन भव्य परिषदांचे (संगीतीचे) आयोजन करण्यात आले होते.

**प्रश्न ६०३ : दुर्गुणी माणसाने केलेल्या कर्मांची फळे तो कशा प्रकारे भोगतो ?**
**उत्तर** – दुर्गुणी माणसाने केलेल्या अकुशल कर्मांच्या तीव्रतेनुसार तो अनुक्रमे पुढील नारकीय दुःखे भोगतो - १. संजीव नरक २. कालसूत्र नरक ३. संघांत नरक ४. रौरव नरक ५. महारौरव ताप नरक ६. प्रताप नरक आणि ७. अवीची नरक
ह्या गोष्टींची आपल्यास येथेच प्रचिती येते. कोणत्या माणसाने कोणते पापकर्म केले ते त्याचे त्यालाच सर्वाधिक माहीत असते व त्याचे मन त्याला खात राहते.
शासनाने (सरकारने) जरी शिक्षा दिली असेल, तरी आपण अशा लोकांना दुःखी-कष्टी अवस्थेत पाहतो. आप्तमित्रांनी टाकून दिलेल्या अवस्थेत, तळमळणाऱ्या किंवा अत्यंत विपन्नावस्थेत उपाशीपोटी जर्जर अवस्थेत, इत्यादी जीवन हेच त्यांचे नारकीय जीवन होय.

**प्रश्न ६०४ : भ. बुद्धांनी ज्या प्रश्नांचे उत्तर न देता मौन राखले, असे अव्याकृत प्रश्न कोणते ?**
**उत्तर** – जेव्हा पोट्टपादने विचारले, ''भन्ते! जग नित्य आहे काय?'' भगवंतांनी उत्तर दिले, ''पोट्टपाद, मी केव्हा म्हटले की, जग नित्य आहे.'' जेव्हा पोट्टपादने प्रश्न विचारला, ''भन्ते! जग अनित्य आहे काय?'' भगवंत म्हणाले, ''पोट्टपाद, मी केव्हा म्हटले की जग अनित्य आहे.'' जेव्हा पोट्टपादने विचारले, ''भन्ते! मग काय जग नित्य आणि अनित्य आहे?'' भगवंत म्हणाले, ''पोट्टपाद, मी केव्हा म्हटले की, जग नित्य आणि अनित्य आहे.'' अशा प्रकारे त्यांनी उत्तरे दिलीत. ''मी केव्हा म्हटले की, जग अनंत आहे, मी केव्हा म्हटले की, जीव आणि शरीर एकच आहेत, मी केव्हा म्हटले की, जीव आणि शरीर भिन्न-भिन्न आहेत, मी केव्हा म्हटले की, मृत्यूनंतरही तथागताचे अस्तित्व असते, मी केव्हा म्हटले की, मृत्यूनंतर तथागत राहात नाहीत. मी केव्हा म्हटले की, मृत्यूनंतर तथागत राहतातही आणि राहात नाहीही''.

भगवंतांनी केलेल्या कर्मांची फळे म्हणजे बौद्धधम्म व त्यामुळे झालेल्या मानवजातीचा उद्धार अजूनही अस्तित्वांत आहे. भगवंतांची तृष्णा सर्वथा नष्ट झाली व त्यामुळे त्यांचा पुनर्जन्म संपला. परंतु देहाच्या भौतिक गोष्टी म्हणजे पृथ्वी, आप, तेज आणि वायू यांचा मात्र नाश झाला नाही. त्या सृष्टीमध्ये समाविष्ट झाल्यात. यास्तव भगवंतांनी पोट्ठपादास दिलेले उत्तर आजच्या युगातील विज्ञानकाराशी तंतोतंत जुळते.

पोट्ठपादाने विचारले, ''भन्ते! आपण ह्या गोष्टी का सांगितल्या नाहीत?

भ. बुद्ध म्हणाले, ''पोट्ठपाद ! ह्या गोष्टी ना अर्थयुक्त आहेत, ना धम्मयुक्त आहेत, ना ब्रह्मचर्याकरिता उपयुक्त आहेत, ना वैराग्याकरिता उपयुक्त आहेत, ना दुःखनिरोध करण्याकरिता आहेत, ना शांती, अभिज्ञा, संबोधिकरिता उपयुक्त आहेत. एवढेच नव्हे तर निर्वाणाकरिताही त्या उपयुक्त नाहीत.''

पोट्ठपादाने विचारले, ''भगवंतांनी कोणकोणत्या गोष्टी स्पष्टपणे सांगितल्या आहेत?''

भ. बुद्ध म्हणाले, ''पोट्ठपाद ! हे दुःख आहे, हे दुःखसमुदय आहे, हे दुःखनिरोध आहे, ही दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा आहे, ह्या सर्व गोष्टी मी स्पष्टपणे सांगितलेल्या आहेत.''

पोट्ठपादाने विचारले, ''भगवंतांनी ह्या गोष्टी का सांगितलेल्या आहेत?''

भ. बुद्ध म्हणाले, ''पोट्टपाद! ह्या अर्थ-उपयोगी, धर्म-उपयोगी आणि ब्रम्हचर्य-उपयोगी असून निर्वाणाकरिता अत्यंत आवश्यक आहेत. म्हणून मी त्या गोष्टीं सांगितल्या आहेत.''

मनुष्य ह्याच जन्मी आपल्या दुःखाचा अंत करू शकतो. म्हणून व्यर्थ प्रश्नांच्या भानगडीत पडून त्याने आपली शक्ति नष्ट करू नये, अशी भ. बुद्धांची इच्छा होती.

**प्रश्न ६०४ (अ) : महामायेच्या गर्भधारणेपूर्वी तिने पांढऱ्या शुभ्र हत्तीचे जे स्वप्न बघितले होते, त्यानुसारच गर्भधारणा झाली होती काय?**

**उत्तर** – नाही. स्त्री पुरु ष स्वप्ने बघतात चांगली तशीच वाईटदेखील. आधी जागेपणी घडली असेल त्या गोष्टींचेही आणि न घडलेल्या गोष्टींचेही. आधी काही केले असेल त्याचेही आणि न केले असेल त्याचेही. आनंद देणारे किंवा घाबरून सोडणारे स्वप्नदेखील, इत्यादि

स्वप्न हे चित्ताच्या (मनाच्या) समोर येणारे केवळ निमित्त (Suggestion) होय. जो स्वप्न बघतो तो पूर्णतः गाढ झोपेमध्ये नसतो किंवा पूर्णतः जागृतही नसतो. परंतु गाढ झोपेची अवस्था थोडी कमी झाली म्हणजे, जी एक 'खुमारी' सारखी स्थिती होते, त्यावेळी माणूस स्वप्ने पाहू लागतो. गाढ झोप लागली म्हणजे चित्त (= मन) विस्मृतावस्थेत असते. विस्मृत चित्त काम करीत नाही आणि त्यावेळी त्याला सुख दुःखाचेही भान नसते अशा वेळी जेव्हा चित्त काहीच जाणत नाही, त्यावेळी त्यास स्वप्नें पडत नाही माणसाचे चित्त काम करू लागते तेव्हाच त्यास स्वप्ने दिसू लागतात.

सहा प्रकारची स्वप्ने येतात

१. वायू भरल्यामुळे

२. पित्ताच्या प्रकोपामुळे

३. कफाच्या प्रकोपामुळे

४. देवतांच्या (सत्पुरुषांच्या) प्रभावामुळे

५. वारंवार एखादे काम करीत राहिल्याने त्याची स्वप्ने दिसू लागतात.

६. भविष्यात घडणाऱ्या गोष्टींविषयीदेखील स्वप्ने पडतात. ह्यापैकी हेच स्वप्न खरे असते आणि पहिली पाच स्वप्ने खोटी असतात.( परंतु भविष्यात घडणाऱ्या घटनांविषयी येणारे स्वप्न केवळ (Suggestion) म्हणजे मनास सूचना असते त्याच्या पूर्णतः खरे ठरण्याविषयी काहीही सांगता येत नाही : संकलिका)

## ईश्वराचे अस्तित्व मान्य नाही

**प्रश्न ६०५.: सृष्टीच्या प्रारंभालाच ईश्वर मानण्यास काही हरकत आहे काय ?**

**उत्तर -** होय. कोणतीही गोष्ट एकतर निमित्त होऊ शकते किंवा निमित्ताला कारण होऊ शकते. उदा. कुंभाराने मातीपासून मडके बनविले ह्यात कुंभार निमित्त आहे आणि माती निमित्ताला कारण म्हणजे साधन आहे. तर मग ईश्वर व सृष्टी ह्यांचा संबंध कुंभार व मातीच्या संबंधासारखाच आहे काय? तसेच जर असेल तर ज्या साधानाद्वारे ईश्वराने सृष्टी निर्माण केली, त्या साधनांना कोणी बनविले? ह्याची दोन उत्तरे होऊ शकतात. एक असे की, ईश्वराने कोणत्याही साधनाशिवायच ही सृष्टी बनविली आहे आणि असे जर आहे, तर हे सर्व जग केवळ 'जादूगाराचा खेळ' आहे, तर मग त्या प्रत्यक्ष न दिसणाऱ्या ईश्वराच्या अस्तित्वावर विश्वास कसा धरावा?

दुसरे उत्तर हे होऊ शकते की, ईश्वराने स्वतःच अस्तित्वात आलेल्या साधनांपासून सृष्टीची रचना केली. तेव्हा अशी शंका येते की, जर प्रकृती स्वतः अस्तित्वात येऊ शकते, तर ही सृष्टीदेखील ईश्वराच्या मध्यस्थीशिवाय अस्तित्वात कां येऊ शकणार नाही? जर आपण म्हटले की, कारणाशिवाय कोणतेच कार्य घडू शकत नाही, म्हणून ईश्वराला कारण-स्वरूप मानणे आवश्यक आहे; तर मग ईश्वराचे अस्तित्व आहे, असे म्हणण्याला काय कारण आहे? जर म्हटले की, तो स्वयंभू आहे, तर मग सृष्टीलाही स्वयंभू का मानू नये? सृष्टी निर्मित झाली नाही, ती पूर्वीपासूनच होतीच, परंतु पूर्वरूपापासून क्षणाक्षणाला तिचा विकास होत गेलेला आहे.

थोड्या वेळासाठी असे मानू की, ईश्वरापासूनच सृष्टीची निर्मिती झाली. निर्मितीचा सिद्धान्त असा आहे की, ज्यापासून एखादी वस्तू बनते, तिचेच गुणधर्म त्या वस्तुमध्ये येतात. आता आम्ही सृष्टीमध्ये इतका अन्याय, अनाचार, अनीती पाहतो, तर मग सृष्टीला बनविणारा ईश्वरसुद्धा अन्यायी, अनाचारी व अनैतिक आहे काय? जर आम्ही म्हटले की, सृष्टीमधील हे दुर्गुण सृष्टीमध्ये ईश्वरापासून आले नाहीत, ते बाहेरून आले आहेत; तर मग प्रश्न उपस्थित होतो की, बाहेरून कोठून आले? काय ईश्वराव्यतिरिक्त आणखी इतर वस्तूचे अस्तित्व आहे? आणि अस्तित्व आहे असे मानले, तर मग ईश्वर सर्वव्यापी किंवा सर्वशक्तिमान ठरणार नाही. त्याच्याशिवाय जी आणखी इतर वस्तू अस्तित्वात आहे, तिच्यात त्याचा अभाव झाल्याचे सिद्ध होईल. तद्वतच ईश्वराच्या शक्तीशिवायच ती वस्तू अस्तित्वात आल्यामुळे ईश्वर सर्वशक्तिमान नसल्याचे सिद्ध होईल.

**प्रश्न ६०६ : बौद्ध निश्चितपणे अनीश्वरवादी आहेत काय ?**
**उत्तर** - होय, ते निश्चितपणे अनीश्वरवादी आहेत. काही लोक भ्रमामुळे असे मानतात की, भ. बुद्ध ईश्वराच्या बाबतीत मौन होते आणि कोणी कोणी स्वार्थामुळे असे म्हणतात की, भ. बुद्धांना जेव्हा ईश्वरा विषयी विचारण्यात आले, तेव्हा ते मौन राहिले, परंतु ह्या दोन्ही गोष्टी निराधार आहेत.

**प्रश्न ६०६ (अ) : अनीश्वरवादी असल्यामुळे बौद्ध नास्तिक असतात काय?**
**उत्तर** – नाही. अकुशल कम्मपथ (म्हणजे दहा पापकर्मे) यात नास्तिकतेचा देखील समावेश आहे. त्यामुळे बौद्ध आस्तिक असायलाच हवा असे सांगितले आहे.

नास्तिकतेचा काय अर्थ आहे. परोपकाराचा काहीच फायदा नाही. शील पालन केल्याने कोणताही फायदा नाही. समाधीपासून कसलाही फायदा नाही, इत्यादी विचार म्हणजे नास्तिकता. इतर धर्मांचे लोक ईश्वरावर विश्वास न ठेवणाऱ्याला नास्तिक म्हणतात. परंतु बौद्धधम्म जीवनाच्या शुभ कार्याविषयी जो उदासीन असतो किंवा आस्थाहीन असतो, त्याला नास्तिक म्हणतो. मिथ्यादृष्टीला बौद्धधम्म नास्तिक समजतो.

**प्र.६०६ (ब) : ईश्वराच्या अस्तित्वास न मानण्यास कोणती कारणे आहेत?**
**उत्तर** - जर ईश्वरच कर्ताधर्ता असेल तर माणूस त्याच्या हातातील केवळ एक बाहुलेच ठरतो. त्यामुळे तो त्याने केलेल्या बऱ्यावाईट कामांची स्वतः जवाबदारी घेत नाही.जर ईश्वराच्या अस्तित्वास मानले, तर या दुनियेत माणसाचा जो छळ होतो, तसे होऊ देणे ईश्वराच्या दयाळूपणाचे द्योतक आहे काय?

ईश्वर सृष्टिकर्ता होय, असे मानणेही योग्य नाही. जर सृष्टी अनादी आहे, तर तिला कोणत्याही कर्त्याची आवश्यकता नसणार, कारण कर्ता असेल तर कर्त्यास त्या कार्यापूर्वीच उपस्थित असणे आवश्यक असते. जर सृष्टी नव्हती असे मानले तर, सृष्टी उत्पन्न झाली त्या घटकेपर्यंत त्या कोट्यवधी वर्षांत ईश्वराचे अस्तित्व होतेच असे मानले तर, त्या क्रियारहित ईश्वराच्या अस्तित्वाचे काय प्रमाण आहे? क्रिया हीच त्याच्या अस्तित्वाचे प्रमाण होऊ शकते नाही का?

ईश्वराच्या अस्तित्वास मानल्यास माणसाला त्याच्या अधीन राहावेच लागेल. तर मग माणसाला शुद्धी आणि मुक्तीकरीता प्रयत्न करावयास वावच कुठे उरतो? तर मग धम्माने सांगितलेले मार्गदेखील निष्फळ ठरतात आणि धम्मदेखील निष्फळ ठरतो. ईश्वराच्या अस्तित्वास जर मानलेच नाही तर माणूस वर्तमान काळात (सद्यस्थितीत) जो काही आहे तो स्वतःच्या कर्मामुळे आणि भविष्यात जो होईल, तोदेखील स्वतःच्या कर्मामुळे. माणसाला कर्म करावयाची स्वतंत्रता असेल तरच धम्माने सांगितलेल्या मार्गाची आणि धम्माची सार्थकता सिद्ध होऊ शकेल.

जे ईश्वरवादी लोक आहेत त्यांच्याद्वारेच हजारो वर्षांपासून धम्मासाठी अशांती पसरविल्या जात आहे आणि रक्ताच्या नद्या वाहविल्या जात आहेत . तर मग ईश्वर या गोष्टीचा निपटारा का करीत नाही. खरे म्हणजे ईश्वर माणसाची मानसिक कृती होय.

एक एक अणू ज्यांनी आपले शरीर घडलेले आहे, प्रतिक्षण आपली जागा नवीन अणूकरिता मोकळी करत असतो, असे असूनदेखील नवीन अणू हा विगत अणूशी पुष्कळच गोष्टींशी मिळता जुळता असतो.

मनावेगळा कोणी आत्मा या नावाची दुसरी कोणती वस्तू नाही. चित्त, विज्ञान आत्मा एकच वस्तू आहेत. (येथे विज्ञान म्हणजे science नव्हे) चक्षू इत्यादी इंद्रियाव्यतिरिक्त या वेगवेगळ्या इंद्रियामध्ये संयोजक एका वेगळ्याच इंद्रियाचे अस्तित्व असलेच पाहिजे असे मानावे लागते, त्यालाच आपण मन असे म्हणतो.

पूर्व-मन आपल्या अनुभवांचे बीज किंवा संस्कार त्यानंतरच्या मनासाठी वारसा म्हणून सोडून जातो, आणि तीच स्मृती राहते. आपण चांगले वाईट जे काही कायिक-वाचिक कर्म करतो, सर्वच कर्माचे मन हेच उगमस्थान असते. त्यामुळे द्वेषयुक्त काम करावयास मनाला द्वेषयुक्त व्हावे लागते ही त्याची घडण किंवा त्या ध्वनीचे गुंजन जोपर्यंत सुरूच असते जोपर्यंत तिचा व्यय होत नाही किंवा विरोधी ध्वनीशी टक्कर होऊन ती नष्ट होत नाही.

माणूस काय चीज आहे? आपल्या चांगल्यावाईट अनुभवांची गोळाबेरीज म्हणजेच या क्षणीचा माणूस! पुढील क्षणी उत्पन्न होणाऱ्या मनास पुष्कळशा गोष्टी आपल्या जनक मनापासून अनुवंशिकतेने मिळत असतात. भ. बुद्धांच्या शिकवणीनुसार हा क्रम जन्माच्या पूर्वी होता आणि मृत्यूनंतर सुद्धा राहीलच. मृत्यूच्या टोकावर तो संस्काररूपी चुंबक उभा ठाकलेला असतो, आणि समान गुणधर्म असलेल्या शरीराकडे आकर्षित होऊन, आपली जुनीच कारवाई सुरू करतो. हा क्रम तोपर्यंत सुरूच असतो, जोपर्यंत तृष्णेचे क्षय होऊन ती वंशपरंपरेनुसार उत्पन्न झालेली संतती विश्रृंखलित होत नाही आणि निर्वाणास प्राप्त होत नाही.

जर आत्म्यास नित्य कुटस्थ मानले तर त्यावर संस्कारांची छाप पडूच शकणार नाही (कारण तो अबाधित आणि अपरिवर्तनीय राहील) जर संस्काराची छाप पडावयास मनाची आवश्यकता आहे असे मानले तर आत्म्यास मानावयाची आवश्यकताच कुठे उरत?

येणेप्रमाणे मन क्षणिक असल्यामुळे, कारण चित्त-संतती क्षणिक नसते (ती प्रवाहरूप असते), म्हणून त्याची पूर्णता आणि परिशुद्धी करावी लागते. वस्तुतः जर आत्म्यास नित्य कुटस्थ मानले नाही, त्याऐवजी क्षणोक्षणी उत्पन्न होणाऱ्या चित्त-संततीस मानले, तर शब्द प्रयोजनावर आमचा आग्रह नाही कारण आत्मा या शब्दाचा नित्य चेतन वस्तू म्हणून उपयोग होत असे, म्हणून भ. बुद्धांनी अन्-आत्म शब्द वापरलेला आहे.(बघावी टीप क्र. ११)

**प्रश्न ६०६ (क) : बौद्धधम्मात आत्म्यास (मनास) अनित्य मानावयास काय कारण आहे?**

**उत्तर** - भगवान बुद्धाच्या काळी इतर आचार्यदेखील होते. त्यांचे म्हणणे असे की, शरीराहून भिन्न असा कोणी आत्मा नाही. शरीरात वेगवेगळ्या प्रमाणात मिसळून असलेल्या रसांमुळे उष्णता आणि प्रयत्न (क्रिया) सुरू होतात. ह्या रसांच्या प्रमाणात कमी-अधिक झाल्यास त्या (उष्णता व क्रिया) निघून जातात. येणेप्रमाणे आत्मा शरीराहून कोणती वेगळी अशी वस्तू नाही. दुसरीकडे, ब्राह्मण आणि इतर अनेक परिव्राजक आचार्य याच्यांत अशी मान्यता होती की, शरीराच्या आत आणि शरीराहून वेगळी अशी एक नित्य चेतन शक्ती आहे, जिचा संचार झाला की शरीरात उष्णता आणि ज्ञानपूर्वक प्रयत्न (क्रिया) दिसावयास मिळतात.

जेव्हां अन्ती (शरीरान्त) ती चेतन शक्ती शरीराला सोडून आपल्या कर्मानुसार शरीराच्या अन्ती (शरीरान्त) निघून जाते. तेव्हा शरीर थंड होते आणि क्रियारहित होते.

भ. बुद्धांनी एकीकडे आत्म्यास नित्य कुटस्थ मानणारे मत आणि दुसरीकडे शरीराच्या सोबतच आत्म्याचा विनाश होतो असे मानणारे मत या दोन्ही टोकाच्या भूमिकांना सोडून मध्यममार्ग धरला. त्यांनी सांगितले की, आत्मा कोणी नित्य कु टस्थ वस्तू नाही. एवढेच नव्हे तर विशिष्ट कारणांमुळे स्कधांच्या संयोगामुळे उत्पन्न एक शक्ती होय.(स्कंध म्हणजे पृथ्वी, आप, तेज, वायू आणि आकाश ही पंचमहाभूते आणि मन) ती शक्ती बाह्य पंचभूतांप्रमाणे क्षणोक्षर्णी उत्पन्न आणि विलय होऊन चित्ताचा प्रवाह जोपर्यंत शरीरात प्रवाहित होत राहतो. तोपर्यंत त्या शरीरास 'सजीव' म्हटले जाते. आपल्या आध्यात्मिक परिवर्तनात आणि शारीरिक परिवर्तनामध्ये बरीच समानता आहे (विस्तारपूर्वक वर्णनाकरिता बघावी टीप ११).

**प्रश्न ६०७ : विश्वातील प्रत्येक गोष्ट ईश्वराने शून्यातून निर्माण केलेली आहे, ह्या मतास बौद्धांची अनुमती आहे काय?**

**उत्तर** – नाही. शून्यातून कधीही कोणतीही गोष्ट निर्माण झालेली नाही. बौद्धांचा चमत्कारावर विश्वास नाही; म्हणून ते शून्यातून उत्पत्ती होण्याच्या सिद्धान्ताला नाकबूल करतात. बौद्धांचा असा ठाम विश्वास आहे की, कोणत्याही गोष्टींची उत्पत्ती शून्यातून होऊच शकत नाही. इंद्रियविषयक (Organic) कोणतीही गोष्ट शाश्वत नाही. प्रत्येक गोष्ट सतत गतिशील अवस्थेत असून परिवर्तनशील आहे, आणि तिचे रूप सतत बदलत असते व उत्क्रांतीच्या नियमानुसार ही क्रिया सातत्याने चालूच असते. आधुनिक विज्ञानानुसार अतिसूक्ष्म परमाणूमध्ये मध्यस्थानी न्युक्लीअस (Nucleus) असून त्याभोवती इलेक्ट्रान (Electron) सतत फिरत असतात.

**प्रश्न ६०८ बुद्धधम्म हा इल्हामी-धर्म आहे काय ?**

**उत्तर** – पुष्कळसे धर्म इल्हामी धर्म मानले जातात. इल्हामी धर्म म्हणण्याचे कारण असे की, तो ईश्वराचा 'संदेश' किंवा 'पैगाम' मानला जातो. ज्याला हा 'पैगाम' प्राप्त होतो, त्याला पैगंबर म्हणतात. तो त्या संदेशाला लोकांपर्यंत पोहोचविण्याचे कार्य करतो.

भ. बुद्धांचा धम्म 'इलहामी-धर्म' नसून एक 'अविष्कार' आहे. ह्या धम्मत मानवीय-जीवनाचा गंभीरपणे अभ्यास केला गेला असून, ज्या स्वाभाविक प्रवृत्तीमुळे मानव जन्म ग्रहण करतो व ज्या प्रवृत्ती मानवाच्या विनाशास कारणीभूत होतात, त्यांचा त्यात पूर्णपणे अभ्यास केलेला आहे व त्याचे परिणाम स्पष्टपणे विशद केलेले आहेत. भ. बुद्धांचा धर्म हा असा आहे.

**प्रश्न ६०९ : जगातील अधिकांश लोक ईश्वराला मानतात काय ?**

**उत्तर** - नाही. जगातील अधिकांश लोक अनीश्वरवादी आहेत. सर्व बौद्ध जग अनीश्वरवादी आहे. सर्व मार्क्सवादी जग अनीश्वरवादी आहे. अशा प्रकारे 'अनीश्वरवादींची संख्याच' अधिक आहे.

**प्रश्न ६१० : वस्तूंच्या अस्तित्वाचा संबंध कसा असतो ?**

**उत्तर** - कोणत्याही वस्तूच्या संबंधात एक अवस्था लय पावते व नवीन अवस्था उत्पन्न होते. ह्या दोन अवस्थांमध्ये क्षणाचेही अंतर नसते. कारण एक लय होताच दुसरी उत्पन्न होते. अशा रितीने वस्तुच्या संबंधाचा प्रवाह चालूच असतो. त्यामुळे वस्तू तीच नसते आणि पूर्णतः दुसरीहि होत नाही. बाळ जन्मास येते व कालांतराने त्याला तारुण्य येते. तेव्हा त्याला पूर्णतः तोच जीव म्हणता येत नाही, किंवा पूर्णतः नवीन जीव म्हणता येत नाही. येणेप्रमाणे जीवनप्रवाहांतील अवस्था बदलत असतात, आणि त्या प्रवाहातील दोन अवस्थांमध्ये एका क्षणाचाही खंड पडलेला राहत नाही. जीव न तोच राहतो न इतर वेगळाच राहतो. या जन्मातील अंतिम विज्ञानाचा लय होताच पुढील जन्माचे विज्ञान उभे ठाकते.

**प्रश्न ६१० (अ) : रूप आणि वस्तू अष्टकलापांनी कशा प्रकारे बनलेल्या आहेत.**

**उत्तर** -

१. अष्टकलाप ही सर्वात सूक्ष्म वस्तू होय. हा सर्वापेक्षा लहानाहून लहान लघुकण होय. त्यामुळे त्याचे विभाजन होऊ शकत नाही. तो अणुपेक्षाही सूक्ष्म असतो.

२. अष्टकलाप चार महाभूत आणि त्यांच्या गुणमर्धांचा समुच्चय होय. ते एकदुसऱ्याहून अलग होऊच शकत नाही. तरीपण त्यांच्यामध्ये परस्पर मोठी पोकळी असते. आईन्स्टाईनच्या सिद्धान्तानुसार (Theory of Relativity) जड वस्तू, शक्ती, आकाश ऊर्जा आणि काळ यांच्यामध्ये परस्पर संबंध आहे.

अ. पृथ्वी धातू आणि तिचे गुणधर्म - म्हणजे हलक्याहून हलका आणि भारीहून भारी, पसरणे, जागा व्यापणे.

ब. अग्निधातू आणि तिचे गुणधर्म - थंड्याहून थंड आणि उष्णाहून उष्ण.

क. वायूधातू आणि तिचे गुणधर्म - हलणे, चालणे, संचलन करणे.

ड. जलधातू आणि तिचे गुणधर्म -बांधून ठेवणे, संयोजन करणे.

३. सर्वच वस्तू, पदार्थ, प्राणी - या अष्टकलापांचे पुंज आहेत. त्यांना 'रूप' असे म्हटले जाते.

हे कलाप अत्यंत सूक्ष्म असतात. नोबल पुरस्कार विजेता डॉ. अल्वरस यांनी एक विशेष यंत्र बनवून परमाणूपेक्षाही सूक्ष्म कणांच्या (Subatomic particles) उदयव्ययास मोजून पाहिले, तेव्हा त्यांना दिसून आले की एका सेकंदामध्ये ते सूक्ष्म कण १ वर २२ शून्य लावल्याने जेवढी संख्या होईल तितक्या वेळा त्यांचा उदयव्यय होतो. कलाप इतके अल्पजिवी असतात.

**प्रश्न ६१० (ब) : वस्तू आणि सापेक्षतेचा सिद्धान्त (Theory of Relativity) यांच्याशी बौद्धधम्माच्या सिद्धांताचा मेळ बसतो काय?**

**उत्तर** - होय, अल्बर्ट आईनस्टाईन या महान शास्त्रज्ञाने सापेक्षतेच्या सिद्धान्ताचा (Theory of Relativity) शोध लावला. त्याच्यानुसार आकाश (Space) केवळ त्रिपरिमाण (Three-dimensional) नाही आणि काळाचे स्वतंत्र अस्तित्व नाही. दोहींचा परस्पर संबंध आहे. म्हणून ते चार परिमाण (Four-dimensional) मध्ये एकमेकाशी निगडित

आहेत. या सिद्धान्तानूसार जड वस्तू (Mass) ही केवळ एका शक्तिरूपाने विद्यमान आहे. एक स्थिर वस्तूदेखील स्वतःच शक्तीचा (ऊर्जेचा) संचय आहे. त्याचा सिध्दांत येणेप्रमाणे ($E = mc^2$, E = energy, m = mass, c = speed of light) याचाच अर्थ असा की कोणतीही वस्तू ही स्वतःच्या शक्तीचा (ऊर्जेचा) एक फार मोठा पुंज आहे. हा शक्तिपुंज त्याच्या स्वतःच्या प्रकंपनामुळे असतो. भगवंतांनी म्हटलेच आहे की या विश्वातील प्रत्येक वस्तू, प्रत्येक कलाप केवळ प्रकंप मात्र आहेत.प्रवाह मात्र आहेत. त्यामुळेच त्यांनी म्हटले "सब्बो लोको पज्जलितो" (बघावा प्रश्न ६१८-अ) क्वॉंटम सिद्धान्ताच्या (Quantum theory) शोधामुळे ही गोष्ट प्रकट झालेली आहे की, एकच लघुकण एकाच वेळी दोन रूप धारण करीत असतो. एक कण (Particle) रूप आणि दुसरे तरंगरूप (Wave). ज्याप्रमाणे नाण्याची दोन भिन्न रूपे असतात, त्याचप्रमाण!

भगवंतांनी ह्या गोष्टीचा साक्षात्कार केला की प्रत्येक कलाप अत्यंत तीव्र गतीने प्रकंपित होतो, बदलतो आणि त्याचा उदय-व्यय होतो. आणि आधुनिक वैज्ञानिकांनीसुद्धा तसल्याच प्रचंड गतीचा शोध लागला.

**प्रश्न ६१० (क) : विकार आणि विचार यांचेदेखील प्रकंप असतात काय?**

**उत्तर** - होय. मनात उत्पन्न होणारे सगळेच विकार (Emotions) आणि सगळेच विचार (Thoughts) केवळ प्रकंप मात्र असतात. ते सगळेच अखंड प्रवाहमान असतात, परिवर्तनशील असतात, बदलत असतात. तृष्णा असो, लालसा असो, रागद्वेष असो, क्रोध, लोभ, मद, मत्सर, इत्यादी सर्वच प्रकंपच प्रकंप असतात. प्रकंपनांच्या घनतेमुळे किंवा विरळतेमुळे विकार वेगवेगळे बनत असतात.

मंगल मैत्रीचे प्रकंप कुठेही, कितीही दूर जाऊ शकतात. परंतु स्वार्थी, द्वेषजन्य, प्रकंप अधिक दूरवर जाऊ शकत नाहीत. ते जवळच समाप्त होतात.

विचारांचे आणि विकारांचे प्रकंप प्रत्येक व्यक्ती बाहेर फेकतच असते. जेव्हा आपण रस्त्याने जात असतो तेव्हा या विचारांच्या आणि विकारांच्या प्रकंपाच्या अथांग सागरांतून जात असतो.

कोणी व्यक्ती आपल्या जवळच्या संबंधातील व्यक्तीची मदत करावयास तीव्रतेने, मंगल कामना करतो, तेव्हा ते प्रकम्प त्याच्याजवळ पोहोचतात आणि त्याचे रक्षण करावयास सहाय्यभूत होतात.

भगवंतांच्या मंदिरामध्ये देखील या शुभ प्रकंपनांचा प्रभाव विद्यमान असतो. देवळांमध्ये आणि इतर कुठेही भजन पूजन, कीर्तनाद्वारे वातावरण शुद्ध करायचा उद्देश असतो कोण्या सत्पुरुषाजवळ गेल्यानेसुध्दा याच गोष्टीमुळे आपल्यास शक्ती मिळते कारण तेथील वातावरण मंगळ मैत्रीच्या प्रकंपनांनी व्याप्त असते.(परंतु चमत्काराच्या नावाखाली स्वार्थी लोक असल्या स्थानी असलेल्या मंगलमय वातावरणास दूषित प्रकंपांनी व्याप्त करतात.)

**प्रश्न ६११ : विश्वात कोणत्या वस्तू नाहीत ?**

**उत्तर** - विश्वात सर्वकाही आहे, फक्त तीन वस्तू नाहीत-

१) अजर-अमर, अशा प्रकारचे सचेतन वा अचेतन काहीच नाही; २) संस्काराची नित्यता

नाही (संस्कार नित्य नाहीत) आणि ३) परमार्थतः कोणी जीव किंवा आत्मा (अशी वेगळी वस्तू) नाही.(मन आहे)

**प्रश्न ६१२ : कर्मामुळे, हेतूमुळे आणि ऋतूमुळे देखिल उत्पन्न न होणाऱ्या गोष्टी कोणत्या ?**

**उत्तर** - अशा दोनच वस्तू आहेत. त्या म्हणजे आकाश व निर्वाण. ह्याच दोन वस्तू न कर्मामुळे, न हेतूमुळे आणि न ऋतूमुळे उत्पन्न होतात. निर्वाण उत्पन्न केल्या जात नाही. निर्वाण प्राप्त करण्याचा मार्ग तर दाखविला जातो, पण त्याच्या उत्पादन हेतुला कोणीच दाखवू शकत नाही. कारण की, निर्वाण निर्गुण आहे. कोणी ह्याला बनविले नाही. निर्वाण केवळ मनाचेच जाणल्या जाऊ शकते. अर्हतपद प्राप्त करून आर्यश्रावक विशुद्ध ज्ञानाने निर्वाणाला पाहू शकतो (म्हणजे अनुभवू शकतो).

**प्रश्न ६१३ : सृष्टीची उत्पत्ती कशी झाली ?**

**उत्तर** - सृष्टीचा निर्माणकर्ता कोणी ईश्वर आहे, असे मानले, तर ते ज्याप्रमाणे कुंभार भांडे बनवितो, त्याप्रमाणे ईश्वराने सृष्टी बनविली असे होईल. हा संसार जर ईश्वर निर्मित असता तर येथे दुःख, पाप व संकटे कशी राहिली असती? आणि दुःख, पाप व संकटाचा कर्ता ईश्वरास न मानता कुणा इतरास मानले तर ईश्वराला सर्वशक्तीमान मानता येणार नाही.

दुसरे मत असे की, 'ब्रह्मा' देखील सृष्टीचा कर्ता होऊ शकत नाही. कारण ज्याप्रमाणे बीजापासून रोपटे उगवते, तशीच उत्पत्ती सर्व वस्तूंची होते. ब्रह्मा सर्वव्यापक आहे, असे गृहीत धरले, तर निश्चितच तो त्यांचा निर्माता होऊ शकत नाही.

तिसरे मत असे की, आत्म्यापासून सृष्टीची उत्पत्ती झाली आहे. पण असे जर असते तर आत्म्याने सर्व वस्तूंना वांछनीय रूप द्यायला पाहिजे होते. दुःखाचे अस्तित्वच नसायला हवे होते. परंतु दुःखाला अस्तित्व आहे, ही गोष्ट सत्य आहे.

ह्याकरिता भ. बुद्ध म्हणाले, "प्रत्येक वस्तूचे अस्तित्व सहेतूक असते. ती ईश्वर, ब्रह्मा किंवा आत्मा यांच्याद्वारे बिनाहेतू अस्तित्वात येऊ शकत नाही. आपली कार्येच बऱ्यावाईट परिणामाला जन्म देतात. सर्व संसार 'प्रतीत्य समुत्पाद' ह्या नियमानुसार चालत असतो.

**प्रश्न ६१४ : बौद्धधम्मानुसार प्राण्यांची उत्पत्ती कशी झाली ?**

**उत्तर** - भगवंतांनी म्हटले आहे, कीं या सृष्टीची सुरूवात कशी झाली व तिचा शेवट कसा होणार ह्या दोन्ही गोष्टी सारख्याच तऱ्हेने गूढ आहेत व ते कोणालाही सांगता येत नाही. सर्वांना प्रथम जन्म झालेला प्राणी, अविद्या व तृष्णा यांच्या फेऱ्यात कसा सापडला ह्याची कल्पना करणे कठीण आहे. (**= अनतमग्गो यं संसारो, पुब्बकोटि न पच्चायति अविज्जानीवारणानं सत्यानं तण्हासम्योजनानं संधावतं संसरतं। सं नि (२) (१७८)**) सर्वप्रथम प्राणाची उत्पत्ती (प्राणलहरीची उत्पत्ती) कशी झाली हे सांगणे कठीण, की ज्या आधी अविद्या व तृष्णा यांचे अस्तित्वच नव्हते! परंतु ही गोष्ट निश्चित की प्राणलहर अनंत काळापर्यंत वाहतच राहते, जोवर अविद्या व तृष्णा यांचे अस्तित्व असते. जेव्हा त्यांचा नाश होतो, तेव्हा प्राणलहर वाहायचे थांबते व पुनर्जन्म थांबतो आणि अशी स्थिती बुद्ध आणि अर्हत यांनी गाठलेली असते.

**प्रश्न ६१५ : डोळ्यांने दिसणारे हे सर्वच विश्व अपरिवर्तनशील असल्याचे बौद्धधम्म शिकवितो काय ?**

**उत्तर** - नाही. आपली ही पृथ्वी सूर्य, चंद्र, तारे, खनिज पदार्थ, वनस्पती, पशु, प्राणी व मानवजात इत्यादी सर्वच परिवर्तनशील असल्याचे बौद्धधम्मात सांगितले आहे.

बौद्धधम्म शिकवितो की, विश्वातील संपूर्ण गोष्टी क्षणाचाही खंड न पडता सतत बदलणाऱ्या आहेत आणि काळाच्या ओघात त्या सर्वच नष्ट होतील. परंतु कर्माच्या दिशेनुसार, उत्क्रांतीच्या सामान्य नियमामुळे व्यक्तिशः व तसेच एकत्रितपणे क्रमाक्रमाने निराळेच विश्व निर्माण होईल. अगदी त्याचप्रमाणे जसे की, आपले सध्याचे विश्व आकाशामधून प्रकट झालेले आहे.

**प्र. ६१५ (अ) : मनुष्यलोक, ब्रह्मलोक वगैरे काय असतात?**

**उत्तर** - विपश्यना करताना साधक जे स्थूल असेल त्याचे तुकडे तुकडे करीत शेवटी त्या स्थितीपर्यंत पोहचू शकतो. ज्या स्थितीमध्ये त्यास "सब्बो लोको पकम्पितो" सारेच विश्व प्रकम्पनच प्रकम्पन आहे, सगळा संसार प्रकम्पनच प्रकंपन आहे असे वाटू लागते.

'लोक' शब्दाचा एक अत्यंत प्रचलित अर्थ असा आहे. साऱ्या विश्वाला, सर्व जगास 'लोक' म्हणतात आणि त्यांची विभाजने आहेत, जसे निरीय लोक, पशूलोक, मनुष्यलोक, देवलोक, ब्रह्मलोक.

'लोकचा' दूसरा अर्थ असा की, जो प्रतिक्षण नष्ट होतो, त्याला 'लोक' म्हटलेले आहे. जे प्रतिक्षणी नष्ट होत असते ते सर्वच्या सर्व लौकिक क्षेत्र असते. त्याला 'लोक' म्हटलेले आहे. संपूर्ण 'लोक' केवळ प्रकम्पन आहे. हे सर्वच जे शरीराच्या सीमेबाहेर आहे त्याचे ज्ञान आम्हास तेव्हाच होऊ शकते जेव्हा आपण अंतर्मुखी होऊन कायेमध्ये अनुपश्यना करीत ह्या स्थूल अंग प्रत्यंगाचे दृष्टिपथांत तुकडे करीत करीत सूक्ष्म प्रकम्पनच प्रकम्पन असल्याचा अनुभव करू, साऱ्या विश्वात जे घडत आहे, तेच या साडेतीन हातांच्या शरीरात घडत आहे. बाहेर प्रकम्पन आहे आणि आपल्या शरीरातदेखील या शरीरातच सगळे लोक समाविष्ट झालेले दिसतील. त्यामुळेच या कायेस 'लोक' म्हटलेले आहे.

लोक कसे उत्पन्न होतात. कसे नष्ट होतात? त्यांचा उदय त्यांचा व्यय कसा होतो, हे कायेमध्ये कायानुपश्यना केल्याने अनुभविल्या जाते; आणि सर्व लोकांहून वेगळी अशी जी निर्वाणाची स्थिति, तिचादेखील या कायेमध्येच साक्षात्कार होईल, बाहेर नव्हे.

या कायेच्या आत डोकावून पाहाल तर सर्वत्र प्रकंपनच प्रकंपन, उदय-व्यय दिसून येतो.(प्रश्न ५६ पाहा).

**प्रश्न ६१६: सर्व प्राकृतिक रचना (Nature's creations) क्षणभंगुर, दुःख भोगणाऱ्या व आत्माविहीन असतात असे म्हटलेले आहे. तर मग 'निर्वाणाला' शाश्वत सुखाची अवस्था का म्हटलेले आहे ?**

**उत्तर** - भ. बुद्ध राजगृहाजवळील वेळुवनात वास्तव्य करीत असताना एका भिक्खूने वरील प्रश्न विचारला होता. भगवंतांनी त्यावर पुढील स्पष्टीकरण दिले.

"भिक्खूंनो! एक अवस्था अशी आहे की, जिथे ना जमीन ना पाणी, ना उष्णता, ना

हवा, ना अनंत आकाश, ना अनंत चेतना, ना शून्यता, ना विज्ञान, ना अज्ञान, ना हे जग ना दुसरे जग, ना सूर्य ना चंद्र, त्याला अनिर्मित म्हणतात. भिक्खूंनो! मी त्याला असे म्हणतो की, ते येतही नाही व जातही नाही वा उभेही राहत नाही. ना मृत्यू ना जन्म. त्याला स्थिरता नाही वा बदलही नाही. ते अमर आहे, ते उत्पन्न होत नाही आणि मरतही नाही. तेथे दुःखाचा शेवट होतो. आवश्यक गोष्टीचे स्वरूप ओळखणे कठीण आहे. सत्याचे ज्ञान सहजपणे होत नाही. जो सुज्ञ असतो तो तृष्णेला वश करतो. जो वस्तुस्थितीला योग्यपणे जाणतो, त्याला सर्व वस्तू शून्यवत वाटतात.

''भिक्खूंनो ! अजात, अप्रारंभित, अनिर्मित आणि आकारहीन असे या विश्वात नसते तर जे जन्मलेले, निर्मिलेले, साकारलेले व उदयास आले आहे, त्यापासून आपली सुटका झाली नसती.

कारण भिक्खूंनो! या विश्वात अजात, अप्रारंभिक, अनिर्मित व आकारहिनांचे अस्तित्व आहे. म्हणूनच जन्मलले, निर्मिलेले, साकारलेले व प्रारंभित आहे व त्यापासून सुटकेचा मार्ग आहे.

**प्रश्न ६१७: निसर्गातील कार्यकारणभावाविषयी ''वासेट्ठ-सूत्रांत'' काय सांगितले आहे ?**

**उत्तर** - त्यात सांगितले आहे की, सृष्टीच्या अस्तित्वास कारण आहे. सर्व वस्तूंच्या अस्तित्वास कारण आहे आणि संपूर्ण प्राणिमात्रांच्या जीवनास कार्यकारणाने बांधले आहे.

**प्रश्न ६१८ : कोणत्या विषयावरील प्रश्नांना भगवंतांनी अयोग्य ऊहापोहाचे प्रश्न म्हटले आहे ?**

**उत्तर** - हे जग शाश्वत आहे की, अशाश्वत आहे, या जगाचा अंत होणार आहे की नाही, शरीर आणि जीव एकत्र आहेत की भिन्न आहेत, प्राणी मेल्यावर उत्पन्न होतो की नाही, इत्यादी प्रश्न सोडवीत बसल्याने, प्रज्ञाप्राप्तीला मोठा अडथळा येण्याचा संभव आहे. कारण हे प्रश्न योग्य रीतीने केलेले नाहीत (न कल्लो पञ्हो), म्हणून हे प्रश्न बाजूस ठेवून योगी व्यक्तीने प्रतीत्यसमुत्पादाचे यथार्थ ज्ञान करून घ्यावे आणि प्रज्ञा पूर्णत्वास न्यावी. कारण प्रज्ञेनेच निर्वाणप्राप्ती होणार आहे.

**प्रश्न ६१८ (अ) : संपूर्ण विश्व जळत आहे असे भगवंतांनी का म्हटले?**

**उत्तर** - भ. बुद्धांनी समाधीद्धारे आपल्या दिव्यचक्षूंनी जे पाहिले त्याचा सारांश असा -

१. परमाणूपेक्षाही लहान कण, ज्याला पुन्हा विभाजित करता येत नाही त्याचे त्यांनी 'कलाप' असे नाव ठेवले
२. कलापदेखील एकसंघ नसतो तो समूह असतो. तो एक घन कण नसतो , तो तरंगांचा पुंजमात्र असतो
३. जी कोणती धनवस्तू दिसते ती असंख्य कलापांचा केवळ पुंज असते. प्रत्येक कलापामध्यें सुद्धा मोठी पोकळी असते (जागा, आकाश), ते एकास एक भिडलेले नसतात. सर्वच तरंगाशिवाय काहीही नसते.परंतु आपल्या डोळ्यांना ते घन समूहासारखे दिसतात.

४. हे कलाप प्रतिक्षणी अगणित वेळा उत्पन्न होतात आणि नष्ट होतात. यांना संततिधन म्हटलेले आहे. त्यामुळेच आपल्याला वस्तू घन वाटतात. यालाच माया (मोह) म्हणतात. हेच संवृत्ती-सत्य आहे. परंतु कलाप अंन्तीम सत्य (Absolute truth) आहेत.

५. याचप्रमाणे इंद्रियांचे आलंबन म्हणजे रंग रूप, गंध, शब्द, रस, स्पर्श गुणधर्म असलेले घनपदार्थदेखील शून्यामध्ये उदय व्यय होणारे तरंगच आहेत. हेच आलंबन धन आहे.

६. येणेप्रमाणे चित्तदेखील धन असल्याचे वाटते; परंतु ते देखील तरंगच असते. ही तरंगे कलाप-तरंगाहून अधिक लवकर म्हणजे सतरा वेळ अधिक वेगाने उत्पन्न होऊन नष्ट होतात. याला चित्तक्षण म्हटलेले आहे. सतरा चित्त क्षणांचा एक रूप क्षण होतो म्हणून भगवंतांनी म्हटलेले आहे,

**''सब्बो पज्जलितो लोको**
**सब्बो लोको पकम्पितो''**

सर्वच लोक प्रज्वलितच प्रज्वलित दिसून पडतात. सर्व लोक प्रकंपितच प्रकंपित दिसतात.

भगवंतानी म्हटलेच आहे-''सर्व लोक (सृष्टी) जळत आहे , चक्षू जळत आहेत, रूप जळत आहे, गंध जळत आहे, रसना जळत आहे, रस जळत आहे, कान जळत आहेत, नाक जळत आहेत, शब्द जळत आहेत, या षडइंद्रियांचे आलंबन जळत आहे, चित्तवृत्ती जळत आहेत, सर्वच इंद्रिय जगत जळत आहे. सर्वच प्रतिक्षण जळतच आहेत. खरेच सूक्ष्मतर स्तरावर प्रज्वलन, प्रकंपन याशिवाय या इंद्रियजगात आणखी काहीच नाही.''

# देवांचे अस्तित्व

**प्रश्न ६१९ : देवी-देवता खरोखरच अस्तित्वात आहेत काय किंवा ती मनुष्याची निव्वळ कल्पना आहे ?**

**उत्तर** - ईश्वर या अर्थाने देवी-देवतांच्या अस्तित्वाचे कोणतेच प्रमाण नाही. त्याअर्थी मनुष्याच्या मनाची ती केवळ कल्पना आहे असे समजावे.तथापि, बौद्ध वाङमयात संपूर्ण विश्वातील भिन्नभिन्न प्रकारच्या जीवांचे जे प्रकार सांगितले आहेत, ते येणेप्रमाणे :

१) ब्रह्मा, किंवा महान दैवी शक्ती (मैत्री, करुणा, मुदिता व उपेक्षा यांची मूर्ती)
२) देवता, किंवा सामान्य दैवी शक्ती,
३) मानवजात
४) पशू
५) पाण्यातील जीव (जलचर)
६) आकाशातील जीव (पक्षी वगैरे)
७) कृमी, कीटक
८) प्रेत, अथवा संतप्त प्राणी
९) असुरक, अथवा अति शोकार्त दैवी प्राणी
१०) नैर्यिक, अथवा नरक लोकातील प्राणी.

**प्रश्न ६२० : महामंगल-सूत्रांत भ.बुद्धांनी असे म्हटल्योच नमूद केले आहे की, साऱ्या जेतवनाला प्रकाशित करीत एक 'देव' त्यांच्यासमोर उपस्थित झाला, भगवंतांचे हे कथन यथार्थ नव्हते काय ?**

**उत्तर** - भगवंतांचे हे कथन यथार्थच होते. महामंगल-सूत्रामध्ये ज्या देवाचा उल्लेख आहे, त्याला आपण सत्पुरुष समजावे. सध्याच्या काळीसुद्धा जेव्हा आपल्याला एखाद्या सद्गृहस्थाची प्रशंसा करावयाची असते, 'तेव्हा तो मनुष्य नाही, देव आहे', असे आपण म्हणत असतो की नाही ? ब्रह्मदेव म्हणजे मैत्री, करुणा, मुदिता (= आनंदीवृत्ती) आणि उपेक्षा यांचे मूर्तिमंत प्रतीक (प्रश्न ५४ अ पाहावा)

**प्रश्न ६२१ : राजकुमार सिद्धार्थासमोर निरनिराळी रूपे घेऊन देव प्रगट झाल्याचे म्हटलेले आहे; तर अदृश्य जीवांचाही मानवजातीशी संबंध आहे, असा बौद्धजनांचा विश्वास असल्याचे म्हणावे काय ?**

**उत्तर** - होय. बौद्धजनांचा असा विश्वास आहे की, असे अदृश्य जीवही पृथ्वीवर आहेत, जे आपापल्या क्षेत्रांत आणि कार्यांत वस्ती करतात. दैवी शक्ती किंवा इद्धी प्राप्त केलेले जीव अस्तित्वात असल्याचे मानतात. परंतु जे अंतस्थ आत्मविकासाद्वारे आपल्या मूळ प्रवृत्तींवर विजय संपादन करून अर्हत बनतात, ते सर्वश्रेष्ठ होत.

**प्रश्न ६२२ : देव किती प्रकारचे आहेत ?**

**उत्तर** - तीन प्रकारचे, ''कामावचार'', म्हणजे अजूनही ज्यांचे मनोविकार सुटले नाहीत. ''रूपावचार'', म्हणजे उच्च स्थितीला प्राप्त; तथापि ज्यांचे रूप अजूनही कायम आहे.

''अरूपावचार'', जे सर्वात उच्चतम अशा पवित्र अवस्थेला पोहोचले असून भौतिक रूपाच्या विरहित असतात, असे.

**प्रश्न ६२३ : आपण देवांना भ्यावे काय ?**

**उत्तर** - जो निर्मळ असून दयाळू अंतःकरणाचा व धैर्यशील मनाचा असेल, त्याला कोणालाही भिण्याची आवश्यकता नाही. मनुष्य, ब्रह्मराक्षस, दैत्य किंवा देव, कोणीही त्याला इजा करू शकत नाही, देवांचे अस्तित्व प्र. ६२२ मध्ये दिले आहे.

## मार

**प्रश्न ६२४ : बौद्ध वाङ्मयात वेळोवेळी उद्धृत झालेला शब्द मार ही खरोखरच कोणी व्यक्ती होती काय किंवा ती केवळ कल्पनाच होती ?**

**उत्तर** - ज्याप्रमाणे चांगल्या कामात सहाय्यक होण्याकरिता देवी-देवतांची कल्पना केली आहे, तशीच चांगल्या कामात विघ्न टाकणारा म्हणजे मार अशी कल्पना केली आहे. अर्थात मार म्हणजे मनुष्याच्या मनातील कलुषित विचारांची साकार मूर्ती होय. (= Personification of Evil thoughts).

**प्रश्न ६२५ : 'मार' कोणाला म्हणावे ?**

**उत्तर** - मार मनाची दुर्बलता, मनातील वाईट प्रवृत्ती ह्यांचेच दुसरे नाव होय. वास्तविक

पाहाता 'प्रेय' की 'श्रेय', हा कलह सनातन आहे.एक मत असे की, जे 'प्रेय' (प्रिय) आहे, इंद्रियांना जे प्रिय व चांगले वाटते, तेच 'श्रेय' (कल्याणकारी) आहे. दुसरे मत असे की, सामाजिक दृष्टीने जे खरोखरच कल्याणकारी आहे, तेच आम्हाला प्रिय वाटायला पाहिजे.

## संमोहिनी विद्या

**प्रश्न ६२६ : संमोहिनी विद्येविषयीच्या मतप्रणालीस बौद्ध ग्रंथांचा दुजोरा आहे काय ?**

**उत्तर -** होय चुल्लपंथकाच्या प्रसंगाचे धम्मपदावरील पालिटीका ग्रंथात वर्णन आलेले आहे. चुल्लपंथक नांवाचा भिक्खू ज्या दिवशी अर्हतपदास पोहोचला, नेमक्या त्याच दिवशी भ. बुद्धांनी त्याला बोलावून आणण्याकरिता निरोप पाठविला. निरोप्या जेव्हा विहारात पोहोचला, तेव्हा तीनशे भिक्खू एकत्र बसलेले असून त्यांतील प्रत्येकजण प्रत्येक बाबतीत अगदी तंतोतंत दुसऱ्यासारखाच असल्याचे त्याला आढळून आले. त्यांच्यापैकी चुल्लपंथक कोण आहे, असे त्याने विचारताच त्या तीनशे भिक्खूपैकी प्रत्येकजण उत्तरला, ''मी चुल्लपंथक आहे.'' त्यामुळे द्विधा मनःस्थितीत तो भ. बुद्धांकडे आला आणि त्याने घडलेली गोष्ट त्यांना सांगितली.

भ.बुद्ध म्हणाले, ''तू पुन्हा विहारात जा आणि जर पुन्हा तीच गोष्ट घडली, तर जो भिक्खू, मी चुल्लपंथक आहे असे म्हणेल, त्या पहिल्याच भिक्खूचा हात धरून त्याला माझ्याकडे घेऊन ये.'' भ. बुद्धांनी ओळखून घेतले की, नुकतेच अर्हत्व प्राप्त केलेल्या भिक्खूने मोहजालाने स्वतःच्या भ्रामक आकृत्या निर्माण केल्या होत्या.

**प्रश्न ६२७ : संमोहन विद्येला पालीमध्ये काय म्हटले आहे ?**

**उत्तर -** मनोमय इद्धी. मनोमय इद्धीने निर्माण झालेल्या अर्हताच्या, आकृत्या संदेह नव्हत्या. परंतु त्या हाडामासांनी तयार झालेल्या, स्पर्श करता येण्याजोग्या किंवा हाताळण्यालायक शरीरमय नव्हत्या.

अर्हताने अभ्यासपूर्वक प्राप्त केलेल्या इच्छाशक्तीद्वारे निरोप द्यावयास गेलेल्या भिक्खूच्या (प्रश्न ६२६ पाहावा) मनावर उमटलेली ती केवळ भ्रामक चित्रे होती. त्याची तुलना आरशांतील प्रतिबिंबाबरोबर करता येईल. म्हणजे अगदी तंतोतंत जुळणारे, तथापि चित्राप्रमाणे घनता नसलेले.

**प्रश्न ६२८ : संमोहन विद्येने कशा प्रकारे भ्रम निर्माण करतात ?**

**उत्तर -** आपल्या मनांत स्वतःच्या स्वरूपाची अगदी स्पष्टपणे तंतोतंत कल्पना करून आणि जितक्या प्रतिमा हव्या असतील तितक्या वेळा त्या प्रतिमेची प्रतिबिंब पाहणाऱ्याच्या कोमल मनावर ठसविले जाते. ह्या पद्धतीला हल्ली संमोहन-संकेत (Hypnotic Suggesstion)असे म्हणतात.

**प्रश्न ६२९ : एकाच वेळी अनेक व्यक्तीस संमोहनाने भ्रामक आकृत्या दिसू शकतात काय ?**

**उत्तर -** होय. परंतु ते अर्हताच्या किंवा संमोहन करणाऱ्याच्या इच्छेवर अवलंबून असते.

समजा की, एका व्यक्तीऐवजी पन्नास किंवा पाचशे व्यक्ती उपस्थित असतील आणि तो मोहजाल केवळ एकानेच नव्हे तर सर्वांनीच सारख्याच प्रकारे ते पाहावे, अशी अर्हताची इच्छा असेल, तर तसेच घडेल. समजा अर्हताची इच्छा केवळ एकालाच मोहजाल दिसावे, अशी असेल तर तसेच होईल.

सध्याच्या काळात विज्ञानाची ही शाखा अतिशय चांगल्या प्रकारे परिचित आहे. संमोहन विद्येच्या आणि वशीकरण विद्येच्या सर्वच विद्यार्थ्यांना अगदी चांगल्या प्रकारे परिचित आहे.

**प्रश्न ६३० : अर्हताला शारीरिक व मानसिक वेदना होतात काय ?**

**उत्तर** - अर्हताला मानसिक वेदना होत नाहीत. कारण अर्हत आपल्या मनाला भावनेच्या अभ्यासाद्वारे अंकीत करून घेतो. कोणतेही दुःख झाल्यास तो संसाराच्या अनित्यतेचा दृढतापूर्वक विचार करून समाधीरूपी खुंट्याला जणूकाही आपल्या मनाला बांधून घेतो. त्यामुळे त्याचे चित्त चंचल होऊ शकत नाही.

परंतु अर्हताला शारीरिक वेदना होतात. पुढील दहा गुण असे आहेत की, ते शरीराच्या बरोबर राहतात-

(१) थंडी, (२) गर्मी, (३) भूक, (४) तहान, (५) मळ, (६) मूत्र, (७) थकवा, (८) वृद्धत्व, (९) रोग आणि (१०) मृत्यू.

ह्या सर्व गोष्टींवर अर्हताचा कोणताच अधिकार किंवा ताबा चालत नाही. कारण अर्हताचे चित्त शरीराच्या आधारावर प्रवर्तित तर होत असते (बदलत असते), परंतु शरीरधर्मावर त्याचा अधिकार नसतो.

## सिद्धी आणि चमत्कार

**प्रश्न ६३१ : ज्याला सर्वसाधारणपणे आपण चमत्कार म्हणतो, त्यासाठी गुप्त शक्ती मनुष्याला स्वभावतःच प्राप्त झालेल्या आहेत काय ?**

**उत्तर** - होय; परंतु ज्या स्वाभाविक शक्ती आहेत, अद्‌भुत नव्हते. विशुद्धिमार्ग ह्या ग्रंथात सांगितलेल्या विशिष्ट पद्धतीवर त्या शक्तीची वाढ केली जाऊ शकते. विज्ञानाच्या ह्या शाखेचे पाली नाव इद्धि-विजाननं (इद्धी-विद्याज्ञान = Knowledge of super-natural power), असे आहे. अर्हतांनी दाखविलेल्या अद्‌भुत चमत्कारांची शेंकडो उदाहरणे बौद्धांच्या धम्मग्रंथात सापडतात; त्या शक्तीला इद्धि-विद्या म्हटलेले आहे. ज्याला ही आत्मसात होते, तो वेगवेगळ्या नैसर्गिक शक्तीचा कौशल्याने योग्य वापर करून अद्‌भुत वाटणारा कोणताही चमत्कार करून दाखवू शकतो.

उदाहरणार्थ - त्याच्या मनास वाटेल तसा वैज्ञानिक प्रयोग.

**प्रश्न ६३२ : इद्धी-विद्येचे किती प्रकार आहेत ?**

**उत्तर** - इद्धी किंवा इद्धी विद्येचे दोन प्रकार आहेत. ते असे-एक बहीर, म्हणजे ज्यात अद्‌भुत चमत्कारी कार्य करणारी शक्ती आहे अशी. ती तपश्चर्येने तसेच मंत्रांच्या पठणाने किंवा विशिष्ट औषधीद्रव्याने किंवा इतर बाह्य मदतीनेसुद्धा तात्पुरती प्राप्त होऊ शकते.

दुसरा प्रकार 'शासनिक', म्हणजे ज्यात ही शक्ती अंतस्थ आत्म-विकासाद्वारे मिळालेली असते. ती सर्वव्यापी असून लौकिक-इद्धि च्या अद्‌भुत चमत्कारापेक्षा अधिक शक्तिशाली असते.

तपश्चर्या म्हणजेच ध्यानाचा मार्ग सतत अनुसरल्याने त्यांचे हळूहळू तपस्वी लोकांमध्ये परिवर्तन होते व तेच लोक ह्या शक्तीचा उपयोग घेऊ शकतात.

**प्रश्न ६३३ : इद्धि-शक्ती नष्ट होऊ शकते काय ?**

**उत्तर** - बहीर इद्धि-शक्ती नष्ट होऊ शकते; परंतु शासनिक इद्धि-शक्ती एकदा प्राप्त केल्यावर कधीच नष्ट होत नाही. लोकोत्तर ज्ञान (Occult) एकदा मिळविले की, ते कधीच नष्ट होत नाही; आणि केवळ ह्या ज्ञानमुळेच निर्वाणाची परिपूर्ण अवस्था अर्हताला माहीत होते. हे ज्ञान अष्टांगमार्गाचे उदात्त जीवन अनुसरल्याने प्राप्त होऊ शकते.

महास्थविर सुमंगल ह्यांनी कर्नल ऑलकॉट यांना स्प्ष्ट सांगितले होते की, ही श्रेष्ठ शक्ती ज्याने आपल्या मनोविकारांवर विजय मिळविला असतो केवळ त्यालाच, म्हणजे अर्हतालाच कायमची प्राप्त झालेली असते. ह्या शक्तीचा उपयोग वाईट वृत्तीचा माणूसही करू शकेल; परंतु ते कार्य थोड्या अवधिकरिता मर्यादित असते. कह्यांत न येणारे मनोविकार जादूगारावर पुन्हा वरचढ होतात आणि शेवटी तो त्यांना बळी पडतो.

**प्रश्न ६३४ : भ. बुद्धांनी लोकोत्तर इद्धि प्राप्त केली होती का ?**

**उत्तर** - होय. ती त्यांना पूर्णावस्थेमुळे प्राप्त झाली. कमी अधिक प्रमाणात त्यांच्या काही शिष्यांनादेखील ती प्राप्त झाली.

आयुष्मान मोग्गल्लान ह्यांनी अद्‌भुत चमत्कार करण्याचे अलौकिक सामर्थ्य सर्वाधिक प्राप्त केले होते. ह्याउलट आयु. आनंद स्वत भ. बुद्धांचे अतिशय जवळचे व प्रिय शिष्य अनेक वर्षांपर्यंत सोबत राहूनही अलौकिक शक्तीला मुळीच प्राप्त करू शकले नाहीत. परंतु भगवंतांच्या महापरिनिर्वाणानंतर त्यांनी लोकोत्तर इद्धी प्राप्त केली.

**प्रश्न ६३५ : मृत व्यक्तीस चमत्काराने जागृत करता येणे शक्य आहे, असे बौद्धधम्मात अधिकारपूर्वक सांगितलेले आहे काय ?**

**उत्तर** - अजिबात नाही. एवढेच नव्हे तर भ. बुद्धांनी किशा गौतमी व मोहरीचे दाणे ह्या सुंदर प्रसंगाद्वारे ह्या उलट शिकविले आहे.

**प्रश्न ६३६ : लोकोत्तर इद्धीचा विकास क्रमाक्रमाने कसा होतो ?**

**उत्तर** - अर्हताना क्रमाक्रमाने प्राप्त होण्याजोग्या सहा अवस्था आहेत.

१) प्रगमनशील भूतदर्शन उगम किंवा उत्पत्तीविषयी क्रमाक्रमाने जाणावयास भूतकाळाचे दर्शन घडविणाऱ्या शक्तीला क्रमाक्रमाने प्राप्त करणे.

२) प्रगमनशील दूरदृष्टी -

म्हणजेच भविष्यकथनाची शक्ती आणि

३) क्रमाक्रमाने तृष्णांचा आणि भौतिक वस्तुविषयींच्या आसक्तीचा लोप करावयाची शक्ती. ह्याच शक्तींचा अमर्यादपणे विकास झालेल्या अशा आणखी तीन अवस्था-

अशा प्रकारे परिपूर्ण अर्हत झालेल्या व्यक्तीस कोणत्याही वस्तूच्या भूतकाळाचे इत्थंभूत दर्शन घडविणारी दृष्टी व भविष्याचे संपूर्ण दर्शन घडविणारी दूरदृष्टी प्राप्त असते; आणि तृष्णेचा व स्वार्थी आकर्षणांचा अंतिम लेशही त्याने पूर्णपणे नष्ट केलेला असतो. त्यांच्यापेक्षा अधिक उच्च प्रतीची अवस्था केवळ 'बुद्धाला' प्राप्त होऊ शकते. (भूतकाळाचे व भविष्यकाळाचे दर्शन घडविणारी दृष्टी मानवास प्राप्त होऊ शकते, याविषयी शंका आहे. - संकलनकर्ती)

**प्रश्न ६३७ : इद्धि मिळविण्याची चार साधने कोणती ?**

**उत्तर** - दृढ आकांक्षा, तिच्याकरिता प्रयत्न, मानसिक विकास आणि योग्य अयोग्य ह्यामधील तारतम्य, ही इद्धी मिळविण्याची चार साधने आहेत.

**प्रश्न ६३८ : भ. बुद्धांनी अद्‌भुत चमत्कार करून दाखविण्यास उत्तेजन दिले काय ?**

**उत्तर** - नाही. ज्यांना चमत्काराच्या मुळाशी असलेल्या तत्त्वांची ओळख नसेल त्यांच्या मनात चमत्कारामुळे गोंधळ उत्पन्न होईल असे जाणून चमत्कार दाखविणाऱ्यांना त्यांनी निरुत्साहित केले व मज्जाव केला. शिवाय लोकांची चमत्काराबद्दल उगाचच जिज्ञासा वाढते व ज्याला इद्धी प्राप्त असेल. त्याला त्याचा डौल दाखवावासा वाटतो. एवढेच नव्हे तर निम्न दर्जाची इद्धी, म्हणजे लौकिक विद्येमध्ये पारंगत असलेले काही जादूगार आणि चेटकेदेखील अद्‌भुत चमतकारासारखा दुसरा चमत्कार दाखवून लोकांना फसवू शकतात. अलौकिक इद्धी प्राप्त झाली असल्याचे खोटेनाटेच जर एखाद्या भिक्खूने सांगितले तर त्यास अक्षम्य पाप समजले पाहिजे, असे तेविज्ज सुत्रात सांगितले आहे.

**प्र.६३८ (अ) : चमत्कार दाखविणे सर्वथा असंभव असते काय?**

**उत्तर** - नाही, परंतु समर्थ लोक अशा पुष्कळशा 'हात-चलाख्या' दाखवू शकतात. ज्यांना सामान्य लोक चमत्कार समजू लागतात. परंतु प्राकृतिक नियमांविरुद्ध कोणतीही घटना घडू शकत नाही. अशा पुष्कळच गोष्टी आहेत ज्या प्राकृतिक नियमानुसारच घडतात. परंतु त्या 'चमत्कारासारख्या' दिसतात, कारण त्यावेळी त्या प्राकृतिक नियमांविषयीचे ज्ञान अवगत झालेले नसते. त्या नियमांचा शोध लागल्यानंतर त्या घटनांना चमत्कार असे संबोधन देणे बंद होते. जसे वीज, रेडिओ, टेलिविजन, विमान, टेलिफोन, सिनेमा, इत्यादी याचा शोध लागण्यापूर्वी त्यांना काल्पनिक वस्तूच समजल्या जात असे.

## तेजस्वी आभा

**प्रश्न ६३९ : भ. बुद्धांच्या शरीरातून तेजस्वी आभा (शरीर रश्मी) प्रकट होत असल्याविषयीच्या एखाद्या गोष्टीचा उल्लेख कोठे झालेला आहे काय ?**

**उत्तर** - होय, भ. बुद्धांच्या पावित्र्याच्या सामर्थ्यामुळे त्यांच्या शरीरातून तेजस्वी आभा प्रकट होत असे. आजही आपल्यास कधी-कधी तेजस्वी चेहरे पाहावयास मिळतात. त्यांस ''बुद्धरश्मी'', बुद्धांची प्रकाशकिरणे असे म्हटले जाते.

त्यात सहा रंग जोडीने दिसायचे

नीलवर्ण, पितवर्ण, लोहितवर्ण, अवदतवर्ण, मंगस्तवर्ण, प्रभस्ववर्ण

सर्वच अर्हतांची आभा तेजस्वी असे. ज्या व्यक्तीचा आध्यात्मिक विकास अधिक असेल, तिची आभाही तशीच तेजंस्वी असायची. त्यास हिंदू लोक तेजोवलय म्हणतात व युरोपियन लोक मानवी प्रभावलय म्हणतात. ख्रिश्चन चित्रकारांनी काढलेल्या श्रेष्ठ आणि पवित्र अशा व्यक्तींच्या सर्वच चित्रांमध्ये प्रभावलयाचा प्रकाश दाखविलेला आहे.

**प्रश्न ६४० : बुद्धरश्मीचे रंग कोठे पाहावयास मिळतात ?**

**उत्तर** – जेथे जेथे भ. बुद्धांची रंगीत चित्रे काढलेली आहेत, त्या सर्वच विहारात आपणांस हे रंग पाहावयास सापडतात. प्रथम सिलोनमध्ये बनविलेल्या आणि नंतर सव्रच बौद्ध देशांनी मोठ्या प्रमाणात स्वीकारलेल्या बौद्धधम्माच्या ध्वजांच्या पट्ट्यांमध्ये सुद्धा ते रंग पाहावयास मिळतात.

**प्रश्न ६४१ : भ. बुद्धांनी स्वतःच आपल्या तेजाविषयीचा उल्लेख कोणत्या प्रवचनात केलेला आहे ?**

**उत्तर** – महापरिनिर्वाण सूत्रात भ. बुद्धांच्या महापरिनिर्वाण समयी त्यांचा शिष्य आयुष्मान आनंद ह्याने आपल्या गुरूच्या शरीरातून अत्यंत तेजस्वी आभा फाकली असल्याचे पाहून त्याबद्दल विचारले असता, भ. बुद्ध म्हणाले की, दोन प्रसंगी ते अलौकिक तेज प्रकट होत असते. प्रथमतः तथागताने सम्यक सम्बोधीची दिव्यदृष्टी प्राप्त झाल्यानंतर आणि दुसऱ्यांदा त्यांच्या महारिनिर्वाणाच्या रात्री.

**प्रश्न ६४२ : तत्पूर्वी झालेल्या इतर बुद्धांच्या शरीरातूनही अशीच आभा प्रकट होत असल्याचे वर्णन आपणास आणखी कोठे वाचावयास सापडते ?**

**उत्तर** – सुमेध आणि दीपांकर बुद्धांच्या कथेत जातक कथा ह्या ग्रंथांच्या निदानकथांमध्ये ह्याविषयी आढळते, किंवा बोधिसत्त्वाच्या सिद्धार्थ गौतमाच्या रूपाने झालेल्या पुनर्जन्माच्या कथेतही आढळते. त्याचे वर्णन सहा फूट व्यासाचे प्रभामंडळ असे केलेले आहे. हिंदु त्या फाकलेल्या तेजाला तेजोवलय म्हणतात. युरोपियन लोक त्याला मानवी प्रभावलय म्हणतात.

**प्रश्न ६४३ : प्रभावलयाचे अस्तित्व विज्ञानाच्या प्रयोगाद्वारे सिद्ध झाले आहे काय ?**

**उत्तर** – होय. बरोन व्हॅन रिचेनबॉक (The Baron Von Reichenbach) ह्या शास्त्रज्ञाने केलेल्या प्रयोगाचे सविस्तरपणे केलेले वर्णन त्याच्या संशोधन पुस्तिकेमध्ये आलेले असून त्याचा आढावा इ.स. १८४४-४५ मध्ये प्रसिद्ध करण्यात आलेला होता. डॉ.बोराडूक (Dr. Boraduc) ह्या पॅरिसमध्ये राहणाऱ्या शास्त्रज्ञाने इ.स. १८९० च्या सुमारास प्रभावलयाचे हुबेहूब छायाचित्र घेतले होते.

प्रभावलय ही एक नैसर्गिक गोष्ट आहे. असे सिद्ध झालेले आहे की, सर्व मानवी प्राणिमात्राच नव्हेत तर गुरेढोरे, वृक्ष, रोपटी आणि दगडामध्येसुद्धा प्रभावलय दिसून येते.

**प्रश्न ६४४ : भ. बुद्धांच्या किंवा अर्हतांच्या प्रभावलयाचे वैशिष्ट्य कोणते ?**

**उत्तर** – इतर प्राणिमात्र व वस्तू ह्यांच्या प्रभावलयापेक्षा भ.बुद्धांचे किंवा कुणा अर्हतांचे

प्रभावलय अत्यंत तेजस्वी आणि अधिक प्रमाणात पसरलेले असते. त्यांनी प्राप्त केलेल्या इद्धीच्या सामर्थ्याची आणि त्यांच्या श्रेष्ठ नैतिक विकासांची, ती साक्ष होय.

**प्रश्न ६४५ : बौद्धधम्म व हिंदुधर्माखेरीज इतर धम्माचे लोकसुद्धा प्रभावलयावर विश्वास करतात काय ?**

**उत्तर** – होय. ख्रिश्चन चित्रकारांनी काढलेल्या सर्वच चित्रांमध्ये पवित्र व श्रेष्ठ व्यक्तीच्या शरीराभोवती प्रभावलयाचा प्रकाश दाखविलेला आहे. तीच श्रद्धा इतर धर्मामध्येही अस्तित्वात असलेली आढळते.

## विश्वातील प्राणशक्तीव्दारे प्राकृतिक उपचार

**प्र.६४५ (अ) : भगवंतांनी नैसर्गिक प्राणशक्ती व्दारे शारीरिक आजारापासून मुक्ती द्यावयासाठी नवीन पद्धतीचा शोध लावला होता काय?**

**उत्तर** – होय त्याचा उल्लेख सद्धम्म पुण्डरिक सूत्रांमध्ये (Lotus-Sutra) सापडतो. संपूर्ण विश्वामध्ये प्राणशक्तीचा संचार आहे. या प्राणशक्तीला विशेष प्रक्रियेने आवाहन केले जाऊ शकते. त्या प्राणशक्तीला आपल्या स्वतःच्या शरीरात संचारित करून आपल्या हातांनी स्पर्श करून, रोगांचा उपचार केल्या जाऊ शकतो. अशा अनेक घटनांचा उल्लेख बौद्ध साहित्यात बघावयास मिळतो की भ. बुद्ध (तसेच इतर अनेक अर्हतदेखिल) आपल्या हातांनी केवळ स्पर्श करून रोग्याच्या रोगग्रस्त अंगाचा उपचार करण्यास समर्थ होते. ते विश्वात संचारित असलेल्या प्राणशक्तीच्या (जीवनशक्तीच्या) ऊर्जेला स्वतःच्या शरीरात आकर्षित करून, तिला आपल्या बोटांद्वारे रोग्याच्या रोगग्रस्त अंगामध्ये प्रवाहित करीत असत. ज्यामुळे रोग्याचा रोग काही अंशाने किंवा पूर्णपणे रोगमुक्त होत असे. बायबलमध्ये देखील येशू ख्रिस्ताद्वारे या प्रकारे रोग्यांचा रोग बरा करावयाच्या घटनांचा उल्लेख आहे. असे म्हणतात की, येशुख्रिस्त (Isa) तिबेटास गेले होते आणि तेथे त्यांनी ही विद्या मिळविली.

**प्र.६४५ (ब) : स्पर्शाद्वारे रोगांना दूर करण्याची (Healing touch) गोष्ट विज्ञानसंगत आहे काय व तिचे प्रामाण्य सिद्ध करता येते काय?**

**उत्तर** – होय. माणसात प्राणशक्ती ऊर्जा जन्मतःच विद्यमान असते. परंतु तिचे प्रमाण कमी झाल्याने रोग निर्माण होतात. या कमी झालेल्या शक्तीला जागृत करून आणि विश्वातील प्राणशक्ती उर्जेला (Universal life - force enery) शरीरात प्रवाहित करून आपण आपल्या रोगाचा इलाज स्वतःच करू शकतो. या विद्येला जपान देशाच्या डॉ. मिकाओ उसुई (Dr. Mikao Usui) एकोणिसाव्या शताब्दीच्या शेवटी पुन्हा शोधून काढले. तिला जापानी भाषेमध्ये रेकी (REIKI) म्हणतात. रे (REI) चा अर्थ विश्वव्यापी आणि की (KI) चा अर्थ आहे प्राणशक्ती किंवा जीवनशक्ती. अर्थात रेकीचा अर्थ आहे 'विश्वामध्ये व्याप्त असलेली प्राणशक्ती'. ही एक नैसर्गिक गोष्ट आहे व ती सर्व प्राणिमात्रांमध्ये निवास करते. आणि मनुष्यप्राणी, वृक्ष, जलचर इत्यादी सर्वांच्या जीवनास गतिमान करते.

**प्रश्न ६४५ (क) : रेकी (REIKI) ही जादू आहे का?**

**उत्तर** - नाही, ती तंत्र नव्हे, मंत्र नव्हे किंवा काळी विद्या नव्हे. सम्मोहन शक्ती नव्हे, परसंमोहन नव्हे. ना कोणी पंथ, ना कोणता धर्म, ती केवळ एक योग-उपचार विधी आहे.

प्राचीन भारतीय संस्कृतीमध्ये 'मनाच्या' स्वास्थाबरोबरच शरीरस्वास्थालाही बरेच महत्त्व दिले गेले होते. मनाचे स्वास्थ्य उत्तम राखण्यास आणि मनाची शक्ती प्राप्त करावयास शरीराचे व्याधिमुक्त होणे अनिवार्य असते. 'रेकी' ही मन व शरीर यांच्यात संतुलन करावयास आणि मानसिक व शारीरिक स्वास्थाचा लाभ मिळविण्यासाठी एक सोपा आणि साधा नैसर्गिक उपाय आहे.

**प्र.६४५ (ड) : 'रेकी' चा शोध कसा लागला?**

**उत्तर** - एकोणविसाव्या शतकात जपानमधील क्योटो शहरात डॉ मिकाओ उसुई नावाचा एक ईसाई शिक्षक राहत होता. एकदा त्याच्या एका विद्यार्थ्याने प्रश्न केला की प्राचीन काळी येशू ख्रिस्त केवळ हाताच्या स्पर्शाद्वारे लोकांचा उपचार करीत असत, हे म्हणणे सत्य आहे काय? ते खरे असल्यास त्याचा विधी कसा असतो.

या प्रश्नाने डॉ. उसुई यांना विचलित केले. कारण त्याचे संपूर्ण उत्तर त्यांच्याकडे नव्हते. त्यांची जिज्ञासा जागृत झाली. त्यांनी आपल्या नोकरीचे त्यागपत्र दिले आणि ते त्या विधीला शोधून काढावयास सज्ज झाले. जपानमधील एका बौद्ध भिक्खूने त्यांना प्रोत्साहन दिले आणि त्यांचे मार्गदर्शन केले.

जपान, अमेरिका, आणि चीन या देशांचे भ्रमण करीत करीत आणि अध्ययन करीत करीत ते भारतात आले. येथे येऊन त्यांनी संस्कृतचा अभ्यास केला. त्यानंतर त्यांनी भारतीय बौद्ध साहित्याचे तिबेटमध्ये जाऊन अध्ययन केले. तेथे त्यांना हस्तस्पर्शाद्वारे उपचार करावयाचा विधी कमळ सूत्राद्वारे (Lotus-Sutra) उपलब्ध झाला. परंतु त्या विधीला आत्मसात करण्यासाठी चेतनेच्या जागृतीची आवश्यकता होती म्हणून ते जपानला परत आले. बौद्ध भिक्खूच्या मार्गदर्शनानुसार त्यानी पवित्र मानल्या गेलेल्या कुरियामा पहाडाच्या शिखरावर जाऊन २१ दिवस उपवास करीत निरंतर ध्यानध्यारणेमध्ये मग्न राहिले. याप्रमाणे स्वतःच्या चेतनेस जागृत केल्याने हस्तस्पर्शाद्वारे उपचार करावयाची दिव्य शक्ती त्यांना प्राप्त झाली. त्यांच्या उरलेल्या जीवनामध्ये त्यांनी हजारो रोगग्रस्त लोकांना रोगमुक्त केले. या विद्येच्या ज्ञानाचा प्रचार व्हावा म्हणून त्यांनी इतरांनाही प्रशिक्षित केले.

**प्रश्न ६४५ (ई) : 'रेकीचा' उपयोग कशा प्रकारे करतात?**

**उत्तर** -

१. 'रेको' शिकावयास सोपी आहे

२. रेकीचा वापर अगदी सोप्या रीतीने करता येतो. हिला स्थान किंवा काळाचे बंधन नाही. ज्या व्यक्तीला हा उपचार घ्यायचा असेल त्या व्यक्तीने इच्छा व्यक्त करावयास हवी तेव्हाच रेकीचा उपचार देण्यात येतो. परंतु जर रोगी बेहोश असेल किंवा एकटे बाळ (मूल) असेल तर इच्छा प्रकट करण्याची आवश्यकता नसते.

३. रेकीमुळे माणसाची अंतर्ज्ञान शक्ती (Institutional power) वाढते त्यामुळे तो

अडचणीला सुलभपणे सोडवू शकतो.

४. डॉक्टरांनी दिलेल्या औषधीबरोबरच 'रेकीसुद्धा' देता येते. रोग्याच्या प्रगतीनुसार डॉक्टर आपल्या औषधीला कमी करून देऊ शकतो.

५. रेकीच्या मदतीने रोगी आपल्या स्वभावातील दोषदेखील हळूहळू दूर करू शकतो आणि व्यक्तित्वास अधिक प्रभावशाली करू शकतो.

६. रेकी कलाकारांना तसेच खेळाडूंना तणावमुक्त करून खेळ किंवा कलेमध्ये प्रावीण्य मिळविण्यास मदत करते.

७. रेकीमुळे घरात सुख, शांती, आणि समृद्धी यात वाढ होते. रेकीचा उपचार दिल्यावर त्याप्रीत्यर्थ काही दान किंवा फी (किंवा एखादी सेवा) घ्यायला हवी. त्याला आदान-प्रदान म्हणतात.

**प्रश्न ६४५ (फ) : रेकीचे प्रशिक्षण कसे घेतले जाते?**

**उत्तर** - रेकी शिकावयास फारच सोपी आहे. कोणीही व्यक्ती पुरुष किंवा स्त्री ज्यांच्या मनात रेकी शिकावयाची इच्छा असेल तो रेकी शिकू शकतो. रेकी शिकायला शैक्षणिक योग्यतेची आवश्यकता नसते. केवळ शिकावयाची इच्छा हवी आणि विश्वास असावा लागतो.

आपल्या शरीरात सात चक्र असतात. ते आपल्या शरीरातील मुख्य ऊर्जास्रोत आहेत आणि निरनिराळ्या अवयवांमध्ये ऊर्जेला प्रवाहित करतात. त्यांच्यापासून मिळालेल्या ऊर्जेला ग्रहण करून अवयव आपले कार्य व्यवस्थितपणे करू शकतात. रेकीचे प्रशिक्षण सुरू असताना रेकी प्रशिक्षक एका पारंपरिक विधीद्वारे ऊर्जाचक्रांच्या शक्तीची उकल करून त्यांना संतुलित आणि गतिमान करतो. याला 'रेकी अट्यूनमेंट' (Reiki Attunement) म्हणतात. त्यामुळे व्यक्ती अधिक जीवनशक्ती प्राप्त करतो. या अधिक प्राप्त झालेल्या जीवनशक्तीमुळे, माणसाच्या शरीराला अधिक ऊर्जा प्राप्त होते आणि विश्वातील विद्यमान ऊर्जेला प्राप्त करून स्वतःला तसेच इतरांनादेखील ऊर्जा द्यायची क्षमता प्राप्त होते. या अधिकच्या ऊर्जेला आकर्षित करावयाच्या क्षमतेमुळे आणि तिचा उपयोग करावयाची क्षमता प्राप्त झाल्यामुळे त्याला 'रेकी वाहक' (Reiki channel) म्हटले जाते.

रेकी शक्तीचा संगत बसल्यावर (Attunement) झाल्यास रेकी कधीही कमी होत नाही. ती शरीरामध्ये मरेपर्यंत टिकून राहते. इतरांना रेकी दिल्याने व त्यांचा उपचार केल्याने रेकी अधिक प्रभावी होते. जर कोणत्या कारणांमुळे तुम्हास स्वतः रेकी उपचार देता आला नाही तरीपण ती नष्ट होत नाही आणि पुनः आवाहन केल्याने पुनः उपलब्ध होते.

**प्रश्न ६४५ (ग) : 'रेकी' विद्या शिकविताना वेगवेगळ्या स्तरावर प्रशिक्षित केले जाते काय ?**

**उत्तर** - होय. प्रथम स्नातक (First Degree) साठी दोन दिवसांचे प्रशिक्षण शिबिर असते. त्यांत आपल्या शरीरातील सात चक्रांपैकी चार चक्रांमधे शक्तिसंचार केला जातो. हृदय चक्र, विशुद्ध चक्र, आज्ञा चक्र आणि सहस्रार चक्र हे चारही चक्र माध्यमाचे कार्य करतात. त्यांच्याद्वारे सर्वव्यापी जीवन-प्राण-शक्ती प्रवाहित होत होत तळहातात पोहोचते. या प्रशिक्षणानंतर शरीराच्या २४ अंगांना तीन-तीन मिनिटे रेकी द्यावी. हीच स्पर्श-चिकित्सा

होय. ही प्रक्रिया मन लावून कमीतकमी २१ दिवस केल्याने शरीराचे आणि मनाचे पुष्कळसे विकार शरीरातून निघून जातात व शुद्धीकरण होते. त्यानंतर द्वितीय स्नातकाचे (Second Degree) प्रशिक्षण कधीही करता येते.

द्वितीय स्नातकाचे (Second Degree) चे प्रशिक्षण देखील दोन दिवसांचे असते. प्रथम दिवशी आज्ञा चक्रामध्ये अधिक शक्तीचा संचार केल्या जातो. त्यामुळे सहावे इंद्रिय जे मन, त्यांत शक्तीचा संचार होतो, आणि दूर बसलेल्या कोणत्याही व्यक्तीस विनास्पर्श चिकित्सा देता येते. याला 'संकल्प शक्तिपात' असे म्हणतात. त्यानंतर व्यक्तीच्या आत लपून असलेली टेलीपथी आणि इन्ट्यूशन शक्तीचा विकास होतो. या डिग्रीनंतर शक्तिसंचार प्रथम डिग्रीहून चारपटीने अधिक करायची क्षमता येते. या डिग्रीचे प्रशिक्षण असलेली व्यक्ती जर स्पर्शाद्वारे ऊर्जा देत असेल तर बरीच अधिक ऊर्जा देतो.

तृतीय स्नातक (Third Degree) ही रेकी मास्टरची डिग्री असते. रेकी मास्टर कुणालाही प्रथम तसेच द्वितीय डिग्रीचा शक्तिसंचार करू शकतो. रेकी मास्टर ही योग्यता केवळ त्याच व्यक्तीला प्रदान केली जाते जी व्यक्ती डॉ. उसुई यांच्या प्रकृती शिक्षा प्रणालीस संपूर्णपणे समर्पित व्हावयास तयार असते; आणि ज्याला रेकी प्रशिक्षण कार्यक्रम चालविण्याचा पूर्ण अनुभव प्राप्त झालेला असतो. द्वितीय स्नातक झाल्यानंतर कमीतकमी एक वर्ष, सदोदित आपल्या रेकी मास्टरसोबत सहयोग करीत राहून रेकीच्या प्रशिक्षणांत भाग घेत त्या व्यक्तीस 'रेकी मास्टरची' योग्यता दिली जाते. कार्यक्रमांत संलग्न राहिल्याने द्वितीय स्नातक, तृतीय स्नातकाची (Third Degree) योग्यता घेण्यास सक्षम होतात.

**प्रश्न ६४५ (ह) : मनुष्याच्या शरीरात कोणकोणते चक्र आहेत आणि त्यांचे कार्य कोणते ?**

**उत्तर** - मनुष्याच्या शरीरात सात चक्र स्थित आहेत; ते येणेप्रमाणे -

१) सहस्रार चक्र (Crown Chakra) हे चक्र डोक्यावर मध्यभागी स्थित असते. त्याचा संबंध Pineal Gland (epiphysis) बरोबर असतो.हे चक्र श्रद्धेला स्थिर करते. विश्वासाबरोबर एकरूप व्हायला मदत करते.

२) आज्ञा चक्र (Third Eye Chakra) हे चक्र कपाळावर दोन्ही डोळ्यांच्या मध्यभागाच्या रेषेवर स्थित असते. ह्याचा संबंध Pituitary Gland सोबत असतो. हे चक्र अंतःप्रेरणा व इच्छाशक्ती यांचे केंद्र आहे. येथे उपचार दिल्याने मायग्रेन, सायनस, डोळे आणि नाक यांच्या विकारावर नियंत्रण केल्या जाऊ शकते; आणि मस्तिष्क तणावमुक्त होते.

३) विशुद्धी चक्र (Throat Chakra) याचा संबध Thyroid ग्रंथीसोबत असतो. ही ग्रंथी शरीराचे संतुलन राखते.

४) हृदय चक्र (Heart Chakra) याला अनाहत चक्र देखील म्हणतात. हे चक्र मनुष्याच्या प्रेम, भय इत्यादी भावनांचे स्थान होय. याचा संबंध हृदय आणि थायमस (Thymus) ग्रंथीसोबत असतो. हे चक्र शरीरात रोग-प्रतिबंधक शक्तीची निर्मिती करते; तसेच रक्ताभिसरणाच्या प्रक्रियेस नियंत्रित करते.

५) मणिपूर चक्र (Solar Plexus Chakra) हे चक्र हृदयाच्या खाली व नाभीपेक्षा दोन बोटे वर स्थित असते. हे चक्र पोट, पित्ताशय, यकृत, पाचनग्रंथी आणि विषारी ग्रंथींना नियंत्रित करते.

६) स्वाधिष्ठान चक्र (Hara Chakra) हे चक्र नाभीच्या अगदी दोन बोटे खाली स्थित असते. याचा संबंध आंतडी, स्त्रियांचे गर्भाशय, अंडकोष, मूत्राशय आणि पुरुषांच्या प्रोस्टेट ग्रंथींशी असतो. हे मनुष्याच्या सुप्त भावनांचे केंद्र आहे. ह्या ग्रंथीमध्ये बिघाड झाल्याने हिस्टेरिया, मनाचे घाबरणे व गर्भाशयासंबंधी विकार निर्माण होतात.

७) मूलाधार चक्र (Root Chakra) हे कुंडलिनी शक्तीचे स्थान आहे. समोर मूत्रपिण्डास आणि मागे गुदद्वारास नियंत्रित करते.

'रेकी' शक्ती वरून आकाशामधून येते. ती सहस्रार चक्र, आज्ञाचक्र आणि विशुद्धी चक्र यांतून क्रमशः जाते आणि हृदय चक्राद्वारे हातांच्या तळव्यात येते आणि कार्य करते. रोग तीव्र असेल तर रेकी दिल्यानंतर तो त्वरितच वाढतो, परंतु रेकी देणे सुरूच ठेवले म्हणजे काही वेळाने लाभ होऊ लागतो.

# कर्म सिद्धान्त

**प्रश्न ६४६ : बौद्धांच्या कर्माच्या सिद्धान्ताचे तत्त्व आधुनिक वैज्ञानिक तत्त्वप्रणालीशी जुळते काय ?**

**उत्तर** – होय. आधुनिक शास्त्रज्ञांचे मत असे आहे की, मनुष्याच्या प्रत्येक पिढीस त्याआधीच्या पिढीच्या सद्‌गुणांच्या वा दुर्गुणांच्या परिणामांना सहन करावे लागते (heritage) व त्यांचा वारसा (heredity) जमेस घ्यावा लागतो. केवळ गोळाबेरीज म्हणून नव्हे, तर प्रत्येक कुशल वा अकुशल कर्माचा वारसा घ्यावा लागतो. जन्मजात गुण वा दुर्गुण बहुतांशी वारसारूपाने अपत्यांमध्ये येतात.

बौद्धधम्मानुसार अपत्यापैकी प्रत्येकासच पूर्वीच्या जन्मात उत्पन्न केलेल्या कारणांनुसारच ह्या जन्माच्या रूपाने फळ मिळते. आधीचा क्षण म्हणजे जुना जन्म आणि पुढे येणारा क्षण म्हणजे पुनर्जन्म होय (पाहा प्र. ६५१) कर्माची कल्पना ती अशी आहे. (संकलिका)

**प्रश्न ६४७ : बौद्धधम्मात ऊर्जेच्या अविनाशीपणाच्या तत्त्वाचे समर्थन आहे काय ?**

**उत्तर** – होय. कर्माचा सिद्धान्त आधुनिक विज्ञानाच्या (Science) ऊर्जेच्या अविनाशीपणाच्या सिद्धान्ताशी बहुतांशी समरूप आहे. केलेले कर्म नष्ट होत नाही, त्याची परिणती होऊन फलप्राप्ती होते.

**प्रश्न ६४८ : कधी कधी कुलक्षणी मातापित्यापासून फार चांगली व शहाणी मुले जन्मास येतात; तर कधी-कधी सुलक्षणी मातापित्यापासून दुराचारी मुले जन्मास येतात, ह्याचे बौद्धजन काय कारण सांगतात ?**

**उत्तर** – त्याला कारण मातापित्यांच्या आणि मुलांच्या सभोवतालचे वातावरण आणि त्यांची वैयक्तिक कर्मे होत, असे कर्नल ऑलकॉट यांचे उत्तर बरोबरच आहे.

तथापि, अशा प्रकारचा अस्वाभाविक नातेसंबंध स्थापित व्हावयास अनेक कारणे आहेत. त्यातील काही कारणांचे विश्लेषण आधुनिक मानसशास्त्रज्ञांनी केलेले आहे. मानसिक देवाणघेवाण (Psychological Transaction Analysis) ह्या विषयाखाली संशोधन करून मानसशास्त्रज्ञांनी असे सिद्ध केलेले आहे की, खाली नमूद केलेल्या गोष्टी वेगवेगळ्या अपत्यांच्या स्वभावात फरक घडवून आणण्यास कारणीभूत होतात -

१) एखाद्या अपत्यास अधिक लाडाने वाढविणे किंवा फाजील लाड करणे
२) काही वेळी चुकीच्या गोष्टीस उचलून धरणे
३) ठेंगणा, उंच, काळा, गोरा, सुंदर इत्यादी शारीरिक गोष्टी ज्यांच्यावर अपत्यांचे नियंत्रण नसते व त्या नैसर्गिकरीत्या त्यांना जन्मजात प्राप्त झालेल्या असतात, अशा गोष्टींची कमी/अधिक प्रसंशा किंवा निंदा करणे
४) मुलांमध्ये वाढत चाललेल्या, अहंभाव, घृणा, द्वेष, इर्षा इत्यादी स्वभावाकडे दुर्लक्ष करणे
५) वेळोवेळी आवश्यक असलेले गोंजारणे किंवा थोपटणे यांचे कमी-अधिक प्रमाण
६) अपत्याच्या मनावार खोलवर रुजून बसलेला एखादा विशिष्ट प्रसंग, वगैरे

**प्रश्न ६४९ : भगवंतांनी कर्माची महती कशी निवेदन केली ?**

**उत्तर -** भ. बुद्ध राजा प्रसेनजिताला धम्मोपदेश देताना म्हणतात, 'महाराज ! आमची चांगली किंवा वाईट कर्मे सावलीप्रमाणे आमचा सतत पाठलाग करीत असतात. 'जसे पेरावे तसेच पीक घ्यावे' ह्या नियमाप्रमाणे जसे कर्म कराल, तसेच त्याचे फळ उपभोगावे लागेल. वाईट कर्माचे वाईट फळ व चांगल्या कर्माचे चांगले फळ मिळत असते. म्हणून प्रत्येकाने शुभ कर्मेच करावीत. ह्याकरिता सर्वाधिक आवश्यकता आहे ती म्हणजे मैत्रीपूर्ण हृदयाची राजाने प्रजेला आपल्या संततीप्रमाणे मानून, तिला कष्ट देऊ नये, तिच्यावर अन्याय करू नये. कुमार्गाचा त्याग करून सन्मार्गाचा अवलंब करावा. काया-क्लेशाने स्वतःला पीडित करण्याने काहीच लाभ होत नाही. प्रज्ञाप्राप्ति हाच मानव जीवनाचा एकमात्र उद्देश असून सर्व धार्मीकतेच्या शिकवणुकीचा हाच केन्द्रबिंदू असायला पाहिजे. प्रज्ञेच्या प्राप्तीशिवाय इतर कोणतीही प्राप्ती निरर्थकच होय.

''हे सत्य केवळ भिक्खूंनांच लागू नाही, तर संपूर्ण मानवजातीला ते लागू आहे. भिक्खू सुद्धा पतित होऊन विनाशाला पोहोचू शकतात. ह्या उलट गृहस्थही ऋषीच्या दर्जापर्यंत पोहोचतात. बुद्धिसंगत - व्यवहार व सदाचार परायण जीवनाद्वारेच श्रेष्ठत्वाचा लाभ होतो.''

**प्रश्न ६५० या जन्मीच्या कर्माचा भविष्यातील जन्मावर परिणाम होतो असे भ. बुद्ध मानीत होते काय ?**

**उत्तर -** नाही. भ. बुद्धांनी कर्माच्या सिद्धान्तावर इतका भर दिला आहे की, कर्मसिद्धान्ताच्या दृढ परिपालनाशिवाय नैतिक सुव्यवस्था अशक्य आहे, असे त्यांचे म्हणणे आहे. ''जसे कराल, तसे भराल'' असे कर्माच्या सिद्धान्ताविषयी सांगणारे भ. बुद्ध हेच सर्वप्रथम होत. परंतु 'कर्म' आणि त्याचा वर्तमान जीवनावर परिणाम, ह्यापुरताच त्यांचा कर्मसिद्धान्त मर्यादित होता. मृत्यूनंतर वास्तव्य असते किंवा वास्तव्य नसते, या विषयाचे उत्तर यांनी अव्याकृत ठेवले (= सांगितले नाही).

**प्रश्न ६५१ : मनुष्याच्या व्यक्तित्वाची ओळख त्याच्या कर्मांमुळेच होते काय ?**

**उत्तर** - होय. आपण कोणाला डॉक्टर म्हणून ओळखतो कारण तो डॉक्टरी करतो. कोणाला इंजिनियर म्हणून ओळखतो, कारण त्याची कर्मे तशी असतात. सज्जन म्हूणन ओळखतो कारण तो तसे वागत असतो. दुर्जन, चोर, खोटारडा, लुच्चा, लफंगा, शूर, धाडशी, देशभक्त, देशद्रोही, समाजकटंक, इत्यादी म्हणून ओळखतो, ते त्यांच्या कर्मांमुळेच. जेव्हा आपण एखाद्या व्यक्तित्वाचे मोजमाप करतो ते त्याच्या प्रकटपणे माहीत असलेल्या संपूर्ण कर्माचे मोजमाप असते. एखाद्याची वाईट कर्मे प्रकटपणे माहीत नसल्यास, त्यास आपण चांगला माणूस असल्याचे मानतो. परंतु कर्माची फळे चिरकालपर्यंत लपून राहत नाहीत व ती उघडकीस येतातच. तेव्हा आपण त्याच्या कर्मानुसार त्याचे मोजमाप करून तसे ओळखतो. (संकलिका) आपण कोणाच्या 'आत्म्याला' पाहू शकत नाही, यास्तव त्याच्या आत्म्यानुसार त्याला ओळखत नाही. बौद्धधम्मात आत्म्याचे अस्तित्वच नाकारलेले आहे व कर्मांचे अस्तित्व व त्यांचा परिणाम यालाच महत्त्व दिलेले आहे.

कर्माचा कोणी 'आत्मा' किंवा 'मी' असा कर्ता नाही. कर्माची स्मृती ठेवणारा कोणी 'मी' अस्तित्वात नाही. कर्माची स्मृती सृष्टीच्या नियमानुसार शरीरातील मेंदू (Brain) मध्ये साठवलेली असते. ती स्मृती म्हणजेच त्या मनुष्याचा स्वभाव होय. (There is not a person that remembers deeds, but the memories of deeds are themselves the person : Karma / Nirvan - Paul Carus : PP 100)

जेव्हा आपण विचार करतो, तेव्हा कोणी विचार करणारा वेगळा 'मी नसतो. 'विचार कर्ता' कोणीही नसतो. ती विचारांची क्रिया असते. ज्याला आपण 'मी' म्हणतो, तो इतर काही नसून आपल्या संपूर्ण विचारांचा समूह (विचारसंच) असतो.

आपण केलेल्या प्रत्येक कर्माचा शिक्का आपल्या स्मृतीवर उमटतो, व स्मृतीचा हा जो समूह त्यालाच आपण 'मी' (किंवा 'आत्मा' किंवा मन) म्हणतो. भूतकाळामुळे वर्तमान काळाची निर्मिती होते. आणि वर्तमान काळापासून भविष्यकाळाची निर्मिती होत असते. हाच तो कर्मसिद्धान्त, कार्यकारण नियम. (Deeds shape in the slow process of growth, the thought-structures, which build-up our personality and that which we call the person the enjoyer, the self, is the totality of our thought forms the living memory of past deeds. Deeds done are stamped upon each creature in the character of his present existance. The past has borne the present and present is the womb of the future. This is the law of karma, the law of deeds, the law of cause and effect : karma/Nirvan-Paul Carus (PP-88)

**प्रश्न ६५२ : पूर्वजन्मीच्या कर्माचा परिणाम मनुष्याच्या वर्तमान जीवनावर होतो, असे भ. बुद्ध मानीत होते काय ?**

**उत्तर** - नाही. कारण असे मानल्यास पूर्वजन्मी दुष्कर्म करणारा गरीब कुळात व सत्कर्म करणारा श्रीमंत कुळात जन्माला आला, असे गृहीत धरावे लागेल आणि माणसाच्या श्रमाला, काहीच स्थान उरणार नाही. हा अत्यंत दुष्ट सिद्धान्त आहे. तेव्हा पूर्वजन्मीच्या 'कर्माचे' संसरण होते (म्हणजे ते माणसासमवेत येते), असे म्हणण्यापेक्षा ते वारसा म्हणून येते असे

म्हणणे अधिक संयुक्तिक आहे. ह्याप्रमाणे वंशपरंपरेच्या नियमानुसार कर्मसिद्धान्ताची कसोटी लावता येते व सिद्धान्ताच्या अभिप्रेत अर्थाला व रूढ अर्थाला बाध येत नाही.

**प्रश्न ६५३ : पूर्वजन्मीच्या कर्माचा वारसा कसा लाभतो ? त्याची प्रक्रिया कशी असते ?**

**उत्तर** – विज्ञानाप्रमाणे प्रत्येक मनुष्यप्राण्याचा उगम मातेच्या गर्भाशयातील रजकण व पित्याचा वीर्यजंतू यांच्या संयोगाने म्हणजे दोन सजीव पदार्थांच्या संयोगाने होतो. ह्या विषयाची चर्चा करण्यासाठी आलेल्या यक्षाला भ. बुद्धांनी सांगितले, ''सर्वप्रथम कलल होतो, नंतर अबुर्द, त्यापासून पेशी तयार होऊन पेशीपासून घन होतो. घनाची वृद्धी होऊन केस व नखे येऊ लागतात आणि माता जे काही अन्न, पेय खाते-पिते, त्यावरच मातेच्या गर्भातील बालक वाढते.'' हिंदु सिद्धान्त ह्याच्या सर्वथा भिन्न आहे. त्याचे म्हणणे असे की, शरीर वंशानुगत मातापित्यापासून प्राप्त होते; परंतु 'आत्म्याचे' तसे नाही. तो शरीरात बाहेरून प्रवेश करतो. परंतु तो कोठून प्रवेश करतो, ह्याचे उत्तर मात्र सिद्धान्त स्पष्ट करू शकत नाही.

**प्रश्न ६५४ : अनुवंशिकतेच्या दृष्टीने पूर्व कर्माचे स्वरूप कसे असते ? 'कर्माला' वंशानुगत प्राप्त गुणविशेष समजावयाचा की, स्वतः संपादिलेला गुणविशेष समजावयाचा ?**

**उत्तर** – विज्ञानानुसार मुलगा वंशपरंपरेने आपल्या मातापित्याचे गुण प्राप्त करतो. पण तो जन्मास आल्यापासून केलेल्या आपल्या चांगल्या-वाईट कर्माच्या परिणामापासून मुक्त होत नाही. त्या कर्मापासून दुसरे नामरूप जन्माला येते. ह्या नामरूपाने केलेली कर्मे सावलीप्रमाणे त्याचा पाठलाग करीत असतात. दुसरे नामरूप जन्माला येणे म्हणजे, क्षणोक्षणी माणसाचे मानसिक व शारीरिक स्थित्यंतर किंवा नवीनीकरण होणे.

भगवंत असेही म्हणतात की, माणसाची स्थिती अनुवंशिकतेपेक्षा त्याच्या भोवतालच्या परिस्थितीवर अधिक अवलंबून असते.

**प्रश्न ६५५ : मनुष्याच्या कर्माचा परिणाम त्याच्या मृत्यूनंतरही इतरांस भोगावा लागतो काय ?**

**उत्तर** – होय. मनुष्याने स्वतः केलेल्या कर्माची फळे त्यास या जन्मामध्येच (म्हणजे शरीरात प्राण असेल तोवर) भोगावी लागतात. तथापि मनुष्याने स्वतः केलेल्या कर्माशिवाय सृष्टीमधील नियमानुसार ज्या घडामोडी होतात (जसे-भूकंप होणे, पूर येणे, दुष्काळ पडणे, ऊन, वारा, पाऊस, थंडी, इत्यादी) त्यामुळे देखील मानवाच्या वाट्यास सुखदुखे येत असतात. ती शारीरिक सुखदुःखे होत. परंतु मानवाच्या स्वतःच्या कर्मामुळे शारीरिक तशीच मानसिक सुखःदुखे निर्माण होतात.

मानवाच्या स्वतःच्या कुशल कर्मामुळे त्याच्या सभोवतालच्या लोकांवर व पुढील येणाऱ्या पिढ्यांवरदेखील कर्माचा परिणाम होतो. भगवंतांनी विशद केलेल्या सुधम्माची फळे आपल्यास आज २५०० वर्षानंतरही मिळत आहेत. बाबासाहेब आंबेडकरांनी जे महत्कार्य केले, त्याची फळे या देशातील दीनदुबळ्या लोकांना आजही मिळत आहेत. भूतकाळातील ज्या ज्या सत्पुरुषांनी कुशल कर्मे केलीत, त्यांची फळेही आपण उपभोगत आहोत. मातापित्यांनी चांगले लालनपालन केले म्हणजे त्यांच्या सत्कर्मांची फळे आपल्यांना

मिळतातच. येणेप्रमाणे इतरजनांच्या कर्माच्या फळांचा परिणाम आपल्यावर होत असतो.

तथापि मनुष्याला स्वतःच्या उन्नतीकरिता स्वतःच कर्मे करावी लागतात. मातापित्यांनी कितीही मदत केली, तरी विद्यार्थ्यांने स्वतःच जर अभ्यास केला नाही व त्यात मन घातले नाही, तर त्यास चांगले फळ मिळूच शकत नाही. म्हणून भगवंतांनी म्हटले आहे -

**तुम्हे हि किच्चं आतप्पं अक्खातारो तथागता ।**

तुम्हाला स्वतःच (कुशल) कर्मे करावयास पाहिजेत (त्याची फळे तुम्हास मिळतील म्हणजेच निर्वाणाची प्राप्ती होऊ शकेल.) तथागत केवळ मार्गदाता आहेत.

## पुनर्जन्म

**प्रश्न ६५६ : भ. बुद्ध पुनर्जन्मास मानीत होते काय ?**

**उत्तर** - होय भ. बुद्धांच्या मते चार भौतिक पदार्थ आहेत, (चार महाभूते) ज्यांच्या योगाने शरीराची रचना होते; ते असे (१) पृथ्वी, (२) जल, (३) अग्नी आणि (४) वायू जेव्हा शरीराचा अंत होतो, तेव्हा आकाशात जे समान भौतिक पदार्थ सामूहिक रूपाने विद्यमान आहेत, त्यांच्यात शरीरातील भौतिक पदार्थ मिसळून जातात. भगवंतांचा पुनर्जन्माविषयी हाच दृष्टिकोण होता. येथे ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे की, शरीराचा अंत होतो, परंतु भौतिक घटक पदार्थ सदैव कायम राहतात. भगवंत केवळ अशा प्रकारच्या पुनर्जन्माला मानीत होते. 'आत्माच्या' पुनरुत्पत्तीवर त्यांचा विश्वास नव्हता; परंतु नामरूपाच्या पुनरुत्पत्तीवर त्यांचा विश्वास होता. त्यांचे मत वर्तमान विज्ञानाशी सर्वथा सुसंगत बसते. विज्ञानाचा एक मुख्य सिद्धान्त असा आहे की, ऊर्जा (Energy) कधीच 'शून्यात' परिणीत होत नाहीत. म्हणून मृत्यूनंतर काहीच बाकी राहत नाही म्हटले तर ते विज्ञानाच्या विरुद्ध होईल. मृत्यूनंतर शरीरातील उष्णता निघून विश्वात संचार करणाऱ्या सर्व शक्तिसमूहाबरोबर मिळून एक होत असते.

**प्रश्न ६५७ : पुनर्जन्माचे चक्र कशा प्रकारे सुरू राहते ?**

**उत्तर** - आम्ही केलेल्या विश्लेषणानुसार भ. बुद्ध दोन प्रकारचे 'पुर्नजन्म' मानीत होते- (१) भौतिक व (२) आध्यात्मिक

भौतिक पुनर्जन्म असा की, विश्वामध्ये चार भौतिक पदार्थ पृथ्वी, जल, अग्नी आणि वायू. यानांच चार महाभूते म्हणतात. जेव्हा शरीरातून चेतना (बल) निघून जाते तेव्हा त्यातील भौतिक पदार्थ त्याच प्रकारच्या सभोवती विद्यमान असलेल्या भौतिक पदार्थात मिसळून जातात. पृथ्वी-कण पृथ्वीमध्ये मिसळतात, जल जलामध्ये मिसळते, अग्नी अग्नीमध्ये मिसळतो व वायू वायूमध्ये मिसळतो. शरीराचा अंत तेव्हा होतो, जेव्हा अशी विपरीत नैसर्गिक स्थिती निर्माण होते की, या चारही महाभूतांना एकत्रित ठेवणारी जी शक्ती म्हणजे चेतना तिचा एकाएकी नाश होतो. चेतना गेल्याबरोबर चारही महाभूते विभक्त (Disintegrate) होतात.

त्याचप्रमाणे चारही महाभूते एका विशिष्ट प्रमाणात एकत्र आल्यावर योग्य नैसर्गिक सुस्थिती निर्माण झाल्याबरोबर चेतनेचा (Vitality किंवा Consciousness) एकाएकी

प्रादुर्भाव होतो. चेतना निर्माण होते व ती चारही महाभूतांना एकत्रित ठेवते. (त्यांचे Integration सुरूच ठेवते) विश्वातील चारही महाभूतांना योग्य प्रमाणात आत्मसात करीत कालक्रमण करते. पुढे एक वेळ अशी येते की, विपरीत नैसर्गिक स्थिति निर्माण होऊन चेतना एकाएकी नाश पावते व शरीरातील चारही महाभूते सभोवतालच्या समगुणधर्मीय महाभूतांमध्ये विलीन होतात. असे हे कालचक्र सुरूच राहते. येणेप्रमाणे शरीराचा भौतिक पुनर्जन्म होत राहतो. (Conscisusness originates as the product of conditions and disappears as condtions cease). नैसर्गिक योग्य स्थिती उत्पन्न होतांच चेतना उद्भवते, व तिच्या अस्तित्वासाठी आवश्यक असलेली नैसर्गिक स्थिती बदलली किंवा लुप्त झाली, तर चेतनेचाही लोप होतो. कर्म/निर्वाण पॉल कॅरस)

आध्यात्मिक पुर्जजन्म असा - आध्यात्मिक पुनर्जन्म म्हणजे याच भौतिक जन्मी चित्ताची अशुद्धता दूर करावयाच्या ज्या दहा क्रमवार अवस्था आहेत, त्यांनाच एका अवस्थेला ओलांडून दुसऱ्या अवस्थेमध्ये प्रवेश करणे होय (यालाच पुनर्जन्म म्हटले आहे) उदा. पहिला जन्म 'मुदिता' प्राप्त केल्यावर संपतो. दुसरा जन्म विमलाभूमीला पोहोचल्यावर संपतो. तिसरा प्रभाकारी भूमी, चौथा अर्चिष्मती भूमी, पाचवा सुदूर्जया भूमी, सहावा अभिमुखी भूमी, सातवा दुरंगमा भूमी, आठवा अचलभूमी, नववा साधूमती भूमी व दहावा जन्म धम्ममेधा होऊन म्हणजेच बुद्धाची दिव्यदृष्टी प्राप्त करून मनुष्य बुद्धत्वास प्राप्त करतो.

**प्रश्न ६५७ (अ) : प्रतीत्यसमुत्पादाचा सिद्धान्त विज्ञानसंमत (Science ला अनुसरून) आहे तो कसा ?**

**उत्तर** - प्रतीत्यसमुत्पादाचा सिद्धान्त कार्यकारण नियमाचे अनुमोदन करतो. तसेच बीज-फळ-बीज-फळ या नियमानुसार अविरत चालणाऱ्या चक्राचे अनुमोदन करतो. निसर्गाचे नियम अतूट आहेत आणि त्यांच्यामुळेच संपूर्ण विश्व एकसूत्रात बांधलेले आहे. निरंतर उत्पाद-व्यय होणे, हाच सृष्टीचा नियम आहे. सर्वच गोष्टी अनित्य आहेत; परिवर्तनशील आहेत. नित्य (सनातन) काहीही नाही. कारणाशिवाय कार्य उत्पन्न होत नाही. विज्ञानाचे (Science) हेच सांगणे आहे की, कार्यकारण परंपरा सतत सुरू असते. जसे बीज, तसेच फळ मिळते.

**प्रश्न ६५८ : पुनर्जन्म कोणाचा ?**

**उत्तर** - भ. बुद्धांनी ही गोष्ट अव्याकृत (स्पष्ट न करता) ठेवली आहे. भिक्खुणी खेमा हिने राजा प्रसेनजिताला ''मरणानंतर तथागत राहतात किंवा नाही'', ह्या प्रश्नाचे उत्तर देताना हे स्पष्ट केले आहे. ''ज्याप्रमाणे समुद्र अमर्याद खोल आहे, त्याच्या तळापर्यंत पोहोचणे शक्य नाही, त्याचप्रमाणे तथागतांच्या रूपावरुन, वेदनेवरून, संज्ञेवरून, संस्कारावरून, विज्ञानावरून तथागतांना मापावयाचे असल्यास असे दिसेल की, तथागतांचे रूप, वेदना, संज्ञा, संस्कार, विज्ञान परित्यक्त आहेत, जडामुळापासून समूळ नष्ट झाले आहेत, ते विमुक्त झाले आहेत; त्यांच्या पुनरुत्पत्तीची संभावना नाही. महाराज, उलटपक्षी तथागतांच्या रूपावरुन, वेदनेवरून, संज्ञेवरुन, संस्कारावरून व विज्ञानावरुन त्यांना खोलवर पूर्णपणे ओळखता येणे शक्य नाही. कारण तथागत धीरगंभीर आहेत, असीम आहेत; समुद्राप्रमाणेच

त्यांच्या तळाचा थांगपत्ता लागत नाही. म्हणून मरणानंतर तथागतांच्या अस्तित्वाविषयी किंवा अनस्तित्वाविषयी विधान त्यांना लागू पडत नाही.''

**प्रश्न ६५९ : मृत्युनंतर जीवनाचे काय होते, याला अव्याकृत प्रश्न का म्हटलेले आहे?**

**उत्तर** - एकदा स्थविर महाकाश्यप आणि स्थविर सारिपुत्र वाराणसीजवळील ऋषिपतन मृगदावामध्ये थांबलेले असताना त्यांनी चर्चा केली. काय तथागत मरणानंतर देखील वास्तव्य करतात की करीत नाहीत ? किंवा करतातही आणि करीत नाहीदेखील? तेव्हा त्यांना असे उत्तर मिळाले की, ह्या गोष्टीविषयी भगवंतांनी काहीच म्हटलेले नाही, अव्याकृत ठेवलेले आहे.कारण ह्या प्रकारच्या प्रश्नाचे उत्तर दिल्याने माणसाचा कसल्याही प्रकारचा लाभ होत नाही. त्यामुळे श्रेष्ठ जीवनाचा आरंभ किंवा प्रज्ञेची प्राप्ती किंवा निर्वाणाप्राप्त मार्गाची प्राप्ती होत नाही. यास्तव भगवंतांनी या गोष्टीला अव्याकृत ठेवलेले आहे.

**प्रश्न ६५९ (अ) : बौद्धधम्मामध्ये जीवनप्रवाहाचे अस्तित्व ह्या शरीराच्या पूर्वी असल्याचे आणि नंतरदेखिल असल्याचे मानतात, ते का ?**

**उत्तर** - शिशूच्या जन्मासोबतच त्याच्या जीवनाचा प्रारंभ होतो. शिशू काय असतो-शरीर आणि मन यांचा समुदाय. शरीरदेखील एकेरी नसते; तो अनंत अणूंचा समुदाय असतो. क्षणोक्षणी शरीरात परिवर्तन होत असते. त्याचप्रमाणें मनातदेखील परिवर्तन होत असते. फरक एवढाच की, मन सूक्ष्म असते, त्यामुळे त्यातील फरक समजणे कठीण असते. आत्मा इतर काही नसून मनालाच आत्मा म्हटलेले आहे; आणि मन क्षणोक्षणी बदलत असते.

शरीर आणि मन (= आत्मा) दोन्ही क्षणोक्षणी बदलत आहेत. मुलाच्या कुठल्याही क्षणीच्या जीवनाचे अवलोकन केल्यास त्या क्षणीचे जीवन त्याच्या पूर्वीच्या काळाशी संबंधित असलेले दिसून येईल.

जर असे म्हटले की, मातापित्यांचे शरीर ज्याप्रमाणे आपल्या अनुरूप मुलास जन्म देते, त्याचप्रमाणे त्यांचे मन तदनुरूप पुत्रास जन्म देते, तर ते काही मर्यादेपर्यंत कबूल करता येईल. परंतु ही गोष्ट सर्वांशाने बरोबर वाटत नाही. जर असे असते, तर मंदबुद्धी मातापित्यांना प्रतिभाशाली पुत्र किंवा प्रतिभाशाली मातापित्यांना मंदबुद्धी पुत्र उत्पन्न झाले नसते. ह्या सर्व अडचणी दूर व्हावयास आपल्याला असे मानावे लागेल की, ह्या जीवनप्रवाहास शरीराहून वेगळे असे, शरीराच्या पूर्वीपासून अस्तित्व असते असे मानल्यास आपण म्हणू शकतो की प्रत्येक पूर्वीचे जीवन, नंतरच्या जीवनास निर्माण करते. म्हणजेच तो जीवनप्रवाह असतो, सतत बदलणारा आणि प्रवाहाची पुढची स्थिती ही त्याआधीच्या स्थितीवर अवलंबून असणारच.

प्रतिभाशाली बाळाची बुद्धी आधीच्या चिर अभ्यासामुळे सुसंस्कृत राहते. मानसिक अभ्यास स्मृतीच्या रूपाने पूर्णतः जसाच्या तसाच शाबूत राहत नाही व तो तसा राहिलाच पाहिजे ह्याची आवश्यकतादेखील नसते. बाळाच्या लहानपणात झळकणाऱ्या प्रतिभेला पूर्वीच्या अभ्यासाचा परिणाम असल्याचे का मानू नये. (डार्विनच्या Theory of evaluation = उत्क्रांतीच्या नियमानुसार मातापित्यांनी केलेल्या कर्मामुळे आणि त्यांच्या काही अंशी बदललेल्या सवयीमुळे दिसून येते की, त्यांच्या संततीमध्ये ते गुण अधिक विकसित झालेले

आहेत : संकलिका) या क्रमानुसार विचार केल्यास आपल्यास दिसून येते की, आपला हा जीवनप्रवाह एका सुदीर्घ जीवनप्रवाहाचा एक लहानसा मधला केवळ अंशमात्र आहे; ज्याचा पूर्वकालीन प्रवाह चिरकाळापासून वाहत आहे आणि पुढेही तो चिरकाळपर्यंत राहणार. जीवनात आपण त्याचा प्रभाव झालेला बघतो. तसेच व्यक्ती आणि समाज, पुढे अधिक चांगले जीवन जगावयाची आशा बाळगून तेव्हाच प्रयत्न करतील, जेव्हा ते जीवनाच्या संस्कृतीला एका विशिष्ट काळांत केलेल्या कर्माच्या परिणामस्वरूप बघू शकतील. याचा आरंभ तृष्णेमुळे (मोह आणि स्वार्थामुळे) होतो आणि तृष्णेचा नाश झाला की त्याचाही (जीवन प्रवाहाचा) देखील नाश होतो.

जीवन प्रवाहास पूर्वीपासूनच येत असल्याचे आणि तो पुढेही तसाच सुरू राहणार असल्याचे मानल्यास, आपण अगदीच निकम्मा असणाऱ्या माणसाच्या मनातदेखील चांगले व्हावयाची आशा जागृत करू शकतो (व त्याला कुशल कर्मे करावयास प्रेरित करू शकतो) असे झाल्यानेच माणूस स्वतःच्या चांगल्या-वाईट कर्माच्या जबाबदारीला समजू शकेल आणि इतर कुणावर अपकार करण्यापासून परावृत्त होऊ शकेल. समाजाच्या हितासाठी आपल्या स्वार्थाचे बलिदान करावयास तो तयार होऊ शकेल. समाजाच्या हितासाठी स्वतःचे बलिदान करावयाची तयारी दाखविणे आणि समाजावर अपकार न करण्याचा निग्रह करणे, ह्या दोन्ही गोष्टी जगास अधिक चांगले बनविण्यास अनिवार्य आहेत तसेच आवश्यकदेखील आहेत. लोकोन्नती बहुधा याच गोष्टींवर अवलंबून असते. याच शरीराला आदी आणि अंतिम मानल्यास त्या दोन्ही गोष्टींकरीता माणसाला प्रेरक करावयाच्या गोष्टींचा अभाव राहील आणि त्यामुळे माणसाच्या वर जावयाच्या गतीला अवरोध उत्पन्न होईल.

**प्रश्न ६६० : पुनर्जन्माचा सिद्धान्त कशावर आधारलेला आहे ?**

**उत्तर** - अगदी तंतोतंत न्याय, समतोलपणा आणि आपोआपच होणारे आवश्यक फेरबदल हीच निर्सगाची प्रणाली सर्वत्र लागू होते असे गृहीत धरलेल्या सिद्धान्तावर बौद्धजनांचा विश्वास आहे. व्यक्तीच्या वेगवेगळ्या जीवनातील प्रबळ असणाऱ्या पवित्र किंवा पापमय इच्छेनुसार पुर्नजन्मांचे हे महाचक्र कमी-अधिक गतीने धावतच राहते. ही श्री. ऑलकॉट यांनी केलेली व्याख्या होय.

**प्रश्न ६६१ : ह्याच जन्मी दुःखाचा अंत करणे संभवनीय आहे काय ?**

**उत्तर** - होय.एकदा भगवान राजगृहात गृध्रकूट पर्वतावर विहार करीत होते. अनेक जैन साधू ऋषिगिरीच्या कला-शिलेवर आसनाचा त्याग करून, उभ्या उभ्या नाना प्रकारचे कष्ट सहन करताना त्यांना दिसले. त्यांनी त्या साधूंना विचारले; ''भिक्खूंनो ! काय तुम्ही निश्चयपूर्वक जाणता की, या जन्मापूर्वी तुमचे अस्तित्व होते ? असे नव्हे की, ते नव्हतेच!''

''आयुष्मान! नाही.''

भ. बुद्धांनी विचारले; ''भिक्खूंनो! काय तुम्ही जाणता की, तुम्ही पूर्वजन्मी निश्चितपणे पापकर्म केलेच आहे, असे नव्हे की, केलेच नाही ?

''आयुष्मान! नाही.''

भगवंतांनी विचारले, '' भिक्खूंनो! काय तुम्ही जाणता की, एवढा दुःखनाश झाल्याने सर्व

दुःखांचा नाश होईल ?''
''आयुष्मान ! नाही. ''
अशा प्रकारे भगवंतांनी दाखवून दिले की, पूर्वजन्माविषयी काहीच माहीत नसताना, त्याच्या आधारावर आणि भावीजन्माविषयी काहीच माहीत नसताना त्याच्याही आधारावर जी जीवन-चर्चा निश्चित केली जाते, ती वाळूच्या भिंतीसारखी निराधारच असते.

* * * *

# काही प्रश्नांवरील टिपा

**प्रश्न १७३ : बौद्धधम्म म्हणजे काय ?**

टीप १ : धर्म ही संज्ञा, (इतर धर्माकरिता योजतात त्या अनुषंगाने) बौद्धधम्मास योजणे हे सर्वथा अनुचित होय. कारण तो (त्या अर्थाने) धर्म नसून ते एक नैतिक तत्त्वज्ञान आहे व तसे मी (कर्नल ऑलकॉट) पुढे सिद्ध केलेले आहे. परंतु विशिष्ट नैतिक तत्त्वप्रणालीचे प्रतिपादन करणाऱ्या लोकसमूहाला, अमुक अमुक धर्माचे लोक अशा प्रकारच्या सामान्य उपयोगाने धर्म हा शब्द रूढ झालेला आहे आणि आकंडेशास्त्रज्ञांनीही त्याला तशाच प्रकारे उपयोगात आणलेला आहे. मूळ लॅटिन व्युत्पत्तीविषयी बौद्ध-सिंहली लोकांना आतापावेतो काहीच कल्पना नव्हती की, युरोपीयन लोकांनी या शब्दांचा कोणत्या अर्थाने उपयोग केलेला आहे. ख्रिश्चन मतानुसार काही गोष्टी बंधनकारक आहेत, तशी कोणतीच गोष्ट त्यांच्या संप्रदायात नाही. जसे, आत्म्याचे दैवी प्राणिमात्रामध्ये मिळून जाणे किंवा अधीन होणे ह्यासारखे बंधन. 'आगम' या त्यांच्या मातृभाषेतील शब्दानेच भ.बुद्ध आणि बौद्धधम्म यांच्याशी त्यांचा असलेला संबंध दर्शविला जातो. तो शुद्ध संस्कृत शब्द असून त्याचा अर्थ 'पोचणे किंवा येणे' असा होतो. बुद्धत्व म्हणजे ज्ञानप्राप्ती. यास्तव 'बुद्धागम' या संयुक्त शब्दायोगे ते बौद्धधम्माची ओळख देतात. 'बुद्धागम' म्हणजे 'ज्ञानप्रकाशाकडे पोचणें किंवा आगमन' ह्या अर्थानेच त्याला समजायला हवे. किंवा शाक्यमुनींच्या धर्माला अनुसरणे असेही म्हणता येईल. खिस्तीमिशनरी लोकांनी 'आगम' ह्या सुटसुटीत शब्दाला पाहून 'बौद्ध तत्त्वज्ञानाचे' सरळ सरळ 'खिश्चनागाम' म्हणून लिहिले. खरे म्हणजे त्यास 'खिश्चन-बंधन' असे म्हणावयास हवे होते. कारण बंधन हा शब्द धर्माशी व्यत्पत्तीदर्शक समानार्थी आहे. 'विभाज्यवादी'-पृथ्थकरण करणारा किंवा मूळ तत्त्वांना विशद करणारे - असे बौद्धांना दिलेले दुसरे नाव आणि 'अद्वयवादी' हे तिसरे नाव होय. ह्याप्रमाणे सामान्य वाचकांच्या सोयीकरिता स्पष्टीकरण देऊन आणि 'धर्म' शब्दाविषयी निषेध प्रकट करून, बौद्धतत्त्वज्ञानाची माहिती देतांना 'धम्म' या सुपरिचित शब्दाचाच उपयोग यापुढेही करण्याचे मी (कर्नल ऑलकॉट) ठरविले आहे. (आम्ही 'धर्म' या संस्कृत शब्दाऐवजी 'धम्म' हा पाली शब्द योजिला आहे. - संकलिका)

**प्रश्न २२८ : मनुष्याच्या वेगळ्या 'आत्म्याची' कल्पना जर आपण नाकारली, तर मनुष्याचे वेगळे व्यक्तिमत्व असल्याचा कोणता पुरावा आहे ?**

टीप २ : 'तृष्णा' किंवा जीवनाची दुर्दम्य लालसा हाच तो पुरावा. जीवाने जसे केले त्या कर्मानुसार त्याला भविष्यात पुण्य किंवा पाप मिळायलाच पाहिजे. आणि तृष्णेमुळे तो जी कर्मे करील, कर्मांच्या फळानुसार त्याचा पुर्नजन्म (म्हणजे विचाराचा बदलाव) होईलच. (संकलिका)

जन्म म्हणजे 'स्कंधांचा' नवीन समूह, किंवा मृत व्यक्तीच्या अंन्तीम क्षणी उत्पन्न झालेल्या विचारांद्वारे घडलेले व्यक्तिमत्त्व.

कर्नल ऑलकॉट म्हणतात - एका किंवा अनेक भूप्रदेशावर अनुक्रमाने पुनःपुन्हा होणारे प्रकटीकरण किंवा एखाद्या व्यक्तीच्या तृष्णासंलग्न अवयवांची (= स्कंधांची) पिढ्यानूपिढ्या

होणारी उत्पत्ती म्हणजेच व्यक्तिमत्वाचे जन्मानुजन्म होणारे प्रकटीकरण होय. प्रत्येक जन्मात व्यक्तिमत्त्व बदलत असते.कधी साधूच्या व्यक्तित्त्वात तर कधी कारागिराच्या; आणि अशा रीतीने जन्मांच्या मालिकेच्या रूपाने कर्म स्वतःस प्रकट करते. (किंवा जन्मरूपी बुरख्यामधून पुढे पुढे सरकते) परंतु जरी व्यक्तिमत्त्व नेहमी बदलत असले तरी ती माण्यासारखी एका मालिकेमध्ये ओवल्याप्रमाणे जीवनाच्या रांगेमध्ये मालिकेस न तुटू देता पुढे सरकत असतात व नेहमीच एका विशिष्ट ओळींमध्ये असते. म्हणून ते व्यक्तिविशेष असते.तो व्यक्तिविशेष जीवनावश्यक चढउतार असतो. जो कर्मांच्या आघाताखाली आणि तृष्णेने उत्पन्न केलेल्या परिस्थितिनुसार, जी दिशा मिळेल त्यानुसार, निसर्गाच्या इंद्रियगोचर स्वभावानुसार दौडत जात असते आणि निसर्गचक्राच्या परिवर्तनांनी देखील टिकून राहते. प्रो. (श्रीमती) ऱ्हीस डेव्हिडस् म्हणतात - जे एका साखळीद्वारे एका व्यक्तिंत्वापासून दुसऱ्या व्यक्तीमध्ये जाते, त्याला 'स्वभावधर्म' किंवा 'कर्म' म्हणता येईल. 'स्वभावधर्म' म्हणजे केवळ तत्त्वज्ञानविषयक (Abstraction) नव्हे; तर माणसांच्या मानसिक गुणांची व स्वाभाविक अशा नैतिक प्रवृत्तीची ती गोळाबेरीज असते. जर आपण जीवनाच्या चढउतारास एक वेगळे व्यक्तिविशेष (Individuality) समजलो आणि त्याचा पुन्हा पुन्हा होणाऱ्या गर्भधारणेला व्यक्तिमत्त्व (Personality) समजलो तर ज्याला प्रो. ऱ्हाइस डेव्हीडस् यांनी 'रहस्यावरील निर्वाणीचा उपाय' असा टोमणा मारलेला आहे. (पहा पृष्ठ - १०१, Buddhism) त्यास यथायोग्य उत्तर देता येणार नाही काय ? दोन विचारांतील फरक दाखविण्यास आपण दोन शब्द वापरायला पाहिजेत; आणि मी निवडलेल्या ह्या दोन शब्दांइतके स्पष्ट आणि अर्थपूर्ण दूसरे शब्द सापडत नाहीत. बौद्ध दृष्टिकोणाप्रमाणे पूर्णत्वास प्राप्त केलेली (अन्योन्य) व्यक्ती म्हणजे स्वतः बुद्धच होणे. मी तर असे म्हणेन की, पराप्राकृतिक आणि अमानवीय अशा अद्भुत स्वभावाची यत्कींचितही भेसळ नसलेले दुर्लभ फूल म्हणजेच 'बुद्ध' आणि ज्याप्रमाणे असंख्य पिढ्यानुपिढ्या 'चार असंख्य आणि शंभर हजार जन्म' (फॉसबॉल आणि प्रो. ऱ्हीस डेव्हिडस् यांच्या 'बुद्धिस्ट बर्थ स्टोरीज, क्रमांक १३ मध्ये नमूद केल्याप्रमाणे) मनुष्याचा विकास होत होत मगच बुद्धत्व प्राप्त होते. व एका मागून एक याप्रमाणे पुनर्जन्म घेत असताना प्रत्येक जन्मी बुद्धत्वास प्राप्त करण्याच्या दुर्दम्य महत्त्वाकांक्षेने सतत पाठपुरावा करणाऱ्या अशा त्या आकांक्षेला आणि दीर्घ प्रयत्नांना आपण काय म्हणावे ? त्याला स्वभाव म्हणावे की व्यक्तिविशेष ? त्याला व्यक्तिविशेष म्हणायला हवे. परंतु प्रत्येक जन्माचे आंशिकरीत्या व्यक्त केलेले तथापि सर्वच जन्मांमधून थोडा थोडा अंश घेऊन स्थापन झालेले, असे त्या व्यक्तिविशेषांचे वर्णन करता येईल.

भ. बुद्धांचा आत्म्याच्या अस्तित्वास नकार, (पहा संयुक्तनिकाय) त्यावेळी प्रचलित असलेल्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाच्या भ्रामक कल्पनेचा पडदाफाश करतो. एका जन्मानंतर निश्चित ठिकाणी किंवा अवस्थेला जाईल व तेथे पूर्णत्वास पोहोचल्याच्या अवस्थे (entity) प्रमाणे चिरकाल आनंद उपभोगील किंवा दुःख उपभोगील, आणि तो असे दाखवितो की, 'मी तोच आहे' अशी सनातनत्वाची जाणीव करून देतो, ते तसे करणे तार्किकदृष्ट्या अशक्य आहे.कारण त्याचे प्राथमिक घटक सतत बदलत असल्यामुळे एका जन्मातील 'मी' दुसऱ्या प्रत्येक जन्मातील 'मी' पेक्षा वेगळा असलाच पाहिजे. परंतु मला बौद्धधम्मात आढळलेल्या

प्रत्येक गोष्टींमध्ये मूळ उत्पत्तीच्या सिद्धान्तानुसार माणूस हळूहळू पूर्णत्वास प्राप्त होऊन ज्यास 'बुद्धत्व' म्हटले आहे. त्या स्थितीला क्रमाक्रमाने प्राप्त करतो, हे उत्क्रांतीच्या मताशी जुळते, आणि त्या व्यक्तीच्या चेतने (Consciousness) मध्ये पुनर्जन्माची ठरावीक साखळी संपल्यावर शेवटी बुद्धत्व प्राप्त करतो; किंवा ध्यानाची चवथी अवस्था प्राप्त करण्यात विजयी होतो की ज्यामुळे त्याला आपल्याला कोणत्याही जन्मातील आदीपासून अंतापर्यंतच्या संपूर्ण जन्ममालिकेची दृश्ये दिसू लागतात. 'जातककथावर्णन, ज्याचे प्रो. ऱ्हीस डेव्हिडस यांनी अतिशय उत्तमप्रकारें भाषांतर केलेले आहे. त्यात एक संबोधन वारंवार दृष्टीस पडते व माझ्या मतानुसार ह्या कल्पनेला दुजोरा देते, ते असे- 'त्यानंतर भ. बुद्धांनी जन्माच्या परिवर्तनामुळे लपलेली गोष्ट स्पष्ट केली' - किंवा 'जन्माच्या परिवर्तनामुळे जे लपले गेलेले होते, ते उघड केले.' - इत्यादी ह्यावरून हे स्पष्ट होते की, सुरुवातीच्या काळी अशी कल्पना होती की, पूर्वजन्मांची हकिकत काय राहते आणि मनुष्याने व्यक्तिशः खऱ्या ज्ञानाच्या अवस्थेप्रत विकास केला म्हणजे. त्याची अव्यक्त शक्ती प्रकट होऊन आकाशात कायम राहिलेल्या पुनर्जन्माच्या अव्यक्त हकिकतीचा ठसा तो पाहू शकतो. मरतेवेळी व गुंगीमध्ये असताना, आंचके देताना, तृष्णेने तयार केलेल्या सर्वांत शेवटच्या वस्तूमध्ये 'जीवनचित्ताचे' (Jivan Chitta) स्थलांतर होते. जगण्याच्या तीव्र इच्छेने सर्व विचार उद्दिष्टांमध्ये परिवर्तित होतात.

**प्रश्न २३९ : असे कोणते कारण आहे की, ज्यामुळे पाच स्कंधांच्या संयोगाने झालेले एक व्यक्तिमत्त्व दुसऱ्या व्यक्तिमत्त्वापासून भिन्न ठरते ?**

टीप ३ : प्रत्येकाच्या मागील जन्माच्या कर्मांचा विपाक होऊन उद्‌भवलेल्या परिणामामुळे प्रत्येक चेतनेचे (Consciousness) भिन्न भिन्न व्यक्तिमत्त्व हळूहळू निर्माण होते. स्कंधांचा हा नवीन समूह म्हणजे एका अर्थाने पाहिल्यास तो नवीन जीव आहे; दुसऱ्या अर्थाने पाहिल्यास तो नवीन नाही. पाली भाषेमध्ये म्हटले आहे, 'नच सो, नच अन्यो' म्हणजे पूर्णतः तोच नव्हे तथापि पूर्णतः दुसराही नव्हे. स्कंधांचे सतत स्थित्यंतर होत असते् शरीरशास्त्रदृष्ट्या असे म्हटले जाते की, मनुष्याच्या शरीराच्या प्रत्येक घटकाची सात वर्षांत पुर्नस्थापना (Replacement) होते.

समजा कोणी 'अ' माणूस चाळीस वर्षांचा असून त्याच्यासारखेच व्यक्तिमत्त्व असणाऱ्या दुसऱ्या अठरा वर्षांच्या ब तरुणाशी तंतोतंत जुळणारा असेल, तथापि त्याच्या शरीराची सतत होणारी झीज आणि वाढ, तसेच मनाचा व स्वभावाचा होणारा बदल, यामुळे तो एक वेगळाच मनुष्य होतो. तरीसुद्धा मनुष्य आपल्या वृद्धावस्थेत आपल्या जीवनाच्या प्रत्येक पूर्वीच्या अवस्थेमधील आपल्या विचारांचा व कृतींच्या परिणामस्वरूप त्यांचे फळ अगदी भोगतोच. अशा रीतीने पुनर्जन्म झालेला नवीन मनुष्य, पूर्वीसारखे तेच व्यक्तिमत्त्व घेऊन, परंतु बदलत्या रूपाने किंवा स्कंधांच्या नवीन समूहासह, पूर्वीच्या अस्तित्वातील आपल्या विचारांचे व कृतींचे परिणाम अगदी बरोबर भोगतो.

**प्रश्न २४०: प्रौढ मनुष्य, त्याचा शारीरिक व मानसिक बदल झालेला असला तरीही आपल्या तारुण्यातील प्रसंगांना जागवू शकतो. तर मग मागील जन्माची स्मृती आपल्या अंतिम जन्माद्वारे वर्तमान जन्मात आपल्याबरोबर का आणता येत नाही ?**

टीप ४ : नवीन स्मृतीमध्ये ह्या नवीन जन्माची नोंद होते. तथापि पृथ्वीवरील संपूर्ण पूर्वजन्माचा इतिहास किंवा त्याचे प्रतिबिंब अस्तित्वात राहतेच; कारण जेव्हा राजकुमार सिद्धार्थास बुद्धत्व प्राप्त झाले, तेव्हा त्यांच्या मागील जन्मातील संपूर्ण अनुक्रम त्यांना दिसून आला. जर त्यांच्या पूर्वजन्मातील घटनांचे लवलेशही शिल्लक उरले नसते, तर हे शक्य होऊ शकले नसते.कारण त्यांच्याकरिता पाहायला काहीही शिल्लक राहिले नसते. जो कोणी ध्यानाची चवथी अवस्था प्राप्त करील, तो प्रत्येकजण अशा प्रकारे पूर्वजन्मींच्या संगतीचा म्हणजे (psychical insight चा) छडा लावू शकतो.

(Perhaps this is being said to show that he had achieved extra-ordinary powers of knowing about previous births. Even Arhats of his time (Great Disciples of Buddha) did not have these powers- This may be only an exageration, as can be concluded from the present-day knowledge of science. Or else it is possible that the modern science is yet to discover the knowledge which the Buddha had acquired : संकलिका.)

**प्रश्न २५४ : मनुष्य केवळ ह्या पृथ्वीवरच जन्म घेतो, असे बौद्धधम्म शिकवितो काय ?**

टीप ५ : भूमंडळावर एखाद्या व्यक्तीला पुढचा जन्म घ्यायचा असेल ते भूमंडळ व त्याचप्रमाणे त्याच्या पुनर्जन्माचे स्वरूप (म्हणजे कोणत्या रूपाने पुनर्जन्म घ्यावयाचा) ह्या गोष्टी त्या व्यक्तीच्या गुणदोषाच्या प्राबल्यानुसार निर्णयास निघतात. दुसऱ्या शब्दात सांगायचे झाल्यास, विज्ञानाशास्त्राच्या नियमात सांगितल्याप्रमाणे त्याचे कर्म ज्या जन्माला आकर्षित करील, त्यानुसार त्याचा पुढील जन्म होईल, असे आणि बौद्धजन म्हणतात.

**प्रश्न २७९ : प्रत्येक बौद्धाला अनुसरण्यास योग्य असे तीन मार्गदर्शक कोणते ?**

टीप ६ : सरणं-विजेसिन्हा मुदलियार श्री. ऑलकॉट यांना लिहितात, 'आतापर्यंत ह्या शब्दाचे अतिशय अयोग्य रीतीने आणि चुकीने युरोपीय पाली विद्वानांनी 'आश्रय' (Refuge) असे भाषांतर केलेले आहे; आणि स्थानिक पाली विद्वानांनी अविचाराने ते तसेच स्वीकारले आहे. पाली शब्दाच्या व्युत्पत्तीच्या दृष्टीने किंवा बौद्ध तत्त्वज्ञानाच्या दृष्टिनेही हे भाषांतर बरोबर नाही, हा शब्दा 'Refuge' 'आश्रयस्थान' किंवा 'पळून जाणे' ह्या अर्थाने बौद्ध धम्माच्या तत्त्वज्ञानाशी अगदीच विसंगत आहे. कारण बौद्धधम्म प्रत्येक मनुष्याला त्याच्या मुक्तीचा मार्ग स्वतःच प्रशस्त करण्याचा आग्रह धरतो. संस्कृतात मूळ शब्द 'स्त्र' किंवा पालीमधील 'सर' किंवा हलणे किंवा जाणे, म्हणूनच 'सरण' म्हणजे 'हलणे' किंवा तो जो कुणाच्या पूर्वी किंवा कुणासोबत जाणारा' म्हणजेच 'मार्गदर्शक' किंवा 'मदतगार' यास्तव मी 'गच्छामि' चा अर्थ 'मी जातो' ' बुद्धम्' म्हणजे बुद्धाकडे', 'सरणम्' म्हणजे 'माझा मार्गदर्शक म्हणून त्याचप्रमाणे 'त्रिसराचे' भाषांतर 'तीन आश्रय' असे केल्याने अतिशय

चुकीचा समज निर्माण करण्यास ते कारणीभूत झाले आहे. ह्यामुळे बौद्धांच्या विरोधकांना हा एक अगदी उत्तम बहाणा मिळालेला आहे, की बौद्धजन सध्या हयात नसलेल्या म्हणजेच कपोलकल्पित व्यक्तीला शरण जातात, व येणेप्रमणे असत्यावर विश्वास ठेवतात. आश्रय हा शब्द निर्वाणाला अधिक लागू होतो- 'सरण' हा त्याचा प्रतिशब्द आहे. पाली मूळ शब्द 'सर' ह्याचा दुसरा अर्थ ठार माणे, किंवा नाश करणे असा होतो, ह्या गोष्टींकडे महाथेरो सुमंगल ह्यांनीसुद्धा माझे लक्ष वेधले. 'बुद्धं सरणं गच्छामी' ह्याचे भाषांतर असे करायला हवे की, 'मी बुद्धाकडे जातो.' तसेच 'धम्माकडे जातो, संघाकडे जातो, कारण बुद्ध आपल्या उपदेशाद्वारे, धम्म आपल्या स्वयंसिद्ध सत्याद्वारे आणि संघ आपले शील व निरनिराळी उदाहरणे, यांच्याद्वारे मला भयापासून मुक्ती प्रदान करतात.

**प्रश्न २८३ : भ. बुद्धांनी आपल्या पूर्वीच्या पांच सोबत्यांना (पंचवर्गीय भिक्खू) उद्देशून केलेल्या पहिल्या प्रवचनाला आपण काय म्हणतो ?**

टीप ७ : धम्मचक्रप्रवर्तन सुत्त ह्याला श्री.एल. कार्नेली विजेसिन्हा यांनी 'धम्माच्या राज्याची स्थापना' असे म्हटलेले आहे, तर प्रो. ऱ्हीस डेव्हिडस् त्याला 'सदाचरणाच्या राज्याची स्थापना' असे म्हणतात. श्री विजेसिन्हा श्री. ऑलकॉट यांना लिहितात, 'तुम्ही त्याला सदाचरणाचे राज्यसुद्धा म्हणू शकता. परंतु त्यामुळे त्याचा कल तत्त्वज्ञानविषयक नीतितत्त्वाऐवजी हठवादी 'ब्रह्मज्ञानाकडे' अधिक झुकलेला दिसेल. 'धम्मचक्रप्रवर्तन सूत्र' हे 'धम्माच्या राज्याची स्थापना' ह्या नांवाने दिलेले प्रवचन आहे.

**प्रश्न ३९६ बौद्धधम्म हा हिंदू धर्माचाच भाग आहे, हिंदू धर्माचाच एक पंथ आहे असे काही जण म्हणतात, ते खरे आहे काय ?**

टीप ८ : ते मुळीच खरे नाही. ते धादांत खोटे आहे. बौद्धधम्माचे तत्त्वज्ञान हिंदू धर्माच्या तत्त्वाज्ञानाकडून मूलतः भिन्न आहे. त्यांतील ठळक भेद येणेप्रमाणेः

१) हिंदू धर्म आत्म्याच्या अस्तित्वास मानतो. बौद्धधम्म 'अनात्म' तत्त्वास मानतो, म्हणजे आत्म्याचे अस्तित्व नाही असे मानतो.

२) हिंदू धर्म परमात्मा किंवा ईश्वराच्या अस्तित्वाच्या तत्त्वास मानतो. त्याच्या अगणित देवी-देवता आहेत, जसे ब्रह्मा, विष्णू, शंकर, राम, श्रीकृष्ण, इंद्र वगैरे. येणेप्रमाणे ३३ कोटी देवीदेवता असल्याचे ते सांगतात. परंतु भ. बुद्ध स्वतःला ईश्वर किंवा परमात्मा मानीत नव्हते, बौद्धजन त्यांना महामानव किंवा महापुरुष मानतात.

३) हिंदू धर्मात समाजव्यवस्था चातुर्वर्ण्यावर आधारलेली आहे. समाजाचे विभाजन जन्मतःच ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शुद्र ह्या चार वर्णांने केलेले आहे व त्याला ते ईश्वरकृत समजतात. **'चातुर्वर्ण्य मया सृष्टयं गुणकर्म विभागशः'** असे श्रीकृष्णाचे भगवतगीतेतील वचन प्रसिद्ध आहे. त्यात ब्राह्मणाला सर्वांत वरचे स्थान दिलेले असून, शूद्रास इतर तीन वर्णांची सेवा करावयाची आज्ञा केलेली आहे. परंतु बौद्धधम्म जगातील सर्व मानवांना समान मानतो; त्यांत वर्णभेद किंवा जातिभेद नाही.

४) हिंदूधर्मात आत्म्याला सनातन म्हणजेच अजर, अमर, अविनाशी मानतात. परंतु बौद्धधम्मात प्रत्येक गोष्टीला 'अनित्य' (impermanent) मानतात सृष्टीचे चक्र सतत

चालत राहते व तिच्यात क्षणोक्षणी सतत बदल घडून येत असतो,अशी बौद्धधम्माची तत्त्वप्रणाली आहे.

५) हिंदू धर्मानुसार दुःखाचे कारण दैववाद असून, ज्याच्या दैवात दुःख असेल त्याला ते निश्चित मिळेल असे म्हटलेले आहे. बौद्धधम्माने जगात दुःख असल्याचे स्पष्टपणे मान्य केलेले असून त्याच्या उत्पत्तीच्या कारणांची उकल केलेली आहे; व त्याचा परिहार कसा करावा, ह्याची स्पष्टपणे शिकवण दिलेली आहे.

६) हिंदूंच्या 'दैववादानुसार' माणसावर ओढवणारी दुःखे किंवा त्याच्या वाट्यास येणारी सुखे त्याच्या दैवगतीनुसार त्याला मिळतीलच असे म्हटलेले आहे. जीव जेव्हा जन्माला येतो, तेव्हा त्याच्या जन्मापासून मृत्यूपर्यंतचे प्रत्येक कर्म व त्याची गती (परिणाम) त्याच्या जन्माआधीच लिहून ठेवलेली असते व ते सर्वकांही घडणारच असे म्हटलेले आहे. ही दैवगती कोणीही टाळू शकत नाही, असे हिंदू धर्मात स्पष्टपणे विशद केलेले आहे. परंतु बौद्धांचा कर्मवाद याच्या अगदीच उलट आहे. माणूस जसे कर्म करील, तसे फळ त्यास मिळेलच, असे स्पष्टपणे सांगितलेले आहे.धम्मपदाच्या प्रथम व द्वितीय गाथांमध्ये हे अत्यंत स्पष्टपणे दिलेले आहे. त्यामुळे हिंदुचा कर्मवाद व बौद्धांचा कर्मवाद ही तत्त्वज्ञानाची विरुद्ध टोके आहेत. दैववादावर विश्वास न ठेवता माणसाने कुशल कर्मे करीत राहावे, असे बौद्धधम्मात ठामपणें सांगितलेले आहे.

७) बौद्धांचा कर्मवाद विज्ञानाशी (Science) सुसंगत आहे. 'जसे कराल, तसे भराल.'' ह्या सिद्धान्तावर आणि कार्यकारण भावावर (Cause and effect) आधारलेला आहे. चांगली भावना मनात ठेवून कोणतेही कुशल कर्म केल्यास, सुख आज ना उद्या मिळेलच. तसेच मनात दुष्ट भावना ठेवून अकुशल कर्म केल्यास, दुःखे तुमच्या सावलीसारखी पिच्छा पुरवतीलचे असे स्पष्टपणे म्हटले आहे. हिंदूचा कर्मवाद दैववादावर आधारलेला आहे.

८) हिंदू धर्मातील धर्मग्रंथांत त्यांच्या देवी-देवतांनी अनेक अनैतिक कर्मे केल्याचे नमूद केलेले आहे. इंद्रदेवाने छद्मवेषाने जाऊन एका ऋषिपत्नीवर (अहिल्येवर) बलात्कार केला. ब्रह्मा, विष्णू व महेश ह्या तिघाही देवाधिदेवांनी एका ऋषिपत्नीस (सती अनसूयेस), ''तू नग्न होऊन आम्हास भिक्षा वाढ'' असा आग्रह धरला की जेणेकरुन तिचे पातिव्रत्य भंग व्हावे व तिला सरस्वती, लक्ष्मी व पार्वती यांच्यापेक्षा कमी लेखले जावे (श्री दत्त जन्माची कथा) श्री विष्णुदेवाने ब्राह्मणाचे रुप धारण करून त्यास दान देणाऱ्या बळीराजास पायाखली चिरडले, इत्यादी शेकडो घृणित कथा आहेत. परंतु भ. बुद्धांचे चारित्र्य अत्यंत निर्दोष आणि सतशील होते.

९) हिंदू धर्मात यज्ञयागाच्या स्वरुपात पशुबळीस मान्यता दिलेली आहे. परंतु बौद्धधम्मात धम्माच्या नावाखाली पशूंची हत्या करणे निषिद्ध मानलेले आहे. (**पाणातिपाता वेरमणि सिक्खापदं समादियामि।** म्हणजे प्राणिहिंसा करणार नाही असे व्रत मी धारण करतो.)

१०) हिंदू धर्मात सुरापान करणे म्हणजे मनसोक्त मद्यपान करणे, धर्माला अनुसरुन असल्याचे सांगितलेले असून यज्ञयाग आणि देवादिकांच्या निवासस्थानी (म्हणजे स्वर्गात) सुरापानाचे अत्यंत स्तोम माजले असल्याचे धर्मग्रंथांत स्पष्टपणे लिहिलेले आहे. भगवान शंकरास गांजा पिणे फारच प्रिय आहे, असे मानतात. परंतु भ. बुद्धांनी मादक द्रव्यांचे सेवन करावयास

मनाई केलेली आहे. (**सुरा-मेरय-मज्ज पमादट्ठाना वेरमणि सिक्खापदं समादियानि।** म्हणजे दारू, मादक मद्ये यांचे सेवन न करण्याचे व्रत मी धारण करतो.) नशा केल्याने मानवाची बुद्धी भ्रष्ट होते.

११) हिंदू धर्मात तर्कास स्थान नाही. सर्वच गोष्टी श्रद्धेवर आधारलेल्या असून, धर्मशास्त्रांमध्ये सांगितलेल्या गोष्टींना तर्काच्या कसोटीवर न लावता त्यांना केवळ श्रद्धेनेच ग्रहण करावयास सांगितलेले आहे. याउलट भ. बुद्धांनी स्पष्ट आदेश दिलेला आहे की, कोण्या कितीही मोठ्या व्यक्तीने सांगितलेली गोष्ट, किंवा धार्मिक पुस्तकांत लिहिलेली गोष्ट, त्यावर विचार न करता कोणीही स्वीकारू नये. एवढेच नव्हे तर भगवंतानी स्वतः विशद केलेला धम्मदेखील लोकांनी आपल्या प्रज्ञेच्या व अनुभवाच्या कसोटीवर तपासून पाहावा व त्यांना पटेल तेव्हा त्याला ग्रहण करावे. अशा तऱ्हेची तर्कशुद्ध चिंतनाची मोकळीक हिंदू धर्मात मुळीच नाही. श्रीकृष्ण भगवतगीतेत म्हणतात, ''चातुर्वण्यमया सृष्टयं गुणकर्म विभागशः। याचा अर्थ तुम्ही त्याला मानलेच पाहिजे, कारण चातुर्वणाची सृष्टी परमेश्वराने स्वतःच केलेली आहे!

१२) हिंदू धर्मात वेदग्रंथांना सर्वाधिक प्राधान्य असून ते ईश्वररचित असल्याचे सांगण्यात येते. त्यांची सृष्टी अनादिकालापूर्वी झाल्याचे मोठ्या गर्वाने सांगण्यात येते. ही गोष्ट तर्काशी पूर्णतः विसंगत आहे. ''वेदवाक्यं प्रमाणं।'' असे म्हणून त्यांना तर्काच्या कसोटीवर लावण्यास मनाई केलेली आहे. बौद्धधम्माच्या धर्मग्रंथांना ऐतिहासिक स्थान असून त्यांचा कालावधी निश्चित केलेला आहे. त्यांतील प्रत्येक गोष्ट, अनुभवाच्या व प्रज्ञेच्या कसोटीवर तुम्हास पटेल, तेव्हाच तुम्ही ग्रहण करा, असे बुद्धधम्माचे तत्त्वज्ञान आहे, यास्तव ते आधुनिक विज्ञानाशी (Science) सुसंगत आहे.

१३) हिंदू धर्मात मोक्षाची प्राप्ती मृत्यूनंतर होऊ शकते, जिवंतपणे नव्हे. मोक्षप्राप्ती होऊन आत्मा स्वर्गास (वैकुंठास) जातो व देवमय होऊन देवांच्या सान्निध्यात राहतो, असे म्हणतात परंतु तसे संभव नाही. काही ऋषिमुनींनी जेव्हा यज्ञयागादी कर्मकांडांनी मनुष्याला जिवंतपणीच स्वर्गात पाठवावयाचे प्रयत्न केले (त्रिशंकूची कथा) तेव्हा देवांनी त्याला स्वर्गातून पृथ्वीवर ढकलून दिले! स्वर्गात अप्सरा असतात, मधुर सुरापान सुरू असते व देवांचा दरबार असतो, अशा स्वर्गात मोक्षप्राप्तीनेच जाता येते, अशी हिंदूची धारणा आहे. याउलट, बौद्धधम्म निर्वाणाची शिकवण देतो. निर्वाण म्हणजे मनाची अत्यंत सुखमय स्थिती हे निर्वाण 'याची देही याची डोळा' ह्याच जन्मी प्राप्त होऊ शकते. निर्वाण म्हणजे मनाच्या दुःखमय स्थितीचा पूर्णतः नाश होऊन प्राप्त होणारी सुखमय स्थिती. परंतु निर्वाण हे कर्मकांडाने किंवा देहदंडनाने प्राप्त होत नाही. आपल्या मनास शुद्ध करीत राहिल्यास, मन अत्यंत परिशुद्ध झाले म्हणजे निर्वाण स्थिती आपोआपच प्राप्त होते.मनास परिशुद्ध करणे म्हणजे त्यातील वाईट विचार काढून टाकणे व त्यास शुद्ध विचारांनी भरणे. काम, क्रोध, लोभ, मद, मोह आणि मत्सर यांचे विचार मनांत कधीही उत्पन्न होणार नाहीत, व सर्वच प्राण्यांविषयी अनुकंपा राहील अशी मनाची स्थिती तयार करणे, म्हणजेच निर्वाण. भ. बुद्धांना संबोधीची प्राप्ती झाल्यानंतर ते निर्वाण स्थितीस पोहचले होते व तशा स्थितीत ते सद्धम्माचा प्रचार करीत ४५ वर्षे पायीच हिंडले. निर्वाणाची कल्पना हिंदूच्या मोक्षप्राप्तीच्या कल्पनेहून सर्वथा भिन्न आहे.

१४) हिंदू धर्माची भगवतगीतेमधील शिकवण' "**कर्मण्ये वाऽधिकारस्ते मा फलेषु कदाचन**" म्हणजे मानवाचा अधिकार केवळ धर्म करावयाचा आहे, त्याने फळाची आशा करू नये, हिला अत्यंत उदात्त शिकवण समजण्यात येते. हिला ब्रीदवाक्याचे स्वरूप देण्यात आलेले आहे. माणूस आशेवर असतो. परंतु जर फळाची आशाच नसेल तर, उत्तम कर्म करावयाची प्रेरणा कशी मिळणार ? यास्तव ही शिकवण तर्कसंगत व न्यायसंगत नाही. शूद्राला म्हणावे, तू केवळ इतर तीन वर्णांची सेवाच करीत राहा, तुझे हेच कर्तव्य होय. तू फळाची आशा करू नकोस, असे म्हणून दीनदुबळ्या लोकांना हजारो वर्षे पतित अवस्थेत राहावयास सांगण्यात आले, ते पूर्णतः अन्यायपूर्ण होते. श्रीकृष्णाने अर्जुनास ही शिकवण देऊन त्याच्या बंधुबांधवांचा, गुरुजनांचा, आप्तमित्रांचा आणि सहस्रावधि निरीह लोकांचा वध करावयास उन्नत केले. याउलट, बौद्धधम्म असे शिकवितो की मनात चांगली भावना ठेऊन कर्म केल्यास, त्याचे उत्तम फळ निश्चितच मिळेल. ही शिकवण प्रेरणाप्रद आहे. तद्वतच अशी ताकीद दिलेली आहे की, मनांत वाईट भावना ठेवून जर कोणते कर्म केले, तर त्याचे दुःखमय फळ मिळाल्याशिवाय राहणार नाही, त्याला तुम्ही टाळूच शकत नाही,असे धम्मपदातील प्रथम व द्वितीय गाथेत स्पष्टपणे सांगितले आहे. येणेप्रमाणे,बौद्धधम्माची मूलभूत शिकवण हिंदू धर्माच्या मूलभूत शिकवणीपासून पूर्णतः भिन्न आहे.

१५) हिंदू धर्मात कर्मकांडास प्राधान्य आहे. यज्ञयाग, देहदंडन, तपश्चर्या, व्रतवैकल्ये, नवस, इत्यादीची शिकवण असून, कोणतेही पाप केले तरी ते गंगास्नान केल्याने धुतले जाते, कर्मकांडाने पापाचे परिमार्जन होते, असे निक्षून सांगितले आहे. त्यामुळे प्रत्येक हिंदू मनावर असा ठसा उमटलेला असतो की, कोणतेही पाप केले तरी त्याचे परिमार्जन होऊ शकते. येणेप्रमाणे, पापकर्मे करावयास एक प्रकारची मोकळीकच दिलेली आहे.

याउलट, बौद्धधम्मात मनाच्या शुद्धतेवर भर दिलेला आहे. स्नानाने शरीराची शुद्धी होते, परंतु मनाची होत नाही. बौद्धधम्मात कर्मकांडास मनाई आहे. जी पूजाअर्चा करण्यात येते, जसे बुद्धवंदना, परित्राण पाठ, इत्यादी यांच्यामध्ये माणसाने निष्ठेने वागावयास, स्वतःस पुन्हा पुन्हा जागृत करावयास, प्रतिज्ञा करावयाचे आवाहन असते. या प्रार्थनांमध्ये, "प्राणिहिंसा करणार नाही, असे व्रत मी ग्रहण करतो; चोरी करणार नाही, असे व्रत मी ग्रहण करतो; भगवंताने सांगितलेल्या पंचशील व सदाचाराचे व्रत मी धारण करतो. सर्वांचे मंगल व्हावे, असेच वर्तन मी करीन", इत्यादी अशा तऱ्हेचे माणसाच्या मनास जागृत करावयाचे आवाहन असते. हिंदूच्या प्रार्थना देवी-देवतांच्या स्तुतीची स्तोत्रे असून, देवा मला अमुक दे व तमुक दे, अशी ती स्वार्थप्रेरित प्रार्थना असते. हिंदूच्या व बौद्धांच्या प्रार्थनांमध्ये तत्त्वतः कसलेही साम्य नाही.

१६) हिंदूंनी आपल्या देवांच्या दशावतारात भ. बुद्धाला स्थान देऊन, अशी दिशाभूल केलेली आहे की, जणूकाही भ.बुद्ध हिंदूचे देव आहेत. येणेप्रमाणे बौद्धधम्म हिंदू धर्माचाच एक भाग आहे किंवा हिंदू धर्माचाच एक पंथ आहे. असा अत्यंत खोटा व खोडसाळ प्रचार, ते कित्येक शतकांपासून करीत आहेत. त्यांनी बौद्धांची मंदिरे, मठ आणि स्तूप काबीज केलीत व त्यांना हिंदुत्वाचे स्वरूप दिले. एवढेच नव्हे तर, बौद्धांचे सर्वात मोठे तीर्थस्थान बौद्धगया येथील बुद्धमंदिरही त्यांनी काबीज केले. कोट्यावधी बौद्धांच्या मागणीस धुडकावून लावून

अजूनही त्या मंदिरावरील हक्क सोडण्यास ते तयार नाहीत.

१७) हिंदूंच्या देवी-देवता अनेक, अगणित आहेत. त्यांचे तेहेतीस कोटी देव असल्याचे सांगतात. देवी देवतांचे एकमेकाशी वैमनस्य आणि द्वेषभाव असल्याच्या पुष्कळच आख्यायिका आहेत. हे शास्त्र एवढ्या विकोपास गेले आहे की, कोण्या देवाची पूजा आधी आणि कोणाची नंतर याविषयीचे वादविवाद आहेत. श्री गजाननाची पूजा सर्वप्रथम न केल्यास तो कोणत्याही कामात विघ्न आणू शकतो, असे म्हणतात. बौद्धधम्म भ. बुद्धाला महामानव मानतो व सुधम्माची शिकवण दिल्यावबद्दल बौद्धजन कृतज्ञतापूर्वक पूजा करतात.

१८) हिंदूंच्या प्रार्थना देवी देवतांच्या स्तुतिस्तोत्रांनी परिपूर्ण असतात. विष्णुपुराणात श्री विष्णूची स्तुती असते; गरुडपुराणात गरुडपक्षाची, वायुपुराणांत वायुदवेतेची येणेप्रामणे देवीदेवतांची अगदी विकोपास जाईपर्यंत स्तुती करणारे भाट म्हणजेच 'भक्तगण' अशी ही व्याख्या झालेली आहे. कोण्या देवाची सदोदित स्तुती करणे व त्या देवाच्या नावाचा सदोदित जप करणे, याला फार मोठे धर्मकार्य समजण्यात येते. अशा प्रकारे भक्तगण देवाची स्तुती करीत सुख-संपदेची मागणी करीत असतात! अशा ह्या अनितीपूर्ण पायावर धर्माची उभारणी केल्याने बुवाबाजीस व (Sychopancy) ऊत आलेला आहे. बौद्धधम्माची प्रार्थना म्हणजे त्रिशरण व पंचशीलाचे पुनरोच्चारण असते-

१९) हिंदूंच्या देवि देवतांच्या अभद्र आणि अश्लील रासलीलांचे प्रदर्शन त्यांच्या प्राचीन आणि प्रमुख मंदिरांच्या शिल्पकलेत पाहावयास मिळते. कोर्णाक,जगन्नाथपुरी,लिंगराज मंदिर (भुवनेश्वर) इ. प्रसिद्ध आणि महान समजल्या जाणाऱ्या मंदिरांमधे अश्लीलतेचे दर्शन घडते. देवी देवतांना प्रत्यक्ष रतिक्रिया करतांना दाखविलेले आहे एवढेच नव्हे तर, ह्या मंदिरांमध्ये पशूंबरोबर रतिक्रिया करतानासुद्धा दाखविलेले आहे.धर्माच्या नावाखाली दर्शविलेला असला घृणित प्रकार सर्वथा वर्ज्य आहे. गेल्या अडीच हजार वर्षांच्या बौद्धधम्माच्या इतिहासात तो बौद्धांच्या कोणत्याही मंदिरात पाहावयास मिळणार नाही.

२०) हिंदू धर्माच्या धर्मग्रंथांत दिलेल्या शिकवणुकीत एकसूत्रीपणा नाही. त्यांत अनेक विसंगती आणि विरोधाभास आहेत. त्यामुळे स्वार्थी लोकांना जी परिस्थिती त्यांच्या स्वार्थसिद्धीस अनुकूल असेल तिची बाजू घेऊन, तसेच वर्तन ते धर्माच्या नावाखाली मोठ्या दिमाखाने करीत असतात. एकीकडे एकपत्नीव्रताबद्दल श्रीरामास 'मर्यादा पुरुषोत्तम' म्हणून प्रसंशिले जाते, तर दुसरीकडे श्रीकृष्णाला 'सोळासहस्र नारींचा पती' महणून प्रसंशिले जाते. श्रीकृष्णाने गोपींच्या बरोबर केलेल्या 'रासलीलाही' प्रसंशिल्या जातात.! श्री गजानन पूर्णतः शाकाहारी आहे, तर त्याची माता पार्वती म्हणजेच 'कालीमाता' बळीच्या बकऱ्याशिवाय प्रसन्न होत नाही आणि तिला रक्ताचे प्राशन करतांना दाखवितात! येणेप्रमाणे संधिसाधुपणास हिंदू धर्मात पूर्णतः वाव दिलेला आहे. अशी विसंगती बौद्धधम्मात नाही.

२१) हिंदू धर्माच्या शिकवणीचा काय सारांश आहे, असे कोणाही हिंदूला विचारले, तर त्याचे उत्तर मिळणे अशक्य आहे. याचे कारण असे की, हिंदू धर्माचे विशिष्ट ध्येय आणि धोरण नाही. त्यामुळे ज्याला जशी शिकवण सोयीची वाटेल व स्वतःच्या स्वार्थसिद्धीस योग्य वाटेल तशी तो ग्रहण करतो. त्यात वर्णभेद आहे, जातिभेद आहे, कधी अहिंसेला महत्त्व दिले जाते, तर कधी थोड्याशा जमिनीच्या तुकड्याकरिता 'महाभारत' युद्ध केले

जाते व सहस्रावधी लोकांची कत्तल होते. तथापि बौद्धधम्माची शिकवण अत्यंत सरळ, सोपी आणि स्पष्ट आहे. ती थोडक्यात अशी, **''सब्ब पापस्स अकरणं, कुसलस्स उपसंपदा. सचित्त परियोदपनं एतं बुद्धान सासनं।''** म्हणजे कसलेही अकुशल कर्म न करणे, कुशल कर्माचे संपादन करणे व चित्ताला (मनाला) परिशुद्ध करणे, हीच बुद्धांची शिकवण होय.

२२) हिंदूधर्म आणि बौद्धधम्म यांची मूलभूत तत्त्वप्रणाली व आचार-विचार लक्षात घेऊन त्यांतील भेद सामान्यजनास स्पष्टपणे कळावा यासाठी बाबासाहेब आंबेडकरांनी धम्मदीक्षेच्या वेळी ध्यावयाच्या बावीस प्रतिज्ञा घालून दिल्या. त्यातील काही येणेप्रमाणे :

१) मी ब्रह्मा, विष्णू, महेश यांना देव मानणार नाही, किंवा त्यांची उपासना करणार नाही.

२) मी राम व कृष्ण यांना देव मानणार नाही, किंवा त्यांची उपासना करणार नाही.

३) मी गौरी, गणपती इत्यादी हिंदू धर्मातील कोणत्याही देवतेस मानणार नाही किंवा त्यांची उपासना करणार नाही.

४) देवाने अवतार घेतले यावर माझा विश्वास नाही.

५) बुद्ध हा विष्णूचा अवतार होय, हा खोटा व खोडसाळ प्रचार आहे, असे मी समजतो.

६) मी श्राद्धपक्ष करणार नाही, पिंडदान करणार नाही.

७) मी कोणतेही क्रियाकर्म ब्राह्मणाचे हातून करवूंन घेणार नाही.

८) मी माझ्या जुन्या मनुष्यमात्राच्या उत्कर्षाला हानिकारक आणि मनुष्यमात्राला असतमान व नीच मानणाऱ्या हिंदू धर्माचा त्याग करतो व बौद्धधम्माचा स्वीकार करतो.

९) ज्ञान, शील आणि करुणा या बौद्धधम्माच्या तीन तत्त्वांची सांगड घालून मी माझे जीवन चालवीन.

**प्रश्न ४२२ : अर्हत कोणाला म्हणतात ?**

टीप ९ : पुढील दहा संयोजनांचा (बंधनांचा) नाश झाला म्हणजे अर्हत्पद प्राप्त होते.

१) सक्काय दिट्ठी (आत्मा हा भिन्न पदार्थ असून तो नित्य आहे अशी दृष्टी)

२) विचिकिच्छा (बुद्ध, धर्म आणि संघ याविषयी शंका किंवा अविश्वास)

३) सीलब्बत परामास (स्नानादी व्रतांनीच मुक्ती मिळेल असा विश्वास)

४) कामराग (कामवासना)

५) पटिघ्घ (क्रोध)

६) रूपराग (ब्रह्मलोकादी प्राप्तीची इच्छा)

७) अरूपराग (अरूप - देवलोक प्राप्तीची इच्छा)

८) मान (अहंकार)

९) उद्धच्चं (भ्रांतचित्तता)

१०) अविज्जा (अविद्या).

अर्हत्पद प्राप्त झाले म्हणजे निर्वाणाचा साक्षात्कार होतो. (बौधनी पृ.७७)

थेरवादानुसार, जे पूर्णतः मुक्त झाले आहेत त्यांनाच अर्हत म्हणतात. (**अनुपत्तो सदत्यो वीतरागो वीतदोसो वीतमोहो खिणासवो ओहितभारो कतंरणीयो नापरम् इत्थताया ति।**)

ज्यांनी मोह, द्वेष, अविद्या यांच्यापासून मुक्ती मिळविली आहे, स्कंधांचे ओझे ज्यांनी फेकून दिले, अतिश्रेष्ठ ध्येय म्हणजे निर्वाणास ज्यांनी प्राप्त केले व पुढील जन्मांपासून मुक्ती मिळविली, त्यास 'अर्हत' असे म्हणतात. (भ. बौद्ध पृ.११३) अर्हतपद मिळाले तरी शारीरिक दुःख आयुष्य संपेपर्यंत राहते.

अर्हतांचे दोन वर्ग पडतात - समधायनिक आणि सुक्खविपश्यक. 'समाधायनिक' त्यांना म्हणायचे ज्या भिक्खूंनी आपल्या मनोविकारांचा संपूर्ण नाश केलेला असून आपल्या बौद्धिक सामर्थ्यांचा आणि अंर्तदृष्टीचा पूर्णपणे विकास केलेला असतो. ते अद्‌भुत चमत्कार घडवू शकतात.

'सुक्खविपश्यक' त्यांना म्हणायचे ज्या भिक्खूंनी मनोविकारांवर पूर्णतः विजय मिळविलेला असतो. परंतु उच्चतर मानसिक सामर्थ्य मिळविलेले नसते.

'दीघनिकाया' मध्ये भगवंतांनी म्हटलेले आहे, 'सुभद्रा! ऐक, जर माझ्या संघातील भिक्खू खरोखरच मी सांगितलेल नियम पाळतील, तर जग आर्हताशिवाय कधीही सुने राहणार नाही.' **इमच्च सुभद्दभिक्खू सम्म विहरेदूू असुत्रो लोको अर्हतोहि अस्स**.

पहिल्या वर्गाचे अर्हत् अद्‌भुत चमत्कार घडवू शकतात, परंतु दुसऱ्या वर्गाचे अर्हत् तसे करू शकत नाही. पहिल्या वर्गातील अर्हत त्यांचा पूर्णपणे विकास झाल्यामुळे मनोविकारांच्या भ्रामक कल्पनांच्या आहारी तर जात नाहीत, मनोविकारांचे किंवा मर्त्य मनोदौर्बल्यांचे गुलाम होत नाही. तर्काच्या मंद कार्यप्रक्रियेला न अनुसरता, विचारार्थ घेतलेल्या कोणत्याही विषयाचे मूळ शोधून काढण्यास ते सक्षम असतात. त्यांचा आत्मविजय पूर्णत्वास गेलेला असतो आणि सामान्य मनुष्यास पीडित करणाऱ्या आणि दास बनविणाऱ्या व क्षुब्ध करणाऱ्या इच्छा आणि भावनांच्या ऐवजी जिला 'निर्वाणाची स्थिती' असे योग्य संबोधन दिलेले आहे, त्या अवस्थेप्रत तो पोहोचलेला असततो. श्रीलंकेमध्ये लोकांची अशी समजूत झालेली आहे की, आता कुणालाही अर्हत्व प्राप्त होणे अशक्य आहे आणि असेही म्हटले जाते की, भ. बुद्धांनी असे भाकीत केले होते की, त्यांच्या मृत्यूनंतर एक हजार वर्षांच्या अवधीत अर्हत्व प्राप्तीचे सामर्थ्य पूर्णतः नष्ट होईल. ही किंवदन्ती आणि हिच्यासारखीच दुसरी किंवदन्ती जी भारतात ऐकण्यात येते, ती ही की, कलियुगाचे अंधकारमय कालचक्र सुरू असल्यामुळे योगविद्येला किंवा उच्च आध्यात्मिक विज्ञानाला आत्मसात करणे अशक्य आहे. ही किवदन्ती पसरण्याचे प्रमुख कारण श्री. ऑलकॉट यांच्या मते असे आहे की, सध्या जे बौद्ध भिक्खू आहेत ते, त्यांचे पूर्वाधिकारी जितके सात्त्विक, शुद्ध पवित्र आणि अंतर्मनाचे जाणकार होते, तसे हे नाहीत व त्यामुळे ते चातुर्याने अशा प्रकारची सबब सांगण्याच्या शोधात असतात. भ. बुद्धांनी मात्र ह्याच्या अगदी विरुद्ध शिकवण दिलेली आहे.

**प्रश्न ६०१ : भ. बुद्धांचा धम्म आधुनिक युगाशी सुसंगत आहे काय ?**

टीप १० : (१) प्रो. एस.एस. राघवाचार यांचे म्हणणे असे की, भ. बुद्धांच्या जन्मापूर्वीचा काळ भारतीय इतिहासातील सर्वाधीक अंधकारमय युग होते. प्रज्ञा किंवा चिंतनाच्या दृष्टीने ते मागासलेले होते. धर्मग्रंथाविषयीच्या अंधविश्वासाने ते जकडलेले होते. नैतिकतेच्या व समानतेच्या दृष्टीनेही फार मागासलेले होते. केवळ धर्मग्रंथाप्रमाणे यज्ञयागादी आचार-विधि

करणें म्हणजेच नैतिकता, असा अर्थ मानला जाई. आत्मत्याग किंवा मनाची पवित्रता ह्यासारख्या नैतिक विचारांना योग्य स्थान नव्हते.

(२) श्री. आर.जे. जैक्सनचे म्हणणे असे की, भ. बुद्धांच्या शिकवणीचे अपूर्व स्वरूप भारतातील प्रत्येक धार्मिक विचारधारेत स्पष्टपणे दिसून येते. ऋग्वेदाच्या ऋचांत मनुष्य बहिर्मुख असून त्यांचे सारे चिंतन देवतांकरिता आहे, असे आढळते. बौद्धधम्माने मानवात सुप्त अवस्थेत असलेल्या त्याच्या सामर्थ्याकडे, त्याचे लक्ष वेधले. वेदांत केवळ प्रार्थना, प्रशंसा व पुजा आढळते. परंतु बौद्धधम्मात मात्र चित्ताला सदाचाराच्या मार्गाने प्रवृत्त करण्याच्या संस्कारांचे शिक्षण मिळत असल्याचे आपल्याला आढळते.

(३) विनवूड म्हणतात, ''जेव्हा आपण निसर्गाचा ग्रंथ उघडतो व कोट्यावधी वर्षांतील उत्क्रांतीचा इतिहास वाचतो आणि जीवन-नियंत्रणास व विकासाच्या उत्पत्तीस कारणीभूत होणारे नियम वाचतो, तेव्हा परमेश्वर प्रेमरूप असल्याचे मत किती भ्रामक आहे, हे आपल्याला स्पष्ट दिसून येते. प्रत्येक प्राण्यामध्ये भ्रष्टता व स्वच्छंदीपणा आढळतो. सृष्टीत जितके प्राणी जन्माला येतात, त्यांच्यात जगणाऱ्यांची संख्या फार अल्प असते. दुसऱ्यांचे भक्षण करा आणि दुसऱ्यांचे भक्ष्य व्हा, असा समुद्रातील, आकाशातील व अरण्यातील जीवांचा नियम आहे. हत्त्या हाच जणु विकासाचा नीतिनियम आहे.'' आणि भ. बुद्धांचा धम्म ह्यापेक्षा कितीतरी भिन्न आहे.

(४) डॉ. रंजन रॉय म्हणतात. ''एकोणविसाव्या शतकात (१) पदार्थ, (२) वस्तुमान आणि (३) कार्यशक्ती ह्या तीन सिद्धांताचे प्रभुत्व होते. ह्या तीनही गोष्टी अविनाशी असल्याचे आदर्शवाद्यांचे मत होते व त्यावेळच्या वैज्ञानिकांना ते सृष्टीच्या नियंत्रणाचे कारक असल्याचे वाटत होते. ह्या तीन गोष्टींच सृष्टीची मूळ तत्त्वे असून विश्व हे अविनाशी अणूंनी भरलेले असल्याची त्यांची कल्पना होती.'' परंतु जे.जे. थॉम्पसन ह्यांनी अणुभंजनास प्रारंभ केला व आश्चर्य असे की, अणूंचे तुकडे होऊ लागले. अशा रीतीने वास्तवतेचे अविनाशी आधारस्तंभ खारीज झाले. चालू शतकात जगात असा समज आहे की, प्रतिक्षणी पदार्थाचा बदल होतो ह्याप्रमाणे सांगितलेला भगवंतांचा अनित्यतेचा सिद्धान्त खरा ठरलेला आहे. आधुनिक विज्ञानानुसार अंतिम तत्त्व अनेक होऊन एक भासित होणारे आहे. ते भ. बुद्धांच्या अनित्यता आणि अनात्मवादाच्या सिद्धान्ताचा प्रतिध्वनी आहे.

(६) इ. जी. टेलर म्हणतात की, बऱ्याच काळापासून बाह्य शक्तींनी मानवावर अधिकार गाजविलेला आहे. जर मानवाला खरोखरच सुसंस्कृत व्हायचे असेल, तर त्याने स्वतःच्या तत्त्वांनी आत्मनियमन करण्यास शिकले पाहिजे. बौद्धधम्म हीच जगातील एकेव प्राचीनतम नैतिक विचारपद्धती आहे, की जिच्यामध्ये मानवाला आत्मनियमन करण्याची शिकवण दिलेली आहे. म्हणून प्रगतिशील जगाला आत्मनियमनाची सर्वोत्तम शिकवण देण्यासाठी बौद्धधम्माची आवश्यकता आहे.

(७) यूनिटेरिअन ख्रिश्चन पाद्री, रेव्हरण्ड लेस्ली बोलटन म्हणतात, ''बौद्धधम्माप्रमाणे यूनिटेरिअन खिस्ती बांधवही परंपरा, धर्मग्रंथ किंवा मतप्रणालीची बाह्य शक्ती नकारून मानवाच्या अंतर्यामी असलेल्या मार्गदीपाचा आधार मान्य करतात. ह्या मताचे अनुयायी येशू खिस्त आणि गौतम बुद्ध ह्यांना जीवनाचे उच्च भाष्यकार असल्याचे मानतात.''

(८) प्रो. न्हिस डेव्हिडस् म्हणतात. "जगातील सर्व धर्म संस्थापकांत भ. बुद्धच केवळ एक असे थोर होते की, जे आपली मुक्ती साध्य करण्याच्या मानवी सामर्थ्याचा स्वाभाविक मोठेपणा बरोबर ओळखू शकले. त्यांची मानवाला प्रज्ञा व मैत्रीच्या शिखरावर प्रस्थापित करून उच्चत्व प्राप्त करून दिले. मानवतेची योग्यता उंचावण्याच्या कर्तृत्वात जर माणसाचा खरा थोरपणा समावलेला असेल, तर असा थोर पुरुष तथागताशिवाय दुसरा कोण असू शकेल ?"

(९) ई.जे. मिल्स म्हणतात " बौद्ध धम्माइतका दुसऱ्या कोणत्याही धर्मात विद्येच्या उच्च मूल्यावर व अविद्येच्या हीनतेवर भर देण्यात आलेला नाही. तसेच आत्मविकासाची इतकी विस्तृत, इतकी सखोल व व्यवस्थित योजना इतर कोठेही आखलेली नाही. आपले डोळे उघडे ठेवून अकुशल कर्म न करण्याविषयी जागरूक राहण्याबाबत कोणत्याही धर्मात भर देण्यात आलेला नाही."

(१०) प्रो. डब्ल्यू. टी स्टास आपल्या बुद्धिस्ट एथिक्स नावाच्या ग्रंथात म्हणतात, "बौद्धधम्मातील नैतिक आदर्श पुरुष म्हणजे अर्हत - हा नैतिक आणि बौद्धिक अशा दोन्ही दृष्टीनी महान असला पाहिजे.तो तत्त्वज्ञ व सदाचारीही असला पाहिजे. बौद्धधम्माने 'विद्येला मुक्तीकरिता अनिवार्य मानले आहे. आणि 'अविद्या' व 'तृष्णा' ह्यांना मुक्तीच्या मार्गातील मुख्य बाधक कारणे मानली आहेत. ह्याउलट ख्रिस्ती धर्मात आदर्श पुरुषाकरिता ज्ञानी असणे आवश्यक मानलेले नाही. कारण की, संस्थापकाच्या अतात्त्विक स्वरूपामुळे ख्रिस्ती धर्मीय विचारधारेत, मानवाच्या नैतिक व बौद्धिक बाजूमध्ये दुरावा निर्माण झाला आहे. जगातील दुःखाचे मूळ अविद्या व अंधश्रद्धा आहेत. भगवंतांनी त्यांना स्थान दिले नाही. भ. बुद्ध आणि त्यांचा धम्म किती श्रेष्ठ व अपूर्व आहेत, हे स्पष्ट करण्यास एवढे पुरेसे आहे." अशा भ. बुद्धांना आपला शास्ता म्हणून कोण बरे स्वीकार करणार नाही.

**प्रश्न ६०६ (क) : बौद्धधम्मामध्ये आत्म्याला अनित्य मानावयाची कारणे कोणती ?**

टीप ११ : आपले शरीर क्षणोक्षणी बदलत असते. एक एक अणू ज्यांनी आपले शरीर घडलेले आहे, प्रत्येक क्षणी आपली जागा मोकळी करीत असतो तेथे नवीन अणू येत असतो. असे असूनदेखील आधीचा प्रत्येक अणू नंतरच्या अणूंशी बऱ्याच अंशी त्यासारखाच असतो. त्याचप्रमाणे आत्मा (मन) देखील बदलत असतो; परंतु परिवर्तन सदृश्य असल्यामुळे ते बदललेच नाही असे म्हणू लागतात. जर आपण असे म्हणाल की, मन बदलते, आत्मा बदलत नाही, तर आमचे म्हणणे असे की मनाशिवाय वेगळी अशी आत्मा म्हणून कोणी वस्तूच अस्तित्वात नाही. चित्त, विज्ञान, आत्मा एकाच गोष्टीची अनेक नावे होत.

ज्याप्रमाणे आपण कान, नाक, डोळे, जिव्हा, त्वचा इत्यादी इंद्रियांचा प्रत्यक्ष अनुभव घेतो तसा मनाचा घेता येत नाही. डोळे चिंचेला बघतात आणि जिभेवरून लाळ गळू लागते; डोळे आणि जीभ ह्या गोष्टी भिन्न आहेत आणि त्यांचा एकमेकांशी संबंध नाही. म्हणून या दोहोंच्या क्रियेचा मिलाप करावयास तिसरे इंद्रिय लागते - ते मन होय. तेच ग्रहण करते, चिंतन करते आणि निर्णय करते. ते ग्रहण, वगैरे कशा प्रकारे करते ? समजा आपल्याला काळ्या नागाचे दर्शन झाले. मग ते ज्ञान तत्क्षणीच मनांत पोहोचते. त्या क्षणी मनामध्ये जे जुन्या मनाच्या अनुभवांचे बीज आपल्यात (म्हणजे आपल्या स्मृतीमध्ये) साठवून ठेवले

असते, हे नवीन ज्ञानरूपी चूर्ण त्यावर पडल्याबरोबर त्याच आकाराचे होऊन भिंतीच्या रंगांमध्ये रंगू लागते. जरी केवळ एकच क्षण नागाला पाहून आपल्याला थांबावे लागले असेल तरी पण, एखाद्या हलवून नंतर सोडून दिलेल्या चक्रासारखे अनेक क्षणापर्यंत एकेकानंतर उत्पन्न होणारे मन त्या रंगात रंगून जात असते. तथापि प्रत्येक पुढील मनावर (= नंतर उत्पन्न होणाऱ्या मनावर) त्याचा असर कमी-कमी होत जातो. जी गोष्ट भयप्रद गोष्टींविषयी असते तीच गोष्ट प्रीतिप्रद किंवा इतर दुसऱ्या कोणत्याही विषयाविषयी असते, असे समजले पाहिजे. म्हणून आपल्याला डोळे इत्यादी व्यतिरिक्त त्यांचे संयोजन करणारे आंतले जे इंद्रिय 'मन' त्याच्या अस्तित्वास मानावे लागते.

ह्याशिवाय आत्म्याची वेगळी अशी आवश्यकता ती कसली ? जर असे म्हटले की जुन्या अनुभवांना स्मृतीच्या स्वरूपात संग्रहित करावयास आत्म्याची आवश्यकता आहे, कारण मन तर क्षणभंगुरच असते; तर आम्ही असे म्हणू की - मन जरी क्षणिक असले तरी ते परवर्ती मनात कारणीभूतदेखील असते. अनुवांशिक नियमानुसार ज्या प्रकारे माता-पित्यांच्या पुष्कळशा गोष्टी पुत्र-पौत्र यांच्यातही येतात, त्याच प्रकारे पूर्वमन स्वतःच्या अनुभवांचे बीज किंवा संस्कार नंतरच्या मनाकरिता वंशावळ म्हणून सोडून जातात आणि हीच गोष्ट स्मृती राखून रहावयास कारणीभूत असते.

वस्तुतः संस्काराची छाप क्षणिक वस्तुवरच बसू शकते. आत्म्याला जर कुटस्थ नित्य (सनातन) मानले, तर तो अनंतकाळपर्यंत एकरस राहणारा असणार, तर मग नेहमीच एकरस राहणाऱ्या आत्म्यावर अनुभवांची छाप कशी बरे पडू शकेल ? जर पडू शकत असेल, तर छाप पडताच त्यांच्या रूपाचे परिवर्तन होणार. आत्मा एखादी जड (घन) वस्तू नाही, की त्याच्या केवळ बाह्य रूपालाच तो डाग लागेल. तो तर चेतनामय आहे. म्हणून असल्या स्थितीमध्ये इंद्रियप्रणीत ज्ञान त्याच्या सर्वच भागामध्ये प्रवेश करील. मग राग, द्वेष, मोह इत्यादि विविध प्रकारच्या संस्कारां-विकारांपैकी कोणत्यातरी एका विकाराचे रूप धारण करील. तर मग तो आधीच्या छाप नसलेल्या आत्म्यासारखा नसणार. तर मग आत्म्यास सनातन, न बदलणारा, नित्य कसे म्हणता येईल? जर असे मानले की संस्काराची छाप पडते, तर तो अभौतिक संस्कारदेखील नेहमी आत्म्यामध्ये राहून अविचल होऊन जाईल, (म्हणजे सनातन होऊन जाईल) तर मग शुद्धी किंवा मुक्तीची आशाच राहणार नाही.

चांगल्या-वाईट कर्मांचा शेवट कसा होतो ? बौद्ध लोक असे मानीत नाही की आपण जे काही करतो त्याची नोंद ठेवावयास द्रुत-लेखकांना आपल्यासोबत ठेवलेले असते. आपण चांगली-वाईट जी काही कर्मे करतो, त्या सर्वांचे उगमस्थान आपले मनच असते. म्हणून द्वेषयुक्त कर्म करावयास मनास द्वेषयुक्त व्हावे लागते. मोहयुक्त कर्म करावयास मनाला मोहयुक्त व्हावे लागते, इत्यादी. मनाच्या त्या स्थितिचे गुंजन तोपर्यंत जागृत राहते, जोपर्यंत त्याचा व्यय होत नाही किंवा त्याविरुद्धच्या गुंजनाशी त्याची टक्कर होत नाही.

चांगले-वाईट मनोभाव धन आणि ऋण सारखे परस्परविरोधी असतात. जर धन कमी आणि ऋण अधिक असेल तर धनाचे पारडे झुकलेले असणार. अशा तऱ्हेचा हिशेब मनाच्या क्षणोक्षणीच्या स्थितीमध्ये सुरूच असतो. येथे हिशेबाची गोळाबेरीज व्हावयास महिने, आठवडे, दिवस लागत नसतात. तो हिशेब तत्क्षणी ताबडतोब होत असतो. माणूस

म्हणजे काय ? स्वतःच्या सर्व चांगल्या-वाईट अनुभवांची गोळाबेरीज म्हणजेच माणूस.

दुसऱ्या क्षणी उत्पन्न होणाऱ्या मनास पुष्कळशा गोष्टी आपल्याजनक मनापासून वंशपरंपरेने मिळतात. ही वंशपरंपरेची साखळी बाल्यावस्थेपासून म्हातारपणापर्यंत सुरूच राहते. परंतु भ. बुद्धांच्या उपदेशानुसार ही साखळी जन्माच्या आधीपासून होती आणि पुढे मृत्यूनंतर देखील सुरूच राहणार. मृत्युसमयी चित्तप्रवाह आपल्या संस्कारपुंजासोबत ह्या जीवनाच्या अंतसमयी जणूकाही उभा ठाकलेला असतो. तो संस्कारपुंजरूपी चुंबक, समान धर्म असलेल्या सर्वात जवळ असलेल्या शरीराद्वारे आकर्षित होऊन त्यांची तशीच क्रिया पूर्वीप्रमाणे सुरू करू लागतो. हा क्रम तेव्हापर्यंत सुरूच असतो जोपर्यंत तृष्णेच्या क्षयामुळे ही संतति विश्रृंखलित होऊन निर्वाणास प्राप्त होत नाही. येणेप्रमाणे कर्म, कर्मफळ आणि जन्मान्तर होते.

जीवास नित्य मानल्यास पुष्कळसे दोष उद्‌भवतात. जे लोक पुनर्जन्मास मानतात आणि त्याच्यासोबत आत्मा नित्य असल्याचेही मानतात, तेव्हा त्यांच्या ह्या गोष्टी परस्पर विरोधी असतात. जर आत्मा नित्य असेल तर तो कुटस्थ (कधीही न बदलणारा, जसा आहे तसाच एकरस राहणारा) देखील असणार. मग जर अशा एकरस राहणाऱ्या वस्तूला परिशुद्ध मानले तर ती वस्तू जन्ममरणाच्या चक्रामध्ये कशी पडू शकेल ? जर अशुद्ध असेल, तर स्वभावतः अशुद्ध असल्यामुळे त्याची मुक्ती कशी होणार ? नित्य कुटस्थ असेल तर संस्काराची छाप त्यावर पडू शकणार नाही, असे आपण आधीच म्हटले आहे. जर छाप पडावयास मनाची आवश्यकता मानली, तर आत्म्यास मानावयाची आवश्यकताच कुठे उरते ?

असा प्रश्न उद्‌भवू शकेल की, जर मन आणि आत्मा एकच आहे, आणि तो 'क्षणिक आहे, तर मी आधी होतो, मी आता आहे' असे एकतेचे भान का होते ? याचे उत्तर असे की, समुदायामध्ये एकत्वाचा विचार, हा सृष्टीचा सार्वभौमिक नियम आहे. आपण सृष्टीतील कोणत्याही वस्तूचा विचार केला, तरी दिसते की, ती हजारो अणूंची बनलेही आहे; ज्यांच्यामध्ये बरेच अंतर आहे. ही गोष्ट लोखंड, हिरा, प्लॅटिनम - घनाहून घन वस्तूलादेखील लागू पडते. जर आपली दृष्टी अतिसूक्ष्म असती जर आपण त्या अणूंना तसेच वेगवेगळे बघू शकलो असतो, जसे घनदाट जंगलातील वृक्ष त्यांच्याजवळ गेल्याने दिसू लागतात. अगणित तुकड्यांनी बनलेल्या ह्या शरीरास आपण एकच शरीर म्हणतो. त्याचप्रमाणे जगातील सर्वच दृश्य पदार्थांमध्ये अनेकता असूनही त्या एकच असल्यासारखे समजून आपण वागत असतो.

जेथे शरीर आणि त्याचे अंश एकाच समयी उपस्थित असतात, तेथे मन प्रतिक्षणी एकानंतर दुसरे उत्पन्न होत राहते. ज्याप्रमाणे विजेच्या पंख्याचे पाते लवकर लवकर इतक्या सूक्ष्म काळात एका स्थानाहून दुसऱ्या स्थानी जाते की, त्याला आपण ग्रहण करू शकत नाही, त्याचप्रमाणे मनदेखील एवढ्या शीघ्रतेने आपल्या स्थानी दुसऱ्या मनास उपस्थित करीत असते की, त्यामधील अंतरास आपण ग्रहण करू शकत नाही. आश्चर्याची गोष्ट अशी की, साऱ्या सृष्टीमध्ये एक-एक म्हणवीत असणाऱ्या ह्या वस्तूंना समूहामध्ये बघितलेले पाहूनसुद्धा विचारणा होते - समूहित असेल तर आत्मा का बरे एकच असलेला दिसता ?

असा प्रश्न उद्भवू शकतो की, जर आत्मा क्षणिक असतो, दुसऱ्या क्षणी त्याचे अस्तित्वच नसते, तर त्याची पूर्णता आणि परिशुद्धी कशी काय ? त्याचे उत्तर असे की आपण जरी क्षणिक मानतो तरी त्याच्या संततीला क्षणिक मानीत नाही. गंगेचे पाणी, तिचा आधार, तिच्या दोन्ही थड्या आणि वाळू सर्वच नित्य बदलीत आहेत; तरीपण सर्वांचा प्रवाह कायम राहतो. (प्रवाह बनलेला असतोच; तिला आपण एका नांवाने गंगा असे म्हणतो). ह्या चित्त-संततीची परिशुद्धी व पूर्णता करावयाची असते. जेवढी चित्त-संतती मोह, द्वेष, इत्यादी मळांनी युक्त होते, तेवढीच त्या व्यक्तीची कायिक, वाचिक कर्मे परिशुद्ध होत जातात आणि फळस्वरूप ती व्यक्ती स्वकीय-परकीयांच्या उपकारास प्रेरित होते, आणि समर्थ होते. मुक्तीपर्यंत पोहोचण्यास माणसाला स्वतःच्या स्वार्थाच्या सीमेला पार करून लोकहिताकरिता सगळ्या गोष्टींचा त्याग करावा लागतो. तृष्णेचा त्याग म्हणजेच दुःखाच्या मार्गास अवरुद्ध करणे होय, कारण जगातील अधिकांश दुःखे तृष्णा आणि स्वार्थ ह्या कारणांमुळेच उद्भवतात.

येणेप्रमाणे, मन क्षणिक असूनदेखील, चित्त-संतती क्षणिक नसल्यामुळे (तो प्रवाह असल्यामुळे), त्याची पूर्णता आणि परिशुद्धी करावी लागते. वस्तुतः जर आत्म्यास कुटस्थ न मानता, त्याच्या ठिकाणी क्षणोक्षणी उत्पन्न होणाऱ्या चित्त-संततीला मानले तर शब्द-योजनेवर आमचा आग्रह नाही. कारण आत्मा या शब्दास नित्य चेतन वस्तू म्हणून योजिले जात असल्यामुळे, भ. बुद्धांनी अन्-आत्म शब्दास योजिले. (बौद्ध दर्शन : पृष्ठ ५)

**प्रश्न १९९ : भ. बुद्धांच्या शिकवणीचा मूळ सिद्धान्त कोणता ?**

टीप १२ : एकाचा विनाश झाला की त्यासोबतच दुसऱ्याची उत्पत्ती सुरू होते. ह्या नियमालाच भगवंतांनी प्रतीत्य-समुत्पादाचा नियम म्हटले आहे. (प्रतीत्यसमुत्पाद किंवा प्रत्यय समुत्पाद). प्रत्येक उत्पन्न होणाऱ्या वस्तूचा प्रत्यय आहे. प्रत्यय आणि हेतू (कारण) समानार्थक शब्द असल्याचे वाटते. परंतु प्रत्ययाचा अर्थ आहे उत्पाद; संपल्यावर उत्पाद म्हणजे एकाचा शेवट झाल्यावर, ते नष्ट झाल्यावर दुसऱ्याची उत्पत्ती. भगवंतांनी सांगितलेला प्रत्यय, अशा प्रकारचा हेतू आहे. (कारण आहे) जो कोणत्याही वस्तू किंवा घटनेच्या उत्पन्न होणाऱ्या आधीच्या क्षणीं नेहमीच लुप्त होतांना दिसतो. प्रतीत्यसमुत्पाद कार्यकारण नियमाचा अविच्छिन्न नव्हे तर विच्छिन्न प्रवाह असल्याचे सांगतो. (discontinuous continuity). प्रतीत्यसमुत्पादाच्या ह्याच विच्छिन्न प्रवाहाबद्दल पुढे नागर्जुनांनी आपल्या शून्यवादास विकसित केले.

प्रतीत्यसमुत्पाद भगवंतांच्या संपूर्ण तत्त्वज्ञानाचा आधारस्तंभच होय. त्यांचे तत्त्वज्ञान समजून घेण्याची ही गुरुकिल्लीच आहे. त्यांनी म्हटलेच आहे - "जो प्रतीत्यसमुत्पादास बघतो, तो धर्मास (= भ. बुद्धांच्या तत्त्वज्ञानास) बघत असतो. ज्याला धम्म दिसतो त्याला प्रतीत्यसमुत्पाद दिसत असतो". हे पाच उपादान स्कंध (रूप, वेदना, संज्ञा, संस्कार, विज्ञान) प्रतीत्यसमुत्पन्न (विच्छिन्न प्रवाहाप्रमाणे उत्पन्न) असतात. (बघावा - मज्झिम निकाय १/३/८).

प्रतीत्यसमुत्पादाच्या नियमाला मानवाच्या व्यक्तित्वास अनुलक्षून त्यांनी त्याची १२ अंगे असल्याचे सांगितले. जुन्या उपनिषदांचे तत्त्वज्ञ आणि इतर अनेक आचार्य नित्य धृव, अविनाशी तत्त्वास 'आत्मा' असे संबोधन करीत असत. परंतु भगवंतांच्या प्रतीत्य समुत्पादमध्ये आत्म्याच्या अस्तित्वास कसलेही स्थान नव्हते. म्हणून आत्मावादाला ते महा-अविद्या म्हणत असत. या गोष्टीला त्यांनी महातण्हा-संखय-सुत्तन्त मज्झिम निकाय १/४/८ द्वारे येणेप्रमाणे समजावून सांगितलेले आहे.

सती केवठपुत्राचा असा समज होता की, दुसरे नव्हे, हेच एक विज्ञान (जीव) संसरण - संधावन (आवागमन) करीत असते. भगवंतांनी तो सर्वथा चूक असल्याचे त्याला सांगितले; आणि भिक्खूंना समजावून सांगितले, ''भिक्खूंनो! ज्या-ज्या प्रत्ययामुळे विज्ञान (जीव-चेतना) उत्पन्न होते, तीच त्याची संज्ञा असते. चक्षूच्या निमित्ताने (जे) विज्ञान उत्पन्न होते, त्याची चक्षुविज्ञान हीच संज्ञा असते. याचप्रमाणे श्रोत्र-घ्राण-संज्ञा, रस, काया, मनविज्ञान संज्ञा असते. जसे ज्या-ज्या निमित्ताने (प्रत्ययाने) आग जळते, तिथे तिथे त्याची संज्ञा असते. काष्ठ-अग्नी, तृण''

''हे (पंचस्कंध) उत्पन्न झालेले आहेत. त्यांना नीटपणे प्रज्ञेने बघितल्यावर (आत्म्याच्या अस्तित्वाबद्दलची) शंका नष्ट होते. भिक्खूंनो! हे (पंचस्कंध = भौतिक तत्त्व आणि मन) निर्माण होतात. हे स्वतःच्या आहारामुळे निर्माण होतात. हे स्वतःच्या आहाराच्या निरोधामुळेच विरुद्ध होत असतात.''

अविद्या पुनः आपल्या चक्राची त्याच्या बारा अंगानिशी पुनरावृत्ती करते. ती अंगे अशी - १. अविद्या २. संस्कार ३. विज्ञान ४. नामरूप ५. सहा आयतनें (षडायतन, सहा इंद्रिये) ६. स्पर्श ७. वेदना ८. तृष्णा ९. उपादान (ग्रहण करावयाची इच्छा)
१०. भव (आवागमन) ११. जाती (जन्म) १२. जरामरण.

१. अविद्या........ : (बघावे बौद्ध दर्शन पृ. ३१)

**प्रश्न ६०४ : भगवंतांनी कोणत्या दहा गोष्टींना अकथनीय (अव्याकृत) म्हटलेलेआहे?**

टीप १३ : भगवंतांनी दहा गोष्टींना अकथनीय (अव्याकृत), म्हणजे ज्यांच्याविषयी चर्चा न करता गप्प राहणेच इष्ट आहे, असे सांगितले आहे. परंतु असे पुष्कळसे बौद्धिक बेइमानी करावयास आतुर झालेले भारतीय लेखक, भगवंतांच्या ह्या उपदेशाचा आधार घेऊन आणि त्याचा विपर्यास करून, असे म्हणू इच्छितात की, भ. बुद्ध आत्मा आणि ईश्वर या विषयासंबंधी गप्प राहिले होते. यास्तव ह्या गप्प राहण्याचा अर्थ असा घेऊ नये की, भ. बुद्धांनी त्या विषयांच्या अस्तित्वाविषयी इन्कार केलेला होता. हे भारतीय लेखक ह्या गोष्टीला लपवू पाहतात की, भगवंतांनी 'अव्याकृत' म्हटलेल्या गोष्टींची यादी 'उघडी' नव्हती की जिच्यामधे तुम्हाला वाटतील त्या कोणत्याही गोष्टींचा अंतर्भाव करता येईल. भगवंतांच्या 'अव्याकृत' यादीमधे केवळ दहाच गोष्टींचा अंतर्भाव आहे. ह्या गोष्टीमध्ये लोक (= जग) जीव-शरीर यांच्यातील भेद-साम्य तसेच मुक्त-पुरुषाच्या गतिविषयी गोष्टींचा अंतर्भाव आहे. (बघावा मज्झिम निकाय २/२/३)

क) लोक (= जग)
१. काय जग नित्य आहे ?
२. काय जग अनित्य आहे ?
३. काय जग अन्तवान आहे ?
४. काय जग अनन्त आहे ?
ख) जीव-शरीराची एकता
५. काय जीव आणि शरीर एकच आहे ?
६. काय जीव वेगळा आणि शरीर वेगळे आहे ?
७. काय मृत्यूनंतर तथागत (= मुक्त) होतात ?
ग) निर्वाणाच्या नंतरची स्थिती
८. काय मृत्यूनंतर तथागतांचे अस्तित्व नसते ?
९. काय मृत्यूनंतर तथागतांचे अस्तित्व असते आणि नसतेदेखील ?
१०. काय मृत्यूनंतर तथागतांचे अस्तित्व नसते, आणि अस्तित्व नसल्याचेही नसते ?

मालुंक्यपुत्राने भ. बुद्धांना ह्या दहा अव्याकृत (उघड न केलेल्या) गोष्टींविषयी प्रश्न केले होते -

"जर भगवान (ह्या गोष्टींना) जाणत असतील, तर त्यांनी त्या सांगाव्या. जर जाणत नसतील तर न जाणणाऱ्या, न समजण्याकरिता ही सरळ-सरळ (गोष्ट) आहे-(स्पष्टपणे म्हणावे) की, "मी जाणत नाही, मला माहीत नाही."

भगवंतांनी ह्याचे उत्तर देतांना स्पष्ट केले, "मी ह्या गोष्टींना अव्याकृत असल्याचे (यासाठी म्हटले), कारण ह्या (यांच्याविषयी म्हणणे) सार्थक नाही; भिक्खू-चर्ये (आदी ब्रह्मचर्य) साठी उपयोगी नाहीत (आणि) न ह्या गोष्टी निर्वेद (वैराग्य), निरोध ( शांती), परमज्ञान निर्वाणासाठी (आवश्यक) आहेत. म्हणून मी त्यांना अव्याकृत केले."

## सर सर्वपल्ली राधाकृष्णन यांची सारवासारव :

भ. बुद्धांच्या तत्त्वज्ञानामध्ये येणेप्रमाणे ईश्वर, आत्मा, ब्रह्म इत्यादी कोणत्याही नित्य गोष्टीला वाव नसूनसुद्धा, उपनिषद आणि ब्राह्मणग्रंथांचे जे तत्त्वज्ञान सत्-चित्-आनंद-यांच्या अगदी विरुद्ध तत्त्वांचे अ-सत् (अनित्य, प्रतीत्य, समुत्पन्न), अ-चित् (अनात्म), अन्-आनंद (दुःख) म्हणजेच अनित्य-अनात्म-दुःख या तत्त्वांची भगवंतांनी घोषणा केलेली असूनसुद्धा सर राधाकृष्णनसारखे हिंदू लेखक बेजवाबदारपणे खालीलं वाक्य लिहावयाची धृष्टता करतात. (बघावे Indian Philosophy Vol. 1, 1st edition p-355,378, 379, 385, 387, 389, 390, 471), तर ह्या गोष्टीला धर्मकीर्तीच्या शब्दांत सांगायचे झाल्यास "धिग् व्यापक तमः" असेच म्हणावे लागेल. सर राधाकृष्णन म्हणतात -

क) "त्यांनी (भ. बुद्धांनी) ध्यान आणि प्रार्थनेच्या मार्गास धरले". कोणाची प्रार्थना ?
ख) "भ. बुद्धाचे मत होते की फक्त विज्ञान (चेतना) क्षणिक असते, इतर गोष्टी नाही." काय म्हणावे, "सर्वच धर्म प्रतीत्यसमुत्पन्न आहेत."- ह्याची अशी व्याख्या करायची?
ग) "भ. बुद्धांनी जे 'ब्रह्म' विषयी स्पष्ट शब्दात होय किंवा नाही म्हटले, त्याला कोणत्याही प्रकारे परमसत्ता (ब्रह्म) च्या अस्तित्वाचा इन्कार म्हणता येत नाही. असे समजणे

कठीण आहे की भ. बुद्धांनी जगाच्या ह्या प्रवाहामधे कोणत्याही वस्तूला धृव (नित्य) म्हणून स्वीकार केले नाही; साऱ्या विश्वामधे होणाऱ्या अशांतीमध्ये (त्यांनी) कोणत्याही गोष्टीला विश्रामस्थळ मानले नाही. जेथे मानवाच्या अशांत हृदयाला शांती मिळू शकेल.''

याकरिता सर राधाकृष्णन यांनी बौद्ध निर्वाणाला 'परमसत्ता' मानून घेतले पाहिजे ह्याकरिता खूप प्रयत्न केलेले आहेत. परंतु बौद्ध निर्वाणाला आभावात्मक न मानता भावात्मक वस्तू मानल्या जाऊच शकत नाही. जेव्हा भ. बुद्ध शांतीच्या प्राप्तीसाठी प्रयत्नशील आत्म्यालाच अतिशय मूर्खतेची कल्पना (बालधर्म) समजतात, तर त्याच्या विश्रांतीकरिता शांतीचा ठाव केवळ राधाकृष्णनसारखे लोकच शोधू शकतात आणि आश्चर्य असे की, त्यांनी (सर राधाकृष्णन्) ह्या वचनालादेखील उधृत केले ते असे, ''हा निरन्तर प्रवाह किंवा घटना आहे, ज्यात काहीही नित्य नाही. येथे (विश्वामधे) कोणतीही वस्तू नित्य (स्थिर) नाही - ना नाम (विज्ञान) आणि ना ही रूप (भौतिक तत्त्व)'' (It is a perpetual process with nothing permanent. Nothing here is permanent neither name nor form) महावग्ग-विनय पिटक द्व द्व ३५)

घ) ''आत्म्यासंबंधी भ. बुद्ध गप्प राहिले त्याचे वेगळेच कारण होते........बुद्ध उपनिषदांत वर्जिलेल्या आत्म्यासंबंधी गप्प आहेत, ना त्याचा स्वीकार करतात, ना इन्कार.''

तसे नव्हे महाशय ! भ. बुद्धांच्या तत्त्वज्ञानाचे नावच अनात्मवाद आहे. उपनिषदामुळे धृव आत्म्यासोबत येथे 'अन्' लावलेले आहे. 'अनित्य, दुःख, अनात्म' ची गर्जना करणाऱ्याविषयी हे तुमचे उद्‌गार हेच सिद्ध करतात की, तुम्ही तत्त्वज्ञानाचा इतिहास लिहावयास सर्वथा अयोग्य आहात. ते पुढे अशी पुनरावृत्ती करतात -

''ह्या अन्तर्हित तत्त्वाशिवाय जीवनाची व्याख्याच केली जाऊ शकत नाही? त्यामुळे भ. बुद्ध नेहमीच आत्म्याच्या सत्यतेबद्दल जो निषेध होता, त्याचा ते इन्कार करीत राहिले.''

याला म्हणतात, ''मुखस्तीति वक्तव्यं दशहस्ता हरीतकी।'' आणि जर भ. बुद्धांच्या आमोरासमोर जाण्याचा प्रसंग आला असता तर राधाकृष्णन यांची काय गत झाली असती, हे जाणावयास मालुंक्य पुत्राच्या प्रसंगाचे वाचन करावे. (बघावे बौद्ध स्मृती दर्शन पृ. ४५)

**प्रश्न ६० : 'दुःखाबद्दलचे' आर्यसत्य ते कोणते ?**

टीप १४ : जीवनातली दुःखे येणेप्रमाणे -

१) स्थूल दुःखे - भूक, तहान, निवारा नसणे, वस्त्राभाव, मार लागणे, प्रिय व्यक्तीचा मृत्यू, व्याधी, वृद्धत्व, इत्यादी

२) विपरिणाम दुःखे - परीस्थिती बदलल्यामुळे होणारी दुःखे, जसे पोषक परिस्थिती बदलून दुःखद स्थिती प्राप्त होणे, मित्राने केलेले कपट, धन-वैभव नष्ट होणे, पद-अधिकार नष्ट होणे, प्रतिष्ठा समाप्त होणे, भाऊ-भाऊ, पती-पत्नी यांच्यात भांडण होणे, इत्यादी.

३) संस्कार दुःखे - चित्ताच्या (= मनाच्या) चेतनेमुळे उत्पन्न होणाऱ्या सर्वच कर्मांच्या फळस्वरूप सन्मुख येणाऱ्या वस्तू, व्यक्ती आणि परिस्थिती संस्कारामुळे उत्पन्न कर्मांपासून कोणाचीही सुटका होत नसते. संस्कार-दुःखाच्या अंतर्गत सर्वच प्रकारची

दुःखे येतात. ही दुःखे इतर सर्व दुःखापेक्षा सूक्ष्म असतात.

येणेप्रमाणे सृष्टीमधे दुःखाचे अस्तित्व आहे, ह्या गोष्टीला हे आर्यसत्य दृढतापूर्वक जाणते. It emphasis on the fact that sufferings exist in the world. (बघावी-दुःख मुक्ती की साधना, पृ. ३७२).

**प्रश्न १७८ (ब) : बौद्धधम्मासंबंधी कोणकोणत्या चुकीच्या गोष्टी काही लोकांनी प्रचलित केलेल्या आहेत ?**

टीप १५ : संक्षेपात त्या येणेप्रमाणे -

१) काही लोक म्हणतात की बौद्धधम्म हा धम्मच नव्हे ते केवळ एक तत्वज्ञान आहे. हा प्रश्न पाश्चात्य पंडितांनी मांडलेला आहे. वस्तुतः बौद्धधम्म जेवढा तत्त्वज्ञानमय आहे, तेवढाच तो 'धम्म' या संज्ञेसदेखील पात्र आहे. एवढेच नव्हे तर, धम्म, नीति आणि तत्त्वज्ञान या तिहींचा यांत सुंदर संगम आहे.

तो ह्या सृष्टीचे स्वरूप आणि तिला चालना देणाऱ्या शक्तींचे ज्ञान करवितो. माणसाला त्याच्या अंतस्थ नीतितत्त्वांचे ज्ञान करवितो आणि त्याच्या उन्नतीच्या पराकाष्ठेचा मार्ग दाखवितो. माणसाच्या गूढ नैतिक प्रवृत्तींवर प्रकाश टाकून, त्यांना जागृत करून, त्याला सन्मार्गाकडे घेऊन जातो.

लोकांची ही धारणा आहे की, माणसाच्या ज्ञानेंद्रियांच्या आकलन शक्तीच्या मर्यादेपलीकडे जे अज्ञेय आहे, त्याचे आकलन करविणे, हेच धम्माचे कार्य होय. म्हणून ते ईश्वर, अलौकिक चमत्कार, ईश्वरी कृपा, इत्यादिंना धर्माशी जोडतात.

२) बौद्धधम्म निरीश्वरवादी अर्थात नास्तिक आहे - ज्याच्या कृपेने वा इच्छेने हे सारे विश्व निर्माण झाले आहे, तो अस्तित्वांत आहे की त्याचा विनाश झाला आहे असा कोणी 'पुरुष', तो ईश्वर या अर्थाने बौद्धधम्म ईश्वराच्या अस्तित्वास नाकारतो.

बौद्धधम्म ख्रिश्चन लोकांच्याप्रमाणे पिता, पुत्र किंवा पवित्र आत्म्यास मानीत नाही. तो संभोग काय, निर्माण काय आणि धम्मकायेस मानतो. (विशेष माहितीकरिता बघावे - Buddhism and its critics by Paul Carus). बौद्धधम्म सांगतो की सृष्टीची निर्मिती किंवा क्षय ह्या गोष्टी अनादी आहेत. कोणत्याही समयी संपूर्ण सृष्टी नव्हे, परंतु तिचा एखादा भाग त्याच्या पूर्वसंचित कर्मानुसार नष्ट होऊन, त्या ठिकाणी नवीन भाग तयार होतो. कर्मानुसार अनुबंधित होणें, हेच, सृष्टीच्या उत्पत्तीचे कारण होय. कोण्या 'ईश्वराच्या इच्छेमुळे'' नव्हे. याचा अर्थ कोण्या मूर्तिमान व्यक्तीरूप परमेश्वरास (Personal God) बौद्धधम्म मानीत नाही.

भ. बुद्धांनी ईश्वराला प्रसन्न करावयाच्या ब्राह्मणी धर्माने दाखविलेल्या मार्गाचा त्याग करून शील आणि नीतियुक्त आचरणास प्राधान्य दिले. त्यामुळे तो धम्मच नव्हे, 'तो केवळ एक नास्तिक पंथ' आहे, असा आरोप बौद्धधम्मावर केला जातो. माणूस आपल्या सुख-दुःखाच्या कर्तृत्वाची जबाबदारी ईश्वरावर सोपवू इच्छितो, हे योग्य नाही. माणसाची एक स्वतंत्र इच्छाशक्ती आहे आणि आपल्या चांगल्या-वाईट कर्मांना तो जबाबदार आहे.

दुसरे कारण असे की ईश्वर श्रद्धागम्य (श्रद्धेने जाणता येणारा) आहे, असे इतर धर्म मानतात. परंतु बौद्धधम्म तिला अंधश्रद्धा समजून तिचा त्याग करतो. बौद्धधम्मामधे ज्ञानानेच श्रद्धेची जागा घेतलेली आहे. ह्या जगात दुःखे आहेत आणि त्या दुःखाचा नाश करायला पाहिजे आणि त्याचे उपाय मनुष्याच्या हाती आहेत. ह्यात ईश्वराचा संबंध कुठेही नाही. बौद्धधम्माची मनुष्याच्या कर्तृत्वावर आस्था आहे, म्हणून त्याला 'नास्तिक' म्हणणे चुकीचे आहे.

३) पुष्कळसे हिंदू म्हणतात की, बौद्धधम्म शून्यवादी आहे. आदी शंकाराचार्यांचे मतसुद्धा असेच होते. परंतु भ. बुद्धांनी शून्यवादाचा उपदेश कधीही केला नाही. शून्यवादाचा अर्थ आहे - हे सारे विश्व, सर्वच सचेतन सृष्टी शून्यातून निर्माण झाली आणि त्यांचा विलयदेखील शून्यातच होईल. परंतु भगवंतांनी सांगितलेले आहे की -

**सेय्यथापि भिक्खवे महासमुद्दो एकरसो लोणरसो,**
**एकमेव खो भिक्खवे अयं धम्मो एकरसो विमुत्तिरसो।। (उदान)**

अर्थ : भिक्खूंनो! ज्याप्रमाणे महासागर एकरस असतो, म्हणजे संपूर्ण पाणी खारटच असते, त्याचप्रमाणे धम्मदेखील विमुक्ती-रसमय आहे.

याचा अर्थ असा होतो की, धम्म ही आध्यात्मिक वस्तू आहे, आणि त्याचा उद्देश केवळ मुक्ती किंवा निर्वाण आहे. हे निर्वाण ह्याच जन्मी मिळविल्या जाऊ शकते. निर्वाणाची स्थिती अत्यंत सुखमय असते. तिचे वर्णन करणे कठीण असते. तिला केवळ अनुभवानेच जाणता येऊ शकते. निर्वाण म्हणजे शून्यत्व नाही. त्याचा अर्थ अविद्येचा नाश होणे; राग, द्वेष, मोह यांचा नाश होणे; कामतृष्णा, भवतृष्णा आणि विभवतृष्णेचा नाश होणे.

४) असे म्हटले जाते की, बौद्धधम्म पूर्ण प्रकारे निराशावादी (Pessimist) आहे; आणि दुःख भोगणे यांतच पुरुषार्थ आहे अशी शिकवण देतो. हे पूर्णपणे चूक आहे. बौद्धधम्म ह्या सत्याला उघड करून सांगतो की, जगात दुःखच दुःख आहे, आणि त्यासोबतच त्या दुःखापासून मुक्ती मिळविण्याचा मार्गदेखील दाखवितो. एवढेच नव्हे तर त्या मार्गावर चालणे हीच यशाची गुरुकिल्ली आहे. तो मार्ग आहे मनाच्या शुद्धीकरणाचा मार्ग. हाच मार्ग आर्य-अष्टांगिक मार्ग होय.

भगवंतांनी स्पष्टपणे सांगितले की जगातील दुःखापासून सुटका मिळवून घेण्यास देहदंडाचा, तपश्चर्येचा किंवा अरण्यात निवास करण्याचा मार्ग चुकीचा आहे. भगवंतांनी मध्यममार्गाची शिकवण दिली - देहदंडाला पूर्णपणे समर्पित न होता किंवा पूर्ण वासनामय आणि तृष्णामय मार्गाचा अवलंब न करता, मनास विकृतीपासून दूर ठेवीत आणि त्यावर यथार्थ दृष्टीने अंकुश लावीत, अष्टांगिक मार्गाने गेल्याने दुःखापासून मुक्ती मिळू शकते.

भगवंतांनी ह्या गोष्टीस पूर्णतः उघड करून सांगितले की, दुःखाची उत्पत्ती कोण्या ईश्वराच्या प्रकोपामुळे होत नसते. दुःखे माणसाच्या स्वतःच्या अविद्येमुळे निर्माण होतात. माणसाला त्याच्या कर्मांच्या अनुसार सुख किंवा दुःखाचा अनुभव येतो. आपल्या दुःखापासून मुक्ती मिळविण्याची गुरु किल्ली त्याच्या स्वतःजवळच असते आणि निराश व्हायची अजिबात गरज नाही. या उपदेशाद्वारे भगवंतांनी माणसाच्या मनात एक नवीन आशा, नवीन अपेक्षा आणि नवीन भवितव्याचा संचार केला आहे. हा आशावादी दृष्टिकोण आहे. (बौधसाइ

पृ. १८-२७)

**प्रश्न १७९ : बौद्धधम्म आणि इतर धर्मांमध्ये प्रमुखतेने कोणती भिन्नता आहे ?**

टीप १६ : बौद्धधम्माची विशेष लक्षणे येणेप्रमाणे -

१) इतर धर्मांची सुरुवात ईश्वराविषयी श्रद्धा आणि त्याच्याविषयी प्रीती यांनी होत असते. ईश्वर प्रत्यक्ष-रूपाने नसतोच, परंतु दुःख मात्र प्रत्यक्षतः दिसते. म्हणून भ. बुद्धांनी आपल्या धम्माचा प्रारंभ ईश्वरापासून न करता, जे प्रत्यक्ष आहे त्या दुःखापासून केला. ही गोष्ट त्यांच्या बुद्धिवैभवाची, सरळपणाची आणि अलौकिक धैर्याची साक्षच आहे. दुःखापासून प्रारंभ करीत, दुःख-परिहाराच्या मार्गाचा शोध करवीत त्यांनी जीवनाच्या सर्वोच्च सुखाच्या प्राप्तीचा (निर्वाणाचा) मार्ग दाखविला. याहून अलग म्हणजे अज्ञात, अगम्य, अचिंत्य क्षेत्रांमधे जसे - प्रकृती, पुरुष, चेतन, अचेतन, पंचतन्मात्र, लिंगदेह यांच्या आदी किंवा अंत इत्यादिंच्या गोंधळात ते कधीही पडले नाहीत. भगवंतांचा मार्ग व्यावहारिक होता. त्यांचा धर्म मानवी आहे, दैवी नाही.

२) दुसरे लक्षण असे की - बौद्धधम्म बुद्धिविशिष्ट आहे; श्रद्धा-विशिष्ट नाही. म्हणजेच तो अंधश्रद्धेस मानीत नाही. त्यामध्ये श्रद्धेची जागा ज्ञानाने घेतली आहे. भगवान बुद्धांचे उपदेश आणि त्यांची मते मी मान्य करतो किंवा मी त्यांचा अनुभव करू इच्छितो, एवढेच कारण बौद्धधम्माचा स्वीकार करावयास पुरेसे आहे. इतर धर्मांचे ध्येय स्वर्गप्राप्ती असते किंवा परमात्म्याशी मीलन परंतु बौद्धधम्माचे ध्येय केवळ दुःखापासून मुक्ती हेच आहे. ध्येय अलग असल्यामुळे, त्यांच्या प्राप्तीची साधने आणि मार्गदेखील वेगळीच आहेत.

३) बौद्धांना ज्ञानजन्य श्रद्धा पूर्णतः मान्य आहे. ज्यांची श्रद्धा विशिष्ट धर्माने प्रेरित आहे, ते लोक स्वतःच्या ग्रंथांना ईश्वरप्रणीत मानतात. बौद्धधम्म म्हणतो सर्वच गोष्टी कर्मफळाने अनुबंधित आहेत, त्यामुळे इतर धर्ममतांकडे तो साक्षीभावाने बघतो; ना त्यांचा विरोध करतो, ना त्यांना अंधश्रद्धापूर्वक मान्य करतो. ही गोष्ट इतर धर्ममतांच्या विषयी त्याच्या उदारतेच्या व्यवहाराचे गमक आहे, आणि अत्यंत प्रशंसनीय लक्षण आहे.

४) चवथे लक्षण असे की, बौद्धधम्माच्या धार्मिक मतांचा शास्त्रीय तत्त्वांशी उत्तम मेळ बसतो. भौतिक सृष्टीच्या नियमांना नैतिक सृजन करावयास लागू करणें, हाच धर्माचा मुख उद्देश होता. बौद्धधम्माचा सृष्टीच्या शास्त्राशी कसलाही, कोठेही विरोध नाही. काळक्रमानुसार ज्ञानाची जसजशी वृद्धी होईल, तसतसे लोक बौद्धधम्माकडे अधिकाअधिक आकृष्ट होतील. या धम्मामध्ये ज्ञान आणि श्रद्धा यांचा उत्तम संगम आहे, त्यामुळेच येथे धर्मांधतेचा पागलपणा दिसत नाही.

५) पाचवे लक्षण असे की, बौद्धधम्मामध्ये धर्ममताकरिता कसलाही दुराग्रह नाही. ज्याप्रमाणे गणिताचे सिद्धान्त अबाधित आणि तर्कशुद्ध असतात, तसेच बौद्धधम्माचे सिद्धान्त आहेत. त्यांच्यात मतभेदांकरिता वाव नाही. जे तर्कसंगत नसेल, युक्तिसंगत नसेल, अनुभवसिद्ध नसेल, उदारतापूर्ण नसेल किंवा जे रहस्यमय असेल अशा गोष्टीची देशना (= धर्मोपदेश) भगवंतांनी दिलीच नाही. त्यांनी 'गुरुमुष्ठी' म्हणजे ज्या गोष्टीची

गूढता केवळ गुरूलाच माहीत असते, अशी कोणतीही गोष्ट ठेवली नाही, सर्व गोष्टींना प्रकटपणे सांगितले. गौप्य-गोपनीय गोष्ट बौद्धधम्मात त्याज्य आहे. त्याचे धम्मसंस्कार, धम्मचर्चा खुलेपणाने, स्पष्टपणे होतात.

६) सहावे लक्षण असे की, बौद्धधम्म व्यक्तिस्वातंत्र्याचा अतिशय अभिमानी आहे. धर्मासंबंधी कोणत्याही व्यक्तीला पूर्ण स्वातंत्र्य असायलाच पाहिजे. कोणतीही गोष्ट तिच्यावर थोपली जाऊ नये (= सक्ती होऊ नये) ह्या गोष्टीला तो पाठिंबा देतो. मनाचे परिवर्तन न झाल्यास, केवळ बाह्य आचरणास महत्त्व देणें, ही मोठीच चूक आहे, असे बौद्धधम्म मानतो. चित्तशुद्धीला प्राधान्य दिले गेले आहे, त्यामुळे केवळ सन्मार्ग दाखवावयाचे कार्य करायला पाहिजे; आणि त्या मार्गावर कोणी चालो वा न चालो, हे त्याच्यावर सोडून द्यायला पाहिजे.

७) सातवे विशेष लक्षण आहे ते अहिंसा तत्त्वाचे. अहिंसेचा अर्थ केवळ मांसाहार नसलेले जेवण किंवा पशूक्लेशांचे निवारणच नसते. ह्या जगात प्राण्यांशी अद्वैतभावाने राहणे, इतरांच्या दुःखात आपण सहभागी होणे, इतरांच्या सुखामध्ये आपले सुख मानणे असा अहिंसेचा विस्तृत अर्थ आहे. हिलाच 'विश्वबंधुतेची' संज्ञा दिलेली आहे. अहिंसेचा अशा तऱ्हेचा विस्तृत अर्थ इतर कोणत्याही धर्मांत नाही. या अहिंसेच्या अर्थाला भगवंतांनी व्यवहाराच्या सर्वच अंगांमध्ये सिद्ध करून दाखविलेले आहे. भूतदया आणि करूणेचे महत्त्व अधिक आहे.

परंतु जेथे अहिंसेला प्राधान्य दिलेले आहे, तेथे जर धम्म आणि नीति यांच्या रक्षणाकरिता हिंसेचा वापर करणे अत्यंत आवश्यक असेल, तेव्हा धम्मसैनिक होऊन, धैर्याने लढले पाहिजे, असा महत्वपूर्ण उपदेश भगवंतांनी सिंह नावाच्या सेनापतीस दिला होता. म्हणूनच त्यांनी राजसेवकांना (सरकारी नोकरी करणाऱ्यांना) बौद्ध भिक्खूची प्रव्रज्या द्यावयास मनाई केली होती.

८) आठवे लक्षण असे की, बौद्धधम्म ईश्वराच्या अस्तित्त्वास मानीत नाही. 'मनुष्य स्वतःच आपला स्वामी आहे' ह्या सिद्धान्तास तो मानतो. तो दैववादास मानीत नाही.

९) नववे लक्षण असे की, तो आत्म्याच्या अस्तित्वास मानीत नाही. म्हणून आत्म्यास 'नित्य' मानण्याचा प्रश्नच नाही. आत्म्यास नित्य मानल्यास त्याच्या परिशुद्धिसाठी वावच राहणार नाही. बौद्धधम्म मनाच्या अस्तित्वास मानतो व त्याला सतत परिशुद्ध करीत रहावे, अशी शिकवण देतो.

१०) दहावे लक्षण असे की, बौद्धधम्म कोणत्याही ग्रंथास स्वतःप्रमाण मानीत नाही, तो बुद्धि आणि अनुभव यांना प्रमाण मानतो.

या विशेष लक्षणांद्वारे ही गोष्ट स्पष्टपणे उघड होते की, भ. बुद्धांचा धम्म पूर्णपणे व्यावहारिक दृष्टिकोणाने ओतप्रोत होता. (बघावे - बौधसाइ पृ. १९०).

* * * *



**कीर्ती पाटील**

यांचा बालपणापासूनच सामाजिक कार्याशी संबंध आला. त्यांचे आजोबा विठोबा रावजी मूनपंडे आणि वडील भानुदास विठोबा मून हे तर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या कार्यात सहभागी होतेच, परंतु सासरचे लोकही समाजसेवी कार्यकर्ते होते. त्या स्वत: नागपूर येथे १९४२ मध्ये भरलेल्या अखिल भारतीय अस्पृश्य महिला परिषदेच्या स्वागताध्यक्षा होत्या. शिक्षिकेच्या व्यवसायातून सेवानिवृत्त झाल्यावर धार्मिक वाचनात आणि लेखनांत आपल्या वेळेचा सदुपयोग करण्याचा उपक्रम त्यांनी सुरू केला. ''द गॉस्पेल ऑफ बुध्दा'' हया पॉल कॅरस नावाच्या अमेरिकन लेखकाच्या जगप्रसिध्द इंग्रजी ग्रंथाचे ''तथागताची सत्यगाथा'' हे सुलभ मराठी भाषांतर प्रकाशित करून त्यांनी मराठी जनतेस सोप्या व सरळ भाषेत बौध्द तत्त्वज्ञानाची ओळख करून दिली.

त्यानंतर बौध्दांच्या मूळ पाली प्रार्थनांचे काव्यमय मराठी भाषांतर तसेच संस्कार पाठ, चालीरीती, सणवार व तीर्थस्थळांची माहिती देणारे ''बौध्द जीवनचर्या'' नावाचे पुस्तकही त्यांनी प्रकाशित केले. त्यानंतर "सीतेचा परित्याग" हे तिसरे पुस्तक हिंदीतून मराठीत भाषांतरीत केले.

बौध्दधम्म आणि त्याविषयीचे तत्त्वज्ञान याविषयी सामान्य जनतेमधे नानाविध शंकाकुशंका आणि कुतुहल आहे. तथापि तथागताने सांगितलेला धम्म हा विज्ञानावर आधारीत आहे. यास्तव ''बौध्दधम्म जिज्ञासा'' या १९९७ साली त्यांच्या ७५ व्या वाढदिवशी प्रकाशित केलेल्या त्यांच्या चवथ्या पुस्तकातून सोप्या, सुलभ प्रश्नोत्तरांच्या माध्यमातून, अनेक शंकाकुशंकांचे निरसन करण्याचा अल्पसा प्रयत्न करण्यात आला.

सुहृद वाचकाच्या आग्रहास्तव सुधारून वाढविलेली ही द्वितीय आवृत्ती सादर करीत आहोत.

*"Wherever the Buddha's teachings have flourished,*

*either in cities or countrysides,*

*people would gain inconceivable benefits.*

*The land and pepole would be enveloped in peace.*

*The sun and moon will shine clear and bright.*

*Wind and rain would appear accordingly,*

*and there will be no disasters.*

*Nations would be prosperous*

*and there would be no use for soldiers or weapons.*

*People would abide by morality and accord with laws.*

*They would be courteous and humble,*

*and everyone would be content without injustices.*

*There would be no thefts or violence.*

*The strong would not dominate the weak*

*and everyone would get their fair share."*

~THE BUDDHA SPEAKS OF
THE INFINITE LIFE SUTRA OF
ADORNMENT, PURITY, EQUALITY
AND ENLIGHTENMENT OF
THE MAHAYANA SCHOOL~

# DEDICATION OF MERIT

May the merit and virtue
accrued from this work
adorn Amitabha Buddha's Pure Land,
repay the four great kindnesses above,
and relieve the suffering of
those on the three paths below.

May those who see or hear of these efforts
generate Bodhi-mind,
spend their lives devoted to the Buddha Dharma,
and finally be reborn together in
the Land of Ultimate Bliss.
Homage to Amita Buddha!

NAMO AMITABHA
南無阿彌陀佛

【印度文 MARATHI 文: 佛學問答 750 則】
財團法人佛陀教育基金會　印贈
台北市杭州南路一段五十五號十一樓
Printed and donated for free distribution by
**The Corporate Body of the Buddha Educational Foundation**
11F., 55 Hang Chow South Road Sec 1, Taipei, Taiwan, R.O.C.
Tel: 886-2-23951198 , Fax: 886-2-23913415
Email: overseas@budaedu.org
Website:http://www.budaedu.org

Printed in Taiwan
4,000 copies;October 2012
IN040-10793